


॥ ॐ नमो भगवते श्रीरामदासाय ॥




## श्रीरामदाससंप्रदाय, श्रीसूर्यदेवमठ, हनुमानगड, वर्धा.

[ श्री ] ह्या **संस्थेची स्थापना** शके १८२५ वैशाख कृष्ण सप्तमी सोमवार ता० १८ मे १९०३ ला झाली.

[ गुरु ] ह्या **संस्थेचे गुरुदेव** भावी मनु श्रीसद्गुरु समर्थ रामदासस्वामी असून **उपासना** श्रीमारुतीची आहे. कलापग्रामीं श्रीनरनारायणाश्रमीं चंद्रवंशांतील राजर्षि देवापि यांसह तीव्र पण शांत तप करीत असणारे सूर्यवंशांतील शेवटचे राजर्षि भगवान् श्रीमरुदेव ह्यांच्या व इतर महर्षि-देवर्षींच्या द्वारें श्रीरामसेवेचें अतिपवित्र कार्य तरी हेच श्रीमारुतिराय करीत आहेत.

[ रा ] ह्या **संस्थेचे उद्देश** पुढील प्रमाणें आहेतः—

(श्री) सकल स्थावरजंगमविश्वाला अंतर्बाह्य व्यापून असणाऱ्या **श्रीरामाची प्राप्ती** करून घेणें.

(श्लोक) 'यं शैवाः समुपासते **शिव** इति **ब्रह्मेति** वेदान्तिनः ।
**बौद्धा** बुद्ध इति **ह्यहूर** इति वा झोरोस्टरस्यानुगाः ॥
**जेहोवे**ति यहूदिनो **जिन** इति ध्यानस्थतीर्थकराः ।
ख्रिस्ता **येशुरि**ति **प्रभुः** स विजयेत् तुर्कस्य **ह्यल्लाभिधः** ॥'

'शैवांना **शिव** वाटतो, गमतसे जो **ब्रह्म** वेदान्तिकां ।
बौद्धां **बुद्ध** गमे, **अहूर** भगवान् त्या पारसी नैष्ठिकां ॥
**जेहोवा** यहुद्यासही, **जिन** बने जैनांचिया मंदिरीं ।
**येशू** ख्रिस्तिजनां प्रभू विजयि तो तुर्कांस **अल्ला** हरी ॥'

'रमन्ते योगिनोऽनन्ते सत्यानन्दे चिदात्मनि ।
इति **राम**पदेनासौ परब्रह्माभिधीयते ॥'

(रामतापनीयोपनिषत्)

(रा) **सर्वभूतीं भगवद्भाव** ह्मणजे विश्वबंधुत्व वाढविणें.

(ओव्या) 'सर्वभूतीं भगवंत पाहीं । भूतें भगवंताचे ठायीं ।
हें अवघे देखे जो स्वदेहीं । स्वस्वरूपें पाहीं स्वयें होय ॥२.६४४॥
जनीं जनार्दन एक । जाणे तो सुटला निःशेख ।
हेंचि नेणोनियां लोक । गुंतले अनेक भवचक्रीं ॥३१.५६३॥'

(श्रीएकनाथी भागवत)

(म) श्रद्धापूर्वक व मननपूर्वक **धर्मग्रंथांचें अध्ययन** करणें.

(श्लोक) श्रद्धावान् लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ (गीता ४.३९)

(ओव्या) 'प्रज्ञेविण अर्थ न कळे । विश्वासेंविण वस्तु नाकळे ।
प्रज्ञाविश्वासें गळे । देहाभिमान ॥ ८.६.४७ ॥
सावध साक्षेपी विशेष । प्रज्ञावंत आणि विश्वास ।
तयास साधनीं सायास । करणेंचि नलगे ॥ ४९ ॥
सत्संगावरी श्रवण । तेणें कळे निरूपण ।
श्रवणें होईजे आपण । तदाकार ॥ ७.८.९ ॥
श्रवणाचा विचार कळे । तरीच भाग्यश्री प्रकटे वळें ।
मुख्य परमात्माच आकळे । स्वानुभवासी ॥ ३८ ॥
श्रवणापरीस मनन सार । मननें कळे सारासार ।
निजध्यासें साक्षात्कार । निःसंग वस्तु ॥ ११.१.४१ ॥'

(श्रीदासबोध)

'तरी अवधान एकलें दीजे । मग सर्वसुखासि पात्र होइजे ।
हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइका ॥ ९.१ ॥' ( श्रीज्ञानेश्वरी )

परमतसहिष्णुता बाळगून विश्वांतील गूढतत्त्वांचा एकत्र जमून धर्मग्रंथांच्या साहाय्यानें अभ्यास करावा, कोणत्याही धर्माची किंवा संप्रदायाची निंदा न करितां त्यांतील सत्य गोष्टींचा शांतपणें व बंधुप्रेमानें विचार करावा, व 'एक एका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥' या संतोक्तीप्रमाणें व्यक्तिद्वेष, निंदा किंवा वितंडवाद ह्यांना वगळून आत्मोन्नतीच्या बिकट मार्गाचा जिना श्रीरामस्मरणपूर्वक यथाशक्ति चढावा हें या संप्रदायाचें धोरण आहे.

( दा ) **हरिकथानिरूपण** व **भगवन्नामसंकीर्तन** यांचा सार्वत्रिक प्रसार करण्यास झटणें.

( श्लोक ) 'हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम् ।
कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥' ( नारदोक्ति )
'संकीर्त्यमानो भगवाननन्तः श्रुतानुभावो व्यसनं हि पुंसाम् ।
प्रविश्य चित्तं विधुनोत्यशेषं यथा तमोऽर्कोऽभ्रमिवातिवातः ॥'
( भागवत १२-१२-४७ )

( स ) उपासनेचें पाठबळ व साधुसंतांचे आशीर्वाद घेऊन **सनातन धर्माची सेवा व परोपकार** करणें.

( श्लोक ) 'परोपकृतिकैवल्ये तोलयित्वा जनार्दनः ।
गुर्वीमुपकृतिं मत्वा ह्यवतारान् दशाग्रहीत् ॥'

[ म ] ही संस्था प्रथमपासून **केवळ धार्मिक** असल्यामुळें हिचा **राजकीय चळवळीशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं.**

[ दा ] धर्मोन्नति व आत्मोन्नति करूं इच्छिणाऱ्या **कोणाही व्यक्तीस** वरील उद्देश मान्य असल्यास योग्यमार्गानें संप्रदायांत येण्याची मोकळीक आहे. याविषयीं वर्ण, लिंग, जाति, पंथ व धर्म यांची आडकाठी मुळींच नाहीं.

[ स ] ह्या संस्थेचीं **सारभूत वचनें** पुढील आहेतः—

( श्री ) 'न बोलें मना ! राघवावीण कांहीं ।
जनीं वाउगें बोलतां सौख्य नाहीं ॥
घडीनें घडी काळ आयुष्य नेतो ।
देहांतीं तुला कोण सोडूं पहातो ॥'

( रा ) 'उपासनेला दृढ चालवावें । भूदेवसंतांसि सदा लवावें ॥
सत्कर्मयोगें वय घालवावें । सर्वांमुखीं मंगल बोलवावें ॥'

( म ) 'सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।
भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥' ( भागवत )

(दा) 'सत्समागम सच्छास्त्रश्रवण । दया क्षमा उपरति भजन ।
निंदा वाद द्वेष गाळून । विष्णुचिंतन करीन मी ॥'
(श्रीधर-रामविजय)

(स) 'रामदास्य घडे ज्यांला । ते सर्वत्र रामदास हो,' (श्रीसमर्थ).



**जय जय रघुवीर समर्थ.**

**श्रीसूर्यदेवमठाचीं सांप्रदायिक तत्त्वें:—**

(श्री) **आमचें ध्येय**–सर्वभूतीं भगवद्भाव अथवा श्रीरामाची प्राप्ति.

(रा) **आमचीं ध्येयप्राप्तीचीं मुख्य साधनें**–भगवंताचें गुणश्रवण, कीर्तन व स्मरण.

(म) **आमचें चिंतन:—**

'सर्वेऽपि सुखिनः संतु सर्वे संतु निरामयाः ॥
सर्वे भद्राणि पश्यंतु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥'
(अर्थ) सर्व लोक सुखी व निरोगी असोत, सर्वांना कल्याणांची प्राप्ति होवो व कोणीही दुःखी नसो.

(ज) **आमची उपासनापरंपरा**–

'स्वरूप संप्रदाय अयोध्या मठ । जानकी देवी रघुनाथ दैवत ।
मारुती उपासना नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासें. ॥'
'जानकी आमची माता । रघुनाथ पिता तसा ।
राघवाचे भक्त बंधु । अयोध्या भुवनत्रय. ॥'
'श्रीरामदास मरु मारुति राम । सूर्यवंशविश्रामधाम ॥'

**(य) आमचे कित्ते**-श्रीरामदास, श्रीज्ञानेश्वर, श्रीएकनाथ, श्रीनामदेव, श्रीतुकाराम, श्रीकबीर, श्रीचोखामेळा, श्रीरोहिदास, श्रीतुलसीदास, श्रीनानक, श्रीचैतन्य, श्रीझोरोस्टर, श्रीखाइस्ट, श्रीमहंमद, श्रीशंकराचार्य, श्रीरामानुजाचार्य, श्रीमध्वाचार्य, श्रीवल्लभाचार्य, श्रीनिंबार्काचार्य, इत्यादि विश्वकुटुंबी संत.

**(रा) आमचा धर्म-**

'अद्रोहः सर्वभूतेषु कर्मणा मनसा गिरा ॥
अनुग्रहश्च दानञ्च सतां धर्मः सनातनः ॥' (भारत-शांति०)

कायावाचामनांनीं प्राणिमात्रांवर अद्रोह ह्मणजे प्रेम करणें, त्यांच्यावर अनुग्रह करणें व त्यांना दान करणें हा साधूंना मान्य असा सनातनधर्म होय.

**(म) आमचें कर्मः**—सनातनधर्माची सप्रेम सेवा व परोपकार.

**(ज) आमचा देश व आमची देशसेवाः**—श्रीरामानें व्यापिलेलें सर्व विश्व आमचा देश असून 'रामकथा ब्रह्मांड भेदून न्यावी ॥' (श्रीदासबोध. १२-९-२६) ही आमची देशसेवा.

**(य) आमची भाषा व आमचे प्रमाण ग्रंथ**-अध्यात्माचे व विश्वबंधुत्वाचे उदात्त विचार व्यक्त करणारी कोणतीही भाषा व तशा प्रकारचे विचार व्यक्त करून ईश्वरप्राप्तीचा मार्ग दाखविणारा कोणत्याही धर्मातील कोणताही ग्रंथ.

'जेथें निरूपणाचे बोल । आणि अनुभवाची ओल ।
तें संस्कृतापरिस खोल । अध्यात्मश्रवण ॥'
(श्रीदासबोध ७-१-५३)

---

१ टीपः-सनातनधर्माची मुख्य तत्त्वें अशीं आहेतः-

**(श्री)** सर्वांतर्यामी एकमेवाद्वितीय श्रीराम

'ब्रह्मा विष्णु आणि हर । त्यांसी निर्मिता तोचि थोर ।
तो ओळखावा परमेश्वर । नाना यत्नें ॥ ६-१-१२ ॥' (श्रीदासबोध)

**(गु)** श्रीदेवीच्या साहाय्यानें त्रिमूर्तिरूपानें रामाचें असंख्य विश्वसमूहांत व्यक्तीकरण.

**(रु)** इंद्र, वायु, अग्नि, वरुण, कुबेर इत्यादि अधिकारी देवांची परंपरा.

**(रा)** विश्वोद्धारार्थ ईश्वराचें अवतारग्रहण.

**(म)** कर्म, यज्ञ व पुनर्जन्म.

**(दा)** मानवी जीवांची स्वोद्धारार्थ त्रिलोकींत भ्रमंती.

**(स)** सर्वभूतीं भगवद्भाव अथवा विश्वबंधुत्व.

'जेणें परत्र साधन । जेणें ग्रंथें होय ज्ञान ।
जेणें होईजे पावन । या नांव ग्रंथ ॥' (श्रीदासबोध ७·९-३४)
'संस्कृता किंवा प्राकृता । भाषा जाली जे हरिकथा ।
ते पावनचि तत्वता । सत्य सर्वथा मानली' ॥
(श्रीएकनाथी भागवत १·२९)

(ज) **आमचे मार्गः**–कर्म, भक्ति व ज्ञाव.

(य) **आमचीं स्फूर्तीचीं शब्दत्रिकुटें:**–(१) श्रद्धा, आशा व यत्न; (२) ऐक्य, प्रेम व सेवा.

(रा) **आमचे कांहीं उघड मंत्रः**–

'श्रीराम जयराम जयजयराम' । 'रामकृष्णहरि' ।
'हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥'
'श्रीगुरु जयगुरु जयजयगुरु' । 'श्रीगुरुदेवदत्त' ।
'ॐ नमो भगवते वासुदेवाय' । 'ॐ नमः शिवाय' ।

(म) **आमचें ब्रीदः**–देव, देशिक व देशाधिपति ह्यांच्या ठिकाणीं सप्रेम निष्ठा ठेवणें.

'आयुष्य हेचि रत्नपेटी । माजी भजनरत्नें गोमटीं ।
ईश्वरीं अर्पूनियां लुटी । आनंदाची करावी ॥ ३-१०-२७ ॥
परमार्थाचें जन्मस्थान । तेंचि सद्गुरूचें भजन ।
सद्गुरुभजनें समाधान । अकस्मात बाणें ॥ ७-१०-३८ ॥
असो जयासी मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा ।
सद्गुरुविण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ५-१-४४ ॥
कोणे एक ग्रामीं अथवा देशीं । राहणें आहे आपणाशीं ।
न भेटतां तेथल्या प्रभूशीं । सौख्य कैचें ॥ ६-१-२ ॥
म्हणोन ज्यास जेथें राहणें । तेणें त्या प्रभूची भेटी घेणें ।
म्हणजे होय श्लाघ्यवाणें । सर्व कांहीं. ॥६-१-३॥' (श्रीदासबोध)

वैशाख कृष्ण सप्तमी,
शके १८४७ गुरुवार;
ता. १४ मे १९२५
हनुमानगड, वर्धा.

सर्वस्वीं श्रीसद्गुरुचरणांचाच
अत्यंत कनिष्ठ सेवक,
**श्रीरामदासानुदास.**

# THE KEKAVALI

OF

# MOROPANTA.

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

*"The greatest poet is the one who selects the best, the most appropriate Symbols to convey the best, the highest, the sublimest thoughts. The highly and purely poetic is the sudden bursting into blossom of a great and tender thought."*

*( A CRITIC ON WALT WHITMAN. )*

---

**FOURTH EDITION.**

**Part II— Life of Moropant with appendixes**

---

*EDITED WITH*

Full, Critical & Copious Examples of Sentiments & fine passages.

BY

## SHRÎ RÂMADÂSÂNUDÂS,

**(SHRÎDHAR VISHṆU PARÂNJPEY, B. A.)**

**(Sometime Professor of Mathematics, Hislop College, Nagpur).**

SHRÎ SURYADEV MATHA, HANUMÂNAGAD, WARDHÂ.

**PUBLISHED**

BY

PÂNDURANG JÂWAJÎ,

PROPRIETOR OF THE "NIRṆAYA-SÂGAR" PRESS,

**Bombay.**

1925.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# केकावलि.



'या ग्रंथा आदरतिल जे हरिहरदास साधु सुरसिक ते; ।
वाटे नरलोकीं जरि असते, तरि परिसतांचि सुर सिकते.' ॥
(स्वर्गारोहणपर्व २.३३)

## भाग दुसरा.

(मोरोपंतांचें चरित्र व काव्यविवेचन तेरा परिशिष्टांसह)

हें काव्य

श्रीरामदासानुदास

(प्रो० श्रीधर विष्णु परांजपे, बी. ए.)

श्रीसूर्यदेवमठ, हनुमानगड, वर्धा.

ह्यांनीं

चरित्रविषयक विपुल माहिती, काव्यगुणदोषविवेचन, वत्सल, प्रेयान् व भक्ति यांसह नवरसांचीं भरपूर उदाहरणें, उत्कृष्ट निवडक उतारे, इतर कवींशी तुलना, इत्यादि प्रकरणें व महत्वाचीं तेरा परिशिष्टें यांसह तयार केलें.

तें

मुंबईत,
निर्णयसागर छापखान्याचे मालक पांडुरंग जावजी
यांनीं प्रसिद्ध केलें.

आवृत्ति ४ थी.] [इ. स. १९२५.

## लक्ष्मीनारायण.



(ओवी) विष्णुशर्मा पिता निश्चिती । अन्नपूर्णा तयाची शक्ती ।
हीं तों आदिपुरुषमूळप्रकृती । मातापिता वंदिलीं ॥

* ॐ स्वस्ति श्रीमातापितृभ्यां नमः *

## शेषशायी.





# ग्रंथसमर्पण.



'मातृदेवो भव । पितृदेवो भव ।'

( तैत्तिरीयोपनिषद् , शिक्षाध्याय. )

(ओव्या) 'विष्णुप्रभाप्रतापकिरणीं । मातें प्रसवली अन्नपूर्णा जननी ।
थोर भाग्य माझे जनीं । वैष्णवकुळीं जन्म झाला ॥
अज्ञानरात्रीं निद्रिस्त असतां । थापटुनी त्यांनीं हातां ।
आळवुनी श्रीगुरुसमर्था । मज रामदासपायीं अर्पिलें ॥'

**माझी परमप्रिय माता**

**कै० ती० सौ० वज्रचूडेमंडित अन्नपूर्णाबाई परांजपे,**

( निर्याण—आश्विन शुक्ल पंचमी शके १८२१, इ. स. ९ आक्टोबर १८९९ सोमवार )

**माझे परमप्रिय तीर्थरूप**

**कै० ती० रा० रा० विष्णु नारायण परांजपे,**

(जन्म—पौष कृष्ण दशमी शके १७६४, शुभकृत् संवत्सर, बुधवार)

( निर्याण—आश्विन शुक्ल अष्टमी शके १८२१, इ. स. १२ आक्टोबर १८९९ गुरुवार )




तसेंच

# भावी मनु

श्रीसद्गुरुसमर्थ रामदास स्वामी.

* ॐनमो भगवते श्रीरामदासाय *





'आचार्यदेवो भव'।

( तैत्तिरीयोपनिषद्, शिक्षाध्याय. )

तसेंच

माझे जन्मोजन्मींचे आत्मीय सद्गुरु

परम कारुणिक सनातन गुरुदेव

**कैवल्यकलापधामवासी**

**भावी मनु**

**सकलतीर्थरूप भगवान् समर्थ श्रीरामदासस्वामी,**

( अवतारारंभ–चैत्र शुक्ल नवमी शके १५३० रविवार )

( अवतारसमाप्ति–माघ वद्य नवमी शके १६०३ शनिवार )

**या तिघांच्या परमपूज्य चरणकमलांस**

हें मोरोपंतकवीचें चरित्र

**त्यांच्या पुत्रानें**

अत्यंत सन्मानपुरःसर व भक्तिपूर्वक

**अर्पण केलें आहे.**

चरणरजकिंकर,

**श्रीरामदासानुदास.**

( जन्म–शके १७९३ अधिक भाद्रपद शुक्ल त्रयोदशी सोमवार ता० २८.८.१८७१ )

(गीति) "श्रीरामदास मेघचि, करितो हा दास मोरसा नाच।
श्रीरामाच्या जसा मारुति पादासमोर सानाच॥"

( मोरोपंत, रामदासस्तुति ११ )

( अभंग ) "हुरमुजी रंगाचा उंच मोतीदाणा । रामदासी बाणा या रंगाचा ॥ १ ॥
पीतवर्ण कांती तेज अघटित । अवाळूं शोभत भृकुटींमाजी ॥ २ ॥
काष्ठाच्या पादुका स्वामीच्या पायांत । सरणी हातांत तुळशीची ॥ ३ ॥
रामनाममुद्रा द्वादश हे टिळे । पुच्छ वळवळे कटींमाजी ॥ ४ ॥
कौपिन परिधान मेखळा खांद्यावरी । तुंबा कुबडी करीं समर्थांच्या ॥ ५ ॥
कृष्णातटाकासी जाहलें दर्शन । वंदिले चरण तुका ह्मणे ॥ ६ ॥"

( पद ) "वैराग्याचा राजा **रामदासस्वामी** माझा ।
त्याचे चरणीं भाव धरा वोजा रे गडियानों ॥ ध्रु० ॥
**राम**चंद्र धरुनि मनीं । कामक्रोधताप हरुनी ।
सावधान ह्मणतां गेला पळोनी रे गडियानों ॥ १ ॥
**म**नासी लागली गोडी । मायेची तोडिली बेडी ।
संसाराची केली देशधडी रे गडियानों ॥ २ ॥
**दा**यक हा कैवल्याचा । दाता भोक्ता विश्वाचा ।
संग नाहीं द्रव्यदारेचा रे गडियानों ॥ ३ ॥
**स**ज्जनगडीं रहिवास । सर्वकाळ तो उदास ।
**शिवरामि** लागे चरणास रे गडियानों ॥ ४ ॥" ( श्रीदासविश्रामधाम )

( पद ) "रामदास माउली । दयाकर ॥ ध्रु० ॥
जगदुद्धारास्तव अवतरली । सज्जनगडि राहिली । माय माझी रामदास माउली ॥ १ ॥
पायिं खडावा वाजति चटचट । भक्तांस्तव धांवली ॥ माय माझी० ॥ २ ॥
भ्रुकुटिं अवाळूं सुहास्य मूर्ति । रामनामें रंगली ॥ माय माझी० ॥ ३ ॥
अंगीं मेखळा दिव्य विराजित । कुबडी करि शोभली ॥ माय माझी० ॥ ४ ॥"

( गीति ) "श्रीगुरुराया ! हा या पायांला याचितो करुनि नमनें, ।
कीं क्षणहि, यांसि सोडुनि, जावें विषयस्पृहा धरुनि न मनें. ॥
श्रीगुरुदेवा ! सेवा घे वात्सल्येंकरुनि अनवरत; ।
मन वर तव दासाचें हा पावुनि हो जसेंचि अनव रत. ॥
श्रीगुरुराया ! प्रेमें सेवावे म्यां तुझे सदा चरण; ।
हे मात्र न सोडावे, जोडावें निश्चयें सदाचरण. ॥
श्रीगुरुराया ! नलगे भजनेतर ह्मणुनि आण वाहूं या; ।
प्रभुजी ! जें बहुमत, तें मज बाळचि गणुनि आणवा, हूं, या. ॥"

( मोरोपंत–मुक्तांजली. )




श्रीसमर्थचरणरजकिंकर श्रीरामदासानुदास हनुमानगड वर्धा.

# मोरोपंतांच्या चरित्राची प्रस्तावना.



"Lives of great men all remind us
We can make our lives sublime,
And, departing, leave behind us
Foot-prints on the sands of time. 1

Foot-prints that perhaps another
Sailing O'er life's solemn main
A forlorn and ship-wrecked brother
Seeing shall take heart again. 2

( H. W. Longfellow )"

(फटका) "थोर माहात्मे होउनि गेले चरित्र त्यांचें पहा जरा
आपण त्यांच्या समान होऊं हाचि सांपडे बोध खरा।
जग हें त्यजितां भवसागरींच्या वाळवंटीवर तरी जरा
चार पाउलें उमटवुं आपुलीं ठेऊं खुणेचा मार्ग बरा।
संसाराचा सागर दुस्तर त्यांतुनि जाण्या पैलतिरा
खटपट करितां गोते खातां निराश होऊनि जाय पुरा।
अशा नराच्या दृष्टिस पडतां आपुलीं पाउलें जरा जरा
कोणी ह्मणावें नाहीं ह्मणोनी येईल त्याला धीर खरा. ॥" ( ह. ना. आपटे )

कोणत्याहि अभियुक्त भाषेच्या वाङ्मयांत इतिहास, बखरी व चरित्रें यांचें महत्त्व फार मोठें असतें. त्यांत मनुष्याचा आजपर्यंतचा अनुभव सर्व सांठवून ठेविलेला असून 'पुढच्यास ठेंच मागचा शहाणा' या ह्मणी प्रमाणें तो सर्वांच्या उपयोगी पडतो. त्यांच्या वाचनानें संकट प्रसंगीं मनुष्यानें कसें वागावें, सदाचरणाचें व दुराचरणाचें फळ काय, सज्जनांचा शेवट गोड होऊन त्यांची कीर्ति कशी वाढते व दुर्जनांची शेवटीं दुर्दशा होऊन त्यांची सर्वत्र छीःथू कशी होते, विषयांध, राज्यमदांध व गर्विष्ठ माणसें बाह्यात्कारीं सुखी दिसलीं तरी अंतःकरणाच्या खऱ्या समाधानास कशीं आंचवतात, नलिनीदलगतजलाप्रमाणें अतितरल क्षणभंगुर अशा मानवी जीवितांत आपलें शाश्वत कल्याण करून घेण्यास कसें वागावें, 'अर्थमनर्थं भावय नित्यं नास्ति ततः सुखलेशः सत्यं' ह्मणजे संपत्ति ही अनर्थावह असून त्यापासून काडीचेंही सुख नाहीं ही सत्पुरुषाची वाणी कशी सत्यपूर्ण आहे, राष्ट्राची उत्पत्ति, अभिवृद्धि व क्षय कशानें होतो वगैरे शेंकडों गोष्टी कळून येतात. तसेंच, त्यापासून मनुष्याच्या अंतःकरणांत वास करीत असलेले रजोगुण व तमोगुण शुद्ध होतात व त्याचें मन हळुहळु सत्वाधिष्ठित होऊन तें उन्नत, प्रसन्न व शांत होतें. असें झालें म्हणजे सहजच त्याची स्मरणशक्ति व कल्पनाशक्ति जागृत होऊन त्याची विचारशक्ति वाढीस लागते व लहान मोठ्या सत्पुरुषाच्या अंगीं दिसून येणारे देशाभिमान, धर्माभिमान, शौर्य, चातुर्य, औदार्य, लीनता, सहनशीलता, दया, क्षमा, शांति, दूरदृष्टि व भक्तिपरायणता इत्यादि गुणांचें अनुकरण करण्याची त्यास बुद्धि होते. व नंतर तो कालांतरानें स्वतः थोर पुरुष बनतो. इतिहास बखरींत तरी सद्गुणीदुर्गणी, लहानथोर, तरुणवृद्ध, शूरकातर कृपण व उदार, इत्यादि भिन्न भिन्न प्रकृतींच्या व अवस्थांच्या असंख्य स्त्रीपुरुषांचीं असंख्य चरित्रे भरलेलीं असल्यामुळें तें एक चरित्ररत्नभांडागारच आहे. त्यांतील कांहीं रत्नांचा संग्रह करून त्यांची माळ कंठांत धारण केली असतां ती या कष्टमय संसारांत सन्मार्ग दाखविते. थोर पुरुषांचे स्थूल मानानें दोन वर्ग होतात. ज्यांनीं आपल्या अलौकिक सद्गुणांनीं आपला देह चंदनाप्रमाणें झिजवून अखिल मानवजातीच्या कल्याणाची खटपट केली असे थोर पुरुष पहिल्या वर्गात ह्मणजे सत्पुरुषकोटींत येतात. भगवान् गौतमबुद्ध, श्रीमच्छंकराचार्य, श्रीएकनाथनामदेवसमर्थतुकारामादि संत, साक्रेटीस, तसेंच नानक, ख्रिस्त, कानफ्युशियस, जरदुष्ट्र इत्यादि धर्मसंस्थापक हे पहिल्या प्रतीचे सत्पुरुष होत. आचरणानें शुद्ध, इहलोकींच्या व्यावहारिक सद्गुणांनीं परिपूर्ण, व स्वहित गौण मानून आपली ज्ञाति, समाज, धर्म व राष्ट्र यांच्या हितार्थ अहर्निश झटणारे पुरुष दुसऱ्या प्रतीचे थोर पुरुष होत. पहिल्या वर्गात मोडणाऱ्या जगद्वंद्य महापुरुषांची संख्या अल्प असून बहुतेक थोर पुरुष दुसऱ्या वर्गांत येतात. स्वार्थदृष्टीचा निरास व सामुदायिकहिताची कळकळ ज्या मानानें या वर्गातील लोकांत दृष्टीस पडतात त्या मानानें त्यांची योग्यता कमीजास्ती समजली जाते. आपल्या अंगच्या गुणांनीं आपल्या देशाचें किंवा धर्माचें हित साधण्याचा यथाशक्ति यत्न करणारे योद्धे, राज्यसंस्थापक, मुत्सद्दी, चित्रकार, शिल्पकार, कवि वगैरे पुरुषांची गणना याच वर्गांत होते. श्रीछत्रपति शिवाजी महाराज, पहिले बाजीराव, अकबर, जॉर्ज वाशिंगटन, शिकंदर, नाना फडनवीस, जिवबादादा बक्षी, ग्ल्याडस्टन, बिस्मार्क, अहिल्याबाई होळकरीण,

बायजाबाई शिंदे, लक्ष्मीबाई झांशीकरीण, डॉक्टर आनंदीबाई जोशी, न्यायमूर्ति रानडे, डॉ. भांडारकर, लोकमान्य टिळक, समाजसुधारक आगरकर, निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर, मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत, देवनाथ इत्यादि कवि, चित्रकार राजा रविवर्मा, वगैरे आपल्या राष्ट्राची कीर्ति वाढविण्यास कारण होणारे सर्व पुरुष द्वितीयवर्गात येतात. थोर पुरुषांच्या सद्गुणाविषयीं पुढील थोडीं वचनें संस्मरणीय समजून येथें देतों:–

(1) "That life is the highest which is a conscious, voluntary sacrifice."

(2) "That man is great and he alone,
Who serves a greatness not his own,
For neither praise nor pelf;
Content to know and be unknown;
Whole in himself.
(Robert, 1st Earl of Lytton)."

(३) भर्तृहरिनाथ नीतिशतकांत ह्मणतातः–

"विपदि धैर्यमथाभ्युदये क्षमा सदसि वाक्पटुता युधि विक्रमः ।
यशसि चाभिरतिर्व्यसनं श्रुतौ प्रकृतिसिद्धमिदं हि महात्मनाम् ॥ (नीतिशतक ५२)"

याचें वामनी भाषांतरः–

"विपत्काळीं धैर्य प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें
सभे पांडित्याचा प्रसर समयीं शौर्य मिरवे ।
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुररति, विद्याव्यसन जें,
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे. ॥"

(४) भवभूति ह्मणतातः–

"प्रियप्राया वृत्तिर्विनयमधुरो वाचि नियमः
प्रकृत्या कल्याणी मतिरनवगीतः परिचयः ।
पुरो वा पश्चाद्वा तदिदमविपर्यासितरसं
रहस्यं साधूनामनुपधि विशुद्धं विजयते ॥ (उत्तररामचरित २.२)"

(भाषांतर) "सदा प्रीती चित्तीं विनय, मधुरा वाणिहि सदा,
स्वभावें कल्याणी मति, परिचया भेद न कदा, ।
पुढें किंवा मागें मनिं रसविपर्यास नसती,
चरित्रें साधूंचीं अकपट विशुद्धेंचि असती. ॥"

महाराष्ट्र वाङ्मयांत थोर पुरुषांचीं चरित्रें महिपतीच्या भक्तचरित्रानंतर आजवर बरीच प्रसिद्ध झालीं आहेत. पण त्यांतही स्वदेशस्थापेक्षां परदेशस्थांच्या चरित्रांचीच संख्या विशेष आहे. याचें कारण या देशांत थोर पुरुष कमी झाले हें नसून लोकांची दृष्टि त्यांच्या सद्गुणापेक्षां दुर्गुणांकडेच जास्त वळत असल्यामुळें त्यांचें इतकें महत्त्व त्यांस वाटत नसावें हें असावें.

सभातरंगकार ह्मणतातः-

"स्वदेशजातस्य नरस्य नूनं गुणाधिकस्यापि भवेदवज्ञा ।
निजांगना यद्यपि रूपराशिस्तथापि लोकः परदारसक्तः ॥"

तरी अलीकडे वरील प्रवृत्ति कमी होत असून पृथ्वीराज चव्हाण, शिवाजी, महादजी शिंदे, जिवबादादा बक्षी, मल्हारराव होळकर, बाजीराव बल्लाळ, झांशीकर लक्ष्मीबाई, अहिल्याबाई होळकरीण, बायजाबाई शिंदे, नाना फडनवीस, परशुरामभाऊ पटवर्धन, आनंदीबाई जोशी, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, नामदेव, शंकराचार्य इत्यादि एतद्देशीय स्त्रीपुरुषांची चरित्रें छापून प्रसिद्ध झालीं असून दरवर्षी नवीन चरित्रें बाहेर पडत आहेत. आमचे मित्र संतचरित्रकार विठ्ठलभक्त लक्ष्मणराव पांगारकर यांनीं ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ या साधुचरित्राप्रमाणेंच आमच्या मोरोपंत कवीचें एक उत्कृष्ट चरित्र लिहून प्रसिद्ध केलें आहे. त्यांत मोठ्या परिश्रमानें माहिती मिळवून मोरोपंत व त्यांचें काव्य यासंबंधीं सविस्तर विवेचन केलें आहे. आमच्या केकावलीवरील 'गुरुशरणागतिटीके'स व या चरित्रास त्या ग्रंथाचा पुष्कळ उपयोग झाला ह्मणून आह्मी मित्र पांगारकर यांचे येथें उपकार मानितों. तसेंच निबंधमालाकार, हंस, पराडकर, भिडे, भागवत इत्यादि ग्रंथकारांचेही आह्मी ऋणी आहोंत. हें चरित्र लिहितांना आह्मांला मोरोपंतीग्रंथांशिवाय इतर अनेक ग्रंथरूपी सज्जनांची संगति घडून त्यामुळें आमची दृष्टि थोडीबहुत तरी अंतर्मुख झाली. हे त्यांचे आमच्यावर मोठे उपकार आहेत. संतसंगतीचें माहात्म्यच तसें आहे. पंत ह्मणतातः-

( गीति ) "सत्संगति करिताहे लीलालेशें करून जेंवि हित. ।
न तसें माता, जाणे संसारामाजि मात्र जें विहित. ॥
सत्संगतिप्रसादें बहु भगवद्भक्तिच्या भरीं भरले. ।
सरले दोष; सकळ जन न तरावे जे कधींहि, ते तरले. ॥
जीं हरिहरप्रसादीं कल्याणें वसति, साधुसंगीं तीं. ।
अघ शमतें, सुख गमतें, मन रमतें, जेंवि दिव्य संगीतीं. ॥
( सत्संगस्तव ७,१९,३५ )"

भर्तृहरि ह्मणतातः-

( श्लोक ) "जाड्यं धियो हरति सिंचति वाचि सत्यं
मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति ।
चेतः प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिं
सत्संगतिः कथय किं न करोति पुंसाम् ॥ ( नीतिशतक १९ )"

याचें वामनी भाषांतर असें:-

"खरें वचन बोलवी, जडपणास कीं घालवी,
महोन्नतिस डोलवी, दुरित मारुनी चालवी, ।
मनीं सुख अमोल वी, यश जगत्त्रयीं कालवी,
अनेक गुण पालवी, सुजनसंगती भूलवी. ॥"

प्रत्यक्ष सत्संगतींत राहून त्यांच्या मुखांतून स्रवणाऱ्या ज्ञानगंगेंत स्नान करण्याइतकें सुभाग्य ज्यांचें नाहीं त्यांना संतांच्या ग्रंथांचें अध्ययन व त्यांच्या चरित्रांचें पठन व मनन करणें हाच सत्समागम होय. चरित्राचा व काव्याचा फार निकट संबंध आहे. कार्लाईल ह्मणतोः—

"There is no heroic poem in the world but is at bottom a biography, the life of a man; and there is no life of a man, faithfully recorded, but is a heroic poem of its sort, rhymed or unrhymed. (Carlyle)"

(भावार्थ) 'जगांतील प्रत्येक वीररसप्रधान काव्य हें मूळाशीं थोर पुरुषाचें चरित्रच असतें. तसेंच प्रत्येक थोर पुरुषाच्या चरित्राचें वर्णन ह्मणजे गद्यात्मक किंवा पद्यात्मक वीररसप्रधान काव्य होय.' मोरोपंतकवि होऊन गेल्यास आज सव्वाशांवर वर्षे होऊन गेलीं. पण त्यांच्या चरित्राचें मनन चाललें असतां त्यांचा सदाचार, त्यांचीं उदार मतें, त्यांची निःस्पृह व निरभिमानी वृत्ति, त्यांची भगवत्परायणता, त्यांची सत्संगाभिरुचि, त्यांचें महाराष्ट्रभाषेवरील प्रेम, त्यांची सरलता, त्यांची जबर उद्योगशीलता, त्यांची सत्यनिष्ठा, त्यांची वारंवार रामयशोवर्णनाची आवड, वगैरे गोष्टींच्या वर्णनांत व विचारांत मन तद्रूप होऊन त्यांशीं थोडें तरी तादात्म्य पावतें व त्यांच्या सद्गुणांचें अनुकरण करून आपण ही निरंतर रामसेवा करावी अशी स्पृहणीय बुद्धि उत्पन्न होते हा कांहीं लहानसहान लाभ नाहीं. या लाभापुढें योगयागांनीं प्राप्त होणाऱ्या सिद्धींचीही मातबरी नाहीं. मोरोपंत ह्मणतातः—

( गीति ) "सत्संग अतिश्रेष्ठ, श्रेयस्कर, ह्मणुनि सुज्ञ या गातीं ।
यातें भजतां सिद्धिप्राप्ति असे जी, न योगयोगा ती. ॥ ( सत्संगस्तव १ )"

त्यांत चरित्रांतील मुख्य मुख्य गोष्टी दिल्या असून नवरस व इतर प्रेयान्, वात्सल्य व भक्ति या रसांचीं भरपूर उदाहरणें व मोरोपंती काव्यांतील उत्कृष्ट निवडक उतारे दिले आहेत. त्यांच्या वाचनानें वाचकांस पंतांच्या काव्याची गोडी लागून महाराष्ट्र वाङ्मयांत पंतांची योग्यता किती मोठी आहे तें कळून येईल. या चरित्रांत मुख्य गोष्टी कोणकोणत्या आल्या आहेत त्या अनुक्रमणिकेंत सांगितल्या आहेत. आतां वर सांगितलेल्या गोष्टी कितपत साधल्या आहेत तें वाचकांनीं ठरवावयाचें आहे. कविकुलगुरु कालिदास ह्मणतातः—

"आपरितोषाद् विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् ।
प्रच्छायसुलभनिद्रा दिवसाः परिणामरमणीयाः ॥
( अभिज्ञानशाकुंतल–प्रस्तावना श्लोक ३ )"

( ओवी ) 'आतां गर्जू अखंड सप्रेम । श्रीराम जयराम जयजयराम ।
तेणें भेटी देईल आत्माराम । सच्चित्सुख होऊं तेणें. ॥'

*** श्रीराम जयराम जयजयराम ***

---

# अनुक्रमणिका.



## भाग २ रा.

# चरित्राच्या परिशिष्टांची अनुक्रमणिका.



# मोरोपंतांचें चरित्र.



## १ विषयाचें अभिनंदन.

(१) (श्लोक) 'सरस्वतीविभ्रमदर्पणानां सूक्तामृतक्षीरमहोदधीनाम् ।
सन्मानसोल्लाससुधाकराणां कवीश्वराणां जयति प्रकर्षः ॥
(क्षेमेन्द्रकृत **बृहत्कथामंजरी** प्रथमतरंग श्लोक० २)'

(अर्थ) वाग्देवीच्या सौंदर्याचे आदर्श, सुभाषितामृताचे समुद्र, व सज्जनांच्या मनांस आनंदविणारे चंद्र असे श्रेष्ठ कवि उत्कर्षानें जय पावतात.

(२) (श्लोक)
'यो मूर्धनि स्रजमिवोद्वहते धरित्रीमुष्णीषतां श्रयति यस्य स भोगिराजः ।
यस्यामसौ वसति वाक्पतिरुक्तिदेवीं तां ये वहन्ति हृदि ते कवयो जयन्ति ॥
(**जगद्धरभट्टविरचित 'स्तुतिकुसुमांजली.'** पंचमस्तोत्रम् श्लोक २)'

(भावार्थ) पंचाशत्कोटिविस्तृतभूमीला मस्तकावर माळेप्रमाणें अनायासानें धारण करणारा शेषनाग ज्या महादेवाचें शिरोवेष्टन झाला आहे, तो परमात्मा परमशिव परापश्यंतीमध्यमावैखरी या चतुर्विध वाणीचा पति असून निजशक्तिस्वरूपभूत जिच्या अंतर्यामीं परनादस्वरूपानें वास करितो, त्या सर्वोत्कृष्ट वाग्देवीला हृदयांत धारण करणारे कवि जय पावतात.

'As an expression of imaginative feeling, as the movement of an energy, as one of those great primal human forces which go to the development of the race, poetry in the wide sense has played as important a part as science. In some literatures (such as that of England) poetic energy and in others (such as that of Rome) poetic art is the dominant quality. In some writers, and these are the very greatest-in Homer, Aeschylus, Sophocles, Dante, Shakespeare, Milton, and perhaps Goethe-poetic energy and poetic art are seen in something like equipose....And assuredly no philosophy of history can be other than inadequate should it ignore the fact that poetry has had as much effect, upon human destiny as that other great human energy by aid of which, from the discovery of the use of fire to that of the electric light the useful arts have been developed.' (Poetry-by Walter Thedore Watts-Dunton in Encyclopœdia Britannica, 11 th edition P. 477)

(४) 'आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर ।
नातरी हे परमेश्वर । वेदावतारी ॥ १ ॥
कीं हे सरस्वतीचें निजस्थान । कीं हे नाना कळांचें जीवन ।
नाना शब्दांचें भुवन । यथार्थ होय ॥ २ ॥
कीं हे पुरुषार्थाचें वैभव । कीं हे जगदीश्वराचें महत्व ।
नाना लाघवें सत्कीर्तीस्तव । निर्माण कवी ॥ ३ ॥
कीं हे शब्दरत्नांचे सागर । कीं हे मुक्तांचे मुक्त सरोवर ।
नाना बुद्धीचे वैरागर । निर्माण जाले ॥ ४ ॥
आधीं कवीचा वाग्विलास । तरी मग श्रवणीं तुंबळे रस ।
कवीचेनि मतिप्रकाश । कवित्वास होय ॥ १५ ॥
कवि व्युत्पन्नाची योग्यता । कवि सामर्थ्यवंतांची सत्ता ।
कवि विचक्षणाची कुशळता । नाना प्रकारें ॥ १६ ॥
कवि सृष्टीचा अलंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार ।
सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवि ॥ १८ ॥
कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण ।
नानासुखांचें संरक्षण । ते हे कवी ॥ १९ ॥
नसता कवींचा व्यापार । तरी कैचा असता जगदुद्धार ।
म्हणोनि कवि हे आधार । सकळ सृष्टीसी. ॥ २१ ॥
नाना विद्या ज्ञातृत्व कांहीं । कवीश्वरेंवीण तें नाहीं ।
कवीपासून सर्वही । सर्वज्ञता ॥ २२ ॥
मागां वाल्मीक व्यासादिक । जाले कवीश्वर अनेक ।
तयांपासून विवेक । सकळ जनासी ॥ २३ ॥
ऐसे पूर्वीं थोरथोर । जाले कवीश्वर अपार ।
आतां आहेत पुढें होणार । नमन त्यांसी ॥ २५ ॥
कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नवरसाचे ओघ लोटले ।
नाना सुखाचे उचंबळले । सरोवर हे ॥ २८ ॥
कीं हीं सुखाचीं तारुवें लोटलीं । अक्षयीं आनंदें उतटलीं ।
विश्वजनास उपयोगा आलीं । नाना प्रयोगाकारणें ॥ ३१ ॥
आतां असो हा विचार । जगास आधार कवीश्वर ।
तयांसी माझा नमस्कार । साष्टांगभावें ॥ ३४ ॥ **(दासबोध १.७)**'

श्रीसमर्थ रामदासस्वामी ह्यांनीं कवीविषयीं जें वर म्हटलें आहे तें अक्षरशः खरें आहे. कोणत्याही राष्ट्राचा अभ्युदय होण्यास ज्या सत्पुरुषांचे परिश्रम कारणीभूत होतात त्यांत कवींची गणना प्रमुखत्वानें केली पाहिजे. कवि हे राष्ट्राचे आत्मे होत. ते 'शब्दसृष्टीचे ईश्वर', 'कल्पनेचे कल्पतरु', 'चातुर्याच्या मूर्ति', 'बुद्धीचे वैरागर', 'सरस्वतीचें निजस्थान,' 'अमृताचे मेघ', 'सुखाचें सरोवर' व 'स्वधर्माचे आश्रय' असल्यामुळें राष्ट्रांत श्रेष्ठ प्रतीचे धर्मविचार जागृत करून धर्माचा पाया बळकट करणें, त्यांतील उपयुक्त संस्थांविषयीं योग्य अभिमान वाढवून त्या चिरस्थायी करणें,

त्यांतील थोर पुरुषांविषयीं आदर उत्पन्न करवून राष्ट्रीय सद्गुणांचा प्रसार करणें इत्यादि राष्ट्रोन्नतीस अत्यंत आवश्यक अशीं महत्कार्यें शांतपणें करण्यास कवीच समर्थ होतात. अशांच्या मालिकेंत महाराष्ट्रभाषेचा कंठमणि व महाराष्ट्रकवितावधूचा प्राणेश्वर प्रसिद्ध रामभक्त मोरोपंत यांची गणना होते. म्हणून त्यांचें संक्षिप्त चरित्र केकावलीच्या वाचकांकरितां येथें सादर केलें आहे.

## २ कुळाची थोडीशी पूर्वपीठिका वगैरे.

'उपजला तरि तोचि मला गमे, । कुलसमुन्नति ज्यास्तव घे रमे. ॥ **(वामन.)**'

कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांत राजापूर तालुक्यांत सौंदळ या नांवाचें एक लहानसें गांव आहे. तेंच या कविश्रेष्ठाच्या पूर्वजांचें मूळ ठिकाण. त्यांचें उपनांव पराडकर. पराडकर हे जामदग्न्य गोत्री कऱ्हाडे ब्राह्मण. सोलापूर जिल्ह्यांत सोनारी नांवाचें एक क्षेत्र आहे तेथील भैरवदेव हा पराडकरांचा व मुक्तेश्वरकवीचा कुलस्वामी होय. कसबें सौंदळ येथें पंतांचे आजे डांगेपतकीचें म्हणजे जमीनीवरील व समुद्रावरील जकात घेण्याचें काम करीत. पूर्वी हें गांव चांगलें भरभराटीस आलें होतें. परंतु कालचक्रास अनुसरून आज तें अगदीं निकृष्ट स्थितींत आलें आहे. पराडकरांचा जमीनजुमला सध्यां तेथें कांहीं नसून भालेकरवाडींत शंकराच्या देवळाजवळ त्यांच्या वाड्याचा पडका चौथरा मात्र आज दृष्टीस पडतो. सध्यां ह्या गांवांत ब्राह्मणाचें एकच घर असून तें पराडकरांचे कुलोपाध्याय वरेकर भटजी यांचें आहे. याच गांवीं पंतांचे तीर्थरूप रामचंद्रपंत पराडकर हे लहानाचे मोठे झाले. याच सुमारास ( इ. स १७००-१७१५ ) कोंकणांतील भट, भानु, जोशी, पटवर्धन, पाध्ये या व इतर घराण्यांतील पुरुष मराठी राज्यांत रोजगार पहाण्यासाठीं कोंकण सोडून घाटावर गेले. रामाजीपंतही आपल्या वडिलोपार्जित वृत्तीस कंटाळून म्हणा किंवा इतरांप्रमाणें मराठी राज्यांत आपल्या नशीबाची परीक्षा पाहण्याकरितां म्हणून म्हणा आपला गांव सोडून आपल्या कुटुंबासुद्धां शके १६३५ च्या ( इ. स. १७१३ ) सुमारास घाटावर कोल्हापूर प्रांतीं आले. केशव पाध्ये व गणेश पाध्ये हे दोघे बंधुही याच सुमारास तेथें आले होते तेथें प्रथम रामाजीपंत कोल्हापुरदरबारीं मुजुमदाराच्या कामावर खुद्द पन्हाळगडावरच चाकर राहिले. इ. स. १७०९-१७८२ पर्यंत पन्हाळगडावर कोल्हापुरकरांचें दरबार भरत होतें. त्यानंतर तें कोल्हापुरास गेलें. ह्मणून त्या काळीं गडाची मोठी भरभराट होती. पन्हाळगडाला 'पन्नगालय व पराशरक्षेत्र' असेंही ह्मणतात. रामाजीपंतांचा स्वभाव फार कडक होता. ते गडावर पंचवीस वर्षें होते. एकदां त्यांनीं आपल्या मोतद्दारास कांहीं अपराधास्तव पैसा तापवून डाग दिला; तेव्हां राजानें मात्र करावयास योग्य असा दंड आपण आपल्या सेवकास केला याबद्दल आपणांस

शासन होईल या भीतीनें त्यांनीं कोल्हापुरकरांची नौकरी सोडून ते पुण्याहून सुमारें तीस कोसांवर बारामतीनामक गांव आहे तेथें गेले. बारामतीस बाबूजी नाईक जोशी ( शांडिल्य गोत्री कोंकणस्थ ब्राह्मण ) म्हणून सुप्रसिद्ध जहागिरदार राहत असत. त्यांच्या पदरीं रामाजीपंत हे प्रथम पागेच्या व मागून कोठीच्या कामावर कारकून म्हणून राहिले. याप्रमाणें रामाजीपंत हे बारामतीस व मोरोपंत पन्हाळगडावर असा क्रम सुमारें एक तप चालला. हे बाबूजी नाईक छत्रपती शाहू महाराजांच्या पदरीं एक नामांकित सरदार असून पहिल्या बाजीराव पेशव्यांच्या मरणानंतर पेशवाईकरितां नानासाहेबांचे ( बाळाजी बाजीरावाचे ) प्रतिस्पर्धी होते. पुढें हे माधवरावसाहेब पेशवे ह्यांच्या कारकीर्दींत रावसाहेब पेशवे अज्ञान असतांना त्यांच्या तर्फेच्या सरदारांपैकीं एक असून त्यांचें रघुनाथराव दादासाहेब व त्यांचे दिवाण सखाराम बापू यांशीं वैमनस्य होतें. बारामतीकर हे पेशव्यांचे आप्त होते. बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांची कन्या भिऊताई ही बाबूजी नाईकांचे बंधु आबुजी नाईक यांस दिली होती. नाईक हे कोट्यधीश सावकार होते. थोरल्या बाजीराव पेशव्यांस पैशाची मदत यांजकडून होत असे. तसेंच राघोबादादांची कन्या दुर्गाबाई ही बाबूजी नाईकांचे मध्यमपुत्र पांडुरंगराय यांस दिली होती. हें लग्न पुण्यास माघ शुक्ल पौर्णिमा शके १६९५ त मोठ्या थाटानें झालें. आईचें (आनंदीबाईचें) अघोर कृत्य हिला(दुर्गाबाईला)न आवडल्यामुळें ती बारभाईस अनुकूल होती. पुरंदरीं राघोबाचे पक्षाची म्हणून हिला नारायणराव पेशव्यांची पत्नी गंगाबाई हिच्या प्रसूतिकाळीं नेली होती. आनंदीबाईस तिचा राग येऊन तिनें बाजीरावास तिची खोड मोडण्याविषयीं निक्षून सांगितलें होतें, त्यावरूनच त्यानें पुढें इ. स. १८१० त बारामतीकरांचा वाडा लुटून जहागीर जप्त केली. (ऐतिहासिक गोष्टी. भा. १ पृ. ५०) व त्यांच्या कुटुंबास काशीवास करावयाला लाविलें. यांचे वंशज बारामतीकर, मेडतकर, बावडेकर या नांवांनीं पुण्यास हल्लीं प्रसिद्ध आहेत. (वंशावळ पहा.)

### ३ जन्म व बाळपण.

( गीति ) 'धन्य **श्रीराम पिता,** धन्या **लक्ष्मी प्रसू** जगीं झाली, ।
आली सत्यवतीची, कीं **भार**तकीर्ति सुतमुखीं आली. ॥ ( स्वर्गा.२.४२ )'
'सुयशें पितृमातुलकुलउज्वलकर तनय तो असावा गे ! ( द्रोण.८.२३. )'

( आर्यागीति ) 'सकळार्थदकृतिकायप्रद पितरांची फिटेल उपकृति काय ? ॥
ज्याला चिंतुनि गमजे त्यजिति विषयिकामपूरकस्वरगम जे ॥
( बृहद्दशम ३५.११ )'

रामाजीपंत पराडकर कोंकणांतून पन्हाळगडीं आल्यावर किर्लोस्कर घराण्यांतील एका मुलीशीं त्यांचा विवाह झाला. लक्ष्मीबाई ह्या सुशील व सात्विकवृत्तीच्या

असून पतिसेवापरायण होत्या. ह्यांच्यापासून रामाजीपंतास तीन पुत्र व एक कन्या अशीं चार अपत्यें झालीं. वडील पुत्राचें नांव **सोनोपंत** असून धाकट्याचें **आबा** असें होतें. त्यांचे मध्यमपुत्र **मोरोपंत** हेच प्रकृत चरित्राचे नायक होत. पंतांचे आईबाप गणेशोपासक ( गाणपत्य ) होते म्हणून त्यांनीं गणेशप्रसादानें झालेल्या या मध्यम पुत्राचें नांव **मयूर** (मोर, मोरोबा) असें ठेविलें. भक्तमंजरीकार राजाराम प्रासादी यांच्या मतें मोरोपंत हे गणपतीचा अंशावतार होते. यांचा जन्म शके १६५१ सौम्यनाम संवत्सरीं म्हणजे इसवी सन १७२९ त पन्हाळगडीं झाला. हे आपल्या वडिलांजवळ पन्हाळगडीं लहानाचे मोठे झाले. यांची प्रकृति जात्या अशक्त असून स्वभाव बापाप्रमाणेंच कांहींसा तापट होता. श्रीगणेशाशिवाय श्रीरामचंद्र हें पराडकरांच्या घराण्याचें आराध्यदैवत होतें. श्रीराम हे मोठे पितृभक्त होते. त्याप्रमाणेंच मोरोपंतांची निष्ठा आपल्या वडील मातोश्रींचे ठिकाणीं फार होती. त्यांनीं आपल्या काव्यांतून व इतरत्र पुष्कळ ठिकाणीं आपल्या मातापितरांचा अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख केला आहे. यांची बुद्धि मोठी तीव्र असून ह्यांना लहानपणापासूनच पुराणकीर्तनश्रवणाचा फार नाद होता. त्यामुळें अल्पवयांतच भारत, भागवत, रामायण, पुराणादि ग्रंथांची यांना चांगली माहिती झाली. यांचे अगदीं पहिले शिक्षक त्यांचे वडील रामाजीपंत होत. त्यांच्याजवळच हे बाळपणीं लिहिणें वाचणें, व रामरक्षादि स्तोत्रें शिकले व अमळ मोठे झाले तेव्हां कारकुनांच्या फडावर बापाजवळ बसून त्या वेळेच्या कारकुनास अवश्य तो सर्व जमाखर्ची हिशेब ते शिकले.

## ४ मोरोपंतांचा विद्याभ्यास.

'गुरु माझे श्री**राम** श्रीमत्**केशव**, **गणेश**-**हरि** चवघे ॥ (गंगावकिली १०९)'
'श्री**केशवं** श्री**गणेशं** । वंदे विद्यागुरुं **हरिं**. ॥ ( संस्कृतमंत्ररामायण )'
'श्रीमद्**गणेश**गुरुपदनखशशिकांतिच्छटा जयंतुतराम् ।
प्रतिभारत्नं लब्धं यासु मयेदं मनस्तमोघ्नीषु ॥ ( प्राकृतमंत्ररामायण )'

आपल्या बापाशिवाय पंत लहानपणीं 'हरि' नामक गुरूजवळ शिकले. हरिभट वरेकर पंतांचे सौंदळचे कुलोपाध्याय हे ते गुरु. यांनींच पंतांचें उपनयन करून त्यांना ब्रह्मकर्म, विष्णुसहस्रनामादि स्तोत्रें व बालबोध व मोडी अक्षर घटविण्यास शिकविलें. पंढरपुरास पंतांचे हातचे लिहिलेले ग्रंथ आहेत त्यांवरून त्यांचें मोडी व बालबोध अक्षर चांगलें वळणदार व घटींव होतें, तसेंच ते फार बारीक अक्षर लिहित असून अनुस्वाराबद्दल वर्तुल काढित असें दिसून येतें. पुढें ते कोल्हापुरप्रांतीं आपल्या विद्वत्तेबद्दल गाजलेले प्रख्यात पंडित केशव पाध्ये व गणेश पाध्ये गोळवलीकर यांचे जवळ पन्हाळगडीं संस्कृत काव्यनाटकव्याकरणालंकारादि शिकण्यास राहिले. पाध्यांच्या घरीं पंत शिकावयास राहिले यासंबंधीं एक मौजेची आख्यायिका

सांगतात. पंत चवदा वर्षांचे होते तेव्हां एकदां द्वादशीचे दिवशीं ब्राह्मण म्हणून पाध्ये यांजकडे जेवावयास गेले. जेवण झाल्यानंतर रिकामपणीं त्या दिवसाचे प्रसंगास अनुसरून त्यांनीं एक सुंदर श्लोक रचिला, व तो त्यांनीं पाध्यांचे ओटीचे भिंतीवर लिहून ठेविला व घरीं निघून गेले. असें दोन तीन वेळां झालें तेव्हां पाध्यांनीं चौकशी केली. तेव्हां ते श्लोक रामाजीपंत मुजुमदाराचा मुलगा मोरोबा यानें रचिले असें समजलें. त्यावरून त्यांनीं रामाजीपंतांस बोलावून तुमचा मुलगा मोठा बुद्धिमान् आहे, त्याला आमच्याकडे संस्कृत शिकण्याकरितां पाठवीत जा म्हणून सांगितलें. त्यावरून पंत पाध्यांकडे विद्या शिकण्यास जाऊं लागले. पाध्यांचें घराणें अदिलशाहींत चांगलें प्रख्यात असून त्यांस यवनांकडून उत्पन्न होतें. गणेश पाध्ये व केशव पाध्ये हे उभय बंधु पन्हाळयास आल्यानंतर दोघांसही कऱ्हाडाकडे पंतप्रतिनिधीकडून व कोल्हापुरच्या महाराजांकडून जमिनी मिळाल्या. त्यांचे पूर्वज कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांत उंब्रज गांवीं राहणारे. त्यांचें उपनांव गोळवलीकर. हे काश्यपगोत्री कऱ्हाडे ब्राह्मण. दोघेही बंधु मोठे विद्वान् होते. त्यांतल्या त्यांत गणेश पाध्ये हे विशेष जाडे विद्वान् होते. ते न्यायव्याकरण-मीमांसादि शास्त्रांत अत्यंत प्रवीण असून मोठे निस्पृही व नेमनिष्ठ होते. कोल्हा-पुरच्या राजवाड्यांत ते पुराण सांगत. यांच्या हस्ताक्षराशीं पंतांच्या हस्ताक्षराचें बरेंच सादृश्य दिसतें. या उभयतां बंधूंचे वंशज पन्हाळगड, कोल्हापूर, कऱ्हाड वगैरे ठिकाणीं आहेत. केशवपाध्यांचे पुत्र सदाशिव पाध्ये हे पंतांचे सहाध्यायी असून परममित्र होते. पंतांनीं अगोदर थोडेंसें संस्कृत व्याकरण पढून मग संस्कृत काव्यें, नाटकें व अलंकारशास्त्र वगैरे ग्रंथांचें अध्ययन केलें. न्याय व वेदांत ग्रंथांचेंहि त्यांनीं थोडेंबहुत परिशीलन केलें होतें. पंतांनीं आपणास शिकावयास किंवा वाचावयास लागणारे चाळीसांवर ग्रंथ स्वतः हातांनीं लिहिले असून कांहीं इतरांकडून लिहून घेतले आहेत असें त्यांच्या पंढरपुरच्या दप्तरावरून दिसतें. बहुतेक ग्रंथांच्या शेवटीं संवत्सर, मास, तिथि, यांचा निर्देश असून गुरु, पिता व आपण स्वतः इतक्यांच्या नांवांचा उल्लेख केलेला आढळतो.

## पंताच्या संस्कृत स्वलिखित ग्रंथांचें शकासह क्रमवार टिपण.

(१) रघुवंश कालिदासकृत ( शके १६७२ मार्गशीर्ष कृ. १४ प्रमोद ) इ. स. १७५० पाराशरक्षेत्रीं.

(२) नैषधोदय श्रीहर्षकृत
(३) अनर्घराघव मुरारिकृत सटीक
(४) मुरारी नाटक
} श. १६७४ अंगिरा म्हणजे इ. स. १७५२ पाराशरक्षेत्रीं.

(५) चित्तप्रबोध — श. १६७६ इ. स. १७५४

(६) विष्णुभक्तिकल्पलता पुरुषोत्तमविरचित, शके १६७६ कार्तिक कृष्ण ७ सोमवार भाव, इ. स. १७५४

(७) वाणीभूषण दामोदरमिश्रकृत श. १६७८ इ. स. १७५६ धाता हा ग्रंथ मुंगीसारख्या अगदीं बारीक अक्षरांनीं लिहिलेला आहे.

(८) प्रबोधचंद्रोदयनाटक कृष्णमिश्रयतिविरचित श. १६८० इ. स. १७५८ बहुधान्य भाद्रपद शु. ८ बारामतीस.

(९) रसमंजरी ( वैद्यक ग्रंथ )
(१०) रसतरंगिणी
(११) राघवपांडवीय कविराजकृत
(१२) पंचदशी विद्यारण्यविरचित
} श. १६८२ इ. स. १७६० विक्रम.

×
(१३) षट्पदी टीका विद्वच्चित्तप्रसादिनी
(१४) कुवलयानन्द* अप्पय्यदीक्षितकृत
} श. १६८३ इ. स. १७६१ वृष. ×वैशाख शु० १० बारामतीस. *आषाढ कृ० ६ भौम पर्वतेश्वराजवळ.

(१५) विक्रमोर्वशीयनाटक कालिदासकृत श. १६८७ इ. स. १७६५ पार्थिव मार्गशीर्ष.

×
(१६) पार्वतीपरिणय नाटक बाणभट्टकृत
(१७) काव्यप्रकाश* (मम्मटकृत)
} श. १६८९ इ. स. १७६७ सर्वजित्. ×माघ शु. ४ *आषाढ कृ० ४

(१८) नरहरिकृत समश्लोकी (मराठी) श. १६९५ इ. स. १७७३.

(१९) मालविकाग्निमित्र नाटक कालिदासकृत श. १७०० इ. स. १७७८, विलंबि आषाढ कृ. ५

(२०) अपरोक्षानुभूति श्रीशंकराचार्यकृत श. १७०३ इ. स. १७८१, प्लव, रामनवमी.

## शक नसलेल्या संस्कृत स्वलिखित ग्रंथांचें वर्णानुक्रमवार टिपण.

(१) अधिकरणरत्नमाला.
(२) अभिज्ञानशाकुंतल नाटक कालिदासकृत.
(३) चंपूभारत अनंतकविकृत.
(४) जगन्नाथपंडित अश्वधाटी.
(५) जैमिनीकृत कुशलवोपाख्यान.
(६) दशावतारखंडप्रशस्ति (डेक्कन कॉलेज—लायब्ररी, पुणें).
(७) नागानंदनाटक.
(८) पुरुषसूक्तव्याख्यान.
(९) बृहदारण्यकभाष्य.
(१०) भगवन्नामकौमुदीटीका.
(११) मत्स्यनीति.

(१२) मुहूर्तमार्तंड ( ज्योतिष ग्रंथ ).
(१३) रतिमन्मथनाटक ( जगन्नाथपंडितकृत )
(१४) रसमंजरीटीका.
(१५) राजमार्तंडाभिधाना पातंजलयोगशास्त्रवृत्तिः
(१६) रामकृष्णविलोमकाव्य दैवज्ञसूर्यसूरिविरचित.
(१७) विद्वन्मोदतरंगिणी ( यांत सर्वशास्त्र व संप्रदाय यांच्या सिद्धांतांचें वर्णन केलें आहे ).
(१८) विवेकसिंधुभाष्य.
(१९) विश्वप्रकाशकोश.
(२०) वेदांतसारतत्त्वदीपिका.
(२१) सप्तशतीदीपन.
(२२) सूर्यशतक श्रीमयूरकविकृत.
(२३) हनुमन्नाटक भोजसभासूरिदामोदरमिश्रसंग्रहित.

**स्वतःसाठीं परंतु दुसऱ्यांकडून लिहून घेतलेल्या ग्रंथांचें टिपण.**

(१) भामिनीविलास पंडित जगन्नाथराय कृत शके १६८२ विक्रम.
(२) ज्ञानेश्वरी (मराठी) श. १६८४ चित्रभानु.
(३) भट्टिकाव्य भट्टिकविकृत श. १६९० सर्वधारी.
(४) कुमारसंभव कालिदासकृत श. १६९८ दुर्मुख.
(५) छायाभिधा रसमीमांसाव्याख्या. श. १७११ सौम्य.
(६) वसंततिलकभाण श. १७१३ विरोध.
(७) नेमिनिर्वाण वाग्भट्टकृत.

पंत फार जलद लिहीत. 'भारतचंपू' नांवाचा एक मोठा संस्कृत ग्रंथ त्यांनीं कोल्हापुरास दुसरा गृहस्थ सावकाश वाचीत असतांना एकीकडे बसून भराभर लिहून काढला असें सांगतात. तसेंच संस्कृतसाहित्यांत सुबंधु, बाणभट्ट व कविराज या त्रयीची 'वक्रोक्तिमार्गनिपुण' अशी प्रसिद्धि आहे. 'राघवपांडवीय' नामक काव्याच्या शेवटीं—

'सरस्वतीदत्तवरप्रसादश्चक्रे सुबंधुः सुजनैकबंधुः ।
प्रत्यक्षरश्लेषमयप्रबन्धविन्यासवैदग्ध्यनिधिर्निबंधम् ॥'

अशी श्लेषप्रिय सुबंधूची प्रतिज्ञा आहे. तसेंच,

'श्लेषे केचन शब्दगुंफविषये केचिद्रसे चापरे-
ऽलंकारे कतिचित् सदर्थविषये चाऽन्ये कथावर्णने ।
आ—सर्वत्र गभीरधीरकविताविंध्याटवीचातुरी-
संचारे कविकुंभिकुंभभिदुरो बाणस्तु पंचाननः ॥

(अर्थ) कोणी कवि श्लेषयोजनेंत, कोणी शब्दरचनेंत, कोणी रसवर्णनांत, कोणी अलंकारघटनेंत, कोणी प्रौढार्थनिबंधनांत, तसेंच कोणी कथासूत्र बांधण्यांत चतुर असतात. परंतु गमीरधीरकवितारूपी विंध्यारण्यांत सर्वत्र संचार करण्याविषयीं अत्यंत कुशल व कविगजांचें कुंभस्थल भेदणारा अर्थात् त्यांचा गर्व परिहार करणारा सिंह एक बाणकवीच होय, अशी बाणकवीची प्रसिद्धि आहे. त्यांच्या ग्रंथाशींही पंतांचा चांगला परिचय असावा असें दिसतें. याला प्रमाणः-कविश्रेष्ठ बाणसुबंधूंचा उल्लेख पंतांनीं कविराजकृत-

'बाणसुबंधू वासवदत्ताकादंबरीकारौ ।
जयतो जयन्तु सुतरां कविराजः सर्वकविशिरोरत्नम् ॥'

अशी उद्गीति रचून केला आहे. त्यावरून शके १६८२ च्या अगोदरच त्यांनीं बाणभट्टाची 'कादंबरी' व सुबंधूची 'वासवदत्ता' हे संस्कृत-वाङ्मयांतील सुप्रसिद्ध ग्रंथ वाचले असावेत असें दिसतें. यावरून पंतांनीं काव्यनाटकांचा व अलंकारशास्त्राचा चांगलाच व्यासंग केला होता व कालिदासादि महाकवींचीं काव्यें व नाटकें त्यांच्या उत्तम परिचयाचीं होतीं हें दिसून येतें. पंचमहाकाव्यांचा व नाटकांचा पंतांस कितपत परिचय होता या प्रश्नाचें यावरून चांगलेंच समाधान होतें (केकावली पृ० ३९५-३९८ पहा ). भारत, रामायण व पुराणें या त्रयीचें अध्ययन हा भारतीय आर्यांचा रोज त्रिकाळीं करण्याचा ब्रह्मयज्ञच होय.

'भारतादिपुराणानि श्रीरामचरितानि च ।
त्रिसंध्यसवनान्येष सर्वसाधारणो मखः ॥ ( राघवपाण्डवीय १-११ )'.

पंतांना पुढें पुराण सांगावें लागत असल्यामुळें व भारत-भागवत-रामायण हे ग्रंथ, व विष्णुपुराण, मार्कंडेयपुराण इत्यादि पुराणांचे कांहीं भाग त्यांनीं महाराष्ट्र भाषेतच रचिले असल्यामुळें मूळ ग्रंथांशीं त्यांचा उत्कृष्ट परिचय असावा हें स्पष्ट होतें. वरील हकिकतीवरून पंत पन्हाळगडीं पाध्यांकडे बारा वर्षे अध्ययन करीत असतांना त्यांनीं आपल्या बुद्धिमत्तेचा उत्तम उपयोग केला व आपल्या आज्ञाधारक स्वभावानें, सत्यप्रियहितमित भाषणानें, सतत विद्याव्यासंगानें, नम्रप्रेमळ वृत्तीनें व तीव्र बुद्धिवैभवानें गुरुकृपेस स्वतांस पात्र करून घेतलें असावें. पाध्ये व पंत या उभयतांमधील प्रेम आमरण कायम राहिलें. पुढें बारामतीस गेल्यावर पंत नवीन काव्यें रचिलीं म्हणजे प्रथम गुरूकडे पाठवीत. त्यांनीं पसंत करून दुरुस्त केल्यावर मग दुसऱ्यांस वाचावयास देत. मधून मधून ते पन्हाळ्यासही गुरूंच्या भेटीकरितां जात असत. संस्कृत ग्रंथांचें पंतांनीं अध्ययन केलें होतें म्हणून त्यांचें प्राकृत ग्रंथांकडे दुर्लक्ष नव्हतें. विवेकसिंधु, परमामृत, ज्ञानेश्वरी, या जुनाट ग्रंथांशीं त्यांचा परिचय असून एकनाथ, नामदेव, रामदास, वामनपंडित, मुक्तेश्वर, विठ्ठल, आनंदतनय,

अमृतराय, उद्धवचिद्घन, मध्वमुनीश्वर, रंगनाथ, जयराम, तुकाराम, तुलसीदास, त्रिपटनिरंजन, बिहारीलाल, सूरदास, कबीर, रैदास इत्यादि मराठी हिंदी कवींच्या ग्रंथांचें परिशीलन त्यांनीं लक्ष्यपूर्वक केलें. प्रसिद्ध नाझरेकर श्रीधरकवि हे त्यांच्या जन्माच्या फक्त एकच वर्ष अगोदर मृत्यु पावले. त्यांचे 'विजय', 'प्रताप,' 'लीलामृतादि'ग्रंथ व पंतांचे समकालीन ताहराबादकर प्रसिद्ध संतभक्त महिपति व लावणीकार रामजोशी यांचे ग्रंथ त्यांनीं ऐकिले व वाचिले होते. मोरोपंतांस ग्रंथवाचनाची व संग्रह करण्याची मोठी आवड होती. त्यांनीं आपल्या स्वतांस 'ग्रंथसंग्रहकारी' ('मयूरेश्वरपंतेन ग्रंथसंग्रहकारिणा । स्वयं कुवलयानंदो लिखितोऽखिलतोषकृत् ॥') 'विद्यार्थी' असें म्हटलें आहे. ते पंढरी, वाई, सातारा, काशीसारख्या दूरस्थळांहून ग्रंथ संग्रहाकरितां आणवीत. कांहींच्या नकला करून घेऊन व कांहीं वाचून परत करीत. त्यांच्या पत्रव्यवहारावरून अमरकोशटीका 'मुकुट' त्रुटित्, हनुमन्नाटक सटीक, श्रीहर्षकृत रत्नावली नाटकाची टीका रत्नावलिच्छाया, दण्डीकृत दशकुमारचरित्र, भोजनकुतुहल, विद्धशालभंजिका, शालिवाहनाचार्यटीका, भवभूतिकृत मालतीमाधव सटीक, प्रबोधचंद्रोदय सटीक, भक्तिचंद्रिका वगैरे पुष्कळ ग्रंथ त्यांनीं वाचिले होते असें दिसून येतें. आतां मुद्रणकलेमुळें ग्रंथसंग्रह करणें फार सोपें झालें आहे. तसा प्रकार तेव्हां नव्हता. तेव्हां मोठ्या श्रीमंताखेरीज बाकीच्यांना ग्रंथसंग्रह करणें झाल्यास ग्रंथ स्वहस्तानें लिहून घ्यावे लागत. तसें करणें मोठ्या परिश्रमाचें व खर्चाचें काम असून त्याला वेळही पुष्कळ लागत असे. ह्मणून ग्रंथ दुसऱ्या कोणास वाचावयास देणें झाल्यास त्याला ग्रंथास तेल, पाणी, शिथिलबंधन, कसर व मूर्ख इतक्या जणांपासून रक्षण करण्यास बजावीत. याविषयीं पुढील श्लोक प्रसिद्ध आहेतः—

'तैलाद् रक्षेज्जलाद् रक्षेद् रक्षेत् शिथिलबंधनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ॥
भग्नपृष्ठकटिग्रीव ऊर्ध्वदृष्टिरधोमुखी ।
कष्टेन लिखितं ग्रंथं यत्नेन परिपालयेत् ॥'

(अर्थ) पाठ, कंबर, मान कष्टवून, डोळे ताणून, सारखें खालीं पाहून मी कष्टानें ग्रंथ लिहिला आहे त्याचें यत्नपूर्वक रक्षण करा अशी लेखकाची ग्रंथवाचकांस प्रार्थना आहे. पंतांच्या 'सन्मणिमाला', 'रामरीति' व संतस्तवनें यांतील वर्णनावरून वर सांगितलेल्या कवींशिवाय विठ्ठलाचीं चित्रकूटें, दासोपंतांचा सवालक्ष गीतार्णव, कृष्णदयार्णवाची दशमावरील टीका इत्यादि महाराष्ट्र व मानपुरी, शाहुहुसेन इत्यादि हिंदुस्थानी कवींचीं काव्यें यांच्यांशीं पंतांचा चांगला परिचय असावा असें कळतें. तसेंच मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिकारांचे ग्रंथ,

व धर्मसिंधूसारखे कर्मकांडाचे ग्रंथही त्यांच्या अवलोकनांत असावेत. सारांश, संतकवींचीं काव्यें व विद्वत्प्रसिद्ध ग्रंथ यांचें सतत वाचन, प्रसिद्ध ग्रंथ लांबून आणून त्याचें लेखन व कीर्तनपुराणद्वारा भगवत्कीर्तीचें वर्णन या तिरंगी शिक्षणांगाच्या व्यासंगामुळें पंतांचा विद्याभ्यास चांगला परिपक्वावस्थेस पोंचला असावा. काळजीपूर्वक लेखनवाचनादिकांच्या अभ्यासापासून काय फलनिष्पत्ति होते तें प्रसिद्ध आंग्लतत्त्ववेत्ता बेकन याच्या पुढील बहुर्थ, जनमनोहर, स्वल्पाक्षर, मधुर, सत्यवाक्यावरून चांगलें कळून येतें:–

'Reading maketh a full man, conference a ready man, and writing an exact man.' (*Bacon's essays, Of studies.*)

( भावार्थ ) 'मनुष्य वाचनानें बहुश्रुत, संभाषणानें हजरजबाबी व लेखनानें ठाकठिकीचा होतो.

जगांत वयोवृद्धांपेक्षां वाचनादि अभ्यासानें ज्ञानवृद्ध झालेल्या मनुष्यांसच सन्मान मिळतो. खरा वृद्ध ज्ञानवृद्धच. मनूचें पुढील वचन पहाः–

( श्लोक ) 'न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः ।
यो वै युवाप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः ॥
( मनुस्मृति अ० २ श्लोक० १५६ ).'

( अर्थ ) नुसते केंस पांढरे झाले म्हणून मनुष्य वृद्ध होत नाहीं. जो ज्ञानी आहे तो तरुण असला तरी त्याला देव वृद्ध समजतात.

पंतांची वाचनाभिरुचि दांडगी होती. तशीच ती सत्फलदायी होती. श्रवण काय, किंवा वाचन काय, त्याचें फल श्रीसमर्थांनीं श्रीदासबोधांत पुढील ओव्यांत सांगितल्याप्रमाणें आलें पाहिजे.

(ओव्या) 'आतां श्रवण केलियाचें फळ । क्रिया पालटे तत्काळ ।
तुटे संशयाचें मूळ । एकसरा ॥ १.१.२८ ॥
मार्ग सांपडे सुगम । न लगे साधन दुर्गम ।
सायुज्यमुक्तीचें वर्म । ठायीं पडे ॥ १.१.२९'

पंतांच्या सद्ग्रंथवाचनानें वरील फळ त्यांच्या हातीं दिलें होतें, म्हणूनच ते कृतार्थ झाले. वाचनाभिरुचीविषयीं पुढील आंग्लग्रंथांतील अवतरण पहाः–

'If I were to pray for a taste, which should stand me in stead under every variety of circumstances, and be a source of happiness and cheerfulness to me through life, and a shield against its ills, however things might go amiss and the world frown upon me, it would be a taste for reading. (*Sir John Herchel*).,

(भावार्थ) सर्व प्रकारच्या भिन्न परिस्थितींत माझ्या उपयोगी पडून, आयुष्यांत येणाऱ्या प्रतिकूळ प्रसंगीं सर्व जग मजवर रुष्ट झाले असतांही जी माझें रक्षण करील अशी एखादी गोष्ट जर मला परमेश्वरापाशीं मागावयाची झाली तर मी वाचनाभिरुचीच मागेन.

पंतांचें शिकणें संपल्यावर आपल्या विसाव्या वर्षी ते पन्हाळगडीं फडावर तीनवर्षें मुजुमदारीच्या कामावर असतांना त्यांना एकदां हिशेबांत पाव आण्याची चूक लागली. पुष्कळ वेळ रात्रीचें जागरण करून उलट सुलट हिशेब केल्यावर शेवटीं एकदांची चूक उमगली, तेव्हां त्यांनीं आनंदानें टाळी पिटली. ही गोष्ट त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास कळली, तेव्हां, 'पाव आण्याची चूक शोधून काढण्याकरितां जर तूं चित्ताची एकाग्रता करून एवढे परिश्रम केलेस, व ती शोधून काढल्यावर तुला एवढा आनंद झाला, तर मग ह्या संसाराची मोठी चूक आपल्या प्रत्येकाच्या हातून घडत आहे, ती दुरुस्त करण्यासाठीं जर तूं परमेश्वराची अनन्यभावें भक्ति करून ती चूक काढून टाकलीस तर तुझ्या जन्माचें कल्याण होऊन तुला महदानंद प्राप्त होईल' असें ते बोलले. तेव्हां ह्या आमच्या मोरोबा कारकुनास उपरति होऊन त्यानें त्याच वेळेस कानावरील बोरूची लेखणी अधिकाऱ्याच्या पायांवर वाहिली व इतःपर कारकुनी न करितां भगवद्भक्ति करण्याकडे आपलें आयुष्य खर्चावयाचें असा आपला निश्चय त्यांस सांगितला. अशीच गोष्ट श्रीएकनाथमहाराजांच्या चरित्रांतही दिलेली आहे. पंत पाध्यांकडे शिकत असतांनाच वडील रामाजीपंत पन्हाळगडची आपली नौकरी सोडून बारामतीस बाबूजी नाईकांच्या येथें आश्रयास राहिले होते. वरील गोष्ट झाल्यावर पंत बरेच दिवसांपासून बारामतीस जाऊन राहिलेल्या आपल्या वडिलांच्या भेटीकरितां पन्हाळयाहून सुमारें चोवीस वर्षांचें वय असतां तिकडे गेले.

## ५ बारामतीकरांचा आश्रय.

'श्री बाबूराय प्रभु माझा अत्यंत सदय अन्नद, हा ।
अर्थिजनां न म्हणों दे तैसा, तसास जेंवि सन्नद हा ! (विष्णुपदवकिली.)'

'भीष्मद्रोणसम गुणें शांडिल्यसुगोत्रपद्मरवि, दे हा ।
आश्रय शंकर जैसा उपमन्युमना मयूरकविदेहा. ॥ (स्वर्गा. २.३६)'

पंत बारामतीस बाबूजी नाईक जोशी यांजकडे जाऊन आठपंधरा दिवस झाल्यावर त्यांनीं यजमानांचें लक्ष्य आपल्याकडे जावें म्हणून एक चमत्कारिक युक्ति काढिली. यजमानांच्या घरच्या बायकामुलींना जात्यावर किंवा झोंपाळयावर बसून ओंव्या म्हणतांना पाहून त्यांनीं मी तुह्मांला पतिव्रता स्त्रियांचीं गाणीं रचून देतों तीं तुह्मी म्हणाल काय असें विचारिलें असतां बायकामुलींनीं 'होय' ह्मणून उत्तर दिलें. त्यावरून पंतांनीं बायकांच्या ओंव्यांच्या चालीवर 'सीतागीत,' 'रुक्मिणीहरणगीत,'

व 'सावित्रीगीत' अशीं तीन गाणीं रचून दिलीं. मुलींना व बायकांना हीं गाणीं आवडून त्या झोंपाळ्यावर बसल्या ह्मणजे किंवा दळतांना पंतांच्या ओंव्या ह्मणूं लागल्या. बायका त्या सुंदर व सरस ओव्या ह्मणत असतांना त्या यजमानांच्या कानीं पडल्या. त्याबद्दल चौकशी करितां रामचंद्रपंतांचे चिरंजीव मोरोपंत त्यांनीं त्या ओव्या केल्या असें कळून त्यांस फार संतोष झाला. यानंतर कांहीं दिवसांनीं नाईकांचे जवळच्या मंडळीनें रामचंद्रपंतांचे चिरंजीव मोरोपंत मोठे विद्वान् असून ते आज कांहीं दिवस पंक्तीस असतात असें यजमानांस कळविलें. त्यावरून संध्येच्या वेळीं पंतांस नाईकांनीं बोलावून सर्व हकीकत विचारली व जवळ रुद्राची पोथी होती तिचा अर्थ सांगण्यास पंतांस सांगितलें. त्यावर रुद्रासारख्या वैदिक ग्रंथाचा अर्थ सांगण्यापूर्वी भाष्य पाहून ठेविलें पाहिजे, दुसरा एकादा संस्कृत ग्रंथ दिल्यास त्याचा अर्थ यथाशक्ति सांगेन अशी पंतांनीं विनंति केली. ती ऐकून जवळच शिवकवचाची पोथी होती त्याचा अर्थ सांगण्यास नाईकांनीं पंतांस सांगितलें. तेव्हां मूळ श्लोक वाचून त्याचा अर्थ लागलाच मराठी श्लोक शार्दूलविक्रीडितछंदांत रचून पंत सांगूं लागले. याप्रमाणें सर्व शिवकवचाचा व पुढें दुसऱ्या खेपेस रामरक्षेचा अर्थ पंतांनीं नाईकांस सांगितला. त्यावरून नाईकांस अतिशय संतोष होऊन त्यांनीं पंतांस आपल्या वाड्यांत पुराण सांगण्यास ठेविलें. वेतनाचें ठरलें नव्हतें. पंत कुटुंबासुद्धां निराळ्या वाड्यांत राहत. त्यांच्याजवळ दहावीस माणसें होतीं. यजमानांच्या कोठींतून भरपुर शिधा येई. ते द्रव्य देत व लग्नकार्यादिप्रसंगीं पूर्ण साह्य करीत. पंतांचे ज्येष्ठ बंधु राघोपंत किंवा सोनोपंत यांजलाहि नाईकांनीं आश्रय देऊन त्यांला आगळगांवची फडणविशी सांगितली. नाईक पंतांस जहागीरही करून देत होते. परंतु त्यांनीं ती घेतली नाहीं. यापुढें पंत आपला वेळ कीर्तनपुराणश्रवणांत, भक्तिपर ग्रंथ वाचण्यांत, कविता रचण्यांत, कीर्तन करण्यांत व पुराण सांगण्यांत घालवूं लागले. यजमान बाबूजी नाईक वर्षांतून आठ महिने स्वारीस जात व पावसाळ्यांत चातुर्मास बारामतीस राहत. तेव्हां पंत त्यांस भारत, रामायण, भागवत, हरिवंशादि ग्रंथांचें पुराण सांगत. पंतांचें संस्कृताचें अध्ययन उत्कृष्ट असून ते फार चतुर, समयसूचक, मार्मिक, मितभाषी पण मुद्देशीर भाषण करणारे असल्यामुळें त्यांच्या कीर्तनपुराणास रंग येऊन श्रोत्यांची अतिशय दाटी होई व ते कीर्तन पुराण ऐकून भक्तिसुखसमुद्रांत तल्लीन होऊन कांहीं वेळ तरी या नश्वर संसाराला कंटाळून विरक्त बनत. याविषयीं एका आधुनिक नागपुरस्थ **हरिदासाचें** पुढील पद वाचनीय आहेः—

'कीर्तनरस अति पिकला हो ! । पाहूनि पुरजन झुकला हो ! ! ॥ ध्रु० ॥
भक्ति सुमति वैराग्य प्रतिपदीं । प्रतिपादी न च नकला हो ! ॥ १ ॥

वाद्य विविध गायन नानाविध प्रेमकलेविण न कला हो ! ॥ २ ॥
सात्विकभाव विवश सकलहि जन विरल त्यांतूनि चुकला हो ! ॥ ३ ॥'

पंतांची विद्वत्ता, त्यांचें सौजन्य व त्यांची सदाचरणप्रियता पाहून बारामतीकरांच्या कुटुंबांतील माणसांचा, त्यांच्या आश्रितांचा व गांवांतील सर्व जातींच्या आबालवृद्धांचा त्यांच्यावर फार लोभ असे. बारामतींतील लोक पंतास प्रेमानें श्रीपांडुरंग, रामभक्त, महाराज, बावा म्हणून त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून त्यांच्या चरणरजांस मस्तकावर धारण करीत. पंत शरण आलेल्या भाविक, मुमुक्षु स्त्रीपुरुषांस अनुग्रहही देत. **भक्तमंजरीकार** म्हणतातः–

( ओव्या ) 'निरंतर पाटी लेखणी हातीं । आर्याकाव्य नित्य करीती ।
नरनारी मुमुक्षु येती । अनुग्रह देती तयांसी ॥
पंडित आणि भजनशील । काव्यकर्ता संत निर्मळ ।
विद्वज्जनांचे अर्थ सकल । पुरवी प्रांजळ साधु तो ॥
जेथें तेथें आर्या म्हणती । कीर्तनरंगीं प्रेमळ गाती ।
शास्त्रज्ञ वैदिक अर्थ करिती । मुक्त होती श्रवणपठणें ॥'

त्याकाळीं पंताचे संगतीनें बारामती आर्यामय होऊन गेली होती. मुलांबाळांपासून वृद्धस्त्रीपुरुषांपर्यंत सर्वांच्या तोंडीं पंतांच्या आर्या असत. शृंगारवीररसांत पोहणारे स्त्रीपुरुष पंतांच्या सहवासानें त्यांचें कीर्तनपुराण ऐकून सात्विक भावांनीं रंगून जात. पंत बारामतीला श्रीसिद्धेश्वरक्षेत्र म्हणत. बाबूजी नाईकांचे मध्यमपुत्र पांडुरंगराव यांचें व पंतांचें परस्पर फार प्रेम होतें. पंतांनीं बारामतीकरांची चाकरी पुष्कळ वर्षें केली. त्यांचें आपल्या यजमानांविषयीं फार प्रेम होतें; ह्मणून ते एकदोनदां दुसरीकडचा थोर आश्रय मिळत असतां तो न पतकरतां बारामतीस आपल्या यजमानांजवळच राहिले. पेशवे होण्याच्या अगोदर दुसरे बाजीराव साहेब हे भाऊबीजेकरितां एकदां बारामतीस आले असतां तेथें नाईकांचे पदरीं मोरोपंत पराडकर मोठे विद्वान् गृहस्थ आहेत असें पाहून त्यांना आपल्याजवळ ठेवण्याची इच्छा रावसाहेबांनीं नाईकांस कळविली. त्यावर नाईकांनीं आमच्या येथें पंत आश्रयानें राहत नसून आम्हीच त्यांचे आश्रित आहों, तेव्हां याजविषयीं आपण पंतांस विचारावें, ते कोणत्याही कामीं स्वतंत्र आहेत असा जबाब दिला. त्यावरून पंतांस विचारतां त्यांनीं नाईकांस सोडून जाण्याची आपली इच्छा नाहीं असें सांगितलें. नंतर आम्हांस एकदां आपण पुराण तरी सांगावें असें रावबाजींनीं म्हटलें. त्यावर पंतांनीं यजमानांस आपण पुराणास असल्यावर दुसरे कोणी असले तरी चिंता नाहीं असें सांगितलें. त्यावरून बाजीरावास फार राग आला. शिवाय बारामतीकरांशीं त्यांचें वैमनस्य असल्यामुळें पंत त्यांचे आश्रित म्हणून ते पंतांचा व त्यांच्या काव्यांचा फार द्वेष करूं लागले. ह्या गोष्टींच्या ऐतिहासिक सत्यत्वाविषयीं शंका

घेण्यास बरीच जागा आहे. तरी वृद्ध कथेचा आश्रय असल्यामुळें ती येथें दिली आहे. पंतांचें देखील बाजीरावाविषयीं व नानासाहेब पेशव्यांविषयीं मत चांगलें नव्हतें. पुढील आर्या पहाः—

'सुज्ञ शिवाजी राजा न म्हणे तुकयासी काय साधु निका ? ।
तत्पंडितप्रधाना नकळे गुण; समज फार आधुनिका. ॥ (तुकारामस्तुति २२)'

'त्रिभुवनराज्य प्रभुचें प्रतिनिधिनें त्वां स्वहस्तगत केलें, ।
भोळ्या दिगंबराचें आक्रमिलें वतन, जळ जसें तैलें. ॥ (नामार्या १०२)'

पुढें बाजीराव गादीवर असतांना व ब्रह्मावर्ती पदच्युत झाल्यावर कोणाही हरिदासाची कथा करावयाची झाल्यास यजमानांचे आज्ञेवरून कारभारी पुढील पांच कलमें हरिदासास कळवीतः—( १ ) सगळी कथा चार घटकांत आटपावी; ( २ ) यजमान कथेस येऊन बसल्यावर सभेकडे हरिदासानें पाठ करूं नये; ( ३ ) कथेंत कृष्णचरित्र लावावें; ( ४ ) लावलेलें आख्यान अर्धवट न ठेवतां संपविलेंच पाहिजे; ( ५ ) मोरोपंतांची आर्या कथेंत म्हणूं नये.

## ६ कुटुंबसौख्य, स्नेहसंबंध व स्वभाव.

( ओवी ) 'मजमाजी रंगली चित्तवृत्ती । यालागीं विसरला गृहासक्ती ।
त्यासी गृहाश्रमीं माझी प्राप्ती । सुखसंपत्ति निजबोध ॥ १७. ४३१ ॥
( श्रीएकनाथी भागवत )'

( गीति ) 'जरि सर्वाधिक नसतें गार्हस्थ्य, सुकवि कशास या गाते ? ।
याच्या साधिति, लोकीं न च मिरवाया यशास यागातें. ॥ ३.४४ ॥

ममकार, अहंकार त्यागुनि होसील मुक्त गेहींच ।
भव अपवर्ग, मम न मम; हे दोघे नांदतात देहींच. ॥ ५१ ॥
( मोरोपंत-शांतिपर्व )'

'व्हावें शिवपदरतमति न शिवाया कलियुगींहि तापानें, ।
होय न भय संसारीं हरभक्तिरसायनाचिया पानें ॥
( मोरोपंत-अनुशासन ३.२३ )'

'स्नेह करी, हृष्ट करी, तर्पी, रक्षी, सदैव संमानी, ।
पावे सुखें सुखहि, तें मित्र असें म्हणति सर्वहि ज्ञानी. ॥
( मोरोपंत, कर्णपर्व अ० २९.१८ ),'

'प्रेमळ रसिकशिरोमणि, दाता, मृदुहृदय, परमपटु, शांत, ।
कांतमुखश्री ज्याच्या उपदेशें बहुत जाहले दांत. ॥
( विठोबादादास्तुति ).'

पंतांचें कुटुंब फार मोठें होतें. त्यांचे वडील, मातोश्री, सख्खे बंधु आबा, भावजय, स्त्री, स्वतःचे पुत्र व कन्या, बहिण, त्यांची आत्या वगैरे माणसें एका वाड्यांतच राहत असत. वडील बंधु सोनोपंत हे पट्टीचे वैदिक होते. पण त्यांचें बंधूंशीं नीट पटत नसल्यामुळें ते मात्र वेगळे राहिले होते. पंतांची स्त्री रमाबाई ही मोठी सुशील, गुणवती साध्वी होती. त्यांचे व त्यांच्या बंधूंचे जांवई, व्याही, साडु, मेहुणे वगैरे गणगोतही बरेंच असून सर्व माणसांचें पंतांवर मोठें प्रेम असे. पंतांनीं गंगावकिलींत व विष्णुपदवकिलींत या सर्वांचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्यांच्याविषयीं पुष्कळच गोष्टी कळतात. पंतांस रघुनाथ, रामकृष्ण व काशीनाथ असे तिघे पुत्र असून तीन कन्या होत्या. ज्येष्ठ पुत्र रघुनाथ याचा जन्म श. १६७६ त झाला. त्याच्या कुटुंबाचें नांव लक्ष्मीबाई होतें. धाकटा रामकृष्ण हा पंतांस श. १६८२ ह्मणजे त्यांच्या ३१ व्या वर्षी झाला. याला पंढरपुरकर प्रसिद्ध धर्मसिंधुकार काशिनाथबाबा पाध्ये यांची कन्या आवडी ऊर्फ आऊताई दिली होती. त्या वेळीं रामकृष्णाचें वय सुमारें चवदा पंधरा वर्षांचें होतें. पंतांची ज्येष्ठ कन्या साळुबाई ही राजापुरकर ठाकुर यांच्या घरीं, मधली सईबाई ही सातान्यांत नांदगांवकर यांच्या येथें, व कनिष्ठ कोंकणांत देवस्थळी यांच्या घरीं कृष्णाजीपंतास दिली होती. पंतांच्या कुटुंबांतील सर्व माणसांचें त्यांच्यावर फार प्रेम असे व ते सर्वदा त्यांच्या धोरणानें वागत. तसेंच त्यांचा आपसांत एकोपा होता. स्वतः पंतांचें आपलीं मुलेंबाळें, लेंकीसुना, आप्तेष्ट, शेजारीपाजारी यांच्यावर फार प्रेम होतें व त्यांचा स्वभाव थोडासा तापट परंतु फार कोमळ, पापभीरु व प्रेमळ होता. त्यामुळें त्यांचा गृहस्थाश्रम फार नमुनेदार होऊन त्यांना परमार्थाकडे निर्वेधपणें लक्ष्य लावितां आलें. ते कर्मनिष्ठ होते पण कर्मठांच्या अंगीं बहुतकरून आढळून येणारी कठोर व अनुदार वृत्ति त्यांच्या ठिकाणीं नसून ते भागवतकोटींतील विनम्र संत होते. ते उत्कृष्ट कवि व ब्रह्मनिष्ठ असून स्वतःस कविकिंकर ह्मणवीत व ज्ञानी असून प्रेमळ सगुणोपासना करीत. श्रेष्ठ ब्राह्मणजातींत व सत्कुलांत जन्मूनही त्यांच्या ठिकाणीं सर्वभूतीं भगवद्भाव ही उदारवृत्ती असल्यामुळें इतर जातींशीं ते प्रेमपूर्वक सहानुभूतीनें वागून त्यांना प्रसंगीं सहाय करीत. त्यामुळें बारामतींतील श्रेष्ठांपासून कनिष्ठ खाटिकादिकांपर्यंत ते सर्वांना सारखेच प्रिय झाले होते. याची साक्ष त्यांच्या गंगावकिली व विष्णुपदवकिली या दोन स्फुटकाव्यांत आढळून येते. सारांश त्यांनीं 'प्रपंच साधून परमार्थाचा लाभ केल्यामुळें' सर्वांकडून आपणास भला भला ह्मणवून घेतलें. पाध्यांचें घराणें पंतांचें गुरुघराणें असल्यामुळें त्याजविषयीं पंतांच्या मनांत आधींच मोठी पूज्यबुद्धि होती. त्यांत त्या घराण्याशीं शरीरसंबंध झाल्यावर तर त्या उभयतांमधील स्नेह फारच वाढला. कोंकणांत संगमेश्वर तालुक्यांतील ६८ गांवची 'ज्योतिष, धर्माधिकरण, उपाध्येपण, पुजारीपण' यांची वृत्ति पाध्येघराण्याकडे

फार दिवसांपासून चालत आली होती. ही वृत्ति पाध्यांच्या घराण्याकडून निघाल्यावर सुमारें इ. स. १७५८।५९ यावर्षी अनंत पाध्ये पंढरीस आले. हे मोठे विरक्त भगवद्भक्त असल्यामुळें पंत त्यांना फार पूज्य मानीत. पंतांच्या भारताचीं बरीच पर्वें व इतर बरीच कविता अनंतपाध्यांनीं पाहिलीं असून ते पंतांस काव्यरचनोद्योगांत वारंवार प्रोत्साहन देत असें तत्कालीन पंतांच्या पत्रव्यवहारावरून कळून येतें. त्यांचे पुत्र काशीनाथ पाध्ये व विठ्ठल पाध्ये. विठ्ठल ऊर्फ तात्या पाध्ये हे जाडे पंडित होते. त्यांनीं काशीस बारा वर्षें अध्ययन करून ते न्यायव्याकरणादिशास्त्रांत निष्णात झाले. तरी वैयाकरणी ह्मणूनच त्यांची विशेष प्रसिद्धी होती. वडील बंधु काशीनाथ ऊर्फ बाबा पाध्ये हे धर्मशास्त्रांत निष्णात होते. त्यांनीं लिहिलेला 'धर्मसिंधु' ग्रंथ काशीस्थ पंडितांनीं मान्य करून त्याची त्यांनीं पालखींतून मिरवणूक काढिली. अजूनही धर्मशास्त्रावरील ग्रंथांत निर्णयसिंधूच्या खालोखाल या ग्रंथाची मान्यता आहे. उभयतां बंधूंचें परस्पर फार सख्य होतें. विठ्ठल पाध्ये हे ज्येष्ठ बंधूस पितृतुल्य समजून त्यांच्या अर्ध्या वचनांत वागत. पंत आपलीं काव्यें अभिप्रायार्थ व शोधनार्थ त्यांचेकडे पाठवीत; व काशीनाथ बाबाही आपल्या व्याह्याच्या कविता मोठ्या आवडीनें वाचून त्यांचें संशोधन करीत. बाबा जसे धर्मशास्त्रांत निष्णात होते, तसेच ते मोठे निस्पृह भगवद्भक्त होते. त्यांनीं पंढरीस क्षेत्रसंन्यास घेतला असल्यामुळें ते पंढरी सोडून कांहीं झालें तरी बाहेर जात नसत. पंढरपुरास श्रीविठ्ठलाचे उपचार बाबांनीं पुष्कळ वाढविले. स्वतः एवढा अधिकार असून बाबा पंतांस गुरु समजत असत. त्यांनीं पंतांच्या धर्तीवर 'रुक्मिणीपत्रिका' म्हणून एक लहानसें प्रकरण रचिलें आहे. त्याच्या शेवटीं 'श्रीमदार्याचार्यमयूरेश्वरशिक्षितमहामहोपाध्यायकाशीनाथविरचित' असा उल्लेख आहे. रुक्मिणीपत्रिकेंतील बाबांची एक गीति अशी आहेः—

'दे भजनदान अणखी सुखा**करा लोकदा नको कांहीं**; ।
त्या मागिजे द्विजांहीं दिवा**करालोकदान कोकांहीं**. ॥'

वरील गीतींत नवाक्षरी यमक साधिलें आहे. यांत पंतांची धाटणी बाबांनीं उचलल्याचें स्पष्ट दिसून येतें. भागवत दशमस्कंधावर ह्या दोन्ही व्याह्यांनीं टीका केली आहे. बाबांची 'तोषणीसार' नांवाची टीका प्रसिद्ध असून पंतांचे बृहद्दशम व मंत्रभागवत हे ग्रंथ सर्वश्रुतच आहेत. बाबांनीं शेवटीं संन्यास घेऊन ते मोरोपंतांच्या मागें अकरा वर्षांनीं शके १७२७ मध्यें समाधिस्थ झाले. त्यांच्या मागें विठ्ठल पाध्ये यांनीं अकरा वर्षें गृहप्रपंच चालविला व राजेरजवाड्यांकडून इनामें मिळविलीं. पंतांच्या कवनवेलीवर प्रेमजलाचें सिंचन करणारे रघुनाथपंत कोशे, पांडुरंगपदभक्त शेजारी नारायण भट्ट, सर्व सृष्टी आत्मानुभवानें राममय पाहणारे

अनंत नारायण बावा व भक्तमंजरीकार राजाराम प्रासादीचे गुरु सिद्धनाथ रामदासी (जन्म शके १६८७) हे चौघे बारामतीकर सत्पुरुष पंतांचे स्नेही होते. सिद्धनाथाच्या व पंतांच्या बारामतीस गणपतिमंदिरांत वारंवार भेटी होऊन मंदिरांतील भुयारांत एकांतांत त्यांची परमार्थरहस्यचर्चा चाले. भक्तमंजरींत याविषयीं उल्लेख केला आहे. तो असाः—

(ओव्या) 'मोरोपंडित बारामतीचा । आवडता परम श्रीस्वामीचा ।
सन्निध आश्रम तयाचा । समागम ज्याचा सतत तया ॥
अति स्नेह मयूरेश्वरीं । प्रेम सिद्धचरणावरी ।
भूअंतर्गत बैसती विवरीं । संगती बरी परस्परें ॥'

तसेंच, सदाशिव पाध्ये कऱ्हाडकर, ताहराबादकर महीपतिसुत विठ्ठल गोसावी, बाळकृष्ण बावा, विठोबादादा चातुर्मासे, त्यांचे पुत्र भैराळबोवा, बीडकर कौस्तुभभट, बाळंभट काजळे, रामचंद्र अनंत बडवे व प्रसिद्ध 'लावणी' कार रामजोशी सोलापुरकर हे पंतांचे स्नेही असून त्यांच्या आर्येचे मोठे भोक्ते होते. या व इतर मंडळींशीं पंतांचा पत्रव्यवहार असून पंत आपलीं काव्यें लेखनार्थ यांजकडे पाठवित. विठोबादादा व त्यांचे पुत्र भैराळबावा ह्यांस पंतांनीं पुष्कळ पत्रें पाठविलीं आहेत, त्यांवरून पुष्कळ नवीन गोष्टी कळतात. एका पत्रांत पंतांनीं विठोबादादा व बाळकृष्ण बावा यांस 'श्रीमद्भगवद्भक्तशिरोमणी' व स्वतःस 'विद्यार्थी मयूर' असें संबोधिलें आहे. उभयतां पितापुत्र प्रेमळ भगवद्भक्त असून कीर्तन करीत. त्यांच्या घराण्याशीं पंतांचा फार घरोबा असे. दादांस तर पंत गुरुतुल्य मानीत असून काव्यरचनेच्या कार्यात ते त्यांच्या पुण्याशीर्वादाची नेहमीं अपेक्षा करीत. भारताचीं पर्वें, ब्रह्मोत्तरखंड, मंत्ररामायण, साधुरीति वगैरे कविता पंत त्यांच्याकडे अवलोकन करून लेखन करण्यास पाठवित असत. स्फुट काव्यें भाग १ यांत छापलेली 'विठ्ठलभक्तस्तुति' विठोबादादांची स्तुति होय. शिवाय विठोबादादांस लिहिलेल्या एका पत्रांत मोरोपंतांनीं त्यांच्याकडे सहा सुरस गीती लिहून पाठविल्या. त्यावरून दादा उत्कृष्ट कीर्तनकार, प्रेमळ, रसिकशिरोमणी, दाता, मृदुहृदय, शांतदांत, नेत्रांत मुखांत कृपा असलेले, लहानथोरांस सारखेच प्रिय, वृक्कालाही सरळ करणारे व आपल्या सूक्तीनें जडाचाही उद्धार करणारे, व गोड भाषण करणारे सत्पुरुष होते असा त्यांच्याविषयीं पंतांचा अभिप्राय होता असें कळतें. या गीति फारच सुरस, सरळ व प्रतिभासंपन्न आहेत. पुढील अल्प मासला पाहाः—

(गीति) 'नेत्रांत, मुखांत कृपा ज्याच्या हृदयांत सर्वदा वसली; ।
शब्दांत मधुरता श्रीहरिच्या अंकीं जशी तशी बसली. ॥
संत विठोबा दादा लहान थोरांत सांगतां वाटे; ।
टाकुनि खेळ मुलांनीं यावें पायां पडावया वाटे. ॥'

दादांची बालविधवा बहिण जिजाबाई हीही भगवत्सेवापरायण होती. तिला पंत मातुश्रीतुल्य समजत. दादांना पाठविलेल्या प्रत्येक पत्रांत पंतांनीं तिला नमस्कार लिहिले असून तिजवर त्यांनीं एका पत्रांत पुढील आर्या रचिली आहेः-

'भवभय जायास्तव त्या नमितों मी सर्वकाळ **जीजी**तें, ।
बहु भूतदया हृदयीं, रंकाची सर्व काळजी जीतें. ॥'

हे विठोबादादा पंतांपूर्वीं तीन वर्षेंच अगोदर ह्मणजे श्रावण कृष्ण १३ शके १७१३ रोजीं पंढरीस समाधिस्थ झाले. यांचा मठ पंढरीस प्रसिद्ध आहे. त्यांचे चिरंजीव मैराळ बावा हे वडिलांच्या नंतर एका तपानें ह्मणजे शके १७२६ चैत्रांत वारले. सदाशिव पाध्ये हे पंतांचे गुरु केशव पाध्ये यांचे पुत्र असून पंतांचे सहाध्यायी व जिवलग मित्र होते. त्यांच्या सांगण्यावरून पंतांनीं कृष्णामाहात्म्य, मदालसाचरित्र व ब्रह्मोत्तरखंड हीं काव्यें रचिलीं. जन्मभर भक्तकथा आवडीनें गाणारे महीपतिबुवा ताहराबादकर यांचे विठ्ठल गोसावी हे चिरंजीव होत. यांचा पंताशीं स्नेह असून पंतांविषयीं त्यांच्या ठिकाणीं पराकाष्ठेचा आदर असल्याचें त्यांच्या पत्रावरून कळतें. बाळंभट्ट ऊर्फ यादव काजळे याचें पंतांच्या आर्येविषयीं फार प्रेम होतें व पंतांच्या आर्यांचे अनुकरण करून त्यानें कांहीं कविताही रचिली आहे. हा पंतांचा रसिक भक्त होता. याचें पंतांस पाठविलेलें आर्यात्मक पत्र फार सुरस आहे. त्याचा थोडासा मासला येथें देतोंः—

(गीति) '**दुर्गा**युतान्विता मज **दुर्गा**त्राला न होय उद्योग, ।
**दुर्गा**श्रया मला श्री**दुर्गा**तोषें घडो भवद्योग. ॥
सारांश हाचि करुणा तुह्मीं करा मजवरी अहीनमनें ।
सुज्ञाप्रति बहुलेखन किमर्थ करणें मदीय हीं नमनें. ॥'

पंढरपुरच्या बडवेमंडळींतील प्रसिद्ध साक्षात्कारी प्रल्हादबोवा हे पंतांच्या जन्माच्या अगोदर अकरा वर्षें ह्मणजे शके १६४० माघ कृष्ण ११ स पंढरीस समाधिस्थ झाले होते. यांचे पणतू रामचंद्र अनंत बडवे-विठोबादादा चातुर्मासे यांचे शिष्य-पंतांचे स्नेही होते. यांनीं केलेल्या मयूरस्तुत्यार्यांत पंतांच्या काव्यगुणांचें वर्णन फार रसिकेतेनें व मार्मिकपणानें केलें आहे. त्या मोरोपंतांच्या चरित्राचीं परिशिष्टें-परिशिष्ट 'अ' यांत छापल्या आहेत. पंतांच्या मित्रमंडळांत आणखी एका सुप्रसिद्ध रंगेल पण रसिक विद्वानाचा समावेश होतो. पेशव्यांच्या दरबारीं '**अभिनव-कालिदास**' पदवी मिळविलेले 'कविप्रवर' सोलापुरकर रामजोशी हे ते होत. यांचा जन्म शके १६८४ त झाला. यांची बुद्धिमत्ता मोठी, कवित्वशक्ति लोकोत्तर, व वाणी अत्यंत रसाळ असल्यामुळें शृंगारवीरकरुणशांत्यादि जे जे रस ते वर्णितात ते ते श्रोत्यांच्या किंवा अलीकडे त्यांची कविता वाचणाऱ्यांच्या समोर मूर्तिमंत उभे

राहतात. त्यांची शब्दयोजना फार मार्मिक, भाषा अस्खलित, रसाळ, सहजसुंदर व जोरदार, व प्रतिभा तप्तकांचनसंनिभ असल्यामुळें त्यांची कविता श्रवण करितांच श्रोत्यांचीं अंतःकरणें तदाकार होऊन त्यांचीं मस्तकें डोलून मुखांतून धन्योद्गार बाहेर पडतात. जोशीबोवा एकुणतीस वर्षांचे असतांनाच त्यांची कीर्ति ऐकून पंत त्यांचे विषयीं विठोबादादाच्या पत्रांत लिहितांना 'सोलापूरकर राजश्री कविप्रवर रामज्योतिर्विद स्वामीचे सेवेशीं साष्टांग नमस्कार. भेटी घडावी हे विनंति' असा मजकूर लिहितात यावरून जोशीबोवाच्या कवित्वाची छाप पंतांसारख्या कविवर्या-वरही केवढी पडली होती हें कळून येतें. यांनाही पंतांविषयीं व त्यांच्या कविते-विषयीं मोठा आदर वाटत होता. यांनीं पंतकवितेवर दिलेला आर्याबद्ध अभिप्राय परिशिष्ट 'अ' पृ० २ यांत छापिला आहे ('वाणी मयूरवदनीं···अनंत माया वी.॥') याशिवाय कोल्हापुरच्या देवीचे पुजारी दाजीबा यासारख्या शेंकडों माणसांना पंतांच्या कवितेनें वेड लाविलें होते. ही मंडळी पंतांची कविता मागवून त्यांच्या प्रती करून घेत. दाजीबा पुजाऱ्यानें पंतांचें उद्योगपर्व लिहून घेऊन त्याच्या शेवटीं पंतांच्या कवितेविषयीं आपला मार्मिक अभिप्राय दिला आहे. तो परिशिष्ट-'अ,' पृ० ४ यांत पहा. रामजोशी हे पूर्वीं तमाशा करीत. ते एकदां पंढरीस तमाशा घेऊन गेले. नटाचें तोंड पहाणें शास्त्रविरुद्ध म्हणून पंत त्यांच्या तमाशांत जात नसत. मंडळीच्या विशेषतः जोशीबोवाच्या अतिशय आग्रहावरून पंत जोशीबोवांचें कवन ऐकण्याकरितां एकदां माडीवर बसले. ही गोष्ट मंडळीनें जोशीबोवांस कळविली. तेव्हां त्यांनीं डफावर थाप मारिल्यापासून बोधवैराग्यपर सुंदर लावण्या रचून म्हणण्याचा सपाटा चालविला. त्या ऐकून पंतांचें मन प्रसन्न झालें व त्यांनीं माडीवरून खालीं येऊन जोशीबोवांची स्तुति केली व तुमची वाणी रसाळ आहे, तुमची विद्वत्ता व वक्तृत्व असामान्य आहे; तेव्हां नटास पुढें करून तमाशा न करितां यापुढें कीर्तन करीत जा असा उपदेश केला. त्यावर कीर्तनाचें साहित्य आपणाजवळ नाहीं असें जोशीबोवांनीं सांगितल्यावरून 'मी तुमच्यासारख्या कीर्तनेच्छूकरितांच काव्य करित आहें. त्याचा उपयोग तुम्ही कीर्तनांत करावा' असें पंत म्हणाले. तेव्हांपासून जोशीबोवांनीं तमाशा सोडून कीर्तन करण्यास आरंभ केला. पंतांची आर्या जोशीबोवांच्या कीर्तनामुळेंच चहूंकडे फार प्रसिद्ध झाली. यासंबंधीं एक अशी आर्या आहेः—

'जैसी जनकें दिधली सच्चिद्घन राम जो सिता त्याला; ।
तैशी मयुरें दिधली आर्याही रामजोसि तात्याला. ॥'

पंतांचे आईबाप त्यांनीं अनुशासनपर्व लिहिण्यापूर्वीच म्हणजे पंत सुमारें ४०। ४५ वर्षांचे असतांनाच वारले. विठोबादादांस पाठविलेल्या पत्रावरून पंतांनीं आपल्या मुलींस व सुनांसही लिहिण्यावाचण्यास शिकविलें होतें असें दिसतें.

त्यांची नातसून मोरभाऊची स्त्री सरस्वतीबाई ही रघुकिरातादि काव्यें पढली होती; आर्यापंडितांनाही न उकलणाऱ्या आर्या ती सहज उकलून दाखवी; शेंकडों आर्या तिला कंठगत असत; व तिनें आपल्या मुलाबाळांना व पुतण्यांस पंतांच्या आर्यांचा अर्थ करण्यास शिकविलें असें सांगतात. स्त्रीजातीविषयीं पंतांचे विचार फार थोर होते. त्यांचे पुत्र रामकृष्णपंत हेही चांगले विद्वान् होते. त्यांचे चुलत सासरे प्रसिद्ध वैयाकरणी व नैयायिक विठ्ठल पाध्ये यांनीं पंढरपुरास त्यांना राहण्यास वाडा बक्षिस दिला व भागानगरचे राजे चंदुलाल यांजकडून इ. स. १८२६ त सुमारें पांचशें रुपये उत्पन्नाचें सारोळें गांव इनाम देवविलें. हेच विठ्ठल पाध्ये पूर्वी कवित्वशक्तीसंबंधानें पंतांशीं मत्सर करीत असत. 'मोरोपंतच काय आर्या करितात, मीही करितों' असें त्यांनीं एकदां अभिमानानें म्हटल्यावरून काशीनाथ बाबांच्या सांगण्यावरून पंत व विठ्ठल या उभयतांच्या आर्या रात्रीं देवाजवळ ठेविल्या. प्रातःकाळीं मंडळी पाहावयास गेली तेव्हां पंतांच्या आर्या देवाजवळ असून विठ्ठल पाध्ये यांच्या दूर खालीं पडलेल्या दिसल्या. तेव्हांपासून विठ्ठल पाध्ये यांनीं पंतांचा मत्सर करणें सोडून दिलें. पंतांच्या मागें त्यांजविषयीं उल्लेख करितांना चंदुलालास लिहिलेल्या पत्रांत 'जगप्रसिद्ध महाभगवद्भक्त श्रीमोरोपंत बाबा···(यांनीं) निरंतर श्रीभगवत्सेवा केली' असे उद्गार काढिले आहेत. पंतांचा स्वभाव गोड, मनमिळाऊ पण अमळ तिरसट असे. पंडितपुराणिकांत दिसून येणारी अहंमन्यता त्यांच्या ठिकाणीं नसून ते फार नम्र होते. त्यांना ग्रंथसंग्रह करण्याचा मोठा नाद असे. त्यांचें आचरण फार पवित्र होतें. या त्यांच्या गुणांवरून बारामतीकरांच्या घरची मंडळी, त्यांचे आश्रित, बारामतीची व इतर ठिकाणची त्यांची स्नेहीमंडळी यांची त्यांजविषयीं मोठी पूज्यबुद्धी असून ते त्यांना फार मानीत असत. तसेंच बाबूरायांनीं पंतांस आश्रय दिला होता यास्तव त्यांनीं आपल्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं आपल्या यजमानांचा, त्यांच्या पुत्रांचा, त्यांच्या आश्रितांचा वगैरे कृतज्ञपणें उल्लेख केला आहे. परिशिष्ट (ड) पहा.

## ७ भगवद्भक्ति, सत्संग व तीर्थयात्रा.

( गीति ) 'मन हेंचि फार इच्छी कीं आतां सेवणें तुझे पाय, ।
तुजवांचुनि इतरांच्या भजनीं मजलागिं होय फळ काय ? ॥
( आर्या केका. २१ )'

'मातेतें त्यजुनि पळहि जाय न भलतीकडे जसें बाळ, ।
सत्संगति सोडुनि मन नच जाउ, तसेंचि घेउ हें आळ. ॥
( सन्मनोरथराजि ११ )'

( गीति ) 'यः पठति, लिखति, पश्यति, परिपृच्छति पंडितानुपाश्रयति ।
तस्य दिवाकरकिरणैर्नलिनीदलमिव विकास्यते बुद्धिः ॥
( सुभाषितरत्नभांडागार पृ० १७७,७६० )'

मोरोपंत महाभगवद्भक्त होते. त्यांना कीर्तनपुराणश्रवणाची व सत्संगाची लहानपणापासून फार गोडी होती. याविषयीं त्यांच्या स्फुटकाव्यांतून व विशेषतः 'सन्मनोरथराजि' या काव्यांतून पुष्कळ उल्लेख आढळतात. 'जसें मांजर दुधावर टपतें, हळद, कुंकूं हीं सौभाग्यद्रव्यें जशीं सुवासिनीला प्रिय असतात, फाल्गुनी पौर्णिमेची जशी लहान मुलांना आवड असते, तसें मला कीर्तन प्रिय असावें व हरिकीर्तनप्रसंगीं धनिकाच्या येथें जसा चोर जपून शिरतो तसें शिरून अनेक कामें मागें असलीं तरी कुचर ढोराप्रमाणें कीर्तन सोडून मीं उठूं नये' अशी इच्छा पंत सन्मनोरथराजींत प्रकट करितात. कीर्तनमहिमा विठोबादादांस पाठविलेल्या एका पत्रांत पंत असा वर्णन करितातः—

( श्लोक ) 'काढिली स्पष्ट मोहाच्या पाठिची साल साधुंनीं ।
भगवत्कीर्तनें, केली देवांची सालसा धुनी. ॥'

( मोहाच्या पाठीची साल संतांनीं भगवत्कथा करून काढिली व पाप्यांचा उद्धार करण्याचें काम कीर्तनांतच होत असल्यामुळें देवनदी गंगेकडे फारसें राहिलें नाहीं म्हणून ती आळशी झाली—हें तात्पर्य. )

'खाती समस्तांसहि काळजी जी । ती साधुला भी, करी काळ 'जी जी !' ॥
कीं ते सदा वर्णिति जानकीशा । जो दे शिवों मोह न जा (=ज्या), न कीशा. ॥'

दुसऱ्या एका पत्रांत सत्समागमाविषयीं 'देव कृपा करील तरच सत्समागम घडोन अत्युत्सवपात्र जन होतो' असा उल्लेख पंत करितात. भगवन्नामवर्णनाची पंतांस केवढी मोठी आवड होती ती त्यांच्या अष्टोत्तरशतरामायणांवरून व इतर काव्यांवरून स्पष्ट होते. भगवद्भक्तांच्या समागमाचे पंत फार भुकेले होते. त्यांच्याविषयीं पंतांचे मनांत केवढी पूज्यबुद्धी वसत असे तें त्याच्या साधुसत्कार, साधुरीति, साधुस्तव, सद्वर्णन इत्यादि प्रकरणांवरून दिसून येतें.

'न शूद्रा भगवद्भक्ता विप्रा भागवताः स्मृताः ।
सर्वे वर्णेषु ते शूद्रा अभक्ता वै जनार्दने' ॥

हें पौराणिक वचन त्यांच्या ठिकाणीं इतकें बाणून गेलें होतें कीं सन्मणिमालेंत मुकुंदराज, ज्ञानदेव, मुक्ताबाई, नामदेव शिंपी, एकनाथ, तुकाराम वाणी, सावळा माळी, गोरा कुंभार, जनी दासी, बोधला पाटील, सेना न्हावी, दादु पिंजारी, धना जाट, मीराबाई, कर्माबाई, कबीर, मानपुरी गोसावी, शेख फकीर, नरहरि सोनार, कान्हुपात्रा वेश्या, चोखा महार, रोहिदास चांभार, सजणा कसाई, शेख महंमद, लतीबा

हे मुसलमान इत्यादि भिन्नभिन्न जातींच्या भगवद्भक्त स्त्रीपुरुषांना त्यांनीं अत्यंत प्रेमपुरःसर नमस्कार केला आहे. सन्मणिमालेंत एके ठिकाणीं ( ८७ गीति ) ते लिहितातः—

(गीत्यर्ध) 'हृदया ! स्मर त्यासि, असो श्रीभगवद्भक्तजाति भलती बा !'.

तसेंच मंत्रभागवताच्या प्रारंभीं नमनार्यांच्या शेवटीं ते म्हणतातः—

( गीति ) 'यश हरिचें ज्यांसि रुचे, यदुपतिसचि वाहिला जिहीं काय ।
यद्यपि निष्कृष्ट झाल्या यवनहि त्यांचेहि वंदितों पाय. ॥'.

जवळपास कोठें संत आले असें वर्तमान त्यांना कळलें तर ते दर्शनास गेल्याशिवाय राहत नसत. एवढेंच नव्हे तर संतदर्शनार्थ ते दूरचा प्रवास करण्यास देखील मागें पुढें पहात नसत. 'सन्मणिमाला' काव्यांत अनेक महाभगवद्भक्तांचा उल्लेख करून हें काव्य संपल्यावर कऱ्हाडानजीक नरसिंहपुर येथें श्रीसिद्धेश्वर भटजी बोवा नामक प्रसिद्ध कटावकर्ते अमृतराय यांचे शिष्य मोठे प्रासादिक भगवद्भक्त योगी रहातात असें पंतांस कळल्यावरून ते इ. स. १७७४ त म्हणजे ४५ व्या वर्षी बारामतीहून श्रीचे दर्शनार्थ मुद्दाम नरसिंहपुरास गेले व तेथें जाऊन त्यांनीं 'महाराज ! मीं अल्पमतीनें सन्मणिमाला म्हणोन कांहीं आर्या केल्या, त्यांत आपलें नांव घालण्याचें राहिलें. त्यांस त्या मालेमध्यें आपलें नांव व्यक्तरूपानें असावें अशी बुद्धीस प्रेरणा श्रींनीं करावी, म्हणून बोवांस आग्रहपूर्वक प्रार्थना केली. त्यांवर 'बरें आहे,' म्हणून आज्ञा झाली असतां त्यांनीं पुढील गीति रचिलीः—

'नमिलें श्रीसिद्धेश्वर भटजी बावाचिया सुपद-कमला; ।
या सन्मणिमालेला सांपडलें हें बरें सुपदक मला. ॥'

हे सिद्धेश्वरभटजी शके १६५५ चैत्र शुद्ध नवमी मंगळवारीं पुनर्वसु नक्षत्रावर जन्मले. कोल्हापुरचे तिसरे शिवाजी राजे, यांनीं आपली स्त्री सुंदराबाई हीसह यांचा शके १७०१ त अनुग्रह घेतला. महादजी शिंदे, शेणोलीकर फडके, भोपटकर पंत सचिव वगैरे सरदारांनींही यांचाच उपदेश घेतला होता. जसे शिवाजीचे गुरु श्री समर्थ रामदासस्वामी, पहिल्या बाजीरावाचे ब्रह्मेंद्रस्वामी, तसेंच तिसरे शिवाजीराजे यांचे गुरु हे सिद्धेश्वरभटजी होते. हे सत्पुरुष वैशाख शुद्ध षष्ठी शके १७२३ सोमवारीं समाधिस्थ झाले.

पंतांनीं आपल्या उत्तरवयांत पुष्कळ यात्रा केल्या हें त्या त्या ठिकाणच्या देवतांच्या स्तुतिपर ज्या त्यांनीं कविता केल्या त्यांतील उल्लेखांवरून समजतें. पंत आपल्या वयाचे साठवे वर्षी शके १७१० कार्तिकांत यजमानपुत्र पांडुरंगराय यांनीं पाठविल्यावरून वडील भाऊ सोनोपंत, आपली स्त्री रमाबाई, आईपेक्षां अधिक प्रेम करणारी आत्या, व इतर नातलग घेऊन इतिहासप्रसिद्ध धनाजी जाधवांचे नातु

अमरसिंह जाधव यांजबरोबर महायात्रेस गेले. धनाजीरावांचे द्वितीय पुत्र शंभुसिंह यांचे हे अमरसिंह जाधव पुत्र असून त्यांची तीन लक्षाची जहागीर होती. यांचा जन्म शके १६५४ त होऊन ते शके १७४० वारले. साष्टी, खर्डे, पानपत इत्यादि लढायांत मराठ्यांच्या तर्फे हे असून ह्यांनीं त्यांत मोठा पराक्रम गाजविल्याचें इतिहासांत नमूद आहे. काशीमहायात्रा म्हणजे काशी, प्रयाग व गया या त्रिस्थळींची यात्रा होय. पंत सर्वमंडळीसह कार्तिकारंभीं बारामतीहून निघाले व शके १७१२ ची बरसात होण्यापूर्वी परत आले. महायात्रेच्या मुक्कामांची जंत्री उपयुक्त समजून येथें देतों. त्यावरून त्याकालच्या प्रवासाची काहीं कल्पना येईलः—

बारामतीहून प्रयाण—**कार्तिक** शुक्ल १ शके १७१०
गांवाबाहेर—शु० १-५
उडवंडी—शु० ८ (बुधवार)
शिरसोफळ—शु० ९-१२
नांदादेवी—शु० १४
आरवी—शु० १५ (गुरुवार)
लिपणगांव—कृ० १
चांभारगोंदे—कृ० २ (शनिवार)
पिसोरें—कृ० ३
रुई—कृ० ४
उकडीगांव—कृ० ५
डोंगरगांव—कृ० ६
खरवंडी—कृ०७ (गुरुवार)
टोंकें—कृ० ८-१०
गाजगांव—कृ० ११
**वेरूळ**—कृ० १२-१३
देवगांव—कृ० १४
टाकळें—कृ० ३०
भडगांव—**मार्गशीर्ष** शु०५ (मंगळवार)
जळगांव—शु० ७ (गुरुवार)
बऱ्हाडपुर—शु० १०-१२
**ओंकारमांधाता**—कृ० ४-५
**इंदूर**—कृ० ११-१२
**उज्जनी—मार्ग.** कृ० ३०—**पौष** शु० १ (रविवार)
सारंगपुर—शु० ६-७
**ओंकार**—शु० ९
**सागर**—कृ० ३-४
नरसीगड—कृ० ३०
**चित्रकुट—माघ** शु० ३-४
गोराडपुर—कृ० २-५
यमुनाउत्तरगीर—कृ० ७-८
**प्रयाग** महाराजगंज—**फाल्गुन** शु० ६ (सोमवार)
मोहनसराई—शु० ७
**काशी—फाल्गुन** कृ० ८-११
**गया—चैत्र** शु० ११—**वैशाख** शु० ७ (शनिवार) (श. १७११)
**काशी**—चातुर्मासारंभापासून मार्गशीर्ष अखेर

पंतांस यात्रेस चलण्यास प्रथम त्यांच्या पत्नीनेंच आग्रहपूर्वक सुचविलें असून बंधु आबा व भावजय सगुणाबाई यांनीं त्यांना अनुमोदन देऊन यात्रेचें सर्व साहित्य करून दिलें, ह्या गोष्टी विष्णुपदवकिलीवरून कळतात. पंतांनीं 'गंगावकिलीं'त सवाई माधवराव पेशवे, नाना फडनवीस, हरिपंत फडके, रास्ते, अहल्याबाई होळकरीण या

सर्वांचा उल्लेख केला आहे. (परिशिष्ट 'ज' पहा.) यावरून इ०स०१७८८-८९ ह्या वर्षी वर निर्दिष्ट केलेली मंडळी जिवंत होती असें दिसतें. पंत काशीस चातुर्मास राहिले. तेथें असतांना रोज सकाळीं स्नानानंतर भगवद्गीतेचें पद्यात्मक भाषांतर रचून तें ब्राह्मणाला दान केल्याशिवाय ते भोजन करित नसत अशी त्यांच्याविषयीं एक गोष्ट सांगतात. काशीस असतांना पंतांनीं आपली कविता काशीकर पंडितांस दाखविली. त्याच्या अगोदर पंतरचित संस्कृत मंत्ररामायण व कांहीं काव्यें पंडितांच्या पहाण्यांत आलीं होतीं. तथापि यावेळीं काशीस्थ पंडितांनीं पंतकवितेची शलाकापरीक्षा (मध्येंच एखादें प्रकरण काढून केलेली परीक्षा) करण्याचें ठरवून भारतार्यांपैकीं खालील दोन आर्या असलेलें पान मध्येंच काढिलें. त्या आर्या ह्याः—

'वदवि मयूराकरवीं श्रीराम विराटपर्व चवथें बा ।
स्वल्प ह्मणोनि न सोडी अमृताची शक्ति सर्व चव थेंबा. ॥
रामघन सत्प्रसादामृत जों जों बहु वळोनि वर्षतसे ।
तों तों भक्तमयूर स्वार्या केका करूनि हर्षतसे. ॥ (विराटपर्व ७.३६-३७)'.

यासंबंधीं पंतांचे मार्मिक टीकाकार **हंस** हे आपल्या 'मोरोपंत' या निबंधांत लिहितातः—'या विराटपर्वाच्या शेवटल्या आर्या आहेत. त्यांत कथानकाचा कांहीं एक संबंध नसून ह्या केवळ पंतकवीच्या स्वतंत्र व निर्मळ प्रतिभानिर्मित आहेत. भगवत्प्रसादानें परीक्षेच्या वेळीं अशाच सुंदर कविता काशींतील पंडिताच्या प्रेमावलोकनास पात्र झाल्या ही मोठी आनंदाची गोष्ट झाली.···असे सुभग अलंकार पाहून काशींतील महापंडित फार प्रसन्न झाले. आणि पंडितांची प्राकृतावर स्वाभाविक अप्रीति असतांही प्राकृतांतील वरच्या सारख्या आर्यांचें अपूर्व लावण्य अवलोकन करून त्यांनीं पंतांच्या कवितेची मोठी वाहवा केली. ज्या पात्राला पाहून पंडित लोक नाक मुरडित होते त्याच पात्रांत आपला काव्यरस भरून तो पंडितांपुढें ठेवून पंतांनीं त्यांकडून चाखविला आणि पाकनैपुण्यांत आपणास वाहवा ह्मणवून घेतलें. एवढ्याच गोष्टीवरून आह्मी पंतांस महाराष्ट्रकविमुकुटमणि ह्मटलें तरी हरकत नाहीं. मग तत्त्वतः त्यांचें कवितासौंदर्यही वरील आख्यायिकेस उत्तेजकच आहे असें पाहिल्यावर कोणता रसिक आह्मांस अनुसरणार नाहीं ?" अशा रीतीनें पंतकविता काशीस्थ पंडितांना फार पसंत पडली व त्यांनीं पंतांची व्यासपूजा केली. याच महायात्रेंत पंतांनीं अनेक पवित्र क्षेत्रांचें व तीर्थांचें दर्शन घेऊन त्यांवर स्तोत्रें रचलीं. काशींतल्या तर सर्व देवतांचें त्यांनीं पृथक् वर्णन केलें आहे. गंगास्तुति, गंगाप्रार्थना, गंगावकिली, गंगास्तव, व गंगाविज्ञप्ति (संस्कृत), हीं पांच प्रकरणें गंगेसंबंधीं व काशीप्रार्थना, काशीस्तुति हीं दोन काशीसंबंधीं असून विश्वेशस्तुति, काळभैरवस्तुति, अन्नपूर्णास्तुति, मणिकर्णिकास्तुति, द्विचत्वारिंशल्लिंगयात्रा हीं काशीस्थ देवतांविषयीं आहेत. या सर्वांत 'विश्वेशस्तुति' व 'गंगास्तव' हीं दोन प्रकरणें सरस उतरलीं

आहेत. त्यांतही 'गंगास्तव' हें तर अधिकच मधुर झालें आहे त्याचीं पद्यें एकूण ३७ असून त्यांतील पहिले सव्वीस श्लोक तर जगन्नाथराय पंडितकृत गंगालहरीच्या प्रसिद्ध शिखरिणी वृत्तांत असून पुढील दोन २७-२८ पृथ्वीछंदांत, २९ वा शार्दूलविक्रीडितांत, व ३० वा स्रग्धरा वृत्तांत आहेत. हींच वृत्तें पंडितांच्या गंगालहरीचीं असून क्रमहि तोच आहे. फक्त गंगालहरीचे शेवटचे दोन श्लोक ( 'विभूषितानंगरिपूत्तमांगा··· इमां पीयूषलहरीं:···') अनुक्रमें उपजाति व अनुष्टुप् छंदांत आहेत. तीं वृत्तें तेवढीं गंगास्तवांत योजिलीं नसून त्यांच्या ऐवजीं सवाई, घनाक्षरी, दंडक, व चामर हीं वृत्तें योजिलीं आहेत. हा गंगास्तव रचितांना पंतांना गंगालहरीचें खचित स्मरण असावें. पंतांचा 'गंगास्तव,' व पंडितांची 'गंगालहरी' ताडून पाहिल्यास 'लहरीं'तील रसपुष्टी, करामत, व माधुर्य गंगास्तवांत आढळून येणार नाहीं. तथापि पंतांनीं यमकाचें बंधन संभाळून गंगास्तवांत पुष्कळच सरसत्व, प्रसाद व भक्तिमत्त्व ओतिलें आहे. भाषा सोपी व वर्णन सरस व सरळ आहे. लांब सामासिकपदें यांत मुळींच घातलीं नाहींत. पुढील मासला पहाः–

( श्लोक ) 'समर्था तूं, चित्तीं भवभय धरूं **का पतित मी**? ।
रवीच्या पार्श्वींचे, न, पडुनि कधीं, **कांपति तमीं** ॥
जगन्माते ! गंगे ! अभयवर **तो दे वसविता** ।
त्वदंकीं, हृत्पद्माप्रति सुखद **तो देच सविता**. ॥ ११ ॥

तुझ्या तीरीं नीरीं हृदय **रमतें**, दुःख **शमतें**, ।
यशोगानें पानें कुमत **गळतें**, विघ्न **टळतें**; ॥
कळी भंगे **गंगे**, ! षडरि **झुरती**, दोष **नुरती**, ।
दिली **रामें**, **नामें** तशिच **जगतीला** निज**गती**. ॥ २३ ॥'

गंगा, गोदावरी, कृष्णा, इत्यादि देशांवरील तीर्थांतच पंतांनीं स्नान केलें असें नाहीं, तर कोंकणांतील राजापुरच्या गंगेंतही त्यांना 'सत्संगतीनें एक वेळ अलभ्य मज्जन घडलें.' पंत 'भूमीवरची मोक्षपुरी पंढरी'सही पुष्कळ वेळां गेले होते. त्यांनीं पांडुरंगाचीं संस्कृत व प्राकृत अशा दोन्ही तऱ्हेचीं स्तोत्रें रचिलीं आहेत. पंढरीसच बाबा पाध्ये यांची मुलगी पंतांचे चिरंजीव रामकृष्णपंत यांस दिली. हा शरीरसंबंध जुळल्यामुळें पंतांचें तेथें बरेच वेळां जाणें झालें व पंतांच्या मृत्यूनंतर त्यांचे चिरंजीव सासऱ्याच्या आग्रहामुळें कायमचे पंढरीसच राहिले. काशीयात्रेहून परत येतांना पंतांनीं 'देवी अहिल्याबाई'ची भेट घेतली व तिच्या थोरपणाबद्दल आपला आदर प्रकट करावा म्हणून त्यांनीं 'अहिल्यास्तुति' नामक एक लहानसें प्रकरण रचिलें. या उदार स्त्रीनें पंतांनीं सालिना ५०० रुपये घेऊन आपल्याजवळ राहावें म्हणून फार आग्रह केला. परंतु पंतांचें आपल्या यजमानांवर फार प्रेम

होतें म्हणून त्यांनीं ती गोष्ट मोठ्या दुःखानें नाकारली. पंतांची सर्व देवांविषयीं समबुद्धि होती तरी ते रामोपासक होते. आपल्या उपास्यदेवतेप्रीत्यर्थ त्यांनीं आपल्या उत्तर वयांत १०८ रामायणें रचिलीं. त्यांत त्यांनीं आपली चित्रकाव्याभिरुचि प्रकट केली आहे. ( परिशिष्ट-'औ' पहा. ) यांपैकीं सुमारें ९६ रामायणें आजवर छापून प्रसिद्ध झालीं आहेत. पंतांचा स्वभाव साधारणतः शांत, तरी अशक्त असल्यामुळें जरा तिरसट होता. ते शरीरानें स्थूल असून वर्णानें गोरे होते. त्यांच्या स्थूल शरीराला अनुलक्षूनच रामजोशी बोवा एकदां त्यांच्यासमोर कीर्तन करीत असतांना पंतांच्या आर्यांचे एक दोन अर्थ करून, त्यांच्या पोटाकडे बोट दाखवून 'मी यथामति हे अर्थ सांगितले खरे, परंतु या विशाल उदरांत आणखी किती अर्थ असतील तें कोणाला माहित!' असें म्हणाल्याचें सांगतात. पंतांना नेहमीं डाव्या हाताचा पंजा हालविण्याची चमत्कारिक संवय होती. 'असें कां?' म्हणून एकानें विचारिलें असतां रामजोशी बोवांनीं विनोदपूर्वक समयसूचकतेनें असें उत्तर दिलें कीं 'पंत पद्यरचना करूं लागले कीं यमकें आम्हांला आंत घ्या, आंत घ्या असें म्हणून सारखी गर्दी करितात, त्यांना पंत कांहींना 'तुम्ही या' व कांहींना 'तुम्ही येऊं नका' असें डाव्या हाताच्या पंजानें सांगतात म्हणून त्यांचा हात सदा हालत असतो?' तसेंच पंत फार दयाळू व निरभिमानी असून त्यांची वृत्ति त्यांच्या भगवद्भक्तीस साजेल अशी गंभीर व प्रेमळ होती. ते बाबूजी नाईकांचे आश्रित होते तरी आश्रितांच्या ठिकाणीं सामान्यत्वें आढळून येणारी असंतोषवृत्ति व लांगूलचालनाची म्हणजे पुढें पुढें करून यजमान, यजमानपत्नी, व त्यांच्या कुटुंबांतील मंडळी, व कामदार यांची मर्जी संभाळण्याची त्यांची वृत्ति नव्हती. ते फार निरिच्छ, 'यदृच्छालाभसंतुष्ट', निःस्पृही, निगर्वी पण मानधन होते. म्हणूनच सेवाविषाची बाधा त्यांना कधीं झाली नाहीं. विठ्ठल पाध्यांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांनीं निरंतर भगवत्सेवाच केली. अशा 'संतोषरत्न' संतकविपंतास आम्ही महाकवि क्षेमेंद्राच्या वाणीनें सादर नमन करितों:-

'विभूषणाय महते तृष्णातिमिरहारिणे ।
नमः संतोषरत्नाय सेवाविषविनाशिने ॥

( क्षेमेंद्रकृत 'सेव्यसेवकोपदेश' १ )'

## ८ पंतांची काव्यरचना.

'Fervency freedom, fluency of thought,
Harmony, strength, words exquisitely sought;
Fancy, that from the bow that spans the sky,
Brings, colours dipped in heaven, that never die,
A soul exalted above earth, a mind
Skilled in the characters that form mankind.'

( *Cowper* ).

'ओजो रंजनमेव वर्णरचनाश्चित्रा न कस्य प्रिया
नानालंकृतयश्च कस्य न मनःसंतोषमातन्वते ।
काव्ये किं तु सतां चमत्कृतिकृतः सूक्तिप्रबन्धाः स्फुटम्
तीक्ष्णाग्रा झटिति श्रुतिप्रणयिनः कान्ताकटाक्षा इव ॥
( **क्षेमेन्द्रकृत बृहत्कथामञ्जरी**, प्रथमतरंग श्लो० ४ ).'

'सरसा सालंकारा सुपदन्यासा सुवर्णमयमूर्तिः ।
**आर्या** तथैव भार्या न लभ्यते पुण्यहीनेन. ॥ ( **सुभाषित** )'

'नानार्थानां सुवृत्तानां सरसानां विलोकनात् ।
श्लोकानां साधुलोकानां मुदं याति मनोऽतुलाम् ॥ ( **पंत** )'

'प्रेम, प्रतिभा, शिक्षारीति पहा; आयका बरें कवन; ।
पवनप्रियपुत्रा ! बा ! म्यां हें केलें न निजगुणस्तवन. ॥
( **पंतकृत नामरसायन.** )'

पंतांस कवित्वस्फूर्ति कशी झाली असावी याचें उत्तर महाकवि क्षेमेन्द्रकृत कविकण्ठाभरणांतील पुढील विवेचनावरून उत्कृष्ट रीतीचें मिळतेंः—

क्षेमेन्द्राच्या वरील ग्रंथाचे पंच संधि असून त्यांतील पहिल्यांत एकवीस कवित्वावाप्त्यर्थ दिव्य व पौरुष प्रयत्न सांगितले आहेत. दिव्य प्रयत्नांत बावनमात्रांत भरून राहणाऱ्या सरस्वतीदेवीचें बीजत्रययुक्त ध्यान सांगून पौरुषप्रयत्नांत पहिल्या चार श्लोकांत अल्पप्रयत्नसाध्य शिष्याला व पुढील तीन श्लोकांत कृच्छ्रसाध्य शिष्यास काव्यक्रियोत्पत्तीचे पुढीलप्रमाणें उपाय सांगितलें आहेतः—

'कुर्वीत साहित्यविदः सकाशे श्रुतार्जनं काव्यसमुद्भवाय ।
न तार्किकं केवलशाब्दिकं वा कुर्याद् गुरुं सूक्तिविकासविघ्नम् ॥ १५ ॥
विज्ञातशब्दागमनामधातुश्छंदोविधाने विहितश्रमश्च ।
काव्येषु माधुर्यमनोरमेषु कुर्यादखिन्नः श्रवणाभियोगम् ॥ १६ ॥
गीतेषु गाथास्वथ देशभाषाकाव्येषु दद्यात् सरसेषु कर्णम् ।
वाचां चमत्कारविधायिनीनां नवार्थचर्चासु रुचिं विदध्यात् ॥ १७ ॥
रसे रसे तन्मयतां गतस्य गुणे गुणे हर्षवशीकृतस्य ।
विवेकसेकस्वकपाकभिन्नं मनः प्रसूतेऽङ्कुरवत् कवित्वम् ॥ १८ ॥
पठेत् समस्तान् किल कालिदासकृतप्रबन्धानितिहासदर्शी ।
काव्याधिवासप्रथमोद्गमस्य रक्षेत्पुरस्तार्किकगन्धमुग्रम् ॥ १९ ॥
महाकवेः काव्यनवक्रियायै तदेकचित्तः परिचारकः स्यात् ।
पदेच पादेच पदावशेषसंपूरणेच्छां मुहुरादधीत ॥ २० ॥
अभ्यासहेतोः पदसंनिवेशैर्वाक्यार्थशून्यैर्विदधीत वृत्तम् ।
श्लोकं परावृत्तिपदैः पुराणं यथास्थितार्थं परिपूरयेच्च ॥ २१ ॥'

दुसऱ्या संधींत बुद्धिमान् शिष्याला कवित्वप्राप्तीचे शिक्षणोपाय सांगितले आहेत. त्यांत विघ्नेशपूजन, काव्यांगविद्याधिगम, महाकाव्यार्थचर्वण, कविवरांशीं सहवास, सुजनमैत्री, लोकाचारपरिज्ञान, वृत्तपूरणोद्योग, समस्यापूरण, नाटकाभिनय-प्रेक्षा, आख्यायिकारस, चारुचित्रनिरीक्षण, प्राणिस्वभावनिरीक्षण, निजोत्कर्षाविषयीं अतृप्तता, परोत्कर्षविचार, आत्मश्लाघाश्रवणाविषयीं लज्जा, परश्लाघानुभाषण, सदा वैरमत्सर सोडून स्वकाव्यव्याख्यान, व्युत्पत्त्यर्थ सर्वांची शिष्यता, पाठ वेळेवर आठवणें, श्रोतृचित्तानुवर्तन, सर्वदेवस्तुतीविषयीं साम्य, पराक्षेपसहिष्णुत्व, गांभीर्य, निर्विकारता इत्यादि शंभर उपाय वर्णिले आहेत. तृतीयसंधींत चमत्कारविरहित कवीचें कवित्व किंवा काव्याचें काव्यत्व शोभत नाहीं ह्मणून दशविधचमत्कार सांगितले असून चवथ्यांत शब्दवैमल्य, अर्थवैमल्य व रसवैमल्य हे काव्याचे तीन गुण व शब्दकालुष्य, अर्थकालुष्य, व रसकालुष्य हे काव्याचे तीन दोष व सगुण, निर्गुण, सदोष, निर्दोष, व सगुणदोष असे पांच प्रकार सांगितले आहेत. पंचमसंधींत तर्क, व्याकरण, भरत, चाणक्य, वात्स्यायन, भारत, रामायण, मोक्षोपाय, आत्मज्ञान, धातुवाद, रत्नपरीक्षा, वैद्यक, ज्योतिःशास्त्र, धनुर्वेद, गजतुरग-पुरुषलक्षणें, द्यूत व इन्द्रजाल इतक्यांचा व प्रकीर्णात चित्र, देश, वृक्ष, वनेचर, औदार्य, अचेतनचेतनाध्यारोप, भक्ति, विवेक, व प्रशम ह्यांचा परिचय कविसाम्राज्य-प्राप्तीची इच्छा करण्यास अवश्य आहे असें सागून प्रत्येकाचें एक एक उदाहरण दिलें आहे. आतां वरील विवेचन मोरोपंतांस कितपत लागू पडतें तें पाहूं. पंतांचें काव्य ज्यांनीं सूक्ष्मरीतीनें वाचलें असेल अशा मार्मिक वाचकांस मोरोपंतांनीं काव्यगुणदोषांचें व भाषणचमत्काराचें मार्मिक ज्ञान संपादन केलें होतें व त्यांच्या काव्यस्फूर्तीच्या उत्पत्तीला व पोषणाला वरीलपैकीं पुष्कळच उपाय कारणीभूत झाले असावे असें स्पष्ट कळून येतें. केशवगणेशशास्त्र्यासारख्या मार्मिक, रसिक व अनेकशास्त्रनिष्णात महापंडितांजवळ त्यांचें अध्ययन होऊन त्यांचा कालिदास, भवभूति, दण्डी, मयूर, श्रीहर्ष, बाण, सुबंधु, कविराज, जगन्नाथराय, पुरुषोत्तम, दामोदरमिश्र, कृष्णमिश्रयति, दैवज्ञसूरि, भट्टी, वाग्भट्ट इत्यादि संस्कृत महाकवींच्या काव्यनाटकादि उत्तम ग्रंथांशीं दृढ परिचय झाला होता. शंकराचार्यांचीं बृहदारण्यकादि उपनिषदांवरील भाष्यें, अपरोक्षानुभूतीसारखीं वेदांतप्रकरणें व भक्तिपर स्फुटकविता, तसेंच विद्यारण्याची पंचदशी, वेदांतसार, तत्वदीपिका इत्यादि भक्तिवेदांतपर ग्रंथांचें, तसेंच, कुवलयानंद, रसमंजरी, रसतरंगिणी, काव्यप्रकाश, वाणीभूषण, रसमीमांसा इत्यादि साहित्यग्रंथांचें त्यांनीं सूक्ष्मपरि-शीलन केलें होतें. संस्कृतकवितेचें अध्ययन करूनच न थांबतां त्यांनीं श्रीज्ञानेश्वर, मुकुंदराज, एकनाथ, नामदेव, समर्थ, तुकाराम, मुक्तेश्वर, श्रीधर, वामन,

तुलसीदास, सूरदास, मानपुरी, विहारी, निपटनिरंजन इत्यादि प्राकृत (मराठी व हिंदी) संतकवींच्या भक्तिज्ञानवैराग्ययुक्त वाणीरूपी त्रिवेणींत भक्तियुक्त अंतःकरणानें वारंवार मज्जन केलें. तसेंच,

'निःश्रेण्यौ ब्रह्मलोकस्य वाग्देव्याः कर्णकुण्डले ।
धर्मद्रुममहामूले वाल्मीकिव्यासयोः कृती ॥ (राघवपाण्डवीय १-१०)'

ह्मणजे 'ब्रह्मलोकास जाण्याच्या शिड्या व सरस्वतीच्या कर्णातील कुंडलें या संज्ञेस प्राप्त होणाऱ्या व्यासवाल्मीकाच्या कृति' अर्थात् भागवतादि पुराणें, महाभारत व रामायण हे ग्रंथ त्यांनीं अनेकवार मननपूर्वक वाचले असावेत. पुण्यतीर्थक्षेत्रांच्या प्रवासांत त्यांनीं संतमहंतयोग्यांचीं दर्शनें घेऊन त्यांच्या चरणरजांनीं आपला देह व भगवद्भक्त संतांच्या मुखांतून कीर्तनपुराणें श्रवण करून आपले कर्ण पवित्र केले होते. याशिवाय रामजोशीबोवांसारख्या रसिक कविप्रवरांशीं त्यांचें निर्मत्सर सख्य होतें. या सर्व गोष्टी मोरोपंतांच्या कवित्वस्फूर्तीला व पुढें तिच्या मनमोहक लावण्यास निःसंशय कारणीभूत झाल्या असाव्या. ह्मणूनच त्यांच्या काव्यावर रसिकांची मुरकुंडी पडते. त्यांना प्रथम आर्या रचण्याची स्फूर्ति झाली ती कीर्तन-श्रवणप्रसंगीं. तो प्रकार असाः–

ते एकदां पंढरपुरास गेले असतांना रेवडीकर बोवांचें कीर्तन आपल्यास ऐकावयास सांपडावें ह्मणून गर्दीत पुढें घुसले. तेव्हां लोकास जरा एकीकडे होण्याविषयीं विनंति करावयाच्या इच्छेवरून त्यांस तेथल्या तेथेंच आर्या करावयाची स्फूर्ति होऊन त्यांनीं पुढील आर्या रचिलीः—

'नित्य तुम्ही प्रभुपाशीं पेढे बरफी नवा खवा खावा, ।
तरि म्यां एके दिवशीं रेवडिचा स्वाद कां न चाखावा ? ॥'

हीच त्यांची पहिली आर्या. तेव्हांपासून त्यांच्या काव्यरचनेस आरंभ होऊन बारामतीस आल्यावर वीस एकवीस वर्षांच्या आंत म्हणजे आपल्या वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षांपूर्वी त्यांनीं ब्रह्मोत्तरखंड, कुशलवचरित, मदालसाचरित, हरिश्चंद्राख्यान, सप्तशती, सीतागीत, रुक्मिणीगीत, सावित्रीगीत, प्रह्लादविजय, मंत्ररामायण, कृष्णविजय, भीष्मभक्तिभाग्य, संशयरत्नावलि, साधुसत्कार, आर्याकेकावलि, नामसुधाचषक, नामार्या, आर्यामुक्तामाला, सन्मणिमाला, स्तोत्रे, नामरसायन, भारताचीं पहिलीं तीन चार पर्वें वगैरे काव्यें रचिलीं. ब्रह्मोत्तरखंड, रचिलें तेव्हां पंत नवीनच कविता करावयास लागले होते असें दिसतें. (ब्रह्मो० २२. ८०) तसेंच गंगाप्रार्थनादि कांहीं कविता पंतांनीं काव्यरचना करावयास लागल्यानंतर थोड्याच दिवसांनीं काशीरामेश्वराच्या पंडितांकडे अभिप्रायार्थ पाठविल्या होत्या असें राम बडवे यांच्या पुढील गीतीवरून कळून येतें:–

'ज्या जन्मतांचि गेल्या काशीरामेश्वरा नमायला ।
प्रौढपणीं आर्यातें जगतीतलही पुरे न मायाला ॥'

तसेंच शके १६९५ माघशुक्ल ८ मीचे (भीष्माष्टमीचे) सुमारास (२० जानेवारी १७७४) पंत नाशकास गेले होते. श्रीमती गोपिकाबाई पेशवे (नानासाहेब पेशव्यांची पत्नी) ह्या त्या वेळेस तेथें होत्या. त्यांच्या सांगण्यावरून त्यांनीं **'भीष्मभक्तिभाग्य'** नांवाचें एक सुंदर काव्य भागवत प्रथमस्कंधाच्या आठव्या अध्यायाच्या आधारानें रचिलें असें त्यांतील पुढील उपसंहारात्मक श्लोकांवरून दिसून येतें:–

(श्लोक) 'या प्रासूत **सतीं गौरीं** कीर्तिं मेनेव सन्नुताम् ।
या सद्गनवसंतश्रीः कल्पवल्लीव याऽर्थिनाम् ॥ १९९ ॥

यस्याः स्नुषा रत्नगर्भा सपत्नी चामरावती ।
तस्याः श्रीगोपिका**देव्याः** किमपीदं कृते कृतम् ॥ २०० ॥'

अत्यंत सरस, भक्तीनें थबथबलेलीं व प्रतिभासंपन्न अशीं जीं पंतांचीं स्फुट काव्यें आहेत त्यांतच या भीष्मभक्तिभाग्याची गणना आहे, मूळ भागवताशीं हें स्फुट प्रकरण ताडून पाहिलें असतां पंतांत कल्पनाशक्ति नसून ते केवळ भाषांतरकार आहेत असें ह्मणणारांस आपली चूक दिसून येऊन त्यांना पंतांपुढें कविश्रेष्ठ ह्मणून निःसंशय मान डोलवावी लागेल. अवतारमाला, वामनचरित्र, पृथुकोपाख्यान, भक्तभूषण, सुदामचरित्र, भीष्मभक्तिभाग्य, वगैरे भागवती प्रकरणें पंतांनीं बहुधा इ. स. १७६६–१७७२ या सहा सातवर्षांत रचिलीं असावींत. यापुढें त्यांनीं (इ. स. १७७६–१७८२) या सात वर्षांत भारताचीं सुमारें विराटपर्वापासून बाकीचीं सर्व पर्वें रचून भारताच्या शेवटीं शेवटीं सन्मणिमाला, श्रीज्ञानदेवस्तुति वगैरे संतप्रकरणें लिहिण्यासही सुरवात केली असावी. द्रोणपर्व कठिण झाल्यामुळें मागून नवें लिहिलें असेंही ह्मणतात. यावरून हेंही काव्य ४५ वर्षांच्या आंतच झालें हें सिद्ध होतें. तसेंच मंत्रभागवत (इ. स. १७८२–१७८४), इतर भागवती प्रकरणें, हरिवंश, अष्टोत्तरशत रामायणें व केकावलि हीं काव्यें त्यांनीं उत्तरवयांत रचिलीं असावींत असें अंतःप्रमाणावरून दिसतें. पंतांनीं मंत्रभागवत रचतांना आधीं दशमस्कंध लिहून नंतर लागलेच इतर स्कंध रचिले असावेत. मंत्रभागवताच्या तीन मणिमाला पंतांनीं कल्पिल्या त्यांत त्यांनीं दशमस्कंधमालेला **'भागवतमंत्रमुक्तमणिमाला'** असें स्वतंत्र नांव दिलें आहे. पंतांच्या अगोदर समग्र महाभारत मराठी कवितेंत विष्णुदास नामा, श्रीधर, नरहरि, मोरेश्वरादि अनेक कवींनीं वर्णिलें. परंतु समग्र भागवत मराठी कवितेंत प्रथम गुंफण्याचा मान पंतांसच द्यावा लागतो. तसेंच जयराम, शिवकल्याण, बहिराजातवेद, कृष्णदयार्णव व एकनाथ महाराज यांनीं जसा दशम, एकादशस्कंधांचा अति विस्तार केला तसा पंतांनीं

न करितां सुमारें ३९४६ श्लोकांचा मूळ दशमस्कंध त्यांनीं मंत्रभागवतांत ११८८ (उपसंहाराचा श्लोक धरून ११८९) गीतींत व बृहद्दशमांत (पूर्वार्ध १७०५ आर्यागीति व ६ उपसंहार श्लोक, उत्तरार्ध संकीर्णवृत्तें १९५३ व उपसंहारश्लोक ५) ३६६९ पद्यांत वर्णिला. त्याच दशमस्कंधाची बहिरा जातवेद यानें पाउण लक्ष, शिवकल्याणानें एक लक्ष, व कृष्णदयार्णवानें सुमारें बेचाळीस हजार टीका केली आहे. श्रीएकनाथ महाराजांनीं तर मूळच्या १३६७ एकादशस्कंधाच्या श्लोकांवर वीस हजारावर ओंव्या रचिल्या. पंतांच्या एकादशावरील गीति साऱ्या ६४९ च म्हणजे मूळाच्या अर्ध्या हिश्शापेक्षां थोड्या कमीच आहेत. पंतांच्या संपूर्ण मंत्रभागवताची ग्रंथसंख्या सारी ३६०४ आहे. मूळ भागवताच्या अठरा हजार ग्रंथाचा फाजील विस्तार न करितां त्याचा संक्षेप पंतांनीं ३६०४ त आणिला. यांत पंतांचें विस्तारभीरुत्व, प्रमाणबद्धता, आटोपशीरपणा, मार्मिक संक्षेप करण्याची अजब हातोटी, पाल्हाळाचा कंटाळा, सहृदयता वगैरे अनेक गुण स्पष्ट होतात. मंत्रभागवतानंतर त्यांनीं **'हरिवंश'** रचिला. आतां त्यांच्या रामायणांचा विचार करूं. पंतांनीं मैराळ भाऊस लिहिलेल्या एका पत्रांत 'भारतांतील सुद्धां (रामायणांची) लहान मोठी याद पाठवावी. अष्टोत्तरशत संख्या जाहली पाहिजे' असा स्पष्ट उद्गार काढिला आहे. त्यावरून १०८ रामायणांची सोमवती वाहण्याची त्यांची इच्छा स्पष्ट होते. तसेंच पंतांचे स्नेही रामबडवे यानींही 'अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथग्रस तीं' असेच म्हटलें आहे. यावरून त्यांनीं एकंदर १०८ रामायणें रचिलीं असावींत हें खचित होतें. पंतांच्या हातचीं अस्सल रामायणें प्रती करून घेण्याकरितां मैराळबावा अनवें गांवास जात असतांना त्यांस वाटेंत अजिंठ्याच्या घाटांत चोरांनीं गांठलें व त्यांच्याजवळील द्रव्य व रामायणांचीं दप्तरें हिसकावून घेऊन दप्तरें घाटाखालीं फेकून दिलीं. बावांनीं पुढें त्या दप्तरांचा पुष्कळ शोध केला पण त्यांस तीं सांपडलीं नाहींत. अशा रीतीनें पंतांच्या अनुपलब्ध रामायणांची कायमची वाट लागल्याची गोष्ट सांगतात. त्यापैकीं 'धन्य' रामायणाचा त्रुटित भाग काव्यसंशोधक ठाण्याचे रा. विनायकराव भावे यांना अलिकडे उपलब्ध झालेला पराडकरांनीं मोरोपंती समग्र ग्रंथांत रामायणखंडांत छापिला आहे. पंतांच्या श्लोककेकावलीच्याच तोलाचें 'आर्याकेकावलि' हें करुणरसानें थबथबलेलें सुंदर काव्य वाचून पंतांवर कांहीं तरी राजकीय संकट आलेलें होतें व त्यांतून आपणास सोडवून केवळ भक्तीस निर्विघ्नपणें लावावें म्हणून त्यांनीं १७४ गीतींत श्रीरामरायाची अत्यंत कळकळीनें प्रार्थना केली असावी असें वाटतें. हें सुरस काव्य वाचून पंतांचे व्याही बाबा पाध्ये यांनीं पुढील मयूरकविवर्णनपर गीति रचिली म्हणून सांगतात:—

'ऐकुनि विश्व सुखावे ज्या केकीचा अपूर्व तो टाहो, ।
त्याला ईशकृपेनें आयुष्याचा कधीं न तोटा हो. ॥'

पंत काव्यरचना फार जलद करित. ते एका बैठकीस १००-१५० आर्या सहज रचित. दररोज रात्रीं धुळीची पाटी, संस्कृत पोथी, व सदीप समई एवढी तयारी चाकरानें करून ठेवावी. नित्यकृत्य आटपल्यावर पंतांनीं सर्व पाटीभर ग्रंथ लिहून मग झोंप घ्यावी. मग दुसरे दिवशीं प्रातःकाळी पाटीवरील ग्रंथाची प्रत लक्ष्मणभट वांईकर यानें करून ठेवावी असा त्यांचा नित्यक्रम होता. पंतांचें अक्षर बारीक असून तें वळणदार व सुवाच्य आहे. खोडाखोडी फारशी केलेली आढळत नाहीं. क्वचित् एखाद्या शब्दावर टीप दिलेलीही आढळते. कोठें कोठें अन्यपाठ सुचवून क्वचित् टीपाही दिल्या आहेत. पंतांचें लिहिणें फार जलद होतें. त्यांच्या बाळबोध व मोडी अक्षराचा नमुना येथें सोबत दिला आहे. पंतांचीं काव्यें तयार होतांच ठिकठिकाणचे त्यांचे स्नेही त्यांच्या प्रती करून घेत. पंतांच्या काव्यांतून जागोजागीं ठरींव यमकें आढळतात. त्यांविषयीं असें सांगतात कीं बारामतीस पंत आपल्या खोलींत फावल्या वेळीं सुचतील तीं यमकें भिंतीवर लिहून ठेवीत. अशा रीतीनें सर्व भिंतींवर यमकें लिहिलेलीं असत. त्यांपैकीं काव्यरचना करितेवेळीं त्यांना जीं योग्य वाटत तीं यमकें त्यांतून निवडून त्यांचा ते उपयोग करित. पंतांच्या बुद्धीस वर्षाकालीं किंचित् मांद्य येत असल्यामुळें त्या वेळेस त्यांच्या हातून काव्यरचना कमी होई. पंतांनीं भारतापैकीं कर्णपर्व प्रथम रचून तें लोकांस आवडल्यामुळें नंतर समग्र भारतावर काव्यरचना केली, असें कित्येकांचे ह्मणणें आहे. भारताच्या प्रत्येक पर्वाच्या पहिल्या गीतीचें प्रथमाक्षर घेतलें असतां 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' असा अष्टादशाक्षरी संस्कृत मंत्र होतो. प्रत्येक पर्वाच्या मलपृष्ठावर वरील मंत्र लिहिलेला आढळतो. सर्व पर्वांची माळ गुंफण्याच्या उद्देशानें प्रत्येक पर्वाच्या प्रथम गीतीची रचना करित करित पंत कर्णपर्वावर आले, तेव्हां त्यांतील प्रथम गीतींत रचावयाचें आद्याक्षर 'भ' प्रथमच बिनचूक रचिलें गेलेलें पाहून त्यांना ईश्वरीप्रसादाचें कौतुक वाटलें. या आख्यायिकेच्या खरेपणाविषयीं संशय घेण्यास जागा आहे. पंतांची ग्रंथसंपत्ति फार मोठी आहे. त्याबद्दल विशेष माहिती 'परिशिष्ट-आ' त पहावी. गीती किंवा आर्या (हीं जरी वास्तविक भिन्न वृत्तें आहेत तरी पंत गीतीलाच आर्या म्हणत) हें पंतांचें आवडतें वृत्त होय. त्यांची बहुतेक कविता याच वृत्तांत रचिलेली आढळते. आर्या छंदाची योजना पंतांपूर्वी महाराष्ट्रभाषेंत फारशी कोणीं काव्यांत केलेली नसून पंतांनींच तिचा प्रथम प्रचार पाडिला (परिशिष्ट-'इ' पहा). संस्कृतांत सुद्धां पंतांपूर्वी गोवर्धनाचार्य व मुद्गलभट्ट यांशिवाय मोठ्या प्रमाणावर आर्याछंदांत काव्यरचना फारशी कोणी

केलेली आढळत नाहीं. गोवर्धनाचार्यांची 'आर्यासप्तशती' व मुद्गलभट्टाच्या 'रामार्या' संस्कृत काव्यांत सुप्रसिद्ध आहेत. पंतांचीं भस्मासुरआख्यान, अंबरीषचरित्र, सुदामचरित्र, भृगुचरित्र इ. आख्यानें, कांहीं रामायणें, व कृष्णविजय उत्तरार्धाचे बरेच अध्याय इतके श्लोकबद्ध आहेत; 'दुर्वासभिक्षा' हें प्रकरण त्यांनीं ओंवी-वृत्तांत रचिलें आहे. कृष्णविजय—पूर्वार्ध हा सबंध आर्यागीतींत रचिला असून उत्तरार्धाचे अ० ५०–५४ हेही त्याच वृत्तांत रचिले आहेत. पंतांनीं ध्रुवचरित्र, अंबरीषाख्यान, मंत्रगर्भसाकीरामायण वगैरे प्रकरणें साकी वृत्तांत रचिलीं असून 'दोहा' वृत्तांत थोडीं रामायणें व कांहीं स्फुट कविता हीं रचिलेलीं आढळतात. लहान मुलींकरितां रचिलेलीं रुक्मिणीस्वयंवर, सीतास्वयंवर, सावित्रीआख्यान व श्रीरामायण एवढीं प्रकरणें त्यांनीं अभंगवृत्तांत रचिलीं आहेत. क्वचित् पदें, आरत्या हींही केलीं आहेत. बाकी त्यांची बहुतेक सर्व कविता आर्या (गीति)छंदांत रचिलेली आहे. त्यांनी आपलीं काव्यें बहुतेक मराठी भाषेंतच रचिलीं. तरी एक सबंध रामायण-मुक्तामाला, कृष्णस्तवराज, पांडुरंगस्तोत्रें, शिवार्याशतक, शंकरस्तव, रामस्तुति, हरिसंबोधनस्तोत्र इत्यादि स्फुट प्रकरणें त्यांनीं संस्कृत भाषेंत रचिलीं आहेत. पंत काव्यरचना करित असतांना श्रीधरी, नीलकंठी इत्यादि टीकांकडे चांगलें लक्ष्य देत असावे असें दिसतें. 'प्रल्हादप्रकरण' हें लहानसें (गीति २०) काव्य त्यांनीं भागवत सप्तम स्कंध श्लो० १८ ह्या श्लोकावरील श्रीधरीटीकेच्या आधारानेंच रचिलें आहे.

'सत्यं विधातुं **निजभृत्यभाषितं** व्याप्तिं च भूतेष्वखिलेषु चात्मनः ।
अदृश्यतात्यद्भुतरूपमुद्वहन् स्तंभे सभायां न मृगं न मानुषम् ॥'

हा भागवतांतील मूळश्लोक याच्या अर्थाची मंत्रभागवतांतील पंतांची गीति अशीः—

( गीति ) 'वाक्य त्रिजगामध्यें जगदीश करावया स्वदासाचें ।
अत्यद्भुत रूप धरी स्वव्यापकपणहि, तो तदा साचें. ॥
(स्कंध ७ गी० ११७)'

वरील श्लोकांतील 'निजभृत्यभाषितं' एवढ्या पदाच्या स्पष्टीकरणार्थ पंतांनीं श्रीधरीटीकेच्या आधारानें अठरा गीति रचिल्या आहेत. त्याचा आरंभः—

( गीति ) 'श्रीप्रन्हाद' स्तंभीं भगवान् दिसतो ह्मणे स्वतातातें; ।
प्रकटे स्वभृत्यभाषित सत्य कराया सुकीर्तिदाता तें. ॥ १ ॥'

असा आहे. पंतांनीं स्वतःच ही गोष्ट शेवटीं सांगितली आहे. ती गीति अशीः—

( गीति ) 'सत्यं विधातुमिति ज्या पद्याचें मूळ हें तयावरिल ।
श्रीश्रीधरकृतरम्यव्याख्यान, विशुद्धबुद्धि या वरिल. ॥ १९ ॥
( प्रन्हादप्रकरण )'

उद्योगपर्वांतील श्रीकृष्णोक्ति (अ० ३. गी० ५३–६२), तसेंच हरिवंश अ० ४५ (पुष्करप्रादुर्भाव), अ० ५४ (त्रिपुरवध) ह्या प्रकरणांस नीलकंठी टीकेचाच मुख्यत्वें आधार आहे. त्रिपुरवधरहस्यकथेच्या हरिवंशांतील गीति के० ७२ पृ० २८६–२८७ यांत टिपेंत आल्या आहेत. पुष्करप्रादुर्भावाचे मूळांत सव्वीस अध्याय आहेत. त्यांचा सारांश नीलकंठी टीकेंत दिलेला पतांनीं चौतीस गीतींत आणिला आहे. व्यासानें रहस्यकथा परोक्षरीतीनें सांगण्याचें कारण 'परोक्षप्रिया इव हि देवाः' हें प्रसिद्धच आहे. पंत ह्मणतातः–

(गीति) 'दुर्जनचोरांपासुनि संरक्षायासि तत्व हें रत्न, ।
केलें परोक्षभावें कथन, मुनिवरें करूनियां यत्न. ॥ ४५.२ ॥'

अमृतमथनकथातात्पर्य पहा! (या विषयींची छापील गीति अशुद्ध छापली आहे. शुद्धगीति पुढें दिली आहेः–)

(गीति) 'मन सिंधु मतिच मंदर, कथिले शमकाम जे सुरासुर ते, ।
अभ्यास हेंचि मंथन, मुक्ति सुधा जाणती सुधी पुरते. ॥ २८ ॥ (हरिवंश)'

याला आधारभूत नीलकंठ चतुर्धराचा टीकाश्लोक असा आहेः–

'मनः सिंधुर्मतिः शैलः शमकामौ सुरासुरौ ।
अभ्यासो मंथनं मुक्तिः सुधायत्राह रूपकैः ॥'

काव्यरचना करितांना मनासारखें वर्णन येईपर्यंत पंत कधीं कधीं दोन दोन तीन तीन प्रयत्न करित असावेत असें मानण्यास पंतांच्या काव्यांत जागा आहे (उद्योग. ११.८-९ यावरील खोडलेल्या गीति, द्रोण. ४.१३-१४; कर्ण. ३३-४१,४३; व कर्ण. ४९,२५ यांच्या समानार्थक गीति पहा). पंतांनीं आपल्या ग्रंथांत बहुशः वर्णनसंक्षेपच केलेला आढळतो. मूळ लक्ष ग्रंथ भारताचा सारांश त्यांनीं १७१३५ गीतींत आणला आहे. तथापि प्रसगविशेषीं पंत वर्णनविस्तारही करित ('परिशिष्ट–'ऊ' पहा). द्रौपदीनें रुक्मिणीस तिची स्वयंवर कथा विचारली असतां मूळभागवतांत तिनें ती एका श्लोकांत 'चैद्याय माऽर्पयितु···'(भागवत १०.८३.८) वर्णन करून सांगितली. पंतांनीं त्याचा विस्तार ९२ गीतींत केला आहे. अवचितसुत काशी (द्रौपदीस्वयंवर कर्ते) याची एक रुक्मिणीहरणावर सुंदर लावणी आहे ('भीमकबाळा ह्मणे नृपाळा त्या शिशुपाळा मी न वरी' हा तिचा आरंभ आहे). तींतील कांहीं ठिकाणची शब्दयोजना व पंतांची शब्दयोजना यांत फार साम्य आहे. यावरून, पंतांच्या वाचण्यांत ती लावणी आली असून त्यावरून त्यांनीं रुक्मिणीस्वयंवरापैकीं कांहीं गीतींची रचना केली असावी असें वाटतें. अवचितसुत काशीनें द्रौपदीस्वयंवर शके १६१८ त समाप्त केलें व पंतांनीं कृष्णविजय शके १७०३ च्या सुमारास समाप्त केला. याच्या पुष्कळ अगोदर काशी कवि वारला असावा. तेव्हां त्यानें पंतांच्या आख्यानावरून आपली लावणी रचिली असें ह्मणतां येत नसून पंतांच्याच मनावर काशीकवीच्या लावणीचा दृढ संस्कार

झाला असावा असें ह्मणावें लागतें. पुढील एकाच प्रसंगावरून उभयतांतील साम्य दिसून येईल.

काशी कवि-(लावणी) 'रुक्मी माझा वडील दादा आह्मां साजणांमधिं मोटा ।
शहाणा परंतु हरिचरितामृतरसांत न भिजे मणिगोटा. ॥'

मोरोपंत-(गीति) 'रुक्मी माझा दादा जो आह्मा साजणांमधें मोटा, ।
खोटा नव्हेचि परि हरिचरितरसीं तो भिजे न मणिगोटा. ॥'.

मंत्र साधण्याकरितांहि कांहीं ठिकाणीं ते वर्णनसंक्षेपही करित [ परिशिष्ट-'ऊ' ]. पंतांनीं आपलीं काव्यें कांहीं स्वतःच्या प्रेरणेवरून व बरींच दुसऱ्यांनीं सुचविल्यावरून रचिलीं आहेत. बृहद्दशम हा त्यांनीं बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून लिहिला. तो कठिण झाला असें बाबांनीं म्हटल्यावरून नंतर 'मंत्रभागवत' रचिलें. 'हरिवंश' पांडुरंगराय नाईक यांचे सांगण्यावरून लिहिला. 'ब्रह्मोत्तरखंड', 'कृष्णमाहात्म्य', व 'मदालसाख्यान' हीं काव्यें स्वगुरुपुत्र सदाशिव पंडितांच्या सांगण्यावरून त्यांनीं रचिलीं. जगन्नाथपंत कुंटे यांच्या सांगण्यावरून 'अवतारमाला' रचिली. गीतेवर सयमक व निर्यमक अशी दोन प्रकारची गीतिरचना पंतांनीं केल्याचें सांगतात. निर्यमक गीतिरचना वामनपंडितांच्या समश्लोकीच्या आधारानें स्वल्प फेरफार करून केल्याचें स्वतः पंतच सांगतात.

( गीति ) 'श्रीमद्वामनविरचित गीता टीकोत्तमा समश्लोकी ।
आर्याटीका तेचि, च्छंद निराळे, विचित्र हे लोकीं. ॥
( गीतेवरील आर्या-प्रस्तावना )'

निर्यमक गीतेचे पहिले सहा अध्याय मात्र पंतांचे असून बाकीचे त्यांचा पुतण्या अप्पा पराडकर म्हणून ब्रह्मावर्तांत राहत असे त्यानें केले म्हणून सांगतात. पंतांनीं वैद्यकाचा अभ्यास सुश्रुतादि ग्रंथांवरून चांगला केला असून ते कधीं कधीं औषधयोजनाही करित असत. तसेंच त्यांच्या वैद्यकीवर आर्या असल्याचें सांगतात.

पुढील वैद्यकीय आर्या पंतांच्या ह्मणून सांगतात परंतु त्याविषयीं संशय वाटतो:-

जीर्णज्वरासि वटिका चिचवटी घे समान तो कुटकी, ।
कवडी खर्च न करितां जाइल बापा ! न वाजतां चुटकी. ॥
स्तनमान काळपुळितें उत्तम कंदचि उपाय हाच वदा, ।
मधुमिश्रित गुंजमिति ध्यावा परिपूर्ण दिवस ते चवदा. ॥
नवसागर भाजुनियां सेवी तक्रांत पावली भार, ।
मुनिदिन किंवा त्रय दिन होईल समूळ नारुसंहार. ॥
चौधारी शुष्क स्नेहीं दारूचा धूर सप्तकें दोन ।
दिधल्या सूज कशीही जाइल तेव्हांचि रुष्ट होऊन. ॥

पंतांच्या काव्यांतून वैद्यकीय उपमा जागोजागीं आढळतात, त्यावरूनही त्यांचें वैद्यशास्त्रनैपुण्य उत्कृष्ट रीतीनें दिसून येतें. परिशिष्ट 'ठ' पहा. बाबा पाध्ये यांनीं भर्तृहरीच्या तीन शतकांवर आर्या रचिण्यास, तसेंच दोन सहस्रांत एक अशीं संस्कृत पंचकाव्यें रघुवंशादि पंचकाव्यांच्या धोरणावर सर्गादि रचना धरून करण्यास पंतांस सुचविलें होतें. बाबा पाध्ये यांच्यासारख्या विद्वच्छ्रेष्ठाच्या मनांत जेव्हां मोरोपंतांच्या संस्कृतभाषाज्ञानाविषयीं व काव्यसामर्थ्याविषयीं एवढा भरंवसा होता तेव्हां ते सरस्वतीदत्तवरप्रसाद कविश्रेष्ठ होते असें ह्मणण्यास काय हरकत आहे?

## मोरोपंतांच्या कवितेचें प्रकाशन व तीवरील आक्षेप.

'*Absolute* (*Real*) poetry is the concrete and artistic expression of the human mind in emotional and rhythmical language.
(*Walter Theodore Watts Dunton*)'

(भावार्थ) मनुष्याच्या मनांतील विचार भावनात्मक व छंदोबद्धभाषेत परिणामकारक व खुबीदार रीतीनें सांगणें याला **खरें कवित्व** ह्मणतात.

(वाल्टर डण्टन यांचा 'कविता' विषयावरील निबंध)

'Poetry is the record of the best and happiest Moments of the best and happiest minds. (*P B. Shelly*)'

श्रेष्ठ व आनंदपूर्ण मनुष्यांच्या श्रेष्ठ व आनंदपूर्ण स्थितींतील उद्गार याला **कवित्व** ह्मणावें. (आंग्लकवि पी. बी. शेले)

'Poetry is the criticism of life, i. e of moral ideas
(*Matthew Arnold*)'

मनुष्यसमाजाच्या संसाराचें, अर्थात् त्यांतील नीतितत्वांचें मार्मिक उद्घाटन ह्मणजे **कवित्व.** (आंग्लकवि व टीकाकार म्याथ्यू आर्नोल्ड).

'अर्थान् केचिदुपासते कृपणवत् केचित् त्वलंकुर्वते
वेश्यावत् खलु धातुवादिन इवोद्बध्नन्ति केचिद् रसान्।
अर्थालंकृतिसद्रसद्रवमुचां वाचां प्रशस्तिस्पृशां
कर्तारः कवयो भवन्ति कतिचित् पुण्यैरगण्यैरिह ॥ (राघवचैतन्य)'

'मन्दं निक्षिपते पदानि परितः शब्दं समुद्वीक्षते
नानार्थाहरणं च कांक्षति मुदाऽलंकारमाकर्षति।
आदत्ते सकलं सुवर्णनिचयं धत्ते रसाऽन्तर्गतं
दोषान्वेषणतत्परो विजयते चोरो विटः सत्कविः ॥ (सुभाषित)'.

कोणी कृपणाप्रमाणें अर्थाचें (=द्रव्याचें, पक्षीं शब्दार्थाचें) चिंतन करितात, कोणी वेश्येप्रमाणें अलंकारांनीं (=दागिन्यांनीं, पक्षीं काव्यांतील अलंकारांनीं)

स्वकाव्याला भूषवितात, कोणी धातुवाद्याप्रमाणें ( किमयागाराप्रमाणें ) रसांचें (=द्रवपदार्थांचें, पक्षीं शृंगारादि नवरसांचें) बंधन करितात; परंतु अर्थ, अलंकृति, व उत्तम रस या सर्वांनीं युक्त अशा उत्कृष्ट काव्याचे कर्ते कवि अगणित पुण्यबळानेंच निर्माण होतात ( राघवचैतन्य ). मन्दपणें पावलें टाकतो ( पक्षीं, स्वकाव्यांत विचा-पूर्वक सावकाश पदें योजितो ), चहूंकडून शब्द ऐकितो ह्मणजे चाहूल घेतो ( पक्षीं, चहूंकडून कोशांतून किंवा सत्कवींच्या काव्यांतून शब्द निवडून घेतो ), नानार्थ ( अनेक प्रकारचें द्रव्य, पक्षीं काव्यांत अनेकार्थ ) साधण्याची इच्छा करितो, आनं-दानें अलंकार ( दागिने, पक्षीं काव्यालंकार ) हरण करितो (पक्षीं काव्यांत योजितो), सुवर्णसमुदायाचें ( सोन्याच्या राशीचें, पक्षीं उत्तम अक्षरसमूहांचें ) ग्रहण करितो व त्यांना रसांतर्गत ठेवितो ( पृथ्वींत गाडून ठेवितो, पक्षीं नवरसमिश्रित करितो ), तसेंच जो दोषान्वेषणतत्पर असतो ( दोषा ह्म. रात्री–तिच्या शोधाविषयीं तत्पर ह्मणजे कोणत्या रात्रीं आपल्याला कार्य साधितां येईल याविषयीं तत्पर, पक्षीं काव्यांतील दोष शोधून ते काढून टाकण्याविषयीं तत्पर असतो ) अशा प्रकारचा चोर, जार, व सत्कवि हा विजय पावतो.

उत्तम कवीच्या काव्यांत कोणते गुण अवश्य मानिले जातात याविषयीं वरील आंग्लसंस्कृत उताऱ्यांवरून वाचकांच्या चांगलें लक्ष्यांत येईल. पंतांच्या काव्यांत वरील सर्व गुण प्रामुख्यानें दिसून येतात. त्यांचा विचार करण्यापूर्वी पंतांची कविता जी पूर्वी पंतवंशजाजवळील किंवा हरिदासांच्या बाडांतून अज्ञातवासांत विश्रांति घेत पडली होती, तिची सार्वत्रिक प्रसिद्धी कशी झाली हें थोडक्यांत पाहूं. प्रथम माधव चंद्रोबा डुकले यांनीं ती आपल्या 'सर्वसंग्रह' मासिकपुस्तकांत शिळाछापावर मुद्रित केली. ती पुढें काव्येतिहाससंग्रह मासिकांतून जनार्दन बाळाजी मोडक यांनीं, 'मयूरकवि' मासिकांतून बाबाजी अनंत तेंडूलकर यांनीं, व शेवटीं निर्णयसागरांत 'काव्यसंग्रह' मासिकांतून मोडक, वामन दाजी ओक, नारायण चिंतामण केळकर, प्रो. भानु, व बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं छापून प्रसिद्ध केली. त्यांत काव्यसंग्रहांत ओकांनीं पंताच्या कवितावधूस टीपांची भरगच्ची पैठणी नेसवून तिच्याकडे रसिकांचें चित्त वेधिलें. मोरोपंताचें काव्य सर्वसंग्रह व काव्येतिहाससंग्रह या मासिकांच्या द्वारें जेव्हां बाहेर पडूं लागलें तेव्हां तो वास्तविक कवि नसून केवळ यमक्या भाषांतरकार होय, त्याचें काव्य कृत्रिम ह्मणूनच नीरस व क्लिष्ट आहे, संस्कृतांत अधम काव्य ह्मणून गणलेल्या चित्रकाव्याच्या रचनेंतच त्यानें आपल्या बुद्धीचा दुरुपयोग केला, खऱ्या रसिकांचें चित्त वेधून टाकण्याजोगे उत्कृष्ट काव्यांतील गुण त्याच्या कवितेंत फारसे आढळून येत नाहींत, त्यांतील भक्तीचा प्रकार–देवाशीं अत्यंत सलगी करण्याचा–अर्थात् अनुचित असल्यामुळें उच्च प्रतीच्या उपासकांस मान्य होण्याजोगा नाहीं, वगैरे दूषणें बड्या, विद्वान् ह्मणून गाजलेल्या मंडळीकडून त्यांस

देण्यांत आलीं. त्यांचा विचार के० ५९ पृ० २२७–२३१ त टीपेंत संक्षेपतः केला आहे. या आक्षेपांचें सविस्तर मजेदार खंडण पहावयाचें असल्यास तें 'निबंधमालेंत' व कै० मल्हार बाळकृष्ण हंस यांच्या मोरोपंतावरील निबंधांत सांपडेल. तें वाचकांनीं त्या पुस्तकांतून अवश्य वाचावें. तसेंच अलिकडे आमचे मित्र संतचरित्रकार विठ्ठलभक्त पांगारकर यांनीं 'मोरोपंती वेंचे' यांतून व आपल्या 'मोरोपंतांचें चरित्र व काव्यविवेचन' या सर्वोत्कृष्ट, व सर्वमान्य ग्रंथांतून या आक्षेपांचा सांगोपांग विचार केला आहे. तसेंच पंतांचे वंशज रा. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर यांनींही स्फुट काव्यांशिवाय मोरोपंती समग्र ग्रंथ' आजवर छापून त्यांतील उपोद्घातांतून प्रो. शिवरामपंत परांजपे, प्रो. दत्तोपंत पोतदार व केसरीकर्ते नरसोपंत केळकर यांसारख्या विद्वान् व मार्मिक पंतभक्तांकडून पंतांच्या काव्यांविषयीं अनेक प्रकारची चर्चा करविली आहे. रा. पराडकर यांनींच आजवर काव्यसंग्रहादि ग्रंथांतून त्रुटित छापलेली पंतांची 'आर्याकेकावलि' समग्र छापून प्रसिद्ध केली. श्लोककेकावलीच्या वाचकांस तिचा आस्वाद मिळावा ह्मणून आम्हीही ती प्रस्तुत ग्रंथांत श्लोककेकावलीच्या मूळानंतर छापून प्रसिद्ध करीत आहों. याबद्दल आह्मी रा. पराडकरांचे व 'मोरोपंती चरित्रा' पासून आह्मांस पुष्कळ साहाय झालें ह्मणून मित्र रा. पांगारकर यांचे सप्रेम उपकार मानितों. श्लोककेकावलि हें मोरोपंतांचें खंड काव्य तर प्रथमपासूनच लोकांस फार प्रिय झालें. याचें प्रमाण अनेकांनीं तें छापिलें व अनेक विद्वानांनीं टीपा देऊन तें सार्थ प्रसिद्ध केलें हें होय. महाराष्ट्र वैयाकरण दादोबा पांडुरंग यांनीं'यशोदापांडुरंगीं'नांवाची केकावलीवर विस्तृत टीका लिहून प्रथम या काव्याची प्रसिद्धि केली. निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकरांसारख्या विद्वानांचें लक्ष्य मोरोपंती काव्याकडे वळविण्यास हीच टीका कारणीभूत झाली. यानंतर परशुराम तात्या गोडबोले यांनीं आपला 'केकादर्श' प्रसिद्ध करून केकावलीचा अर्थ वाचकांस सुलभ रीतीनें समजावून दिला. त्यानंतर आजपर्यंत रा. रामभाऊ जोशी व्याकरणकार, रामकृष्ण माधवराव चोणकर, बोरकर, केशव सदाशिव केळकर, नारायणराव बेहरे एम्. ए. एल. टी वगैरे अनेक विद्वान् गृहस्थांनीं केकावलि सार्थ सटीप छापून प्रसिद्ध केली. निर्णयसागरानेंही आपल्या 'काव्यसंग्रह' मासिक पुस्तकांतून केकावलि विपुल टीपा देऊन इ. स. १८९७ त छापून काढली. त्याचीच ही विस्तृत चतुर्थावृत्ति इ. स. १९२५ त आज वाचकांपुढें येत आहे. याप्रमाणें मोरोपंती काव्याच्या प्रकाशनाची ही संक्षिप्त हकिकत आहे. आतां पंतांच्या कवित्वरचनेविषयीं विचार करूं.

**मोरोपंतांची योग्यता. पंत केवळ भाषांतरकार आहेत काय ?**

( गीति ) 'वाग्देवीच्या नमितों बालक मी रम्यपादराजीवा ।
वारुनि जडत्व जी दे वात्सल्यें ज्ञान सादरा जीवा. ॥
( मंत्रभागवत उपोद्घात गी० ७ )'

'व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी ।
आर्यावृत्तें रचितों, स्वल्पांतचि आणितों कथा सारी. ॥
(आर्याभारत, आदि. अ० १ गी० ९)'

'सुकुमारबुद्धि वक्ते श्रोते दे, त्यांसि कीर्तनश्रवण ।
व्हाया, स्वल्पाचि कथा लिहिन रसिकसाधु रंजनप्रवण. ॥
(हरिवंश १-७)'

"Notwithstanding all that may be said upon poetry as a fine art, it is in the deepest sense of the word an 'inspiration'. No man can write a line of genuine poetry without having been 'born again' i. e. born from above'. (T. W. Dunton)".

(भावार्थ) कविता ही ललितकलांपैकीं एक आहे. तेव्हां, ललितकलेच्या उत्पत्तीचे व वृद्धीचे नियम कवितेलाही लागू पडतात, हें जरी खरें असलें तरी तिचा खरा उगम अंतःप्रेरणेपासूनच होतो. अंतःस्फूर्तीवांचून खऱ्या कवितेची एक ओळही कोणाला लिहितां येणार नाहीं. खऱ्या कवितेची एक ओळही लिहिण्यास ईश्वरानुग्रहानें काव्यसृष्टींत पुनर्जन्म होऊन अंतःस्फूर्तीच झाली पाहिजे.

मोरोपंताची कविता बहुतेक स्वतंत्र अशीच आहे. भारत, रामायण, भागवत, हरिवंश इत्यादि मोठ्या ग्रंथांतून बहुतेक स्थळीं फक्त कथानकापुरताच कायतो मूल संस्कृतग्रंथांतून आधार घेतला आहे. कांहीं स्थळीं पद्यशः भाषांतर, उपमादि अलंकार व वर्णन मूळग्रंथांतून किंवा टीकेंतून घेतलेलें आढळतें. कोठें कोठें त्यांतील वर्णनांत पदरची भरही घातलेली आहे. तरी बहुतेक ठिकाणीं त्यांनीं अलंकार, उज्वल कल्पना, अनुप्रास, यमकें इत्यादि काव्यसाहित्य स्वप्रतिभेनें निर्माण करून मूळांतील कवितेचें साधेंभोळे पण निसर्गरम्य स्वरूप उत्कृष्टपणें सजविलेलें आढळतें. कण्वाश्रमांतील तापसी शकुंतलेचें निसर्गरमणीय रूप दुष्यंतराजाची पट्टराणी झाल्यावर जसें पालटून 'आधींच सोन्याचें त्यांत जडावाचें लेणें श्रीमंताचें शोभिवंत' या कव्युक्तीप्रमाणें अत्यंत सुंदर दिसूं लागलें, त्यांतलाच प्रकार पंतांच्या काव्यांत मूळ व पंतकृति सूक्ष्मपणें, निष्पक्षपातानें ताडून पाहाणारांस आढळून येतो. काव्यसंग्रहांतील टीपांतून यांचा निर्देश जागोजागीं केलेला आहे. विस्तार-भयास्तव या सर्वांचीं उदाहरणें येथें देणें शक्य नाहीं. तरी कांहीं गोष्टींचीं येथें भागवत, हरिवंश, भारत यांतून थोडकीं उदाहरणें देतों:—

पंतांनीं पद्यशः भाषांतर केलें याचीं **भागवतांतील** उदाहरणें:—

(श्लोक भागवतांतील) 'कृष्णं च तत्प्रभावज्ञमासीनं जगदीश्वरम् ।
हृदिस्थं पूजयामास माययोपात्तविग्रहम् ॥ (१-९-१०)'.

मोरोपंती भीष्मभक्तिभाग्यांतील गीतिः—

मायायोगें मानववेष धरुनि, भार भूमिचा हरला ।
ज्या जगदीशें कृष्णें, पूजी हृदयांत भीष्म त्या हरिला. ॥ ४२ ॥

(मूळ श्लोक) 'सर्वं कालकृतं मन्ये भवतां च यदप्रियम् ।
स कालो यद्वशे लोको वायोरिव घनावलिः ॥ १४ ॥'

( गीति ) तुमचें अप्रिय झालें मागें; आतांहि सर्व जें कांहीं ।
तें काळकृत असें मी ह्मणतों; हें सत्य, अन्यथा नाहीं. ॥ ५८ ॥
तो काळ लोक ज्याला वश, जैसे घन समस्त वाताला, ।
देतां योगवियोग, श्रम लव ज्याच्या नसेचि हाताला. ॥ ५९ ॥
लीलेनेंचि सुदुर्घट घडवी, तो प्रभु न होय काळ कसा ? ।
विघडी घडींत घडिलें अवघडही, निरभिमान बाळकसा. ॥ ६० ॥

वरील गीतींत पहिल्या तीन ओळींत पदशःभाषांतर असून वायुघनाची उपमा देखील तीच आहे. पुढचा 'देतां योगवियोग···निरभिमान बाळकसा' हा भाग पंतप्रतिभानिर्मित होय. पंतांनीं भागवताच्या चतुर्थस्कंधांतील अ० ८–१२ यावर ध्रुवचरित्र ह्मणून प्रकरण रचिलें आहे. त्यांत हा भाषांतराचा प्रकार बराच दिसतो. पुष्कळ ठिकाणीं तेच शब्द, पदें व उपमा योजिल्या आहेत. उदाहरणः—

( भागवत श्लोक ) 'एकदा सुरुचेः पुत्रमंकमारोप्य लालयन् ।
उत्तमं नारुरुक्षन्तं ध्रुवं राजाभ्यनन्दत ॥
तथा चिकीर्षमाणं तं सपत्न्यास्तनयं ध्रुवम् ।
सुरुचिः शृण्वतो राज्ञः सेर्ष्यमाहातिगर्विता ॥
न वत्स नृपतेर्धिष्ण्यं भवानारोढुमर्हति ।
न गृहीतो मया यत्त्वं कुक्षावपि नृपात्मजः ॥
बालोसि बत नात्मानमन्यस्त्रीगर्भसंभृतम् ।
नूनं वेद भवान् यस्य दुर्लभेऽर्थे मनोरथः ॥'

यावरील पंतांच्या साक्या पहाः—

एका समयीं सुरुचिसुतातें अंकीं घेउनि राजा ।
लालन करीत बसला होता ह्मणत रसा इतरा जा. ॥
सिंहासनीं बसावें आपण असि वांछा ध्रुव वाहे ।
पाहे भूप उगाचि, न घे कीं, ती सुरुचि निकट आहे. ॥
परम कठिण ईर्ष्यागर्ववती ती सुरुचि असें वदली, ।
जेणें साधुसभा बहु कांपे वातें जैशी कदली. ॥
वत्सा ! दुर्लभ सिंहासन हें इच्छिसि बैसायातें, ।
उचित नसोनिहि आक्रमिसी तूं सहसा कैसा यातें ? ॥

राजसुतहि न पदोचित तूं कीं म्यां धरिलासि न पोटीं, ।
होतासि मदात्मज जरि असती पदरीं सुकृतें मोठीं. ॥
अन्यस्त्रीसुत आपण ऐसें बहुधा नेणसि बाळा ! ।
इच्छिसि दुर्लभ अर्थ ह्मणोनी नुमजुनि हीना माळा. ॥

यांत इटालिक्समधला मजकूर तेवढा पंतांच्या पदरचा आहे. **हरिवंशांतील** उदाहरणें:—

( मूळ श्लोक ) 'देवेषु देवः सुश्रोणि दानवेषु च दानवः ।
मानुषेष्वपि धर्मात्मा मनुष्यः स महाबलः ॥ हरिवंश. ९२.२१ ॥'

( गीति ) देवांत देव, सुंदरि योग्यगुणें दानवांत दानव तो, ।
सखि ! मानवांत मानव, या नवल करूनि सर्व मानवतो. ॥ ३५.६५ ॥

( मूळ श्लोक ) 'त्रैलोक्ये यस्य रूपेण सदृशो न कुलेन वा ।
गुणैर्वा चारुसर्वांगि ! शौर्येणाप्यस्ति वा शुभे ! ॥ ९२.१९ ॥'

( गीति ) त्रैलोक्यांतिल गुरु गुण या प्रद्युम्नींच वसति एकवट, ।
जाणो ग्रीष्मव्याकुळ पांथचि ते, तोहि वसति एक वट. ॥ ३५.६८. ॥

६५ वी गीती तर सर्वच भाषांतररूप आहे. ६८ वींत सारांश घेतला असून पंतांनीं त्यांत एका सुंदर दृष्टांताची भर घातली आहे.

( मूळ श्लोक ) 'जगतः सारमुद्धृत्य पुत्रः स विहितः शुभे ।
कृत्वाऽनंगं वरे सांगं विष्णुना प्रभविष्णुना ॥ ९२.२४ ॥'

( गीति ) 'सर्व जगत्सार करुनि एकत्र, अनंग जो सुचिर काय, ।
केला सांग प्रभुनें तो, जैसा आपुला रुचिर काय. ॥ ३५.६६ ॥·

( मूळ श्लोक ) 'मनोरथो हि सर्वासां स्त्रीणामेव शुचिस्मिते ! ।
भवेद्धि मे पतिकुलं श्रेष्ठं पितृकुलादिति ॥ ९२.३१–३२ ॥'

( गीत्यर्ध ) 'जनककुळाहुनि पतिकुळ अधिक असावें असा वधूकाम. ॥ ३५.७१ ॥'

गी. ६६,७१ उत्तरार्ध ह्यांत तर भाषांतरच आहे.

( मूळ श्लोक ) 'सखि दह्यति मेंऽगानि मुखं च परिशुष्यति ।
औत्सुक्यं हृदि चातीव कोऽयं व्याधिरनौषधः ॥ ९३.५५ ॥
न दृष्टपूर्वो हि मया श्रुतमात्रेण कांक्षितः ।
अहो धूमयतेंऽगानि स्त्रीस्वभावस्य धिक् खलु ॥ ५७ ॥
प्रकृत्या शीतलो वायुर्नानापुष्परजोवहः ।
दावाग्निसदृशो मेऽद्य दंदहीति शुभां तनुम् ॥ ६० ॥'

( गीति ) झालें मुख शुष्क, हृदय उत्सुक, सखि ! तापलीं पहा अंगें. ।
कोण अनौषध गद हा ? दाह अधिक शीतवस्तुच्या संगें. ॥ ३६.५८ ॥
मारुत सुगंध, शीतल, मंदहि देहास या दवानळसा ; ।
ह्मण, 'हे दमयंतीसी, भेटुनि दे हास यादवा नळसा.' ॥ ५९ ॥

पूर्वी न देखिला, श्रुतमात्र प्रिय वांछिलाहि कांपवितो, ।
तापवितो, न्यून नव्हे, प्रियसखि! विरहापरीस कां पवि तो? ॥ ६० ॥
धिक्कारातें लोकीं सखि! होय स्त्रीस्वभाव हा पात्र, ।
गात्र व्याकुळ होतें, भ्रमतें मन, कांत ऐकिला मात्र. ॥ ६१ ॥

तसेंच हरिवंश अ० ९४, श्लोक ५
'प्रभावत्यास्तु तं दृष्ट्वा ववृधे कामसागरः ।
चंद्रस्येवोदये प्राप्ते पर्वण्यां सरितां पतिः' ॥' येथूनें
'अरुणोदयकाले च ययौ यत्र नटालयः ।
अकामया प्रभावत्या कथंचित् सविसर्जितः ॥'



श्लोक २० पर्यंत सर्वच श्लोकांचें पंतांनीं जवळ जवळ भाषांतरच केलें आहे. भाषांतर करीत असतांनाही पंत मूळांतील अर्थ खुलविण्याचा प्रसंग वायां जाऊं देत नाहींत. याचीं थोडीं निवडक उदाहरणें देतों. हरिवंशांत, शुचिमुखी हंसी पद्मनाभदैत्यकन्याप्रभावतीसखीला प्रद्युम्नगुणांचें वर्णन करितांना ह्मणत्येः-

( मूळ श्लोक ) 'व्यतिक्रामति ते भीरु यौवनं चारुहासिनि ।
यदतीतं पुनर्नैति गतं स्रोत इवांभसः ॥ ९२.१५ ॥'

पंत ह्मणतातः-

(गीति) प्रथम कथा कथुनि ह्मणे, 'यौवन न सखि! प्रभावति! मिरासी, ।
करिसि असें व्यर्थ कसें वपु? हरि ज्याचा प्रभाव तिमिरासी.' ॥ ३५.५९ ॥

( मूळश्लोक ) 'कामोपभोगतुल्या हि रतिर्देवि! न विद्यते ।
स्त्रीणां जगति कल्याणि! सत्यमेतद् ब्रवीमि ते ॥ ९२.१६ ॥'

यावरील पंतांची गीति पहाः-

कामोपभोगतुल्या प्रीति जगीं स्त्रीजनां नसे दुसरी; ।
पतिच्या संगावांचुनि सर्व स्त्रीच्या वृथा कळाकुसरी. ॥ ३५.६१ ॥

मूळ श्लोक व पंतांच्या गीति दोन्ही वर दिल्या आहेत. त्यावरून भाषांतराचा भाग किती व पंतांचा स्वप्रतिभानिर्मित भाग किती हें मार्मिक वाचकांस कळून येऊन पंतांच्या कारागिरीचीही बरीच कल्पना त्यांना होईल. आतां भारतांतील एक दोन उदाहरणें घेऊंः-

(श्लोक कर्णपर्वांतील) 'न मामस्मादभिप्रायात् कश्चिदद्य निवर्तयेत् ।
अपींद्रो वज्रमुद्यम्य किमु मर्त्यः कथंचन ॥'

(गीती मोरोपंतांची) 'या दृढमदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला ।
मर्त्यांची काय कथा? प्राकृतसा कर्ण काय हा गमला? ॥
( कर्ण-२६-३३ )'

( मूळ श्लोक ) 'यच्च प्रार्थयसे हन्तुं कृष्णौ मोहाद् वृथैव तत् ।
नहि शुश्रुम संमर्दे क्रोष्ट्रा सिंहौ निपातितौ ॥'

( मोरोपंती गीति ) 'त्या दोघां कृष्णांतें ह्मणसी मारीन, मोह हा; कवणें ।
वधिले सिंह शृगालें ऐसें लोकांत ऐकिलें श्रवणें ? ॥

( कर्णपर्व २६-२५ )'

( मूळ श्लोक ) 'अप्रार्थितं प्रार्थयसे सुहृदो न हि सन्ति ते ।
त्वां ये निवारयन्त्याशु प्रपतंतं हुताशने ॥'

( पंतगीति ) 'इच्छिसि न इच्छिजे तें, संसारीं तुज नसेचि हित मित्र ।
पडसी पतंगसा जरि **धनंजयीं** वारिती न, हें चित्र ! ॥

( कर्ण. २६-२६ )'

वरील शल्यकर्णसंवादांतील पंचविसावी गीति तर मूळाचें भाषांतरच आहे. तेत्तिसावी गीति भाषांतरित असून त्या शिवाय 'प्राकृतसा काय कर्ण हा गमला ?'. या अधिक वर्णनानें खुलविली आहे. तसेंच, सव्वीसावी गीति ही देखील मूळाचें भाषांतरच आहे. तरी त्यांत मूळांतील शब्दास धरून 'हुताशनीं' हा शब्द जुळत असतां तो न घालतां त्याबद्दल प्रतिशब्द 'धनंजयीं' घालून कवीनें बहार उडविली आहे. कारण 'हुताशन' हा मूळांतील शब्द केवळ अग्निवाचक असून भाषांतरांतील 'धनंजय हा शब्द अग्नि व अर्जुन या दोघांचाही वाचक आहे. अर्जुनावर चालून जाण्यांत कर्णा ! तुझी स्थिति अग्नींत झेंप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें होईल हें तात्पर्य. पतंगाचा दृष्टांत मूळांत गर्भित आहे असें कदाचित् मानिलें तरी तो भाषांतरांत स्पष्ट केला आहे. वरील उदाहरणांवरून पंतांनीं भाषांतर केलें तें तरी किती सफाईनें व मूळास खुलवून केलें तें मार्मिकांच्या लक्ष्यांत येईलच. असाच प्रकार इतर भाषांतरितस्थळींही आढळतो. सारांश, मूळांतील कल्पना घेऊन ती प्रौढ व मूळापेक्षांही सुंदर रीतीनें सजविणाऱ्या कवीस केवळ भाषांतरकार ह्मणणें योग्य नाहीं. मूळापेक्षांही अनेकपटीनें सरस वर्णन केलेलीं स्थळें पंतांच्या भारतांत, विशेषतः त्यांचा 'भव्यप्रताप' कर्णपर्वांत विपुल आढळतात. भाषांतर करणें हें काम तरी टीकाकारास वाटतें तितकें सोपें खचित नाहीं. तें उत्तम रीतीनें करण्यास भाषांतरकर्त्याच्या अंगीं पुष्कळ गुण असावे लागतात. जगन्नाथ पंडितांची 'गंगालहरी', भर्तृहरीचीं शतकें, भगवद्गीता इत्यादि ग्रंथांचीं वामनपंडितांनीं केलेलीं भाषांतरें पाहावीं. ह्मणजे याविषयीं वाचकांची खात्री पटेल. भगवद्गीतेचें भाषांतर पंतांनीं देखील मूळावरून स्वतंत्रपणें न करितां वामनपंडिताच्या समश्लोकीच्या मध्येंच अल्पस्वल्प फेरफार करून केलें आहे. पंतांसारख्या संस्कृतमराठी भाषेंत प्रवीण व कविता, त्यांतही गीति रचण्यांत, अत्यंत पटु अशा पंडितांसही भगवद्गीतेचें

भाषांतर करितांना वामनाचा आश्रय करूनच तें काम उरकवून घ्यावें लागलें. सारांश, भाषांतर करणें हें तरी काम सोपें नसून भाषांतरकर्त्यांच्या ठिकाणीं मूळ व भाषांतर करावयाचें त्या भाषांशीं व भाषांतर करावयाच्या ग्रंथाशीं उत्कृष्ट परिचय, व मूळांतील प्रसादमाधुर्यसौंदर्यादि मूळ भाषेंतील गुण अन्य भाषेंत उतरविण्याचें चातुर्य या गोष्टी असाव्या लागतात. याशिवाय भाषांतरकर्त्यास मूळ ग्रंथकाराच्या करुण, शृंगारी, प्रौढ, विनोदि इत्यादि भिन्न भिन्न वृत्तींशीं त्या त्या प्रसंगीं समरस होतां आलें पाहिजे. याविषयीं दोघां विद्वानांचे अभिप्राय येथें थोडक्यांत देतों. (१) विविध-ज्ञानविस्तारकार **रामभाऊ गुंजीकर** विस्तारांतील एका लेखांत ह्मणतातः—

'एका भाषेंतील कल्पना दुसऱ्या भाषेंत ठाकठिकीनें व अर्थामध्यें तफावत पडूं न देतां नेणें ह्मणजे दुर्घटच काम खरें. तें पाहिजे त्यास व पाहिजे त्यावेळीं साधेल असें नाहीं. मूळभाषेचें सौंदर्य, पदलालित्य, ध्वनिमंजुळता, विचारगांभीर्य इत्यादि गुण दुसऱ्या भाषेत जसेच्या तसे व्यक्त करून दाखविणें लहानसहान काम नव्हे!' (२) निबंधमालाकारांनीं 'भाषांतर' या निबंधांत भाषांतरकर्त्याचे अंगीं कोणकोणते गुण लागतात, भाषांतराचें काम किती कठिण आहे वगैरे गोष्टी फार चांगल्या रीतीनें दाखविल्या आहेत. **शास्त्रीबोवा** ह्मणतातः–'उत्कृष्ट भाषांतरकार ह्मटला ह्मणजे त्यास इतके गुण अवश्य पाहिजेत. एक तर ज्या भाषेतून तो भाषांतर करणार ती त्यास पूर्ण अवगत व्हावी. ह्मणजे व्याकरणरचना, अर्थस्वारस्य वगैरे यांचें मर्म त्यास यथास्थित कळलें पाहिजे. याप्रमाणें मूळ ग्रंथाचा अर्थ सर्व यथास्थित त्यानें आपल्या मनांत भरून घेऊन मग तो भाषांतरद्वारा त्यानें दुसऱ्या भाषेंत ओतूं लागावें. दुसरें ज्या भाषेंत भाषांतर उतरायाचें तिचेंही पहिलीसारखेच त्यास पूर्ण ज्ञान पाहिजे, तरच पहिल्या भाषेंतील अर्थ दुसरींत त्यास नीट ठाकठिकीनें बसवितां येईल. हें काम पहिल्यापेक्षां किती कठीण आहे हें सांगायास नकोच!···भाषाभाषांत अनेक प्रकारची तफावत असते. कित्ये-कांत शब्दसंग्रह अगदीं थोडा, कित्येकांत संस्कृताप्रमाणें शब्दसाधनिकेची पुष्कळ सोय असते, कित्येकांत अशा कांहीं कल्पना असतात कीं दुसऱ्या भाषेनें त्या व्यक्त करतांच येत नाहींत, किंवा आल्याच तर केवळ सरासरी मात्र करतां येतात; या खेरीज शब्दांचें मृदुत्व, सौंदर्य, लालित्य इत्यादि प्रकार; वाक्यरचनेची रीत, भाषा-पद्धतीची शैली वगैरेही आणखी अनेक भेद असतात. तेव्हां या सर्व अडचणींतून बरेपणीं निभावून जाणें लहानसहान काम नव्हे. त्यास मनुष्याच्या अंगीं समंजसता व चातुर्य असून भाषांतराच्या कामांत तो चांगला घटावलेलाही असला पाहिजे. तिसरी गोष्ट, ज्याचें भाषांतर करावयाचें तें भाषांतर होण्यासारखें पाहिजे···असोः तर याप्रमाणें दोहों भाषांची पुरी माहिती भाषांतर करणारास असून ज्याचें भाषांतर करावयाचें त्याची तशी योग्यता हवी. हीं उत्कृष्ट भाषांतरास तीन साधनें मुख्यतः

अनुकूल असलीं पाहिजेत. याखेरीज चौथीही एक गोष्ट सांगितली पाहिजे. ती ही कीं, भाषांतरकर्ता मूळ ग्रंथकाराशीं समवृत्ती असला पाहिजे. ह्मणजे मूळच्या ग्रंथकाराची वृत्ति जशी रंगेल, थट्टेखोर, किंवा गंभीर, कडक वगैरे असेल तशीच भाषांतर करणाराची असायास पाहिजे; किंबहुना एकाच ग्रंथांत अशा वृत्ति जसजशा त्यानें जागोजाग प्रगट केल्या असतील तसतशा अनुक्रमानें भाषांतरांत उतरल्या पाहिजेत. ...'याचप्रमाणें मूळग्रंथांच्या भाषापद्धतीकडे वगैरेही भाषांतर करणारानें लक्ष दिलें पाहिजे.' गुंजीकरांनीं व मालाकारांनीं वर सांगितलेले भाषांतरकर्त्याच्या अंगीं अवश्य लागणारे सर्व गुण मोरोपंतांच्या अंगीं चांगल्या तऱ्हेनें वास करित असून त्याशिवाय त्यांच्या ठिकाणीं मूळग्रंथांत नसलेलें सौंदर्य भाषांतरांत ओतून तें मूळापेक्षां सरस करण्याचा एक विशेष गुण आढळून येतो. याचीं उदाहरणें त्यांच्या काव्यांतून सर्वत्र पसरलेलीं आहेत. वरील विवेचनावरून केवळ भाषांतरकार ह्मणून जी कवीची हेटाळणी होते ती देखील अगदीं चुकीची आहे असें दिसून येईल.

वरील विवेचन मोरोपंतांस भाषांतरकार समजलें तरी त्यांची योग्यता केवढी ठरते हें दाखविण्यापुरतेंच आहे. परंतु वास्तविक प्रकार असा नाहीं. मूळ भारत, भागवत व रामायण इत्यादि मोठे ग्रंथ पुढें ठेवून जरी त्यांनीं काव्यरचना केली असली तरी ती बहुतेक स्वतंत्र अशीच आहे. ग्रंथांच्या आरंभीं केलेलें गोड प्रास्ताविक मंगलाचरण व शेवटीं काढलेले आनंदोद्गार हे तर कवीचे स्वतःचेच होत. 'नमो भगवते वासुदेवाय' ह्या एकादशाक्षरी भागवती मंत्राचीं अक्षरें प्रत्येक गीतींत क्रमानें सहा ठिकाणीं साधून केलेल्या मंत्रभागवतारंभींच्या नमनात्मक मंगलाचरणाच्या अकरा गीति व मंत्रभागवताच्या दशमस्कंधारंभीं 'श्रीमानुरुगायो मुकुंदो जयति' हा स्वकृत द्वादशाक्षरी मंत्र साधून रचिलेल्या बारा गीति, व भारताच्या पर्वांच्या आद्यंतीं काढिलेले प्रेमळ उद्गार वाचकांनीं वाचून पाहावे ह्मणजे त्यांत भक्तियुक्त काव्यसौंदर्य कसें भरलें आहे तें दिसून येईल.

मासल्याकरितां पुढील गीति पहाः—

'**न**लिनाक्ष प्रभु लक्ष्मी**न**यनमनोहरपदांबुजध्या**न** ।<br>
**न**वघननील चतुर्भुज **न**मिला जो पुण्यकीर्तिचें स्था**न**. ॥ १ ॥<br>
**मो**हतमोर्क जगद्गुरु **मो**क्षदप्रद त्या शिवींच नित्य र**मो**, ।<br>
**मो**दित मन हो, चिंतित **मो**घ नसो, सर्व पाप ताप श**मो**. ॥ २ ॥'

भारतारंभींच्या नमस्क्रियात्मक मंगलाचरणापैकीं पुढील दोन गीतींचा थाट पहाः—

'श्रीमत्सद्गुरुनारदवाल्मीकिव्यासशुककवीश मनीं ।<br>
आणुनि नमितों भावें जे मोहतमाचिया रवी शमनीं. ॥ १.१ ॥<br>
श्रीशश्रीकंठचरण नमितों, जे सर्व-सेवक-स्वरग; ।<br>
भलतेहि वर्ण होती श्रुतिमत यन्निष्ठ, जेंवि सुखरग. ॥ १.२ ॥'

उद्योगपर्वाच्या शेवटची काव्यनदीची गर्जना पहाः—

'खवरविरचित गुरुवरें हें भारत लिहविलें मयूरकरें, ।
मुनिरचित मयूरेश्वरदेवकरें द्वापरांत जैंवि हरें. ॥ १४.२० ॥'

भीष्मपर्वाच्या जवळ जवळ शेवटच्या गीतींतील पुढील स्वकाव्याभिमानोक्ति पहाः—

'ग्रंथ प्राकृत दिसतो परि न प्राकृत विलोकितां नीट, ।
गोपांत गोप भासे कृष्ण, परि नयेचि पाहतां वीट. ॥ (११.८०)'

'आपलें काव्य भगवद्भक्तांच्या स्फूर्तीनें रक्षित आहे, ह्मणून त्याला निंदकांची भीति बाळगावयास नको' याविषयीं पुढील बाणेदार उक्ति पहाः—

'श्रीनारद, वाल्मीक, व्यास, पराशर, वसिष्ठ, शुक सुकवी, ।
प्रतिभारक्षक; नाशक खळ किति? अमृताश्रिता दव न सुकवी. ॥
(भीष्म ११.८३)'

शल्यपर्वाच्या आरंभींचें अपूर्व मंगलाचरण पहाः—

'गरुडध्वजचरणाश्रितचरितश्रवण त्रिताप संहरितें; ।
भगवत्प्रेम वसाया करितें हृदयासि, पिटुनि अंह, रितें. ॥ (१.१)'

ऐषिकपर्वाच्या अखेरचें मयूराचें नृत्य पहाः—

'निववुनि भक्तमयूरा करुणाघन हाच नाच शिकवीतो, ।
बहु सुकृतयशःसस्यें क्षेत्रीं क्षेत्रीं यथेष्ट पिकवीतो. ॥ (३.४३)'

शांतिपर्वाच्या अंतीं सुकृति अर्पण करितांना काढिलेले पुढील सानंदाभिमानोद्गार पहाः—

'श्रीरामगुरुपदाब्जीं सुकृतिरुचि मयूर सुकृति हे वाहे; ।
श्रीतुळशीसीं, पावुनि बहुमान, न कां करील हेवा; हे? ॥ (७.१२४)'

अनुशासनपर्वाच्या शेवटची रसिकप्रार्थना किती सुरस आहे ती पहाः—

'रामसुत मयूर ह्मणे झाल्या रसिकांसि पसरुनी पदर, ।
'मी तुमच्या अमृतकरें, गरुडें पावे न जेंवि नीप दर, ॥
सज्जन मातें देवू संग, जसा गरुड दे कदंबातें; ।
देणें मींच न, गाइल बहु नाकीं मत्पिता मदंबा तें. ॥ ( ८.९९–१०० )'.

अश्वमेधपर्वाच्या अखेरची विनयोक्तिपूर्वक गुरुभक्ति पहाः—

'श्रीगुरुनेंचि करविलें हें स्वार्थ, करूनि नवस, लेखन कीं, ।
मणि आकरीं, प्रभुविना स्नेहासि धरूनि न वसले खनकीं. ॥ ( ६.४४ )'

स्वर्गारोहणपर्वाच्या शेवटची हरिभक्त व रसिकमंडळी यांस केलेली विज्ञप्तिः—

'श्रीहरिजनरसिकसभे ! घे निजगुण, जरि मयूर चुकला, गे ! ।
कीं, बोलका नव्हे हा ! शिक्षित बोलावयासि शुक लागे. ॥

चुकलों, तदपि न चुकलों; कीं, जें बहुमत शुकादि सन्मुनिर्तें, ।
म्यां गायिलें यथामति सच्चरितचि सत्प्रियार्थ जन्मुनि तें. ॥
( २.४४-४५ )'

'भीष्मभक्तिभाग्य' या स्फुटप्रकरणाच्या मंगलाचरणगीति फार गोड उतरल्या आहेत. पुढील अल्प मासला पहाः-

'श्रीकृष्णाचें चित्तीं चिंतावें सुचिर चारु पदकमळ, ।
प्रक्षाळी हृदयींचे जें श्रीवक्षस्थलैकपदक मळ. ॥
ज्या वेदप्रतिपाद्याप्रति पाद्या सत्यलोकपति अर्पी, ।
जें पाप, ताप वारी; वारी विश्वेश्वरासही तर्पी. ॥
त्या हरिच्या चरणीं मन कोण न अर्पील कवि? न यज्ञांनीं ।
जी सुगति, ती घडे जे स्मरतां, ज्यां नमिति सविनय ज्ञानी. ॥
विधिचेंहि जन्म ज्याच्या पदभक्तिविणें अपार्थ, सूतातें ।
विश्वपटींच्या भावें नमितों मी त्याचि पार्थसूतातें. ॥ ( १-४ )'

मूळांतील कल्पना घेऊन पंत तिला आपल्या ओजस्वी वाणीनें कसी शृंगारितात त्याचीं आणखी एक दोन उदाहरणें पहाः-

कर्णपर्वात 'त्याच्या ( कर्णाच्या ) शतशः इषुधारा भ्रमरपंक्तीप्रमाणें शोभल्या' या अर्थाच्या मूळश्लोकांतील वाक्यावर पंतांनीं किती प्रौढ व वीररसास पुष्ट करणारें व परंपरितरूपक व कारकदीपक या अलंकारांनीं मंडित असें झोंकदार वर्णन केलें आहे तें पहाः-

अद्भुतकर्णशरासनघनजनितामितविशुद्धशरधारा, ।
तापविती, कांपविती, निर्मिति तटिनी जपासुमाकारा. ॥ कर्ण. २.१७ ॥

प्रस्तुतस्थलीं वीररसवर्णास लांब समास विशेष पोषक असल्यामुळें त्याची योजना करण्यांत पंतांनी आपलें चातुर्य प्रकट केलें आहे. असाच प्रकार इतरत्रही युद्धवर्णनप्रसंगीं दीर्घसमासयोजनेंत पंतांनीं केलेला आहे. कर्णपर्व अ० ५ गी० ११; अ० ८, गी० १३,१४ इत्यादि पहा. याच पर्वात 'वसुदान राजास द्रोणानें मारिले' या अर्थाच्या मूळांतील वाक्यावर पंतांची करामत पहाः-

'जो कीं यथार्थनामा राजा पांडवसहाय वसुदान, ।
आचार्ये काळकरीं दिधलें समराध्वरीं तदसुदान. ॥ ४.२४ ॥'

गदापर्वात धर्माची दुर्योधनास उक्तिः-

( मूळांत ) 'यदि इंद्रो तवाश्रयः' अशी आहे. याचें पंतकृतवर्णन पहाः-

( गीति ) 'होईल, पवि धरुनि करीं, आजि तुज जरि स्वयें हरि सहाय ।
पावुनि अयश, ह्मणेलचि तो केवल दुर्बळापरिस 'हाय.!' ॥ ( १.६८ )'

मूळांतील सामग्री घेऊन त्यांत आपल्या पदरची भर घालून पंत कसा नामी परिपाक तयार करितात याचीं पंतकाव्यांत मुबलक उदाहरणें आहेत. एकच उदाहरण पहाः–

(मूळ) 'निपपात महाराज शोकव्यसनकर्षितः ।
गांधारी च नृपश्रेष्ठ ! सर्वाश्च कुरुयोषितः ॥ (शल्य. १.४१)'

(पंतांचें वर्णन) "घेतांचि परम दुःसह विषरससा उग्र शब्द तो कानें, ।
मूर्छित पडला मृतसा राजा धृतराष्ट्र पुत्रशोकानें. ॥ १.४
पुत्रव्यसनें व्याकुळमति विदुरहि हाय ! ह्मणुनि बहु रडला, ।
पडला मूर्छित, वाटे वातें तो पात पादपा घडला. ॥ ५ ॥
गांधारीतें मूर्च्छा ग्रासी; न धवा न देवरा खाया ।
चुकली, तिजपासुनि तिस पावावा कोण देव राखाया ? ॥ ६ ॥
नवसुनि गौरीस ह्मणत होत्या, 'अहितास परिसुना सासू', ।
धर्मक्षोभें मग्ना शोकीं झाल्याच परि सुना सासू. ॥ ८ ॥
(शल्य. अ० १)"

शल्यपर्व, व गदापर्व यांवर लिहितांना रा. नारायण चिंतामण केळकर बी. ए. यांनीं मूळग्रंथांतील अध्याय व श्लोक यांची पंतांचे अध्याय व गीति यांशीं सूक्ष्मपणें तुलना करून पंतांचें महाभारत भाषांतर नसून फक्त कथानकापुरताच काय तो त्यांनीं मूळ संस्कृत ग्रंथावरून आधार घेतला आहे, हा मुद्दा उत्तम रीतीनें सिद्ध केला आहे. ते ह्मणतातः–"(शल्यपर्वातील) १६६७ मूळ श्लोक कोणीकडे ! आणि ३८२ आर्या कोणीकडे ! २९ अध्याय कोणीकडे आणि ४ अध्याय कोणीकडे ! कशास कांहीं मेळ ? 'भाषांतर' ह्मणजे केवळ भाषा मात्र वेगळी; बाकी मूळ कृतीची प्रतिकृति अगदीं हुबेहुब असली पाहिजे. दृष्टांत तेच, वर्णनें तींच, अलंकार तेच, विषयविवेचनपद्धति तीच, विषयाचें वर्गीकरण तेंच. एवंच, सर्व तेंच. संस्कृतभाषा नाहीं इतकेंच. पण येथें पाहावें तों साराच निराळा प्रकार ! आकृतीचें स्थूल व बाह्यस्वरूप सुद्धां जमत नाहीं. 'सादृश्य' बघावयाला जेथें जेथें ह्मणून जावें, तेथें तेथें 'विसदृशता' दत्त ह्मणून पुढें उभी रहाते ! 'हा पहा मोरोपंताला पकडला !' ह्मणून गर्व करावा, व नीट निरखून पाहूं लागावें तों काय ? मोरोपंत निसटला ! या व्यापारांत शेवटीं कांहीं तथ्य नाहीं, असें वाटून मनुष्य श्रमून गप्प बसतो···शेवटीं अशी खात्री होते कीं, मोरोपंतांनीं महाभारताचें भाषांतर केलें नाहीं. त्यांनीं पुढें मूळ भारत ठेविलें आणि भाषांतराचा कारखाना सुरू केला, असें नव्हे; तर फक्त कथानकापुरताच काय तो मूळ संस्कृत ग्रंथांतून आधार घेतला आहे. कवितेंतील अलंकार, उज्वल कल्पना, अनुप्रास व यमकें हीं सर्व कवीचींच होत ! मुळांतील कंटाळवाणा भाग

गाळून मुद्याचा भाग तेवढाच घेऊन त्यावर आपलें कौशल्य खर्च केलें आहे." ह्याच भारतांतील प्रकार मंत्रभागवत, हरिवंश इत्यादि ग्रंथांतून आढळतो. कथानक सोडून इतर लांबलचक प्रकरणें पंतांनीं मार्मिकपणानें गाळिलीं आहेत.

वरील विवेचनावरून मोरोपंत हे केवळ भारवाहक भाषांतरकार नसून महाकवि आहेत अशी सहृदय व काव्यमर्मज्ञ वाचकांची खात्री होईल. याविषयीं मोरोपंतांचे मार्मिक निबंधकार धाकटे चिपळूणकर शास्त्रीबोवा आपल्या सुप्रसिद्ध निबंधमालेंत ह्मणतातः—"आह्मांस खास वाटतें कीं, ज्यास लवमात्र ह्मणून सहृदयता आहे तो प्रस्तुत कवीच्या ग्रंथांचें उगीच वरवर अवलोकन करूनही प्रकृत वादाच्या संबंधानें फार वेळ द्वैधांत राहणार नाहीं. ज्याप्रमाणें लोहचुंबकाची परीक्षा करायची असल्यास त्याचें व लोहाचें सांनिध्य झालें कीं बस्स आहे, मग लोहाला मागें ओढलें तरी तें जाऊन चुंबकास चिकटणारच; त्याप्रमाणें ज्यास सत्काव्याचें मर्म समजतें आहे व ज्यावर सत्कवींचीं वचनें मोघ होत नाहींत, तो आमच्या महाराष्ट्रकवीचा सरस्वतीनिष्यंद सेवितांच लुब्ध होऊन जाईल यांत बिलकुल संशय नाहीं. तसेंच ज्यास प्रकृत कविता वाचून वरच्या पैकीं कांहींच अनुभव येणार नाहीं त्यानें आपले ठायीं अरसिकता मानली, अथवा आपल्या मनावर दुराग्रहाचा पगडा जबरदस्त आहे असें मानलें तर मोठीशी चूक होणार नाहीं असें आह्मीं खात्रीनें सांगतों···आतां ज्या कवित्वगुणांवर आह्मी इतके लुब्ध होऊन गेलों आहों, व ज्यांच्या योगानें आमचें प्रेम प्रस्तुत कवीवर इतका काळ पावेतों स्थिर होऊन बसलें आहे, ते गुण कोणते ते सांगतों. कवितेचीं अंगें दोन; एक पदरचना व दुसरें अर्थरचना···या दोन्ही प्रकारांवरून पाहतां आह्मी मोरोपंतांची महाकवींत गणना करतों. ('निबंधमाला')." पंतांच्या काव्यांतील उतारे वर आले आहेत त्यावरून आणखी एक गोष्ट चाणाक्ष वाचकांच्या लक्ष्यांत येईल. ती ही कीं, खऱ्या कवीप्रमाणें पंत संसारांतील गोष्टीकडे व निसर्गातील प्रत्येक वस्तूकडे काव्यदृष्टीनें पाहातात. त्यामुळें त्यांच्या काव्यांत निसर्गांतील रमणीयता व संसारांतील मोहकता सहजच उतरली आहे. तसेंच काव्यरचना त्यांनीं करमणुकी-करितां किंवा द्रव्यार्जनार्थ केली नसून प्रथम प्रथम कांहीं अंशीं कीर्तीस्तव पण पुढें पुढें सर्वस्वीं आत्मोद्धारार्थ केली. (परिशिष्ट 'छ' पहा). शिवाय, व्यासवाल्मीकांच्या काव्यांत—भारतरामायणांत जो संदेश सांगितला आहे तोच त्यांच्याही काव्यांत आढळून येतो. धर्मानें वागल्यानें इहलोकीं कीर्ति होऊन परलोकीं शाश्वत सुख मिळतें ह्मणून तसें वागावें; व अधर्मानें वागण्यानें इहलोकीं जरी कधीं बाह्यतः सुख मिळतेसें दिसलें, तरी सुख न होतां मनाला असमाधान वाटतें व अपकीर्ति होऊन परलोकीं दुःख होतें, ह्मणून अधर्मानें न वागतां मनुष्यानें धर्मानें वागून सत्संगांत राहून ईश्वरभक्ति करावी ह्मणजे इहपरलोकीं त्याला कीर्तिलाभ व

खरा आनंद प्राप्त होतो. हा मोरोपंतांचा सर्व काव्यांतून वाचकांस संदेश आहे. मोरोपंत आपल्या 'दुर्वासभिक्षा' या ओवीबद्ध लघुप्रकरणांत ह्मणतातः- .

'अधर्मे दुर्योधन क्षय । पावे धर्में धर्म जय ।
संकटीं देव करुणालय । दास रक्षी हें कथिलें. ॥ ६ ॥
जरी सहाय झाला देव । आलें घरा महावैभव ।
तरी आसक्त मनोभाव । नसावा हें कळविलें. ॥ ७ ॥'

सत्काव्यांची हीच मुख्य शिकवणूक असल्यामुळें सत्काव्याध्ययनाचा राष्ट्रास फार मोठा उपयोग होतो. सुप्रसिद्ध बौद्ध थियासोफिस्ट **जिनराजदास** ह्मणतातः- 'जगांतील प्रश्नांकडे निरनिराळ्या दृष्टींनीं पाहतां येतें. ह्या दृष्टींपैकीं काव्यदृष्टि ही एक महत्वाची दृष्टि आहे. जगाकडे वर्तमानपत्रें एका दृष्टीनें पहातात, इतिहास दुसऱ्या दृष्टीनें पाहतो, काव्य तिसऱ्या दृष्टीनें पहातें व भौतिक शास्त्रें आणखी एका नव्या दृष्टीनें पाहातात. काव्याच्या दृष्टीनें पाहिल्यास प्रत्येक गोष्टीचें सौंदर्य आपल्या लक्ष्यांत अधिक चांगलें येऊं शकतें. ज्ञान हें किती मनोहर, किती रमणीय आहे हेंही कविवृत्तीमुळेंच आपणांस समजतें. प्रत्येक प्रश्नाची एक विशिष्ट बाजू काव्यानें आपणास अवगत होते व त्यामुळें काव्य हें राष्ट्रास उपयोगी आहे. काव्यानें मनुष्याच्या नीतीस जीवंतपणा आणतां येतो. या कारणामुळें काव्यास्वाद घेण्याचें मर्म लोकांस समजणें फार जरूर आहे, व त्याकरितां प्रत्येक माणसास काव्य शिकविलें पाहिजे. राष्ट्रांतील उत्तम कवींच्या कृतींशीं त्याचा परिचय असला पाहिजे व काव्य लिहिण्याचें शिक्षण त्यास दिलें पाहिजे. हें शिकविल्यानें प्रत्येक माणूस चांगलें काव्य लिहूं लागेल असें नाहीं, पण काव्य लिहावयास शिकविल्यानें कविवृत्तीचें मर्म काय हें लक्षांत येणें सोपें पडेल.'

## ९ काव्यगुणदोषविवेचन.

'सच्चेतःकैरवांतें विकच करि, जगत्ताप संपूर्ण टाळी,
अज्ञानध्वांत सारें हरि, रसिकचकोरांसि अत्यंत पाळी; ।
नाना वस्तु प्रकाशी, कविहृदयपयोराशिसंतोषहेतु,
काव्येंदु स्वप्रभेनें खळविरहिजनीं होतसे धूमकेतु. ॥

( प्राकृतमंत्ररामायण-उपसंहार ८ )'

'नसे तादृक् चेतोहर गुण जरी, साधु तरि या
वरू, चूडारत्नीकृतविधुहि जैसा धुतरिया; ।
भले सद्विद्यांचे नद करिति ते लोभ, विहिरा
तयांचा मी; कर्षो जडहि घडिला शोभवि हिरा. ॥

( कृष्णविजय-पूर्वार्ध, सज्जनप्रार्थना २ )'

पंतांनीं जे मोठे ग्रंथ रचिले त्यांत प्राकृतसंस्कृत मंत्ररामायणें, मंत्रभागवत, बृहद्दशम, हरिवंश, व भारत यांचीं प्रमुखत्वानें गणना आहे. त्यांतही मंत्ररामायण, बृहद्दशम उत्तरार्ध व भारत यांत काव्यरसपरिपाक चांगला साधला आहे. तरी भारताच्या रचनेंत जसें पंतांचें बुद्धिसर्वस्व प्रकट झालेलें आढळतें तसें इतर ठिकाणीं फारसें आढळत नाहीं. भारतांत पंतांनीं भाषेची कमावणी संस्कृतभाषा, शुद्ध मराठीभाषणसांप्रदायिक वचनें व साहित्यशास्त्र यांच्या साहाय्यानें उत्तम रीतीनें केलेली आहे. कर्णमधुर छंदोबद्धरचना, अर्थानुरूप शब्दाचा प्रतिध्वनि, कथानकशुद्धता, समयोचित स्वभावानुसार भाषणें, रसभरित अस्खलित वर्णनशैली, व्यापक सहृदयता, व्याकरणशुद्धि, यमकानुप्रासचातुर्य, श्लेषांची मार्मिक योजना, अर्थालंकारांचा भरपूर सांठा व कल्पनाविहंगमाच्या भराऱ्या इत्यादि पंतकाव्यांतील सर्वसामान्य गुण पंतांच्या भारतांत सर्वोत्कर्षानें आढळून येतात. एका अर्वाचीन विद्वान् लेखकानें ह्मटल्याप्रमाणें 'एकंदर उपलब्ध मराठी कवींच्या समुदायांत निरनिराळ्या दृष्टींनीं पंताना फार महत्त्वाचें स्थान द्यावें लागतें.' लेखक ह्मणतातः—'मराठी वाङ्मयांत आर्याछंदाचा निर्माता व पुरस्कर्ता, भाषेच्या शुद्धीकडे व सुधारणेकडे विशेष लक्ष्य पुरवून बहुधा व्याकरणशुद्ध व संस्कृत शब्दांच्या उचित योजनेनें प्रौढ अशी भाषा अस्खलितपणें लिहिणारा ग्रंथकार, अत्यंत सभ्य व मर्यादित असें वर्णन करून सुद्धां उत्कृष्ट तऱ्हेनें रसपरिपोषण करून अंतःकरण उचंबळवून टाकणारा शिष्ट व नागर कवि, अत्यंत कारकुनी बाण्याचा, टापटीपीचा व विस्तारभीरु असा कथालेखक, व अतिशय हृद्य अशी कलाकुसर करून कविताकामिनीला मनोहर अलंकार लेवविणारा कुशल कारागीर, इतक्या नात्यांनी पंतांनीं महाराष्ट्र-वाङ्मयांत आपल्याला अत्यंत महत्त्वाचें व अढळ असें स्थान प्राप्त करून घेतलें आहे. ( मोरोपंती भागवतरचना लेखांक ३ रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी एम्. ए. केसरी ९ डिसेंबर १९२४ )'. याविषयीं महाराष्ट्रीय **ज्ञानकोशकार** ह्मणतातः—'मोरोपंतानें मराठी भाषेवर जितके उपकार केले तितके दुसऱ्या कवीनें केले नाहींत. त्यानें कथानकें जरी जुनीं घेतलीं, तरी त्यांतील कोट्या, विचार व त्यास लाविलेलें वळण नवीन आहे. मराठी कवितेंत संस्कृत शब्दांचा उपयोग करतांना कधीं कधीं अतिरेक केला आहे. त्याची कविता ह्मणजे एखाद्या राजाची सर्वांगसुंदर, नाजूक, बहुमोल अलंकारांदि आभरणांनीं युक्त व बहुविधकलाकुशल प्रौढ वयाची तरुणी होय. शब्दगौरव, भाषेची प्रौढी, रसानुकूलता, भरपूर अलंकार, काल-व्यक्ति-प्रसंग यांना अनुसरून वर्णनें, मुख्य सूत्र न सोडतां थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणणें हें याच्या काव्याचें विशेष आहे. अर्थगौरव, पदलालित्य, माधुर्य, ओजस्विता हे याच्या कवितेचे मुख्य गुण आहेत. ( महाराष्ट्रीय ज्ञानकोश-विभाग अकरावा पृ० ४४५)'. आतां मोरोपंती काव्यांत आढळणाऱ्या गुणांविषयीं आणखी थोडासा खुलासा करून त्यांचें स्पष्टीकरण करूं.

पंतांच्या कवितेचा मोठा गुण तिची **प्रौढता** हा होय. लांब समास ( परिशिष्ट–'ऌ' पहा ), संस्कृत शब्दांचा किंवा वाक्यांचा भरणा, तसेंच शुद्ध संस्कृत पद्धतीस अनुसरून केलेली वाक्यरचना व प्रयोग ( परिशिष्ट 'ॡ' ) इत्यादि गोष्टींमुळें पंतांच्या काव्यांत **ओज** किंवा **प्रौढता** फार आली आहे. नुसती भाषाच प्रौढ असते असें नाहीं तर आंतील अर्थही गंभीर व प्रौढ असतो. त्यांच्या काव्यांत अर्थालंकार व शब्दालंकार यांची गर्दी झालेली आढळते प्रासयमकादि शब्दचमत्कृतीचा कित्ता पंतांनीं आनंदतनय, विठ्ठल कवि व वामनपंडित यांपासून घेतलेला असून त्यांत त्यांनीं आपली पराकाष्ठा केली आहे लांब यमकें, चमत्कारिक अनुप्रास व साहित्य-शास्त्रज्ञांनीं सांगितलेले बहुतेक सर्व अलंकार पंतांच्या काव्यांत, विशेषतः त्यांच्या भारतांत आढळतात ( परिशिष्टें 'ऋ', 'ॠ' व टीप पृ० ८४ पहा ). मधून मधून शब्दांवर श्लेष व कोड्याही आढळतात; पण त्यांची संख्या त्यांच्या काव्याचे प्रमाणानें फारच कमी ( परिशिष्ट–'ऐ', 'ओ' पहा ). मोरोपंतांची श्लेषावर अभिरुचि असती तर एखादें 'नलोदया' प्रमाणें श्लेषप्रचुर काव्य रचणें त्यांना कठिण नव्हतें. त्यांची चित्रविचित्र रामायणादि काव्यें पाहिलीं म्हणजे महाराष्ट्र-भाषा त्यांच्या अगदीं अंकित होती असें वाटतें. अशा कवीला एखादें श्लिष्ट काव्य रचणें म्हणजे हाताच्या मळाप्रमाणें सोपें झालें असतें. त्यांच्या काव्यांतील पुष्कळ यमकें ठरींव म्हणजे पुन्हा पुन्हा तींच तींच आलेलीं असतात. तरी तीं दूरान्वित नसून सहज ओघानेंच आलीं आहेत असें वाचकांस वाटतें ( परिशिष्ट–'अं' पहा. ) शब्द व अर्थ यांच्या अलंकारांची गर्दी झाली आहे तरी त्या-मुळें अर्थहानि झालेली फारशी आढळत नाहीं. कोठेंही मूलवर्णनास सोडून अलंका-राच्या ओघांत पंत वाहावले नसून त्यांची शब्दरचना व वर्णनाची हातोटी अशी खुबीदार असते कीं त्यामुळें सहृदय वाचकांची त्यांच्या काव्यांवर मुरकुंडीच पडावी.

## मोरोपंती काव्यांतील रसवर्णन.

नवरस जसे कांहीं त्यांच्यापुढें हात जोडून उभे होते असें वाटतें. नवरसां-खेरीज 'वात्सल्य' व 'भक्ति' हे रस पंतांच्या काव्यांत प्रमुखत्वानें आढळतात. कोण-त्याही रसांचें वर्णन चाललें असतां कवीचें त्याच्यांत अगदीं तादात्म्य दिसून येतें. उत्कृष्ट रसपरिपाकाचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आहेत. याविषयीं लिहितांना निबंधमालाकार ह्मणतातः–'महाकवीच्या ठायीं ( सुंदर पदरचना व अर्थरचना यांशिवाय ) दुसरें मोठें लक्षण हें आढळतें कीं, संपूर्ण रसवर्ग जसा काय त्यांच्या स्वाधीन असतो. चितार्‍याच्या पाशीं सारे रंग जसे सदैव सिद्ध असतात, पाकाचार्या-पुढें षड्रस जसे हात जोडून उभे असतात, त्याचप्रमाणें कवीचीही गोष्ट होय. सारी भाषा ही जशी काय त्याची अंकित होऊन गेलेली असते, यास्तव तो अशी

कांहीं चमत्कारिक शब्दाची सांगड घालून देतो कीं वर्णनविषयक पदार्थ जसा काय डोळ्यांसमोर उभा राहतो, व वर्ण्यमनोवृत्तीशीं वाचकाच्या चित्ताचें तादात्म्य होऊन जातें! मोरोपंताच्या कवितेंत वरील रसाविर्भावाचीं शेंकडों उदाहरणें आहेत. ( निबंधमाला, अंक ६३ )'. येथें त्यांचा उगीच थोडासा उल्लेख मात्र करितों.

## शृंगाररसवर्णन.

ज्यास संस्कृतांत 'प्रथमो रसः,' किंवा 'आद्यरसः' असें ह्मणतात त्या **शृंगाररसाचें वर्णन पंतांच्या काव्यांत वाचलें असतां असें दिसून येईल कीं प्रणयी-जनांचीं हृद्गतें जरी कवीला पूर्णपणें अवगत होतीं तरी त्यांनीं कोठेंही फाजिलपणा केलेला नाहीं. शृंगारवर्णन तर अप्रतिम आहे पण त्यांत अश्लीलत्व मुळींच नाहीं.** पंतांच्या कवितावधूचा श्रृंगार इतर कवींच्या शृंगाराप्रमाणें अश्लील नसून तो पतिव्रतेच्या श्रृंगाराप्रमाणें मर्यादशील असून हृदयंगम आहे. पंतांचें शृंगारवर्णन भवभूतीच्या श्रृंगाररसवर्णनाप्रमाणें खुबीदार नाजूक व प्रौढ असतें. श्रृंगारवर्णनाचा कळस करण्यासारख्या प्रसंगींही त्यांनीं आपला मर्यादशील, प्रौढ, पण खुबीदार 'बव्हर्थजनमनोहर स्वल्पाक्षर' असा श्रृंगारवर्णनाचा क्रम सोडिला नाहीं. हरिवंशांतील प्रद्युम्नप्रभावतीविवाह (अ० ३५-३६), उषानिरुद्धविवाह (अ० ४१), कृष्णविजयांतील कृष्णाची रासक्रीडा (अ० २९-३३), रतिप्रद्युम्नांची ओळख पटणें (अ० ५५), मंत्रभागवतांतील कृष्णाची रासक्रीडा (१०-३७६-४०७), भारतांतील शर्मिष्ठाययातिकथा (आदिपर्व अ० ११), दुष्यंतशकुंतलाख्यान (अ० १२), कर्णजन्मप्रसंग (अ० १७) पांडुमाद्रीसमागम (अ० १९), ऊर्वशीकृत अर्जुनविलोभन (वनपर्व अ० ३. ४७-७२), कीचककृत द्रौपदीप्रमाद ( विराटपर्व अ० १ ), मंत्ररामायणाच्या उत्तरकांडांतील रावणकृत रंभाधर्षण ही कथा, इत्यादि प्रसंग पंतांच्या श्रृंगारवर्णनाचीं उदाहरणें होत. विप्रलंभश्रृंगाराचीं उदाहरणें पाहिजे असल्यास मंत्ररामायण, मुक्तामाला संस्कृत व वनपर्व यांतील रामाचा सीतेविषयीं विरह व मंत्रभागवतांतील किंवा बृहद्दशमांतील कृष्णदारविरहवर्णन हे प्रसंग पहावे. आतां क्वचित् श्रृंगारांतर्गत बीभत्सवर्णनही आढळतें, पण त्या काळाकडे लक्ष्य दिलें असतां ती गोष्ट क्षम्य असून त्याची अल्पता पंतांच्या रसिकत्वाचें व सभ्यपणाचें मोठेंच चिन्ह होय. पंतांच्या एकंदर काव्यमहोदधींत फाजील श्रृंगारवर्णनाचीं किंवा तत्सूचक पदें फारच अल्प आहेत. या विषयीं केकावली टीपा पृ० ९०-९३ पहा. आतां पंतांच्या श्रृंगाररसवर्णनाचा थोडासा मासला पाहूं या. प्रथम संभोगश्रृंगाररसाच्या उदाहरणांचा मासला पाहा:-हरिवंशांत वज्रनाभदैत्यकन्या प्रभावती हिचा प्रद्युम्नाशीं व उषेचा अनिरुद्धाशीं गुप्तविवाह झाला तेव्हांचीं वर्णनें **संभोगशृंगाराचीं उत्कृष्ट उदाहरणें** होत. प्रभावतीची नूतन सखी हंसी प्रद्युम्नाचें गुणवर्णन करितांना म्हणतेः-

(गीति) "सुंदरि सुंदरवर वर येतां प्रद्युम्न जरि पहातीस, ।
श्रीविष्णुला जसी श्री, त्याला सर्वस्व तूं वहातीस. ॥ अ० ३५.६२ ॥"
मूळ श्लोक-'यं सदा देवि दृष्ट्वा हि स्रवंति जघनानि हि ।
आपीनानिव धेनूनां स्रोतांसि सरितामिव ॥ ( अ० ९२ श्लो० २२ ).'

या मूळश्लोकांतील अतिरिक्त शृंगाराचें वर्णन पंत किती खुबीदार व मर्यादशील-पणानें करितात तें आतां पहाः-

(गीति) "सखि ! नारींचा धीर प्रद्युम्नातें विलोकितां गळतो, ।
स्त्रीजन मीनचि वाटे, त्याचा रूपादि सुगुण जो, गळ तो. ॥ ६४ ॥"

प्रभावति प्रद्युम्नाला घेऊन येण्याविषयीं हंसीची विनवणी करितेः-

"हें कार्य कराया, त्या प्रभुसूनुकडे तुवांचि सखि ! जावें ।
राज्ञीनेंही, देतां जीवन रुग्णानुगेसि, न खिजावें. ॥ ७६ ॥
हे तव अनुजा, तनुजा, अथवा दासीच, ह्मण, न आलि; सये ! ।
या कार्याहि न व्हाया कोणा उपकारगणन आलिस, ये. ॥ ७७ ॥"

प्रद्युम्न आज प्रदोषकालीं तुला भेटेल असें हंसीनें सांगितल्यावर तिचें भाषण-

"ती त्या हंसीस ह्मणे, 'मज मत्सदनांत धीर दे, वस, ये; ।
प्रथमसमागम, भीतें मन, कीं तो वीर, धीर, देव, सये !' ॥ ३६.४७ ॥
हंसी ह्मणे, 'सये ! मी सोडिन तुज पळहि न, सदना चाल, ।
भय काय ? तुह्मी दोघे पावुनि नव संग रसद, नाचाल. ॥ ४८ ॥"

संध्याकाळीं चंद्रोदय झाल्यावरील प्रभावतीच्या उत्कंठावस्थेचें वर्णनः-

"तों राजसुता पावे, भी, उदया पावतां हिमकरातें. ।
न च दैत्यसुता भीती, मुख पसरुनि धांवताहि मकरातें. ॥ ५५ ॥
जो होता हिमकर, सखि ! झाला अद्भुतचि अहिमकर तो कां; ।
मारूं, गिळूं, पहातो, हा दितिजांच्याचि अहि, मकर तोकां. ॥ ५६ ॥
'द्विजराज' ह्मणवितो जरि, अकरुण, हिमकर नव्हेचि, गरकर हा. ।
बाळा ह्मणतिल, 'होवुनि, या कर्में, दुर्यशांत गरक, रहा.' ॥ ५७ ॥
गेलें धैर्य, नव्हे स्थिर हें, जेंवि प्रथम वांसरूं सुटलें; ।
घडिभरि दर्शन नव्हतां, सुमुखि ! समज सूत आयुचें तुटलें ॥ ६३ ॥
कामविकारें पवनें पावली कंपा प्रभावती कदली, ।
वदली, बहुत असो तें, गावें जें काय बोलिला सदली. ॥ ६४ ॥"

प्रद्युम्नाची एकांतांत गांठ पडल्यावरचें वर्णनः-

"प्रद्युम्नातें पाहुनि, वाढे सहसा प्रभावतीकाम; ।
विधुतें विलोकुनि जसा सागर, अद्भुत तसेंचि तें धाम. ॥ ७० ॥

राजात्मजा सलज्जा होवूनि, उभी अधोमुखी राहे, ।
साहे तेज न बाळा, मदनानन तिर्यगीक्षणें पाहे. ॥ ७१ ॥
स्पर्शे स्मर, देखाया मुख, वदवाया, प्रभावती ह्नुतें. ।
रोमांचरूप कंचुक तो त्याचा स्पर्श लेववी तनुतें. ॥ ७२ ॥
करुनि अधोमुख मुख सखि! मजसी कांहींच तूं न कां वदसी ? ।
या दासाची उक्ति स्वीकारीं, काय चंद्र घे न दशी ? ॥ ७३ ॥
न करीं उपमर्द वदनशशिशोभेचा स्वयेंचि दाटून, ।
कष्टोत न ओष्ठांच्या प्रांता लोचनचकोर चाटून. ॥ ७४ ॥"

पुढें प्रद्युम्नप्रभावतीचा गुप्तविवाह लागल्यावर एकांतीं भेट झाली व त्यांचे मनोरथ पूर्ण झाले. त्या प्रसंगींचें वर्णनः–

"वरुनि वधूतें, सांगे द्वारीं स्वत्राणकाम सु-खगीतें, ।
मग जें, तें वर्णावें लक्षेही काय कामसुख गीतें ? ॥ ८१ ॥"
दक्षिण कर धरुनि, स्मरशयनीं ने, बैसवी तिला अंकीं, ।
चुंबी मुख, आलिंगी, मदनीं सुख बहु, धनें जसें रंकीं. ॥ ८२ ॥
रमवी प्रद्युम्न बहु प्रेमें, पाहोनि तदधिकार, तितें; ।
करि सुरत नवोढेसीं, जें दे तन्मतिस तदधिका रतितें. ॥ ८३ ॥
प्रातःकाळीं कष्टे प्रद्युम्नातें प्रभावती सोडी, ।
गोडी लावुन जाय; क्षणदा घटिका तसी गमे थोडी. ॥ ८४ ॥
प्रेमें वेडचि लावी प्रद्युम्नास प्रभावती, राया! ।
त्या रसतरंगिणीचा लागों दे न प्रभाव तीरा या. ॥ ८८ ॥"

प्रभावती गर्भिणी झाल्याचें भगिनींस कळलें तेव्हांचें वर्णनः–

"पुरुषवर प्राप्त तिला झाला, हें इंगितें तयां कळलें; ।
यश जेंवि मृगमदाचें, सुरतसुखाचें कधीं नसे मळलें. ॥ ९४ ॥
करुनि स्मित, एकांतीं विश्वासवतीस कृत्य नव पुसती, ।
कीं भगिनी झांकाया शकली कृतसुरतनृत्य न वपुस ती. ॥ ९५ ॥"

उषानिरुद्धांच्या स्वप्नविवाहाचें व नंतरचें वर्णनही खमंग आहे. मासला पहाः–

"देवीवरसामर्थ्यें अतुळें, नागोत्तमें जसी नागी, ।
स्वप्नीं संभोगचिन्हा पुरुषवरें होय भोगिली जागी. ॥ ४१.६० ॥
झाले ते नवसंगीं, होतात विकार भोगिलीला जे, ।
कुळदूषण मानी, भी, प्रबळ विटें जेविं भोगिली लाजे. ॥ ६१ ॥
कांहीं काळ प्रेमें क्रीडा व्रीडावती करी, राजा! ।
निववी पतिसंगसुखें, कामदहन तापवी शरीरा जा ( =ज्या ) ॥११६॥"

भारतांतील दुष्यंतशकुंतलाख्यानांतील प्रसंग ( इंद्राज्ञेनें तपोभंगार्थ आलेल्या मेनकाप्सरेला पाहून विश्वामित्राची कामवशता- )

"होती करीत कंदुककेलि, मधुर गान, मोहिनी; तीतें ।
स्पर्शे प्रथम वसनहर पवन, मग त्यजुनि तोहि नीतीतें.॥ (आदि.१२.३०)
सुरतरसांत बुडाला, जाणों स्त्रीरत्न शीतनवसर, तो ।
तप्त मतंगज रतला; शक्र ह्मणे, बहु करूनि नवस 'रतो.' ॥ ३१ ॥"

ययातिशर्मिष्ठाख्यानांतील शर्मिष्ठेची वरोत्कंठा कशी थोडक्यांत, खुबीदार शब्दांनीं वर्णन केलेली आहे तें पहा:—

"प्रियतम सहाय नसतां यौवनहननेंकरूनि जो सीण, ।
तद्गुणनीं कुंठितमति होईल सरस्वतीहि जोशीण. ॥ आदि. ११.२ ॥"

कुंतीसूर्यसमागमप्रसंगीं सूर्याचें भाषण:-

"भीरू! भय त्यजुनि, मिठी घालीं माझ्या गळ्यांत बाहूंनीं ।
दर्शन अमोघ माझें; तुज उचित न हा नकार बाहूनी. ॥ १७-१२ ॥
सत्य प्रिय, हित बोलुनि, योजुनि अंकीं निवास, रमणीतें ।
घेउनि, देउनि अधरामृत, भोगी रत्न वासरमणी तें. ॥ १४ ॥
झाला सहजकवचमणिकुंडलधर तत्क्षणीं रुचिर बाळ; ।
तीहि कुमारी झाली; आली जाणों प्रसूतिच्चि आळ. ॥१५॥ (आदिपर्व)"

वाल्मीकिरामायणाच्या उत्तरकांडांत २६ व्या अध्यायांत रावणकृत रंभाधर्षण-कथा सविस्तर सांगितली आहे. तिचा सारांश पंतांनीं आठ गीतींत आणिला आहे. त्यांतील चार गीति पहा:-

"नलकूबर नामक जो धनपतिसुत तन्मनःप्रिया रंभा ।
अवलोकिली दशास्ये कनकाची काय चालती रंभा. ॥ १५६ ॥
दशवदनाला श्रीशी गमली, मग वृत्त तो पुसे सारें; ।
तीणें स्नुषा तुझी मी, हें कथिलें भाषणें सुधासारें. ॥ १५७ ॥
मदनातुर तो राक्षस रंभेला वारितां बळे भोगी; ।
नवकेतकीसुमातें वेष्टुनि काळा जसा महाभोगी. ॥ १५८ ॥"

ही सर्पकेतकीसुमाची उपमा मूळांत नाहीं.

"दशकंठें मदमत्तें वनीं यथाकाम मर्दिली रंभा; ।
जैशी निरंकुशानें वन्यगजानें फलानता रंभा. ॥ १५९ ॥"

'एवमुक्त्वा स तां रक्षो निवेश्य च शिलातले ।
कामभोगाभिसंरक्तो मैथुनायोपचक्रमे ॥

सा विमुक्ता ततो रंभा भ्रष्टमाल्यविभूषिता ।
गजेन्द्राक्रीडमथिता नदीवाकुलतां गता ॥
लुलिताकुलकेशान्ता करवेपितपल्लवा ।
पवनेनावधूतेव लता कुसुमशालिनी ॥'

(वाल्मीकिरामायण अ० २६ श्लो० ४१-४३)

या मूळांतील श्लोकांच्या आधारावर पंतांनीं वर्णनाचा मार्मिक संक्षेप करून श्रृंगाररसवर्णन कसें खुबीनें केलें तें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. मूळांत रंभासौंदर्यवर्णन, कामुक रावणाचें श्रृंगारिक भाषण व रंभेचें उत्तर हीं श्लो० १४-४० या सत्तावीस श्लोकांत विस्तारानें वर्णिलीं आहेत. 'विस्तरभीरु' पंतांनीं सर्व विस्तार गाळून तो प्रकार वेंचक, मार्मिक व सूचक शब्दांत सुरस वर्णिला आहे. मंत्रभागवतातील रासक्रीडावर्णनप्रसंगाच्या पुढील गीति पहाः-

"भक्तप्रिय परमेश्वर वाजवि बहुमधुर चित्तहर पावा; ।
कीं गोपींचा सेवुनि नादामृत, सर्व ताप हरपावा. ॥ १०. ३७७ ॥
गमलें गृह गोपींतें गहन, गहन, गेह वेणुच्या पानें; ।
गेल्या प्रियाकडे त्या; नेल्या रक्षूनि पुष्पचापानें ॥ ३७८ ॥
बल्लव रोधिति ज्यांला त्या तनुतें त्यजिति तत्क्षणीं अजि! तें ।
प्रेम वदावें काय ? श्रीहुनि बहु मानिल्या स्वयें अजितें. ॥ ३७९ ॥
वाहों आल्या तनु, मन, निजचरणीं हें कळूनि, आगमनीं ।
त्यांशीं विनोद करि बहु निष्ठुरसा जेंवि सानुराग मनीं. ॥ ३८१ ॥
सुमुखी रडति, 'गृहा जा' म्हणतां, मग त्या नमूनि भवनाशा, ।
दास्यवरार्थ प्रार्थिति हृदयांतूनि त्यजूनि भवनाशा. ॥ ३८२ ॥
दे अभय दयासिंधु, क्रीडे त्यांसीं परोपरी रानीं; ।
पूजिति पाय प्रभुचे पुष्पांनीं, तेंवि त्या शरीरानीं. ॥ ३८३ ॥"

गोपींना अभिमान झाल्यामुळें श्रीकृष्ण गुप्त झाला, तेव्हां गोपींना झालेल्या विरहावस्थेचें-**विप्रलंभशृंगाराचें वर्णन** पंतांनीं फार बहारीचें केलें आहे-

"**नम्र**पणें श्रीदेवी सेवी पद, जीस सर्व मानवती; ।
तीच्या स्वामीस कशा त्या गोपी मानतील मानवती ? ॥ ३८६ ॥"
**मोकलिल्या** तत्काळ, प्रभु झाला गुप्त, दुर्गुणें विटला; ।
**स्त्रीजन** विरहीं टाकी, जैसा अग्नींत दिव्यपट किटला. ॥ ३८७ ॥
**भरल्या** प्रियविरहविषें, स्मरल्या गोपी मनांत अपराधा; ।
नेली एक प्रभुनें जी, काय करी अनंत तप **राधा** ? ॥ ३८८ ॥
**गहनीं** शोधिति, पुसती देव, स्थिरजंगमासि, तळमळती; ।
**अश्रुस्नाता** गोपी पडतां कवळूनि भूमितळ मळती. ॥ ३८९ ॥

वल्लभपदमुद्रांसह सिकतेंत स्त्रीपदेंहि लक्षूनी ।
त्या बहु तापति, जेंवि क्षुधित सदन्नांत गरळ भक्षूनी. ॥ ३९० ॥
तेवींच, दिसे जों जों तत्क्रीडा चिन्हपंक्ति महिवरती ।
तों तों गोपी, जाणुनि कांतकृतस्वापमान गर्हिवरती. ॥ ३९१ ॥
यमुनापुलनीं गेल्या, विफळाशा जाहल्या, वनीं भ्रमल्या, ।
श्रमल्या भगवद्विरहीं, शेवटिं त्या सर्व दीनशा गमल्या. ॥ ३९६ ॥
नक्षत्रें इंदुविणें, स्त्रीरत्नें प्रभुविणें तशीं गमलीं. ।
स्वसुखनिधान करींचें जातां त्यांचीं मनें बहु भ्रमलीं. ॥ ३९७ ॥
मोहळ कृष्ण सुरसमय, गोपी सरघाची, त्यासि त्या चुकल्या. ।
काय क्लेश वदावा ? सुकल्या शोकें, स्वजीवना मुकल्या. ॥ ३९८ ॥"

विरहानंतर पुनर्दर्शनप्रसंग—

"भक्तीनें आळवितां, गातां गुण चिंतुनी मनीं मूर्ती, ।
प्रकटे गोपींत प्रभु, होतां तद्बुद्धि निर्मळा पूर्ती. ॥ ३९९ ॥
गलदंजनाश्रुमलिनें वदनें त्यांचीं पुशी स्वपाणीनें; ।
सांत्वन करी प्रियांचें परमेश्वर अमृत मधुर वाणीनें. ॥ ४०० ॥

यानंतर ४०१–४०४ यांत रासक्रीडा वर्णन करून पंत उपसंहार करितातः—

"देउनि पद्मादुर्लभ सुखराशी त्यां जळीं स्थळीं रमवी; ।
अस्खलितवीर्य भगवान् गोपींचा कामताप तो शमवी. ॥ ४०५ ॥
वामाक्षी त्या प्रातःकाळीं जातां फिरूनि सदनातें ।
शतदा भेटति, चुंबिति, पाहति मुरडोनि कांतवदनातें. ॥ ४०६ ॥
यमसदन तसें होय त्रासप्रद गोपिकांसि निज ओक; ।
कंटाळती गृहातें, ह्मणति, 'खरें, ह्मणति यासि कवि ओक.' ॥ ४०७ ॥"

**शृंगाररसांतर्गत ईर्ष्यामानाचें वर्णन** हरिवंश अ. २६ यांत सत्यभामेचा रुसवा व कृष्णानें केलेलें तिचें शांतवन या प्रसंगीं सुरेख केलें आहे. प्रणयी स्त्रीपुरुषांना तत्सदृश प्रसंगीं यांतील शिकवणूक निःसंशय फार उपयुक्त होईल. नारदानें कृष्णास दिलेलें स्वर्गीय पारिजात कुसुम त्यानें आपणास न देतां रुक्मिणीस दिलें, यांत आपला अपमान झाला असें मानून सत्यभामा क्रोधपूर्ण होऊन रुसली तेव्हांच्या तिच्या चेष्टाः—

"ऐकुनि अपमान, करी जाणों परिहारयत्न हा रमणी ।
फाडी वस्त्र क्रोधें, विखरी तोडूनि रत्नहारमणी. ॥ २६.२१ ॥
आवडती ह्मणुनि करी, मानुनि निजमानघात, **रुसवा** हे, ।
हृदयांत ताप ज्याचें फळ, जो कोपाख्य, या तरुस वाहे ॥ २३ ॥

बांधुनि शिर, शून्यगृहीं निजली, नेसूनि शुभ्रपातळ ती. ।
संवाहनकामा परि धाकें दासी पदा न आतळती. ॥ २४ ॥"

सत्यभामा रुसली हें ऐकून तिचें सांत्वन करण्यास कृष्ण गेले तेव्हांचें वर्णन पहाः–

"प्रभु विश्वकर्मनिर्मितसदनद्वारांत दारुका ठेवी, ।
जाय हळूच न कळतां, जेथें ती खिन्नमानसा देवी. ॥ २७ ॥
दूरूनि भीतभीत श्रीपति कुपिता मनःप्रिया पाहे, ।
मृदुचरणांगुष्ठनखे उकरीत क्षोणितें सती आहे. ॥ २८ ॥
लीलाकमलदलांतें सुनखांहीं लेश लेश तोडून, ।
जोडून स्वमुखीं तें, ती हांसे श्वास उष्ण सोडून ॥ २९ ॥
ठेउनि वामकरतळीं मुख, धरुनी ध्यान, ते पुन्हा सोडी; ।
शयनीं पळ निजुनि, उठे, लागे कोठेंहि न च जिला गोडी. ॥ ३१ ॥
अंतर्बाह्य क्रोधें, पहिली प्रेमें जसी, तसी भिजली; ।
शिर ठेउनि उपधानीं झांकुनि पदरें मुखाब्ज, ती निजली ॥ ३२ ॥
त्या समयीं प्रेष्यांतें संज्ञा करि हरि, मुनिव्रता धरवी, ।
शंकित समीप जाय, प्रभुची हे रीति आयका बरवी. ॥ ३३ ॥
प्रेष्येच्या हस्तीं जें चामर, सज्जनमयूरघन घे तें, ।
ढाळीत उभा राहे; सेवी त्या देवदेव अनघेतें. ॥ ३४ ॥
प्रभुकरसंसर्गी त्या कुसुमांचा तीस चेव दे वास, ।
प्रेष्येसि सुगंध पुसे उठुनि, न जाणूनि देवदेवास. ॥ ३५ ॥
प्रेष्या नमिति, न वदती, जाणों त्या जाणती न बोलाया, ।
पाहे चहूंकडे, तों देखे तीचीच दृष्टि लोला या. ॥ ३६ ॥
प्रभुतें पाहुनि, भामा देवी भगवत्प्रिया ह्मणे, 'युक्त'. ।
पाहे अन्यत्र, निघे एक मुहूर्त न तिच्या मुखें उक्त. ॥ ३७ ॥
नेतें भवाब्धिच्या जें ध्यात्यासि पलिकडील कांठीं, तें ।
श्रीमुख रागे पाहे ती, घालुनि भोंवयांत गांठीतें. ॥ ३८ ॥
मग 'बहु शोभसि', ऐसें ह्मणुनि, वदन वामकरतळीं ठेवी, ।
होउनि अधोमुखी, स्फुरदधरा, लागे रडावया देवी. ॥ ३९ ॥
अंभोजदळांपासुनि शुद्ध हिमसलिल नृपा ! जसें गळतें, ।
स्रवलें त्या भामेच्या नेत्रांपासूनि जें तसें जळ तें. ॥ ४० ॥
"वरिचेवरि हस्तांहीं धरुनि, प्रभुवर उरस्थलीं जिरवी; ।
मिरवी स्नेहातिशय, प्रीति श्रीजानिची नव्हे हिरवी. ॥ ४१ ॥"

या पुढें कृष्णानें केलेलें भामेचें शांतवन विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. तें रसज्ञांनीं मूळांतच वाचावें. तें त्यांस फार आवडेल. विप्रलंभशृंगारवर्णनाचें आणखी एक ठळक उदाहरण रामास सीतेविषयीं झालेला विरह होय. के० ८१ पृ० ३५१–३५२ पहा. शृंगाररसाविषयीं पृ० ४७१–४७४ पाहा.

## वीररसवर्णन.

**वीररसवर्णन तर पंतांना अत्युत्कृष्टच साधलें आहे.** वीररसाचें वर्णन करितांना पंतांना स्फुरण चढून 'सूं सणणण सणणणणण' अशी शब्दबाणांची वृष्टि करून ते वाचकांस प्रत्यक्ष समरभूमीचें दर्शन करवितात. वीररसाचीं उदाहरणें भारतांत व रामायणांत वाचकांस हवीं तितकीं आढळतील. वनपर्वातील किरातार्जुनीय युद्ध (अ० ३), विराटपर्वातील अर्जुनप्रकटन व गोग्रहणप्रसंगींचें युद्ध (अ० ३,४) उद्योगपर्वातील विदुलासंजयसंवाद ( टीपा पृ० १८८ ) ( अ० १० ), भार्गवभीष्म-युद्ध (अ० १३), भीष्मपर्वापासून गदापर्वापर्यंत सर्व पर्वे व रामायणांतील युद्धकांड यांत पंतांनीं वीररसाचा महानदच निर्माण केला आहे.

वीररसाचा थोडासा मासला दाखवितों. किरातार्जुनयुद्धप्रसंग–किरातरूपी शंकरानें अर्जुनास कटु शब्दांनीं युद्धास आव्हान केलें तेव्हां कवि म्हणतातः–

१ (गीति) "तें वाक्य अर्जुनाला गरळ जसें यामुनाह्रदा कढवी, ।
पढवी जो चापश्रुति रामासि, तयावरि स्वधनु चढवी. ॥१५॥ (वनपर्व ३)
शर ते जाणों वाहे एक निमेषांत एक लाखोली, ।
प्रभुची जाणेल कसा बाहुबळें तोचि एकला खोली ? ॥ १६ ॥
स्वरवें गिळों न देते कवळहि सिंहा विदारिते भाते, ॥
सरले शर, दोन्हीही झाले सहसा तदा रिते भाते. ॥ १७ ॥
भ्याला, परि धैर्य धरुनि, ताडी त्या ईश्वरासि कोदंडें, ।
देता विश्व कवळिल्या उग्रा काळासि कंप जो दंडें. ॥ १८ ॥
जें युद्धांत ह्मणे, 'हो ! भास्करजी ! न करजाळ विकिरा' तें ।
गांडीवधनु हि हरिलें कामाद्यरिमदतमोरविकिरातें. ॥ १९ ॥
ज्याचा पाद म्हणे, 'रे ! भक्तभवा ! स्वकुदशा न कर, वाळ,' ।
त्यावरि धनंजयाचा भंगे, पावे यशा न करवाळ. ॥ २० ॥
प्रभुला जिंकूं पाहे भुजयुद्धीं, जेंवि काजवा सविता, ।
परि तोषवी स्वधर्में आराधुनि भक्तराज वासवि त्या. ॥ २१ ॥
'मृत्युभयासि तराया न जड सुधेचें धरा चिबुक,' लीला ।
ज्याच्या असें सुरांसहि ह्मणती तो प्रभु बराचि बुकलीला. ॥ २२ ॥
शोणित वमला, श्रमला, भ्रमला, गमला नुठेलसा पडतां; ।
परि उठला, मोह कसा राहेल दयाकटाक्ष सांपडतां ? ॥ २३ ॥

न पहाते झाले हो! पूर्वीं कौतुक कदापि नाकी तें, ।
विजयार्थ शरण गेला नर नतकामदपदा पिनाकीतें. ॥ २४ ॥"

विराटाच्या नृत्यशाळेंत रात्रीं भीमकीचकांचें बाहुयुद्ध झालें तेव्हांची गीति किती वीररसपरिपूरित व रौद्ररसमिश्रित आहे ती पाहाः–

२ (गीति) "ब्रह्मयाकरवीं स्मरवी, मधुसूदनचरित जें पवनभू तें, ।
कांपवि शेषफणेतें न विराटाच्याचि त्या भवनभूतें. ॥ १४० ॥
(विराट. १)"

आतां, भीष्मभार्गवभीषण युद्धाचा थोडा मासला पहाः—

३ (गीति) "करिता जाला मजसी माजा गुरु राम संगरारंभा, ।
पाहों ये योगिचमू जसि सोडुनि कामसंगरा रंभा. (उद्योग.) ॥ १३.७१ ॥
प्रथमचि सोडी मजवरि मद्गुरु शरवर्ष कायहानिकर, ।
तैसाचि हाहि शिष्य, प्रेक्षक जन ह्मणति काय हा निकर? ॥ ७२ ॥
प्रथम दिनीं म्यां गुरुच्या धनुची, पण करुनि तोडिली कोटी. ।
मजवरि तीक्ष्णशरांची गुरुनें कोपोनि सोडिली कोटी ॥ ७५ ॥
पळमात्र पावली शर मर्मीं शिरतां मदीय तनु कंपा, ।
नाहीं गडबडलों, कीं मजवरि गुरुचीच पूर्ण अनुकंपा. ॥ ७६ ॥
मग मी जालों गुरुच्या मर्मीं शतसंख्य बाण शिरकविता, ।
संधानशक्ति माजी कांपवि तद्धृदय, जेंवि शिर कविता. ॥ ७७ ॥
गुरु खवळलाचि होता, मीं हि बहु तसा कधींच न खवळलों; ।
एकामेकांवरि मग साक्षात् कल्पांतमेघसख वळलों. ॥ ९७ ॥
वातास कीं शिराया न दिली पदवी रविप्रकाशाला. ।
इतरां मीच न होइल मग तापद वीर विप्र काशाला? ॥ ९८ ॥
मग तुमुल लोमहर्षण अद्भुत युद्ध प्रवर्तलें बा! गा! ।
झाला असेल कंप क्षितिकंपें क्षितिधरा महानागा. ॥ १३१ ॥"

वरील थोड्या गीति वाचून भीष्मभार्गवभीषणयुद्धाची किंचित् तरी कल्पना येईल. पूर्ण कल्पना येण्यास उद्योग पर्व अ० १३ च वाचिला पाहिजे. भीष्मपर्वापासून गदापर्वापर्यंतच्या पर्वांत युद्धच वर्णन केलें असल्यामुळें त्यांत वाचकांना वीररसाची महानदीच गंभीर घोषणा करीत वाहतांना आढळेल. भीष्मपर्वांतील अर्जुनाचें युद्धकौशल्य पहाः–

४ (गीति) "सूं सणणण सणणणणण वाजति शरनिकर काय हानिकर, ।
वदले सुरमुनि, 'करितो नररूपें रुद्र काय हा निकर?' ॥ ॥ २.७३ ॥
शरधिशरजलधि फुटले, कीं दैवें पाश एकदा तुटले, ।
ते काळव्याळ करटिघोटकभटभेक खावया सुटले. ॥ ७४ ॥

कवि योजुनि उपमा गजहरनरततिस वाहुटळ लाजो, ।
अतुळबळ न कां गरगलकलहीं हि न विजयबाहु टळला जो. ॥ ७५ ॥
देवासुराहव न बहु त्या कौरवापांडवाहवाहून, ।
शोणितनदींत गेले सभट रथद्विरदवाह वाहोन. ॥ ७६ ॥"

अर्जुनास युद्धांत भीष्मानें पीडित केलेलें पाहून क्रुद्ध होऊन भीष्मावर धांवून जाणाऱ्या भक्तवत्सलकृष्णाचें चित्र पंतांनीं कसें लालभडक रंगविलें आहे तें पहाः–

५ (गीति) "जो मातृस्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली ।
तो भीष्मावरि कोपे, स्वमधुहराउपरि जेंवि सरघाली. ॥ ३.३७ ॥
ऐसें वदोनि केलीं नयनें जैसीं नवीन कोकनदें, ।
देवें कांपविले बहु गर्जोनि जसे तटस्थ लोकनदें. ॥ ३८ ॥
चक्र करीं धरुनि रथाखालीं टाकुनि उडी सजव धांवे, ।
वाटे त्या सिंहानें सर्व हि भीष्मादि ते गज वधावे. ॥ ३९ ॥
भारें लवे प्रतिपदीं भू, शेष धरूं शके न लवलीला, ।
भीष्माच्या मात्र मनीं ती प्रभुची दे न भीतिलव लीला. ॥ ४० ॥
कोपे जै विश्वंभर शंभर उत्पात भूमिकंपादी, ।
गडबडले सुरमुनि तैं अर्जुन सन्मित्रकार्य संपादी. ॥ ४२ ॥
धावुनि यत्नें धरि, परि ओढुनि ने त्यासि देव ओढकसा, ।
जाणों ह्मणे, 'भुजबळें पाहों जरि ओढितोसि, ओढ कसा?' ॥ ४३ ॥
कर जोडुनि भीष्म ह्मणे, 'येतां मारावयासि या हो ? या, ।
हा सत्यसंध केला, मुक्ति हि, साधूंसि गावया, होया.' ॥ ४४ ॥
केला उभा सिताश्वें चरणीं घालुनि मिठी पदीं दशमीं, ।
प्रभु तत्व असें कळवी कीं, 'प्रेमबळेंचि पदनता वश मी.' ॥ ४५ ॥"

द्रोणपर्वात द्रोण, कर्ण, अर्जुन, भीम, अभिमन्यु व घटोत्कच यांचे युद्धप्रसंग पंतांनीं मोठ्या वीरश्रीनें वर्णिले आहेत. त्यांचें वर्णन करितांना पंतांना आपण योजिलेले दृष्टांतही अपुरे व असमर्पक वाटूं लागले.—

६ (गीति) "**द्रोणार्जुनरण** हि परिस, ज्याचें कथनहि नृपा ! नव्हे सोपे. ॥२१.२७॥
गगनांत आमिषार्थ श्येनांचें युद्ध नरवरा ! होतें, ।
तेंवि ह्मणावें तरि, हा दृष्टांतीं शुद्ध न रव; राहो तें. ॥ २८ ॥
करिवर, हरि, शरभहि, पशु; अशुचि निशाचर; तसेच दानवही; ।
यांसम हे; यांच्या गुणलिपिसि पुरेल न महीसमान वही. ॥ २९ ॥
कौरवपांडवकटकें झालीं, जैसीं पटार्पितें चित्रें; ।
गुरुनें जैसीं केलीं कुतुकें, तैसींच विष्णुच्या मित्रें. ॥ ३० ॥

शिष्याला गुरु, गुरुला शिष्यहि, त्या रणमखांत आटेना; ।
दाटे नारदकंठहि; युद्ध पुरेसें कदापि वाटेना. ॥ ॥ ३१ ॥
'जरि आपणासि आपण कल्पुनि रुद्र द्विधा, करिल समर, ।
तरि उपमा होय,' असें ह्मणती शक्रादि सर्वही अमर. ॥ ३५ ॥
सुरनर करीत होते, मानुनि परमेश्वरासम, स्तवन. ।
ते चंद्र सूर्य जाणों, जलजांचें कटक तें समस्त वन. ॥ ३६ ॥"

सर्वयुद्धपर्वातील वर्णनापेक्षां कर्णपर्वांतील वर्णनांत वीररस फार नामी उतरला आहे. यांत अगदीं प्रारंभापासून अलंकारांनीं नटून थटून वीररसलक्ष्मी आपल्या इतर रससहचरीदेवींना घेऊन प्रकट झालेली दिसते. उदाहरण पहाः–

७ (गीति) "भव्यप्रताप कर्ण, खपित्याहुनि फार संगरीं तपला; ।
कीं ज्याच्या शररश्मिव्रातपटीं तो सहस्रकर लपला. ॥ १.१ ॥
खसख्याचें साधाया चिंतित, जरि पार्थमर्दना जपला, ।
दुसरे दिवशीं हरिच्या दृष्टिपुढें अर्जुनाशुगें खपला ॥ २ ॥
संजयसूत नृपाच्या जाय प्रक्षीण बांधवीं सदनीं; ।
जाणों प्रियजनशोकाजगराच्या उघडल्या महावदनीं. ॥ ४ ॥"

कर्णपर्वांत भीम व अश्वत्थामा (अ० १०), अर्जुन व संशप्तकवीर (अ० १२,३३), भीम व कर्ण (अ० ३२,३३), अर्जुन व अश्वत्थामा (अ० ३९), भीम व दुःशासन (अ० ४५), अर्जुन व कर्ण (अ० ४७,४९), यांचीं परस्पर युद्धें वीररसोत्पादक आहेत. भीमद्रौणीचें युद्ध पाहून प्रेक्षकांचे व देवांचे उद्गार पहाः–

८ (गीति) "योजिति दिव्यास्त्रांतें, करिति प्रकट स्वशक्तिनैपुण्य; ।
प्रेक्षक त्या युद्धाहुनि बहु वर्णिति आपुलेंचि तें पुण्य. ॥ १०.१० ॥
गगनीं सुरसिद्ध ह्मणति, 'या युद्धाची कळा हि सोळावी ।
युद्धांतरें न पावति; या अमृतरसींच दृष्टि घोळावी. ॥ ११ ॥"

भीमयुद्धाचें वर्णनः–

९ (गीति) "कुरुसेनेसीं घाली जेव्हां समरांगणीं गदा फुगडी, ।
तें कालदृष्टि झडकरि पक्ष्मकपाटें पहावया उघडी. ॥ ३३.३ ॥
उठलीं अमित कबंधें, रक्तांच्या वाहिल्या असीम नद्या; ।
तरि भट ह्मणति परस्पर 'हूं हाणा, ध्या यशोरसीं मन द्या.' ॥३३.१४॥"

संशप्तकाचें अर्जुनाशीं युद्धः–

१०(गीति) "तों एकदांचि कोपें संशप्तकयोधसंघ करि लगट, ।
जाणों बळकल्पांतोदधि विजयाचळवरासि करिल गट. ॥ ३३.२१ ॥
भस्मचि करि, परि पडती ज्वलदनलावरि पतंगसे भट ते, ।
झाले यक्षहतकृपणसम शरहत निधिसमार्जुना झटते. ॥ २२ ॥

कोणी ईषा, कोणी हयरथचक्रें, मुकुंदभुज धरिती; ।
बुडतां भवांत तारक गुरुसेत्ववलंब साधु ते करिती. ॥ २३ ॥
कोणी वीर रथावरि चढले, जडलेचि ओढिती तनुतें, ।
धनुतें घ्याया झोंबति, परि भय वरिलें न भूतिकांतनुतें. ॥ २४ ॥
जैसा मत्त मतंगज झाडुनियां देह हस्तिपक पाडी, ।
तैसा कृष्णहि निजभुजसक्त सुभट पाडितां स्वभुज झाडी. ॥ २८ ॥
निजभुज झाडुनि उडवी संशप्तक शूरसूनुसुत दूर, ।
वाटे नक्र तटीं तो टाकी क्षुब्धार्ककन्यकापूर. ॥ २९ ॥
पार्थहि रथातळीं निजतेजें सकळ स्वशत्रुभट लोटी, ।
स्वर्गाखालीं ढकली शक्र जसा वेंचतां सुकृतकोटी. ॥ ३० ॥
जरि होति कोळसे परि धनंजयीं पडति, टोळ सेना कीं; ।
येथ रजीं रक्तीं वपु, तदधिक सुरतांत घोळसे नाकीं. ॥ ३३ ॥"

अर्जुनाचें सैन्यावर नागपाशास्त्रविसर्जन—उत्कृष्ट उपमाः—

११(गीति)"खलसेना निश्चेष्टा केलीच यशोर्थ बांधुनी पाय, ।
दुग्धार्थ बद्ध करिजे गोपें जसि फार मारकी गाय. ॥ ३३.४२ ॥
दारुण कर्म, अहितबळ अहिपाशें दृढ निबद्ध करितो, हें. ।
विश्व जसें कर्मफलद परमेश्वर बांधितो सुदृढ मोहें. ॥ ४४ ॥"

अर्जुनाश्वत्थाम्यांच्या युद्धप्रसंगांतील मासला पहाः—

१२(गीति)"द्रौणि पविप्रतिमशरें उर ताडी जिष्णुचें, तरी उर तें ।
चूर्ण न होय शिवोरःस्पर्शेंचि; न लवहि अन्यथा उरतें. ॥ ३९.१७ ॥
पार्थच्छेदि द्विजधनु; होय रविकरांहि ज्यामध्यें न रिघ, ।
करि घनशरपटल असें, तों टाकी क्रुद्धविप्र तो परिघ. ॥ १८ ॥
परिघ अरिघनसमीरें पार्थे पविहतनगापरि च्छिन्न ।
करितां, तो विप्र दिसे त्रिपुरहर क्षोभला परिच्छिन्न. ॥ १९ ॥"

अर्जुनानें अश्वत्थाम्याचा सारथि मारिला तेव्हां अश्वत्थाम्याच्या पराक्रमाचें वर्णनः—

१३(गीति)"तेव्हां अभ्रांतमना तो परमोदार विप्र वाहांतें, ।
प्रबळांतेंही आवरि, वेळा जसि वारिधिप्रवाहांतें. ॥ २४ ॥
अश्वहि आवरी, करि शरसंधानहि विप्रसिंह निकरानें, ।
झांकी पार्था, जेंवि क्षेत्रा दुष्काळशलभनिकरानें. ॥ २५ ॥
त्या कर्मातें पाहुनि सर्व ह्मणति, 'साधु ! साधु ! बापा ! हो ।
संतुष्ट तुज तुझा सप्रेम स्वर्गस्थ देव बा (=बाप) पाहो'. ॥ २६ ॥"

कर्णार्जुनाचें भीषणयुद्ध पहाः-

१४(गीति)"वर्षति अन्योन्यावरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे, ।
पुरुहूतदूतवातद्युमणिकरां शरगृहांत रीघ नसे. ॥ ४७.३ ॥
जेंवि दिनांतीं पक्षी व्यापिति वृक्षास रचितनीडास, ।
तेंवि तयांतें ते शर; भासति अहि घेति धांवुनि डांस. ॥ ४ ॥
पूर्वी जसि कृष्णावरि शक्रें, तसि जिष्णुवरि महावृष्टी ।
कुपितें कर्णें केली, कल्पांतीं जेंवि घाबरी सृष्टी. ॥ १२ ॥
गगन व्यापुनि गर्जति घनघन निर्मिति घनान्वि आंधारा, ।
देति न कंपा शंपा, परि देती धीरनायकां धारा. ॥ १३ ॥
योजि ब्रह्मास्त्रातें तों खंडी कर्ण त्यासि, तें भीमा, ।
स्वशिरःखंडन भासे, लंघी तत्क्षोभवारिधी सीमा. ॥ १९ ॥
करिती अत्युत्साहें युद्ध त्रिदशग्रहेशसंभव ते. ।
कौरवपांडवसैनिक पाहति ठाकोनियां तयांभवतें. ॥ ३१ ॥
भेदी अयुतशरांनीं भीमाला, शौरिलाहि साठांनीं, ।
ताडी धनंजयाला, मर्मस्थानींच कर्ण आठांनीं. ॥ ३२ ॥
आच्छादुनि बाणांनीं पार्थरथा, सोमकांसि दे त्रृष भें. ।
पांचाळकटक तेणें विदारिले, तट जसे महावृषभें. ॥ ३३ ॥
अर्जुन तेव्हां कोपे क्षालाया शत्रुदारसिंदूर, ।
न्हाणाया निजविजयप्रभवाश्रुकरूनि कुलपतींदूर. ॥ ३६ ॥
वातें जेंवि कसपटें, कुरुकटकें दूर उडविलीं पार्थें, ।
भुजलीलासंपादितदुर्घटजंभारिमुखनिलिंपार्थें. ॥ ३७ ॥
कर्णवधार्थें पार्थें तेव्हां अत्युग्र योजिलें अस्त्र, ।
रवि झांकिला शरांनीं; भीतावरि काय घातलें वस्त्र. ! ॥ ५२ ॥
तें कर्ण मनीं चिंती गुरुला, हरिला जसा करीश मनीं, ।
आथर्वणें, मुदित निजजन, विजयास्त्राचिया, करी, शमनीं. ॥ ५३ ॥
शिक्षोत्साहबळानें कोणी कोणासि त्यांत आटेना; ।
देवां विचक्षणांसहि एक उणा एक अधिक वाटेना. ॥ ५५ ॥
योजिति अस्त्रें शस्त्रें एकाहुनि एक अधिकबळ होतीं; ।
उभयरता विजयश्री न टिके एकत्र एक पळ हो ! ती. ॥ ५६ ॥
जेव्हां शरजाळांनीं पाडिति दोघेहि अंधकारा ते, ।
भूतें ह्मणति, 'अकाळीं प्रळय नसो, पाव अंधकारातें !' ॥ ५७ ॥
साधु ! ह्मणति त्यां दोघां युद्धचमत्कार पाहतां अमर. ।
कीं नाहींच कधींही त्यांहीं तैसा विलोकिला समर. ॥ ५८ ॥

दिव्याप्सरा तयांतें शिंपिति शीतलसुगंधतोयांहीं; ।
वीजिति सुव्यजनाहीं; वरिला सत्कार भव्य तो यांहीं. ॥ ६३ ॥"

यापेक्षां जास्त कर्णार्जुनयुद्धवर्णन देण्यास अवकाश नाहीं. तें सर्व वीररसपूर्ण वर्णन वाचकांनीं मूळांतच वाचावें. शल्यपर्वांतील शल्ययुद्धाचा उगीच थोडासा मासला पहाः—

१५(गीति) "शल्य विशिखपटलानें क्षितिवरि धर्मासि, रविसि वरि, लपवी, ।
खपवी बहु बळ, वाटे तदिषुपुढें निपट हार वरिल पवी. ॥ २-१५ ॥
तेव्हां झाले बहुशत दारुण उत्पात भूमिकंपादी, ।
अमरकटक मथुनि नमुचि जेंवि यश, तसेंचि शल्य संपादी. ॥ १६ ॥
रक्तें न्हाला, झाला फुलल्या पळसासमान तो लाल, ।
बोलाल 'धन्य धन्यचि' शल्ययशें जिष्णुसींच तोलाल. ॥ ३६ ॥
मध्यान्हीं भानुकडे तैसें शल्याकडे पहावेना, ।
रवितेज जेंवि घूका तैसें तत्तेज तें सहावेना. ॥ ४४ ॥
गजवीरशवकुशांनीं झांकी त्या रणमखीं अवनिवेदी, ।
समरांगण ताट भरुनि काळाला मद्रभूधव निवेदी. ॥ ८३ ॥
नरवर गरधरखरतरशर करकर दांत खावुनी सोडी, ।
फोडी कवच उरस्थळ; वाटे तो वात त्या द्रुमा झोडी. ॥ ८४ ॥
धर्म तयावरि योजी शक्तिसि, सुरशिल्पपति जिचा घटक; ।
कटक ग्रस्त करी ती, कोठेंहि जिला कधीं नसे अटक. ॥ ९९ ॥
निजशक्ति ईश्वरें ती असुरावरि योजिली असें वाटे; ।
क्रौंचाद्रि तसाचि उरीं होतां शक्तिप्रहार तो फाटे. ॥ १०० ॥
वक्ष विदारुनि शक्ती क्षोणींत शिरे बिळीं जसी उरगी, ।
कुरुगी 'हा ! हा !' ऐसी प्रकटे बहु, साधुजयिं जसी सुरगी. ॥ १०१ ॥"

गदापर्वांतील भीमदुर्योधनांचें गदायुद्ध सुरु झालें तेव्हांचे उत्पातः—

१६ (गीति) "तेव्हां परमभयंकर झाले उत्पात भूमिकंपादी, ।
शंपा दीर्घध्वानें बहु यश, देवी तसेंचि संपादी. ॥ ३.२ ॥
हाणिति चुकवितिहि बळें दावुनि, लागावया गदा, विवर; ।
करणें प्रहार माथां ज्याच्या त्या तो गदा न दावि वर. ॥ ३.४१ ॥
बसतां गदा गदेवरि किटळें बहु उसळती; अहा ! त्यांचीं ।
तेजें जसीं विजांचीं, झांकिति नयनें नृपा ! पहात्यांचीं. ॥ ४२ ॥
चुकवावया प्रहार व्योमीं उडतांची ऊरुवरि ताडी, ।
मांड्या मोडुनि मारुति महिवरि सहसा सुयोधना पाडी. ॥ ४३ ॥"

मंत्ररामायणांतील युद्धकांडांतील वीररसाचा अस्सल मासलाः–

१७ (गीति) "ते दुंदुभि तोयदरव, दरवर, वीणा, मृदंग वाजविती; ।
गजहयरथचक्रध्वनि भटसिंहध्वान भुवन गाजविती. ॥ ४०१ ॥
कांपे धरा थरारा, गिरि चळती, अब्धि होय संक्षुब्ध,
पांसु प्रांशूष्णांशुद्युति चोरुनि, होय सुरनदीलुब्ध. ॥ ४०२ ॥
प्रांशु ध्वज हेममय, द्विप गिरिसे, रथ विमानसंकाश; ।
खगपतिगति हय ऐसें, सैन्य करी निरवकाश आकाश. ॥ ४०३ ॥
तो समर लोमहर्षण केला, त्याला तुला नसे कांहीं; ।
केशाकेशि, नखानखि, मुष्टामुष्टि प्लवंगलोकांहीं. ॥ ४०६ ॥
नानायुधव्रजक्षत कपि कोपें पादपाद्रिशिखरांहीं ।
रात्रिचरसेनेला मर्दिति पदमुष्टिदंतनखरांहीं. ॥ ४०७ ॥
मृतगजहयदेहातें हातें उचलोनि मारिती रिपुला; ।
क्षतरक्षःक्षतजांच्या क्षितिपृष्ठीं वाहती नदी विपुला. ॥ ४०८ ॥
दुर्बुद्धिमंदिरातें दशकंठाच्या कठोरहृदयातें ।
मुष्टिद्रुमोपलांहीं मारुति ताडि रणांत अदयातें. ॥ ४०९ ॥
दशमुखभुजभुजगाशुगदंष्ट्राविद्धांग नील मोहातें ।
पावे, तों करि लक्ष्मण शललासम पंक्तितुंडदेहातें. ॥ ४११ ॥
रावण परमक्रोधें विशिखें वर्षे जसा महांबुधर; ।
धरसा निश्चल भासे, राघवराजा महेषुचापधर. ॥ ४१९ ॥
रामशरव्रजविद्धक्षणदाचर तो दिसे जसा शल्य; ।
शल्यव्याकुळ होउनि, विसरे संपूर्ण युद्धकौशल्य. ॥ ४२० ॥
रामहरिद्व्यमार्गणकिरणांहीं असुरघूक तो त्रास ।
पावे, कीं रावणगज साहेना राघवेषुतोत्रास. ॥ ४२१ ॥
घेउनि धिक्कारातें, जय देऊनि रामबाहुदंडातें, ।
यातु गृहीं जाय, गणी कोदंडातेंचि कालदंडातें. ॥ ४२२ ॥"

## वीररसांत शृंगाराचें मिश्रण.

वीररसांत शृंगाराचें मिश्रण हें संस्कृतसाहित्यशास्त्रज्ञांच्या मतें अविरुद्ध नाहीं. 'वीरशृंगारयोरविरोधः ( रसगंगाधर–जगन्नाथ पंडितरायकृत )'. त्याचींही उदाहरणें पंत–काव्यांत आढळतात. विराटपर्व ३.११४; भीष्म. ११.५४; द्रोणपर्व २०.७७; २२.६१; कर्णपर्व अ० ८.२ (सूत वरुनि लाजे···), अ० ११,५ (विजयश्रीसीं···), अ० ३३, ३३; अ० ३५, ४८–५६ इत्यादि पहा. येथें स्थळसंकोचास्तव थोडासा मासला देतों.

(गीति) (१) "जरि होति कोळसे परि धनंजयीं पडति टोळसेना कीं; ।
येथ रजीं रक्तीं वपु, तदधिक सुरतांत घोळसे नाकीं. ॥ (कर्णपर्व ३३.३३)"

(२) "सैनिक जै निकरानें भांडति तै चालती न रविवाह; ।
वाटे रंगें खेळति, समर न तो, भाग्यवन्नरविवाह. ॥ ३५.४८ ॥
शीतळ मंद सुगंध श्रमशमनश्वसन संगरीं वाहे, ।
सुरजन सहाप्सरोजन मन देउनि शुद्ध युद्ध तें पाहे. ॥ ४९ ॥
शीतसुगंधद्रव्यद्रव सिंचिति भट महानटांवरि त्या, ।
कंठीं माळा घालिति, मरणापूर्वींच जाहल्या वरिल्या. ॥ ५० ॥
वीरवरांतें सेवी कल्पुनि सुव्यजन अंचळाला जे, ।
त्या अप्सरेसि, जाणों, अवलोकुनि फार चंचळा लाजे ! ॥ ५१ ॥
वरि तळपति, पळ पतिता न उपेक्षिति, झेलिती सती अमरी. ।
पद्मवनासि विकासापूर्वीं हि क्षण न सोडिति भ्रमरी. ॥ ५२ ॥
त्या भटमणिवरि करिति च्छत्र निजा अंचळाचि अच्छा या ।
देवी, छत्रें तुटलीं ज्यांचीं, ज्यांवरि रणांत न छाया. ॥ ५३ ॥
मंदाकिनी सरोरुहमकरंदनिषेकशीतळें पदरें ।
वीरांचे मुख पुसिती, वीजिति, यन्मन धरी न कंप दरें. ॥ ५४ ॥
मृति बरि भटकटकाला, दुर्लभरसपानकामुकाला हे ।
अमृतप्रपाचि आजि; स्वर्गींचा जन निका मुका लाहे. ॥ ५५ ॥
भीमार्जुनकर्णांच्या बाणांनीं जे रणांगणीं मेले, ।
ते झेलिले सुरींहीं सुरपुष्पांचे जसे नवे झेले. ॥ ५६ ॥
स्त्रीकुचलीन तरुणसे क्षत्रिय गजकुंभलीन ते गमले; ।
रमले मुहूर्तपरिमित निद्रेसीं सर्व जीव विश्रमले. ॥ २०.७७ ॥"

(३) "जो घोळसी तुज, जसा सुरतीं अतिकामरस कलत्रास, ।
पाहोनि पावले, ज्या नरसिंहा; सामर सकल त्रास. ॥ २२.६१ ॥
(द्रोणपर्व)"

(४) "बैस रथीं, तूं माझा सारथि हो, तरणिचा जसा अरुण, ।
न्यावा चमूवरि तुवां रथ तरुणीप्रति जसा स्मरें (=मदनानें) तरुण. ॥
(विराट. ३.११)"

वरील गीतींत वीररसांत शृंगाराचें मिश्रण झालें आहे. विराटपर्वांतील वरील गीतींत वीरशृंगारमिश्रण आहे त्याविषयीं विविधज्ञानविस्तारकारांचा आक्षेप व त्याचें निबंधमालाकारांनीं केलेलें समर्पक खंडण फार वाचनीय आहे. निबंधमाला अंक ५९ पहा. त्यांतील सारांश असाः—"शृंगार आणि वीर यांचा परस्पर केवळ विरोध आहे असें नाहीं. येवढें मात्र खरें आहे कीं, कोणी वीर रणावेशांत भरून गेला असतां त्याच्या तोंडून शृंगारोक्ति वदविणें किंवा कोणी अनंगरंगमग्न झाला असतां त्यानें वीरश्रीचें भाषण करणें, हें शोभणार नाहीं; पण उपमेकरितां

शृंगारांत वीररस आला असला तर तो हास्यास्पद होतो असें नाहीं. लौकिक भाषेंतही 'रतियुद्ध' आणि 'रणनवरा' या शब्दांवरून वरीलच प्रमाण मिळतें. त्यांतून ज्या प्रसंगविशेषीं वरील (विराटपर्वांतील) शृंगारोपमा योजिली आहे तेथें तर ती विशेष शोभते असें आह्मांस वाटतें...गीर्वाणकविमुकुटमणीच्या ग्रंथांतही पुढील शृंगारोपमा आढळतातः-

'स निर्विश्य यथाकामं तटेष्वालीनचंदनौ ।
स्तनाविव दिशस्तस्याः शैलौ मलयदर्दुरौ ॥ ५१ ॥
असह्यविक्रमः सह्यं दूरान्मुक्तमुदन्वता ।
नितंबमिव मेदिन्याः स्रस्तांशुकमलंघयत् ॥ ( रघुवंश ४.५१-५२ )'

वरील श्लोकांचे लेलेशास्त्रीकृत भाषांतरः-

(द्रुतविलंबित) 'विमलचंदन ज्यावरि साजिरें मलयदर्दुर नामक शैल रे ! ।
युवतिदिक् विलसे जणुं दक्षिणा कुच तिचेचि जयांप्रति हो गणा. ॥
(उपजाति) कामी निजस्त्रीकुचकुड्मलाचा, जसा करीतो उपभोग साचा ।
यथेच्छ तैसा उपभोग त्यांचा करोनियां तो अधिप प्रजांचा, ॥
सह्याख्य जो पर्वत थोर आहे, नितंब जाणों क्षितिचाच पाहे, ।
समुद्ररूपी बहु भव्य वस्त्र, राहे दुरी सोडुनि ज्या विचित्र. ॥
स्त्रीच्या नितंबाप्रति वस्त्रहीना पती, जसा आक्रमितो सुजाणा, ।
तसा तया आक्रमुनी विशाळ, सेने सवें जाय तई नृपाळ. ॥'
तसेंच रघु. ११...'राममन्मथशरेण ताडिता...' "पद्यः"

केकावलि पृ० २१०-२११ यांत वरील श्लोक व त्याचें भाषांतर दिलें आहे.

(५) "भीष्मा मर्दाया अरि, विट जेंवि सतीकुचा, मरायास ।
झटति तदायास जसा गरुडींच पृदाकु-चामरायास ॥
(=सर्परूप चवरीचा श्रम) (भीष्म. ११.५४)"

## करुणरसवर्णन.

करुणरसाचीं उदाहरणें पहावयाचीं असल्यास मंत्ररामायणांतील रामाचें कृत्रिम शिर पाहिलें तेव्हां, व पुढें रामलक्ष्मणांस निश्चेष्ट पाहून सीतेनें केलेला शोक; युद्ध. २२२.२२३, ३५०.३५९; कुशलवोपाख्यानांतील रामानें सीतेचा त्याग केला तेव्हांचा सीतेचा शोक; (अध्याय ४,३३.८७), हरिश्चंद्राख्यानांतील शोक; वनपर्वांतील नलदमयंती कथा व यक्षाख्यान यांतील शोक; द्रोणपर्वांत अभिमन्यु-वधानंतर पांडवांनीं केलेला शोक; तसाच स्त्रीपर्वांत कुरुक्षेत्रांत युद्धसमाप्तीनंतर कौरवस्त्रियांनीं केलेला शोक; इत्यादि प्रकरणें पह्या. त्यांतील थोडासा मासला दाखवितों:-

( मंत्ररामायणांतील प्रसंग )

१ (गीति) "अवलोकुनि राघववर देवर, भूमीवरी रजोध्वस्त, ।
अस्तधृति त्रस्तमना सीता ठेवी स्वमस्तकीं हस्त. ॥ युद्ध. ३५० ॥
हा! नाथ! हा! रमण! हा! लक्ष्मण! हा! तात! हांऽब! हा। दिष्ट!।
विष्टपनायक काळें गिळिला, केलें मलाचि अवशिष्ट. ॥ ३५१ ॥
निजला काय श्रीमान् वसिष्ठ भगवान् भवत्कुलाचार्य?।
आर्यसुता! स्वर्गातें गेलाशि, कसा न होनि कृतकार्य. ॥ ३५२ ॥
हा! दशरथराजमहिषि! कैशी तूं साहशील सुतशोक?।
कैकेयि! तोक गिळिला, म्हणेल तुज काय हा बरें लोक?॥ ३५३ ॥...
हा! देवर! तुजला मी पंचवटीमाजि गांजिलें, बापा!।
न वदावें तें वदल्यें, म्हणवुनि रुसलासि काय निष्पापा? ॥ ३५५ ॥
त्रिभुवन भय हि न हरिलें, स्वरत्नहरदस्यु मारिला नाहीं; ।
मज टाकुनियां स्वर्गा गेलां कार्य न करोनियां कांहीं. ॥ ३५६ ॥
तातांसि विचाराया गेलां, दोघे हि धर्मसंकट कीं; ।
सत्वर पुनरपि येतों, ऐसें कथिलें नसे कसें कटकीं? ॥ ३५७ ॥
त्यजिलें जरि मज, तरि हें राहो, तुज विषयरुचि नसे, शांता!।
त्यजिली कशि धर्मज्ञा! वृद्धा विधवैकनंदना माता? ॥ ३५८ ॥"

कुशलवाख्यानांतील सीतेचा सविस्तर शोक वाचकांनीं मूळांतच वाचावा. सीतेचा शोक ऐकून पशुपक्ष्यादिक सुद्धां रडूं लागले. तेव्हांचीं थोडीं पद्यें पहा:-

२ (गीति) "तोषधनाचे तस्कर, त्या सीतेचे असे विलाप वनीं ।
शिरले जेव्हां सत्वर दुःखप्रद ते चढोनियां पवनीं. ॥ ४.७६ ॥
शुक पिक सकल कलकल स्वरें करुनि भोंवतींच आरडती, ।
विविधपतगनिकररवच्छलें करुनि भूमिभूलता रडती. ॥ ७७ ॥
टाकुनि नाट्यरसातें धांवुनि आले तिच्या समीप शिखी, ।
शिंपुनि निजनेत्रजळें, म्हणति, 'सतीचा विझो प्रकोप शिखी.' ॥ ७८ ॥
शिंपिति नेत्रजळांहीं, स्वल्प शिवति भूमि धांवतां हरिणें; ।
स्वदुहितृशुगग्नितप्त क्षिति म्हणउनि पोळती जणों चरणें. ॥ ७९ ॥
शीतळकमळजळांहीं वर्षति तीच्या तनूवरि भ्रमरी. ।
निजवालधिचमरांहीं वीजिति तिस किंकरीपरी चमरी. ॥ ८० ॥
सुमदालसा, जलार्द्रा, ज्याच्या सजळें करीं, शिरीं कमळें, ।
ऐशा करिणी सेविति तिस कर्णव्यजनमारुतें विमळें. ॥ ८१ ॥
उदकस्थखगगणांहीं धांवुनि ते शिंपिली जलकणांहीं; ।
करिति शकुंत द्विजवर पक्षच्छायेसि शीघ्र तिजवरही. ॥ ८२ ॥

झालें हंसांचें कुळ तें व्याकुळ तेथ जानकीशोकें, ।
ज्यांच्या मुखनयनांहुनि गळति मृणालें जळें तदवलोकें. ॥ ८३ ॥
( श्लोक ) पंचास्य व्याघ्रऋक्षप्रभृति वनचरें केवळ क्रूर सत्वें,
तीं ही तत्काळ झाली सकरुण हृदयें भूसुता शुद्धसत्वें; ।
जे सन्मार्गप्रचारें करुनिच असतें संग्रहीं पुण्य हो! तें
सर्वव्यापन्महीध्रप्रशमनविषयीं वज्रवत् दक्ष होतें. ॥ ८४ ॥
( गीति ) निजजननी क्षिति, हेही क्षितिजा, जाणूनियां असें नातें, ।
आलिंगुनि समजाविति ह्मणउनि धूलिरखसा जणों तीतें. ॥ ८६ ॥
हृद्गत मी परि कांहीं इच्या श्रमाचा नव्हेचि परिहार, ।
ह्मणुनि जणों अश्रूंतें गाळी मुक्ताफळच्छळें हार! ॥ ८७ ॥"

शीतळ मणिहारानें देखील सीतेचा संताप शमला नाहीं, व ती धूळींत लोळत असतांना तिच्या गळयांतील मुक्ताहार तुटला हा सुंदरोत्प्रेक्षागर्भित भावार्थ.

आतां भारतांतील करुणरसाचीं थोडीं उदाहरणें देतों. वनपर्वांत कलिग्रस्तनळानें दमयंतीचा वनांत परित्याग केला तेव्हां दमयंतीनें केलेल्या शोकाचा मासला पहाः—

३ (गीति) "नळ गेल्यावरि कलिनें जागविली कीं तिचे असु खपावे, ।
पति न दिसतां ह्मणे, 'हा!' राज्यभ्रंशें न ती असुख पावे. ॥ ४.१२३ ॥
'अजि नाथ! अहो नरवर! अजि इकडे एकवेळ हेरा हो! ।
एकाकी जाल कसे? दासी सेवा करील हे, राहो. ॥ १२४ ॥
चुकल्यें, क्षमा करा जी! न चुकेन पुढें कदापि सत्कार्या, ।
त्यजिली दया अकस्मात्, त्यागार्हा काय तीहि सत्कार्या? ॥ १२५ ॥
माझें मन बहु तुमचा चिंतूनि असाधुवाद तळमळतें; ।
अजि पुण्यश्लोक! पहा मत्त्यागें कीर्तिपादतळ मळतें.' ॥ १२६ ॥
व्याघ्राला ही रडवी भ्रमतां गहनीं तदा विलाप तिचा, ।
पदमुद्रित पथहि तिळा कलिवशदैवें न दाविला पतिचा. ॥ १२७ ॥
अग नग खग मृग पाहुनि त्यांसि ह्मणे, 'नळ विलोकिला, बोला,' ।
त्या शोकगररसाच्या पानीं मुनि शंभुचीच मति लोला. ॥ १३८ ॥"

वनपर्व अध्याय ११ यांत श्रीरामानें सीतेविषयीं केलेला शोक हा करुणरसाचें सुरेख उदाहरण होय. त्यांतील पुढील थोड्याच गीति पहाः—

४ (गीति) "प्रभुला दे ताप तिचा (=पंपासरोवराचा) वात, जरि सुगंध मंद शीतळ तो. ।
वाटे नलिनींत न, हा देह कढाईत सर्वथा तळतो. ॥ ७४ ॥
हा सीते! तुजवांचुनि सर्वहि मज तापहेतु हा सीते! ।
हा सीते! तूंचि, मज व्यसनसमुद्रांत सेतु, हा सीते! ॥ ७५ ॥

हा सीते ! हा न जगत्प्राण, खरा वाघ वायु हा, सीते ! ।
हा सीते ! व्याळचि हा, व्यक्त पितो राघवायु हा, सीते ! ॥ ७६ ॥
हा सीते ! मज देतो त्वन्मुखजितचंद्र ताप हा सीते ! ।
हा सीते ! करितो द्विजराज हि ह्मणवूनि पाप हा सीते ! ॥ ७७ ॥
हा सीते ! कसि कळली त्वद्व्यसनकथा पिकास, हा सीते ! ।
हा सीते ! जरि नत मी, कसितोंचि तथापि कास हा, सीते ! ॥ ७८ ॥
हा सीते ! जे त्वत्कचभारजितकलाप मोर हा सीते ! ।
हा सीते ! ते नाचति, मज पाहुनि, मजसमोर, हा सीते ! ॥ ७९ ॥
हा सीते ! हा सीते ! अससिल अद्यापि तूं कसी सासु ? ।
ऐकुनि या वार्तेतें प्रियसखि ! वांचेल ती कसी सासु ? ॥ ८१ ॥
हा सीते ! हा सीते ! हा सीते सुदति ! मुदतिशयसुखने ! ।
मुखनेत्रां दावुनि, परलोकीं मज साध्वि ! द्यावया सुख ने. ॥ ८३ ॥"

मंत्ररामायण अरण्यकांड गीति ७५-८४ यांत व संस्कृत मुक्तामालेंत हा शोक फार सरस वर्णिला आहे. केकावलि पृ० ३५१-३५२ पहा.

५ (गीति) 'कोठें जनकसुते ! तूं गेलीस ? धरासुते ! प्रिये ! जाये ! ।
न करीं विनोद, झाला व्याकुळ अत्यंत देह माजा; ये ॥ ७५ ॥
तूं काय कोप धरिला ? अपूर्व मृग नाणिला ह्मणून मनीं; ।
तरि चंद्रमृगहि आणुन देइन, हें तूं असत्यसें न मनीं ॥ ७६ ॥
श्वशुराला परलोकीं गेलिस जरि तूं करावया नमना; ।
पुसल्यावांचुनि कैशी सीते ! झालीस आज यानमना ? ॥ ७७ ॥
न्यावें मजही तेथें, श्वशुराची प्रार्थना करून सती ! ।
भरत करू राज्यातें, तुजवांचुनि वांचुनी, सुखे नसती. ॥ ७८ ॥
हा प्रियतमे ! वियोगज्वलनमुखीं होमिलेंस कां मातें ? ।
वैरी संतोषविले, टाकुनि यातें वनीं सकामातें. ॥ ८३ ॥
( मंत्ररामायण, अरण्यकांड )"

सभापर्वात द्रौपदीनें कृष्णाचा धांवा केला तेव्हांच्या गीति करुणरसानें ओतप्रोत भिजलेल्या आहेत. थोडासा मासला येथें देतोः—

६ (गीति) "जै दुर्दशा कराया दुर्दैवें सिद्ध नीच हा केला, ।
तै दीनबंधुला ती कृष्णा मारी मनींच हांकेला. ॥ सभा. ५.६८ ॥
'हे नाथ ! रमानाथ ! व्रजनाथ ! हरे ! मुकुंद ! कंसारे ! ।
गोविंद ! कृष्ण ! केशव ! दीनार्तिहरस्त्वमेव संसारे. ॥ ६९ ॥
काळें हि सख्या ! न तुझ्या दासीस पहावयासहि सकावें, ।
त्वद्भगिनीवस्त्र खळें नम्र करायास काय हिसकावें ? ॥ ७० ॥
जीहुनि नसे सुभद्रा तुज बहुमान्या, अकीर्ति हे तीची; ।
धांव दयाब्धे ! होते विश्वांत तुझ्या अकीर्ति हेतीची. ॥ ७१ ॥

भगिनी ऐसें वदल्यें, परि फारचि लाजल्यें, न हें लटिक; ।
प्रभुजी! रक्षा, तुमच्या दासांची मी लहानसी बटिक. ॥ ७३ ॥
भागा, या, गाय तशी मी, न धरी अघभयास हा यवन; ।
गुरुजनसद पाळक, परि झाले या निर्दया सहाय वन. ॥ ७५ ॥
कीर्त्यर्थ उद्धरीं मज उद्धरिलें जेंवि सागरीं महिला; ।
त्वद्दासांची होती त्या अमृतीं, आजि या गरीं महिला. ॥ ७६ ॥
बा! ढळतां तिळहि पदर भावि व्यजनासि साग रामा जी, ।
ती खळसभेंत उघडी पडत्ये न पडोनि सागरामाजी. ॥ ७७ ॥
भो भगवन्! भो वत्सल! भो हतचाणूरमल्ल! भागावें. ।
विश्वीं तुझेंचि, दुसरें न, यश श्रीप्राणवल्लभा! गावें. ॥ ७८ ॥
आजि असत्परपुरुषस्पर्श, न अपराध अन्य केला हो! ।
झांका प्रसादपदरें न कुजनदृक्स्पर्श कन्यकेला हो?' ॥ ७९ ॥
अवतरला उतराया जो दुःसह दुष्टभार महिवरला, ।
अहिवरलास्यपटु प्रभु करुणोक्तें द्वारकेंत गहिंवरला. ॥ ८० ॥"

द्रोणपर्व अध्याय ४ गीति १-५ यांत अभिमन्यूच्या मृत्युबद्दल धर्मानें केलेला शोक; अ० ७ गीति १२-३५ यांतील अर्जुनाचा शोक; अ० ८ वा गी० २७-३४ यांतील सुभद्रेचा शोक; यांत करुणरस फार चांगला साधला आहे. थोडा मासला पहा:-

७ (गीति) "धर्म ह्मणे, 'हा! हा! म्यां मंदें दाटुनि कुमार मारविला; ।
बहुवीरसूत दिसल्या अधिक सुभद्रा, उमा, रमा, रविला. ॥ ४.१ ॥
अर्जुनकृष्णसुभद्राकृष्णाकुंतींस काय समजावूं? ।
काळ न भेटे कैसा? तद्वदनीं पुत्रकायसम जावूं. ॥ २ ॥
अद्यापि उत्तरेचें मुख पीत असेल बहळ हळदीनें. ।
म्यां जेंवि, लब्धसन्निधिनाशें करिजेल न हळहळ दीनें. ॥ ३ ॥
तुज उत्तरे! मुलि! दिला म्यां कापायास मान विश्वास, ।
कलिकाळ काय बुडविल मज बहु पापासमान विश्वास? ॥ ४ ॥
कथिलें कसें असें मज 'धर्मा! करवाळ काढ कलहातें. ।
मृत्युमुखीं कुलकरगुणशर्माकरबाळका ढकल हातें'. ॥ ५ ॥"

अर्जुनाचा शोक ऐका:-

८ (गीति) "मृदुलप्रकृति न साहे सुतशोका, जेंवि न रविला पाला; ।
शिबिरीं करी परोपरि नारायणमित्र नर विलापाला. ॥ ७.१२ ॥
'मज आडवा न आला, तरि या पांचांत पृथुनयन सावा ।
कां नीरजनाभाचा भाचा सुगुणाब्धि पृथुनय नसावा! ॥ १३ ॥

बोले कृष्णमुखींची वेणु तसा, परम लाडिका वाणी. ।
जो स्पर्शे, शिशुहि, न घें गुरुसन्निध, पर, मला डिकावाणी. ॥ १४ ॥
जो बहु परपृतनांसीं, गोपींसीं बाळकृष्णसा, रमला, ।
दावा हो! सत्वर तो स्वगुरुवचनगीतकृष्णसार मला. ॥ १५ ॥
बाळ हि जो खड्गपरशुचक्रगदाचापतोमरा वाहे, ।
संकल्प दुर्जनांचे जाले कीं सफळ 'तो मरावा' हे. ॥ १६ ॥
ज्याची शास्त्रीं शस्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् समज, ।
काय तुह्मी केला हो! आणुनि तो भेटवाचि वत्स मज. ॥ १७ ॥...
हर! हर! जाणों चुरिला तो बाळ करेणुनीं चरणपातें. ।
शिव! शिव! भरितिल कीं हो! तो बाळक रेणु नीच रणपातें. ॥ २३ ॥
कुंतीस काय सांगूं? कृष्णेला दाखवूं कसें वदन? ।
दुष्कर मला सुभद्रासांत्वन, दुर्दर्श उत्तरासदन. ॥ २४ ॥
यांचें (=धर्मभीमादि बंधूंचें) स्वरूप कळतें तरि पळ न विसंविताचि बाला हा;।
'शिव! शिव!' ह्मणेल मरणावधि वैधव्याधिमग्न बाला हा! ॥ २७ ॥
कां माजें उर न उले? कवि 'पवि' कीं ह्मणति तोकशोकाला! ।
लोका लाजे मन, कीं जावें यश हारवूनि ओकाला. ॥ ३१ ॥
हा वत्सा! रक्ताक्षा! जाले त्वत्सुगुण आजि घातकसे! ।
बा! वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे? ॥ ३३ ॥'
भगवान् ह्मणे, 'बुडाला कीं हा मोहांत! रक्ष भो गीते! ।
जीवाला विषय, तसे संमोहाया न दक्ष भोगी ते. ॥ ३६ ॥''

सुभद्रेचा शोक ऐका:—

९ (गीति) ''ऐकुनि ह्मणे सुभद्रा, 'हा वत्सा! काळ काय हा निधना? ।
जाली कसी अकस्मात् धनलुब्धाच्या समूळ हानि धना! ॥ ८.२७ ॥
शोकीं कसे बुडविले माजे असु, उत्तरासुसह सारे. ।
जालासि स्वप्नींचा निधिसा तूं दृष्टनष्ट सहसा रे! ॥ २८ ॥
धिक् पांडुयदुबळांतें, रक्षाया न शकलें मुलाला जें. ।
स्वपतिपराक्रमवर्णनशीलत्वें मींहि बा! तुला लाजें. ॥ २९ ॥
जालें व्यर्थ वृकोदरभावोजीचें बलाढ्यपण आजि; ।
वाटे मरेल शोकें, नातू आहेत फार पण, आजी. ॥ ३० ॥
हा वत्सा! धैर्यनिधे! हा वत्सा! जनमनोहराकारा! ।
हा वत्सा! कुलतिलका! हा वत्सा! सर्वसद्गुणाधारा!' ॥ ३१ ॥
इतुक्यांत उत्तरेसह कृष्णा ये, होय भर विलापाला; ।
शोकीं आप्तसमागम, विषतरुचा जेंवि भरविला पाला. ॥ ३३ ॥

मूर्छित पडे सुभद्रा, शीघ्र तिला सांवरी कमळपाणी. ।
वारा घाली, लावी नेत्रांला शीतसें अमळ पाणी. ॥ ३४ ॥
प्रभुला 'हाय !' ह्मणाया लावी मोहीं बुडोनि घटिका हो ! ।
स्नेह असाचि असे, जरि लटिका करितील साधु, लटिका हो. ॥ ३६ ॥"

स्त्रीपर्व तर सर्वच शोकरसाची तरंगिणी आहे. त्यांतील शोकरसाचा मासला काय द्यावा. ! पतिपुत्रादि आप्तांच्या मरणानें कौरवस्त्रियांचीं हृदयें पोळून गेल्यामुळें त्यांच्या शांतवनार्थ त्या आपल्या नेत्रांतून सारखी जलवृष्टि करित आहेत. सहृदय वाचकांनीं हें वर्णन मूळांतच वाचावें. तथापि मूळ न वाचणाऱ्या वाचकांकरितां त्याचे उगीच थोडेसे चार शिंतोडेच तेवढे येथें देतों.

गांधारी दिव्यदृष्टीनें रणभूमीवर पुत्रादि आप्तांच्या प्रेतांची दुर्दशा पाहून व आपआपल्या पतींच्या प्रेतास कवटाळून शोक करणाऱ्या विधवा स्त्रियांचा हृदयद्रावक शोक ऐकून भ्रमिष्ट होऊन कृष्णास ह्मणत्येः—

१०(गीति) "बहु पोटीं भडभडतें, गडबडतें चित्त जें विमळ मळतें, ।
वमनाविण न शमे तम न उसळलें पित्त जेंवि मळमळतें. ॥ ३.१५ ॥"

द्रौपदीचें सांत्वन करितांना गांधारी ह्मणत्येः—

( गीति ) "शोक अपरिहार्यचि, जो जाला गेला; वृथाचि हा शोक. ।
शोक सफळ जरि असता. मेल्यांला उठविते न कां लोक ? ॥ ७३ ॥
काय मृदु स्त्रीचे उर ! शोकें तडकेल उद्धतपशूर. ।
शोच्य नव्हेत तसे ते, मरति रणीं करुनि शुद्ध तप शूर. ॥ ७४ ॥
मुलि ! समजाविल आह्मां स्वविवेकाहूनि अन्य पटु कोण ? ।
गोड गुहेचा शोकें गेहाचा काळकूट कटु कोण. ॥ ७६ ॥"

द्रोणाचार्यांचें शव पाहून गांधारी कृष्णापाशीं शोक करित्येः—

११(गीति)"शिव ! शिव ! कृष्णा ! क्रव्यादांहीं याचाहि भक्षिला काय, ।
स्वाश्रय न रक्षिला तरि अस्त्रांहीं अर्थ रक्षिला काय ? ॥ ३८ ॥
अस्त्रांची घे, साधुनि सेवा सहवास विप्रसा, दानें, ।
ज्याच्या तरे रण करुनि देवासह वासवि प्रसादानें. ॥ ३९ ॥
ज्याचें अतुळ ब्राह्म क्षात्र हि तेज प्रसिद्ध, जो लोहा ।
स्पर्शमणि तसा, प्रणता शिष्या अत्युत्तमत्व दे, तो हा. ॥ ४० ॥
त्याच्या खातात पहा तडतड तोडूनि करट पायांतें, ।
सर्व तुम्ही वंदाया तेव्हां जोडूनि कर टपा यांतें. ॥ ४१ ॥
कृष्णा ! कृपी कृशाकृति कृपणा झाली पहा महाशोकें, ।
नाना विलाप करिती, गमती, कोकीच टाकिली कोकें. ॥ ४२ ॥

ती ब्रह्मचारिजटिलच्छात्रजनासह करूनि आशु चिता, ।
उचिता क्रिया करितसे; या स्त्रीची अद्भुताचि बा ! शुचिता. ॥ ४३ ॥
तळमळती पाहोनि प्रेतदशा निपट अनुचिता पतिची, ।
असिला बहु काय चिता ? देणारी सुबहु तनुचि ताप तिची ॥ ४४ ॥
रथचापशरादिसमरसाहित्यें द्रोणदेहदाहातें ।
करुनि छात्र निघाले. कोठें सत्पुरुषरत्न हा ! हा ! तें ? ॥ ४५ ॥"

✓ अभिमन्युस्त्री उत्तरा हिचा शोक तर अत्यंत हृदयद्रावक आहे. अध्याय ४ गीति ४१–६० पहा. तिचा शोक वर्णन करून शेवटीं पंत ह्मणतातः–

"जड सोडवितां, हृदयीं देह मनोमयचि उरविला पतिचा, ।
गांधारीनें कथिला भिजवी प्रभुचें हि उर विलाप तिचा. ॥ ६० ॥"

अभिमन्यूचें शव घेऊन शोक करणाऱ्या उत्तरेजवळून तें जबरदस्तीनें सख्यांनीं दूर केलें तेव्हां ती पतीच्या देहाचें मनोमय ध्यान करूं लागली. हा शोकवृत्तांत गांधारी आपल्या दिव्यदृष्टीनें पाहून कृष्णास सांगत होती. तो ऐकून प्रभूला अत्यंत दुःख झालें व त्यांच्या नेत्रांतून झर झर अश्रुधारा वाहून त्यांनीं त्याचा विस्तीर्ण ऊर भिजून गेला; हा भावार्थ.

आतां **रौद्रभयानकरसांचें वर्णन** पंत कसें करितात तें पाहूं या.

## रौद्ररस व भयानकरस यांचें वर्णन.

रौद्र व भयानक यांचीं उदाहरणें कुशलवोपाख्यान अ० १३, ५–१०, हरिवंश अ० ४८ तील देवदैत्यांचा भीषण समर, कर्णपर्वातील भीमदुःशासनांचें भयानक युद्ध (अ० ४५ गी० १–३०) व सौप्तिकपर्वातील अश्वत्थामा, कृप, कृतवर्मा या वीरांनीं–विशेषतः अश्वत्थाम्यानें केलेला पांडवशिबिरांत स्वस्थ निजलेल्या असावध वीरांचा सरसकट संहार, यांत सांपडतील. सौप्तिकपर्वांतील मासला पहाः–

१ (गीति) "होय भगवदाविष्ट द्रौणि ब्राह्मण महोग्र भार्गवसा, ।
अन्योन्य भूतराक्षस ह्मणति, 'धरुनि शिबिरसत्रमार्ग वसा'. ॥ १.४९ ॥
शिबिराकडे निघाला तो साक्षात् रुद्रसा महातेजा, ।
ईश्वरचि ह्मणत होते बहु राक्षसभूतगण पहाते जा(=ज्या). ॥ ५० ॥
कृपभोजांतें सांगे, 'शिबिरद्वारीं असा, वधा, नाहीं ।
चिंता तुह्मांसि, तुमचें काय करावें असावधानांहीं ? ॥ २.१ ॥
शिबिरांत घालितों मी व्हाया गुरुशत्रुहानि घाल्याला, ।
एकहि पळों न द्यावा, माराचि ह्मणोनि 'हा !' निघाल्याला.' ॥ २ ॥
ऐसें सांगुनि शिरला शिबिरांत द्रोणपुत्र अपथानें, ।
होतीं करित कृपीचीं बहुधा बहुयुग बहूग्र तप थानें. ॥ ३ ॥

तो धृष्टद्युम्नाच्या गेला राजा ! हळूच निलयातें ।
गोष्ठांत गोवृषांतें व्याघ्र जसा न्यावयासि विलयातें. ॥ ५ ॥
सदनीं शिरोनि पाहे सुखसुप्ता तातघातका मत्ता, ।
धृष्टद्युम्ना, उठवी हाणुनि, नागासि गरुडसा लत्ता. ॥ ६ ॥
सहसा नेत्रें उघडुनि तो धृष्टद्युम्न ओळखे अरिला. ।
शयनावरुनि उसळतां दृढ कवळुनि केश गुरुसुतें धरिला. ॥ ७ ॥
पाडी, रगडी, वाटे तो तार्क्ष्यचि त्या महाहिला झडपी, ।
पितृघात आठवुनि, उर एकें, अन्यें पदें गळा दडपी. ॥ ८ ॥
ऋतुपशुतें जेंवि, तसें लागे शस्त्राविणेंचि माराया, ।
बा राया ! नखरांहीं फाडी, परि तो शके न वाराया. ॥ ९ ॥
पार्षत ह्मणे, 'गुरुसुता ! मजला शस्त्रेंकरूनि मारावें, ।
पावेन वीरलोकाप्रति, बा ! शरणागतासि तारावें.' ॥ १० ॥
द्रौणि ह्मणे, 'मारावा शस्त्रें तो, जो असेल अधमान्य; ।
गुरुघातका ! तुझा तो गुरुभक्तजनीं असाचि वध मान्य.' ॥ ११ ॥
ऐसें वदोनि मर्मीं हाणी तो शत्रुघातकर टांचा, ।
बुकलुनि मारी, चित्तीं घूकृत स्मरुनि घात करटांचा. ॥ १२ ॥
तो मार्यमाण पार्षत आरडतां, ज्या स्त्रिया जवळ होत्या, ।
उठल्या सहसा, झाल्या त्रासव्यालाननीं कवळ हो ! त्या. ॥ १३ ॥
उग्रें कर्में रूपें भासे तो भूत, विप्र भासेना; ।
केल्या त्रासें हरिच्या दशकंठें जेंवि विप्रभा सेना. ॥ १४ ॥
अंतःपुरांत जेव्हां 'नृप वधिला' ह्मणुनि गलबला केला. ।
होय चमूला भुजही भर, पाशीं जेंवि गल बलाकेला. ॥ १७ ॥
'धांवा हो ! धांवा हो ! आतां बसला रथीं, पहा, रोधा; ।
नेणों नर कीं राक्षस, गेला मारूनि या महायोधा.' ॥ १८ ॥
गडबडुनि वीर उठले, शस्त्रें घेऊनि धांवले क्षिप्र, ।
त्यां सर्वांतेंहि वधी त्या रुद्रास्त्रेंकरूनि तो विप्र. ॥ १९ ॥
मग सुखसुप्तांचीच द्रुततर शिबिरांत मान तो कापी; ।
शस्त्रांसि ह्मणे भटगल देउनि, जसि माय थान तोका, 'पी' ॥ २२ ॥
बा ! वधिले तेहि प्रतिविंध्यादि द्रौपदीकुमारमणी, ।
हसली लावुनि तेव्हां अकृपपण प्रभुकडे उमा रमणी. ॥ २३ ॥
मग मारिला गुरुसुतें पाडुनि तो भीष्मघातक शिखंडी; ।
गुंजाहि गुरु गराची गिळितां, न करील घात कशि खंडी ? ॥ २४ ॥

शिबिरांत राक्षसभयें हृदयीं हतशेष सर्व भट कोंदें, ।
पळतां कृप कृतवर्मा द्वारीं एकासही न फटकों दे. ॥ २६ ॥
मग तींकडे दिसाया सर्व शिबिरसन्निवेश पेटविला, ।
सकळ प्राणिगण तिघां वीरांहीं प्रेतपतिस भेटविला. ॥ २७ ॥"

वीरसंहार करून शिबिराबाहेर आलेल्या अश्वत्थाम्याचें रौद्ररूपवर्णनः-

( गीति ) "एकचि झाला होता रक्तें चिकटोनि खड्गमुष्टि कर, ।
तैसाचि कवच देहहि; त्याहुनि न विवाहवेष तुष्टिकर. ॥ २.३१ ॥ "

यांत बीभत्सरसाचें मिश्रण असून शिवाय त्यांत शृंगाराची ही स्पष्ट छटा आहे. नवऱ्या मुलाच्या लग्नाच्या वेळच्या लालपोषाखाची अश्वत्थाम्याच्या वेषास उपमा देण्यांत पंतांनीं त्याची भयंकर सूड घेण्याची हौस व्यक्त केली आहे. शृंगाराचें रौद्रांतील मिश्रण बहुधा रसोत्पत्तीस पोषक नसतें, परंतु या ठिकाणीं द्रोणपुत्राची भयंकर मनःस्थिति दाखविण्यास ती उपयुक्त असल्यामुळें योग्यच ठरते. वरील वर्णनांत रौद्र, भयानक व वीर या रसांची रक्तवर्ण त्रिवेणी वाहत आहे. असाच प्रकार कर्णपर्वांत भीमदुःशासनांत आढळतो. त्याचाही थोडा मासला येथें देतों. तो वाचून रसज्ञ वाचकांस वीररसाबरोबरच भयानक व रौद्र या रसांची भट्टी पंतांस कशी उत्कृष्ट साधली आहे तें समजून ते या वीरकवींच्या नायकाचें खचित सप्रेम अभिनंदन करितील.

२ (गीति) "धांवति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार, ।
जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत दंपतीच अ-पकार. ॥ २ ॥" (कर्ण. ४५.)

या गीतींतील 'अपकार दंपती' (=दंती, हत्ती) ही कल्पना पंतांची स्वतःची नाहीं. ती त्यांना पुढील सुप्रसिद्ध श्लेषघटित संस्कृत श्लोकावरून सुचलेली असावी. तरी ती त्यांनीं 'मदमत्त', 'क्रोधोद्धत' या जोड विशेषणांनीं व 'अपकार आठवूनि' या सूचक वाक्यांशानें विशेष खुलविलेली आहे.

'अधुना मधुकरपतिना गिलितोऽप्यपकारदंपती येन ।
त्रातः स पालयेत् त्वां विगतविकारो विनायको लक्ष्म्याः ॥
(सुभाषितरत्नभांडागार कूटप्रकरण श्लोक ४६)"

'धुकाररहित मधुकरपतीनें' ह्मणजे मकरपतीनें 'अपकारदंपती' ह्मणजे 'प'काररहित दंपती अर्थात् दंती (=हत्ती) गिळला असतां ज्या लक्ष्मीच्या 'विकाररहित विनायकानें' अर्थात् नायकानें (=पतीनें) त्याचें रक्षण केलें तो तुझें रक्षण करो! लक्ष्मीपति विष्णु तुझें रक्षण करो-हा भावार्थ. आतां भीमदुःशासनाचा युद्धप्रसंग पहा.

"जें वैरशल्य दुःसह हृदयांत, करावया तदुद्धरण, ।
अत्यद्भुतबळ अरि ते करिते झाले हठें विशुद्ध रण. ॥ ३ ॥

तेव्हां गदाप्रहारें भीम ललाटीं स्वशत्रुला ताडी, ।
क्षितिवरि हरिवज्राहत गिरिशिखर जसें, तसें तया पाडी. ॥ ६ ॥
पत्नीचा केशग्रहसमय स्मरला; निजप्रतिज्ञा ते, ।
आठवि; ह्मणे, 'ह्मणोत न मिथ्यावादी, मजप्रति ज्ञाते.' ॥ ७ ॥
वृषनृपकृपकृतवर्मद्रोणसुतांतें ह्मणे 'अहो ! परिसा; ।
दुःशासनासि वधितों मी भीम गजासि धोपला हरिसा. ॥ ८ ॥
शक्ति असेल तरि तुह्मी रक्षा, मी आपुली प्रतिज्ञा ती ।
संरक्षितों, कराया स्वर्गी संतृप्त संप्रति ज्ञाती.' ॥ ९ ॥
ऐसें गर्जोनि उडी टाकी स्वरथावरूनि कलितासि, ।
तो भीम भीमकर्मा गांठी त्या रिपुसि भूमिगलितासि. ॥ १० ॥
गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी, ।
तैसा भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी. ॥ ११ ॥
भीम विदारी खड्गें सहज परम कठिण शत्रुचें उर तें, ।
वाटे पविपातींही त्या साध्वीला न गांजितां, उरतें. ॥ १२ ॥
अशनिहतशिलातल जल, रक्त तसें खड्गभग्न तें उर वी, ।
तृषित घटोत्कचतात प्राशी शोणित, न लेशही उरवी. ॥ १३ ॥
मग कंठनाळ चरचर तो सत्य करावया बिरुद कापी, ।
देउनि मिटक्या मटमट, घटघट त्या स्वाहितासृगुदका पी. ॥ १४ ॥
'जे जे लोकीं असती रस ती त्यांची न माधुरी थोडी, ।
परि अरिच्या रक्तरसीं मज बहु त्याहूनि लागली गोडी.' ॥ १६ ॥
ऐसें वदोनि ओष्ठप्रांत जिभेनें पुनःपुन्हां चाटी, ।
अवलंबी अत्युग्रा भीम अतृप्तद्विपारिची धाटी. ॥ १७ ॥"

हें दारुणकर्म पाहून शत्रुपक्षीय वीरांस झालेल्या भीतीचें वर्णनः-

(गीति) "रिपु शूर दूर तेथुनि तें दारुण कर्म पाहतां पळती, ।
किति पडती, किति दडती, कितिएकांची धृतायुधें गळती ! ॥ १८ ॥
जाणों त्या अत्युग्रा मूर्तश्रीनारसिंहमंत्रास ।
पाहोनि पावले ते रिपुभटभूपाळभूत संत्रास. ॥ १९ ॥"
म्हणति, 'मनुष्य नव्हे हा;राक्षस कीं काळ हा खवळला हो ! ॥
कीं आमुची कराया, मूर्त प्रळयाग्नि, राख, वळला हो !' ॥ २० ॥"

भीमाचें भाषणः-

(गीति) "भीम पुन्हां दुःशासनरक्तें अंजलि भरोनियां डोले; ।
मिटक्या देउनि, पाहुनि कर्णसुयोधनमुखांकडे, बोले. ॥ २२ ॥

'पीतों हें रक्त तुझें; हांसत होतासि मज, जसा भणगा; ।
दुःशासना ! तसा तूं पुनरपि 'गौगौः' स्वआननें ह्मण गा ! ॥ २३ ॥
काय करूं ? काळानें अभय दिलें, घेतलासि तूं पदरीं, ।
दुःशासना ! कुळक्षयमूळा ! 'तुज रक्षिता दुजा न दरीं.' ॥ २९ ॥
ऐसें बोलत हांसत शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख विकट, ।
प्रकट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युतांनिकट. ॥ ३० ॥"

हीं **रौद्रभयानकाचीं उदाहरणें** झालीं. शेवटच्या गीतींत तर **बीभत्स-रसाचें**ही वर्णन आलें आहे. **रौद्राचें आणखी एक उदाहरण**– द्रोणपर्वांत धृष्टद्युम्नानें द्रोणाचा शिरच्छेद करून द्रोणनिंदा केली. तेव्हां सात्यकीस राग येऊन तो धृष्टद्युम्नास ह्मणतोः–

३ (गीति) "शैनेय ह्मणे, 'कैसें वदतो, जाणों नव्हेचि पापीसा ! ।
नाहीं कोणी येथें, याची जिव्हा समूळ कापीसा. ॥ २२.४७ ॥
सत्य रसज्ञा ह्मणतों, गुरुनिंदा बोलतां, तडकलीला. ।
करितील दर्शनार्थ, प्रियसख हे बोल तांतड कलीला. ॥ ४८ ॥
जीभ चिरावी शतधा, शिरहि उलावें, खळा ! भुज गळावे, ।
श्वपचगृहाला पथिक द्विजसे, सोडुनि तुला असु पळावे. ॥ ४९ ॥
हितशत्रु काममुख हे, 'नरकीं' ह्मणती 'अपत्रपा ! पड', सा; ।
पाप डसाया लाविल अहि वृश्चिक; भाजशील पापडसा. ॥ ५० ॥
त्वां, सप्त, अवर, पर जे, त्यांतें नरकांत घातलें; कानें ।
परिसुनि ह्मणेल पार्षत, 'केला द्रोणें न घात, लेंकानें.' ॥ ५१ ॥
भीष्में महानुभावें आदरिला तो तसा स्वयें स्वांत. ।
तूं जेंवि कृतघ्न तसें मानी शुद्धासही तुझें स्वांत. ॥ ५२ ॥
भीष्मवधींहि शिखंडी कारण उत्पादिला तुझ्या बापें, ।
कोण तुह्मां द्रुपदसुतावांचुनि जोडील हीं महापापें ? ॥ ५३ ॥
ब्रह्मघ्ना ! जन पाहे तुज, सहसा आजि पाहुनि रवीला. ।
द्विजराजघ्ना ! बहुधा विधिनें तुजलाचि राहु निरवीला. ॥ ५४ ॥
सरलें आयुष्य तरिच, निंदिसि तूं मत्समक्ष गुरुगुरुतें. ।
मांजर वांचेल कसें ? करिल व्याघ्रासमक्ष 'गुरुगुरु,' तें ? ॥ ५५ ॥
साहेन तुझे शत मी, एकचि माझा गदाप्रहार सहा. ।
पापा ! पळों नको; घे अमृतरस असा नसे, महारस हा.' ॥ ५७ ॥"

'यांत **आलंबनविभाव** धृष्टद्युम्न याविषयीं सात्यकीस उत्पन्न झालेला क्रोध हा **स्थायीभाव** त्यानें केलेल्या गुरुनिंदेनें उद्दीपित होऊन अमर्ष, उग्रता इत्यादि

**व्यभिचारिभावांनीं** विस्तार पावून धृष्टद्युम्नास मारण्यास धांवणें, त्याची निर्भर्त्सना करणें इत्यादि **अनुभावांनीं** गोचर झाला आहे व अशा रीतीनें उत्पन्न झालेला क्रोध पूर्ण होऊन **रौद्ररस** बनला आहे. ( रसप्रबोध )'

**भयानकाचें आणखी एक सुरेख उदाहरण** भस्मासुराख्यान श्लोक २०-२३ यांत आलें आहे. वृकासुरास शंकरापासून वर प्राप्त झाला असतां तो वरदात्या शंकराच्याच मस्तकावर हस्त ठेवून वरपरीक्षा करून पार्वतीस हरण करावें या हेतूनें शंकरापाशीं गेला. तेव्हांचें वर्णनः—

४ (श्लोक) "ऐसा तो पापरूपी, वृकअसुर बरें वंचुनी लोकराया, ।
योजी तत्काळ चित्तीं समधिगतवराची परीक्षा कराया; ।
केला संकल्प लोकत्रयसुभग शिवारत्न त्याचें हराया, ।
धांवे ठेवावया तो स्वकर शिरि, तदा भीति झाली हरा या. ॥ २० ॥"

शंकर पळूं लागले तेव्हांची त्यांची अवस्थाः—(सुंदर स्वभावोक्ति)

"न सांवरति सर्वथा दशभुजाहि देवा जटा; ।
वृषासहित राहिल्या चरणपादुका वाजटा; ।
शिरःस्रजहि धावतां त्वरित भंग पावे, गळे; ।
गळोनि पडले फणी पथि भुजंगपावेगळे ॥ २२ ॥
गळाल्या गळ्यांतूनि रुद्राक्षमाळा ।
नसे निर्भयस्थान रुद्रा क्षमाला. ।
पळे विष्टपीं ऊघडा नागवा, जी !
पदालाचि मानी प्रभू नागवाजी ! ॥ २३ ॥"

'वरील पद्यांत **आलंबन** वृकासुर यापासून शंकरास उत्पन्न झालेला **भय**नामक **स्थायिभाव**, त्याला दिलेला वर, त्याचें मस्तकावर हात ठेवण्यास येणें, इत्यादिक **विभावांनीं** आवेग, चपलता इत्यादिक **व्यभिचारिभावांनीं** व पळून जाणें इत्यादि अनुभावांनीं परिपुष्ट होऊन रसरूप झाला आहे. ( रसप्रबोध )'

## बीभत्सरसवर्णन.

बीभत्सरसाचा थोडा मासला वर कर्ण. ४५.३०, सौप्तिक. २.३१ या गीती दिल्या आहेत त्यांत आलाच आहे. याशिवाय इतरत्रही त्यांच्या काव्यांत बीभत्स-रसाचें वर्णन तुरळक आलें आहे. विराटपर्वांत उत्तरगोग्रहणयुद्धारंभीं शंख वाजविला तेव्हांचें वर्णनः—

१ (गीति) "ऐसें वदे, करी मृदुपूर्वंजलजवादनीं मग जवा, जी !
तेव्हां त्या कुरुकटकीं हगले मुतले समस्त गज वाजी. ॥ ४.९ ॥"

अर्जुनशंखवादन, घटोत्कचरात्रियुद्ध, व भीमसिंहनादश्रवण याप्रसंगीं असेंच

बीभत्सवर्णन पंत करितात. विराट. ६.५० 'प्रभु सुरदत्तदरातें वाजवि...;'कर्ण. १२.८ 'येतांचि अर्जुनानें वाजविला...', ८; द्रोण. १६,६९ 'कटकीं होते वाजी, वारण...'; भीष्म २.४ 'भीमाच्या सिंहरवें...'; इत्यादि पहा.

शिखंडीपुरुषत्वपरीक्षणप्रसंगाची पुढील गीति पहाः-

२ (गीति) "कुपितें त्या हेमभुजें पुरुषपरीक्षास्मृती न आठविल्या, ।
पोरी नव्या नव्या नरपतिसुतवेषें सजूनि पाठविल्या. ॥ उद्योग.१३.२१६॥
पडल्या एका शिंग्यावरि बहु शिंग्या करूनि हातेणें, ।
जो मंदुरेंत होतो गोंधळ, केला प्रकार हा तेणें. ॥ २१७ ॥"

युद्धास पाठ देऊन घरीं मरणाऱ्या क्षत्रियाची स्थिति दुर्योधन वर्णितोः-

३ (गीति) "तो बहु निंद्य क्षत्रिय, देउनि जो पाठ जडतम रणातें, ।
पावे, सदा गदार्दित होउनि रडवीत, रडत, मरणातें. ॥ ५३ ॥
लागे अंतीं हगवण, मग वणवासा ज्वर प्रबळ पेटे, ।
नेटे बहु कफ, मोहीं होय गरक, नरकयातना भेटे. ॥ ५४ ॥
(शल्य. अ० १)"

तसेंच स्त्रीपर्व अ० ६ गी० १९ 'समरीं जरि न मरावे...'परिशिष्ट'ज'पृ०१६२ (१०४) पहा.

कर्णपर्व अ० १२ गीति २०-२९ पहाः-

४ (गीति) "कृष्ण ह्मणे, 'विजया ! या रणभूमिकडे पहा महाबाहो ! ।
बा ! हो सदैव विजयी. स्वत्राणा आर्तजन तुला बाहो. ॥ कर्ण. १२. २०॥
पार्था ! पहा पहा रे ! नटताति चहूंकडे कबंध रणीं. ।
झाली तुझ्या रथासहि वीरशरीरीं सुदुर्गमा धरणी. ॥ २१ ॥
हे त्वां महाभुजा ! भुज वीरांचे खंडिले असंख्य, अही ।
गरुडें जसे नखांहीं. दिसते अत्यंतउग्रमूर्ति मही. ॥ २२ ॥
हीं मस्तकें भटांचीं कमळेंसीं विखरिलीं. इहीं भूतें ।
त्वां पूजिले. उदारा ! केलीं तृप्तें पलाशनें भूतें. ॥ २३ ॥
तुज हे देत्ये आशीर्वाद मधुघ्नासि जेंवि दे, वसुधा. ।
सेविति यथेष्ट भूतें क्षतजनदी, जेंवि सर्व देव सुधा. ॥ २४ ॥
दुस्तर रक्तनदी हे, वाहवित्ये द्विरदही, बहुचि खोल. ।
हा शोणितमासांचा झाला सर्वत्र दुर्गम चिखोल. ॥ २५ ॥
भटकोटिकटक वर्ते ज्याच्या आज्ञेचिया कळेवर तें, ।
पडलें धरावराचें रणिभूमितळीं पहा कळेवर तें. ॥ २६ ॥
रत्नांगदमुकुटकटकहारपदकमुद्रिकादिनगरासी ।
जिकडे तिकडे पडले.गेले भोक्ते कृतांतनगरासी. ॥ २७ ॥

हे जळ मागति; धांवति हे आणायासि; हे पहा रडती ।
कीं न प्राशुनि मेले; हे घेउनि आप्तनाम आरडती. ॥ २८ ॥
शरचापतूणतोमरखड्गगदाशक्तिपरशुपरिघांतें ।
भग्नांतें अवलोकीं. त्वां जय संपादिलाचि अरिघातें.' ॥ २९ ॥"

वरील गीतींत बीभत्सरसाचें उत्कृष्ट उदाहरण आहे. या रसांत शव, रक्त, मांस, भूत, पिशाच इत्यादिकांचें वर्णन असतें. प्रस्तुतस्थलीं या रसाची कबंध, रक्त इ. **आलंबनें**; कबंधांचें नाचणें, रक्ताचें वाहणें इ. **उद्दीपनें**; कृष्णाचे आनंदरोमांच, हस्तविक्षेप व शब्द हे **अनुभाव** असून कृष्णार्जुनांचा आनंद हा **व्यभिचारी भाव** आहे. साधारणतः बीभत्सरसाचे रोमांचनेत्रनिमीलनादि अनुभाव असतात. पण प्रस्तुत स्थळीं बीभत्सरस नायकाच्या शौर्यापासून उत्पन्न झालेला असल्यामुळें त्यास त्यामुळें आनंद होणें साहाजिक आहे. म्हणून येथें अनुभावव्यभिचारीभावांत थोडा फरक पडला.

## हास्यरसवर्णन.

पंतांचा स्वभाव प्रौढ व गंभीर व भारतरामायणादि ग्रंथांत शृंगारवीरकरुण रसांचें प्राधान्य असल्यामुळें त्यांच्या काव्यांत हास्यरसास फारसा अवकाश नाहीं. तथापि मधून मधून त्यांच्या काव्यांतून हास्यरस व विनोद स्वतंत्र रीतीनें किंवा इतर रसांच्या अनुषंगानें आढळून येतात. याचीं थोडीं उदाहरणें देतों. आदिपर्वांत बकराक्षसाख्यानांत ब्राह्मणकुटुंबांतील विलाप चालला असतां लहान बालकांचे बोबडे बोल वर्णितांना पंत म्हणतातः–

१ (गीति) "ऐसें वदोनि कन्या रडवूनि रडे, तशांत जवळूनि ।
खवळूनि उठे बालक, बोले हस्ते तृणासि कवळूनि. ॥ ३०.३१ ॥
समजावुनि त्यांसि म्हणे, 'ऐसें लातिलिचलासि मालीन; ।
कां ललतां आललतां? पलतां मी सांगलांत तालीन.' ॥ ३२ ॥
हांसविलीं हर्षविलीं व्यसनार्ते तिघेहि बाळशब्दानें. ।
अब्दानें ग्रीष्मदवाकुळबर्हिकुळें जसींच अब्दानें. ॥ ३३ ॥"

वरील गीतींत करुणरसांत हास्यरसाची भर टाकून पंतांनीं तो विशेष खुलविला आहे. द्रोणपर्वांत मरुत्तराजाच्या यज्ञप्रसंगाचें वर्णन करितांना पंत म्हणतातः–

२ (गीति) "ज्याच्या मखीं सभासद सुर सर्व, मरुत्समूह परिवेष्टा. ।
म्हणति परस्पर भुक्तद्विज, जरि पट न धरि पोट, तरि वेष्टा. ॥ ४.७६ ॥"

पोटभर सुग्रास अन्न जेवलेले अधाशी भोजनप्रिय ब्राह्मण परस्परांस म्हणूं लागले कीं जेवणानें धोतरें ढिली होऊन तीं आतां पोटावर न राहतां गळूं पाहातात, तरी तीं कशीं तरी गुंडाळून घ्या; पण सुग्रासान्नाचें भोजन चालूं द्या.

त्याच पर्वांत गयराजानें अग्नीस वर मागितले. त्यांतील एका वराचें वर्णनः–

३ (गीति) "श्रद्धा बहु दे; आले असतां अशना वराक राजे वा; ।
सम विनवावें कीं, 'द्या सूदां यश, नावरा करा, जेवा.' ॥ ५.८६ ॥"

गयराजा ह्मणतोः– हे अग्ने! भिकारी व राजे यांच्यावर माझी सारखीच श्रद्धा असून भोजनप्रसंगीं मी उभयतांस ही सारखीच प्रार्थना करावी कीं 'अन्न आचाऱ्यांनीं फार चांगलें तयार केलें आहे, तें यथेष्ट जेवून त्याला यश द्या, हात आवरूं नका, आकंठ जेवा.' जेवतांना आरंभीं संकोचणारे पण यजमानानें आग्रह केल्यावर बाह्यात्कारीं "नको नको" ह्मणत पक्वान्नांची रास पोटांत कोंबणारे ब्राह्मणी राज्यांतील भटजी यांची रीत पाहून पंतांनीं वरील वर्णन केलें असेल काय?

विराटपर्वांत उत्तराबरोबर युद्धास जातांना बृहन्नडेचा उत्तरार्शी संवाद व बृहन्नडेचा कवचधारणप्रसंग पहाः–

४ (गीति) "वाद्य असो, नृत्य असो, हो अभिनय, किमपि गान अथवा हो,।
जाणोनि कसें ह्मणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो? ॥ ३.२६ ॥
वैराटि ह्मणे, 'नर्तक हो कीं वादक तथैव गायन हो,।
सारथि हो या समयीं, एकहि वश कौरवासि गाय न हो.' ॥ २७ ॥
ऐसे वदे, कवच दे त्या श्रितकुशलावहास त्यायाला,।
तद्धारणीं चुके तो कन्या पाहूनि हांसल्या याला. ॥ २८ ॥
ज्याचें किरातरूपिप्रभुधिक्कृतिगर्भ गाय नाक वच,।
हांसे आपणहि, ह्मणें, 'ठावें मज काय गायना कवच? ॥ २९ ॥
लेवविलें राजसुतें, जाणों त्याला कधीं न तो कवच,।
सच्चरित अप्रगल्भहि हृदयहर जसें स्वधीन तोकवच. ॥ ३० ॥"

कृष्णविजय अ० ८६ यांत ही परिहासविनोदहास्याचें वर्णन आढळतें. सुभद्राहरणाख्यानांत सुभद्रेला पाहून यतिरूपी अर्जुनाची भोजन करितांना झालेली अवस्था व तीवर पंतांची टीका पहाः–

५ (गीति) "घाली घृतांत सैंधव, दुग्धीं जंबीर, पायसीं कथिका;।
मथि कामशर जया त्या राम ह्मणे साधुमोक्षसत्पथिका! ॥ ८६.१३ ॥"

तीर्थस्नानास जातांना वाटेंत सुभद्रेच्या रथांत आतुरतेनें धांवून बसणाऱ्या अर्जुनाचें वर्णनः–

६ (गीति) "तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रारथीं, जसा पाटीं।
सुचिरक्षुधित ब्राह्मण 'हां हां' ह्मणतांहि वाढल्या ताटीं. ॥ २२ ॥"

हास्यरस हा बहुधा विचित्र वेष, विलक्षण चेष्टा, विनोदपर भाषणें, दुसऱ्याचें हंसणें, लोकविलक्षण रूप, भलतेच ठिकाणीं भलताच अलंकार घालणें, विपरीत क्रिया इत्यादिक पाहिल्यानें उत्पन्न होतो. याचे स्वनिष्ठ (विलक्षण वेष, विपरीत क्रियादि पाहून पाहणाऱ्या मनुष्याला जें हास्य येतें तें) व परनिष्ठ (दुसऱ्या मनुष्यास हंसतांना पाहून हंसणें तें) असे दोन भेद असून स्मित, हसित (उत्तम

पुरुषाच्या हंसण्याचे प्रकार ), विहसित, उपहसित ( मध्यम पुरुषाचे हास्यप्रकार ), अपहसित व अतिहसित ( कनिष्ठाचें हंसणें ) असे सहा प्रकार आहेत. कृष्णविजय अ० ६६ त कृष्णाचीं शंखचक्रगदापद्मगरुडादि चिन्हें धारण करणाऱ्या पौंड्रक वासुदेवानें कृष्णास वासुदेव हें नांव व शंखचक्रादिचिन्हें यांचा त्याग करून मला शरण ये ह्मणून हास्यास्पद निरोप पाठविला तो ऐकून सर्व हंसूं लागले. हा हास्यरसाचाच प्रकार आहे. पौंड्रकाचा निरोपः–

७ (श्लोक) "कृष्णा ! मी वासुदेव प्रभु अवतरलों धर्मरक्षार्थ, एक
स्वामी लोकत्रयाचा, मदितर न असे, त्वां धरावा विवेक; ।
मिथ्या मन्नामचिन्हें मिरविसि, न तुला योग्य तें सर्व, सोडीं,
ये कल्याणार्थ मातें शरण, जरि असे वांचणें हस्त जोडीं. ॥ ५ ॥
पूज्यातिक्रमदोषनिष्कृति बरी ही एक आहे, नमीं
पायातें, अपराध मागिल दयापाथोधि साहेन मी; ।
तूं मिथ्या मिरवूं नको, मदभिधा चिन्हें तयां सोडुनी,
ये मातें शरणा करासि, अथवा चापीं शरा जोडुनी.' ॥ ६ ॥"

हा विलक्षण निरोप ऐकून हास्यरस पिकला त्याचें वर्णनः–

"ऐसें केवळ बाळकत्थन महा आश्चर्य दे, हांसवे
न श्रोत्यांस, नृपा स्मितींच बहु त्या गांभीर्यगेहा सवे; ।
हासाब्धींत असें न यादवसभे झालें कधीं मज्जन,
स्वीकारी पळ याचि षड्विधरसा निःशंक धीमज्जन. ॥ ७ ॥
(कृष्णविजय अ० ६६)"

## अद्भुतरस.

विस्मयाची पूर्णावस्था होऊन सर्व इंद्रियांचें ताटस्थ्य होणें हा अद्भुतरस होय. 'लोकविलक्षण रूप, सुंदर शिल्पकर्म, चमत्कारिक संभाषण, मनोरम वस्तु, हातचलाखी, अशक्य गोष्टी घडून येणें इत्यादिकांपासून विस्मय उत्पन्न होतो. तो उत्पन्न झाला ह्मणजे मनुष्य एकदम चकित होऊन त्या पदार्थाकडे टक लावून पाहतो, तोंडावर बोट ठेवून मान, हात हालवून त्याची प्रशंसा करितो आणि जडता, हर्ष, मोह इत्यादि भावांनीं तो विस्मय परिपुष्ट होऊन रसरूप होतो.' याचीं थोडीं उदाहरणें येथें देतों.

भीष्मपर्वात कृष्ण रथचक्र हातांत घेऊन भीष्मास मारण्यास धांवला तेव्हांचें वर्णनः–

१ (गीति) "चक्र करीं धरुनि रथाखालीं टाकुनि उडीस जंव धांवे, ।
वाटे त्या सिंहानें सर्वहि भीष्मादि ते गज वधावे. ॥ ३.३९ ॥
**भारें लवे प्रतिपदीं भू, शेष धरूं शके न लवलीला, ।**
भीष्माच्या मात्र मनीं ती प्रभुची दे न भीतिलव लीला. ॥ ४० ॥

कोपे जैं विश्वंभर शंभर उत्पात भूमिकंपादी, ।
गडबडले सुर मुनि, तै अर्जुन सन्मित्र कार्य संपादी. ॥ ४२ ॥
धांवुनि यत्नें धरि, परि ओढुनि ने त्यासि देव ओढकसा, ।
जाणों ह्मणे, 'भुजबळें पाहों जरि ओढितोसि ओढ कसा' ॥"

असाच प्रसंग त्याच पर्वाच्या नवव्या अध्यायांत आणखी एकदां आला. तेव्हांची भीष्माची श्रीकृष्णास उक्तिः—

२ (गीति) "ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दररक्तचक्षुच्या पातें, ।
तो तूं आंगें मारूं पाहसि मज दाउनि प्रतापातें. ॥ १०२ ॥"

'या पद्यांत **आलंबन** जें स्वशरीर त्याविषयीं, श्रीकृष्णाचें प्रताप दाखवून युद्ध करणें या **विभावानें** उत्पन्न झालेला जो भीष्मनिष्ठ विस्मयनामक **स्थायीभाव** तो गर्व, हर्षादि **व्यभिचारीभावांनीं** परिपुष्ट होऊन **अद्भुत**नामक रस झाला आहे. (रसप्रबोध).'

आणखी एक उदाहरणः— द्रोणपर्वांतील 'द्रोणयुद्धचमत्कारवर्णन' पहा.

३ (गीति) "द्रोण क्षत्रियहृदया बहु, जैसी भीति राम दे वधुनी. ।
करि पूर्ण सेवित्यांचे, रक्तनदी जेंवि काम देवधुनी. ॥ १०३. ॥"
शतसंख्य नाचले त्या अद्भुतसमरोत्सवीं भटकबंध. ।
वातें घनसा, द्रोणें धर्माचा भेदिला कटकबंध. ॥ ४ ॥
रक्तनदींत बुडाले गज, मग गेले न कोण वाहोन ? ।
गमला गोवर्धननगवर्षिघनसमूह शोणवाहोन. ॥ ५ ॥
द्रोणरण विलोकुनि, सुर, सिद्ध, स्मरती तदा पिनाकिरणा; ।
ह्मणती, "दापिल काळा हा, रविच्या काय दापिना किरणां ? ॥ ६ ॥"

वरील गीतींत **अत्युक्ति** ह्या अलंकारानें मिश्रित असा **अद्भुतरस** झाला आहे.

## शांतरसवर्णन.

विषयसुखाविषयींच्या तिरस्कारबुद्धीस निर्वेद ह्मणतात. तिचा जो परिपोष ह्मणजे पूर्णावस्था तो **शांतरस** होय. हा निर्वेद पुण्यतीर्थक्षेत्रें, ऋष्याश्रम, सत्पुरुषदर्शनसमागम, सत्कथाश्रवण, देहाची क्षणभंगुरता, कामक्रोधादिकांपासून घडलेले अनर्थ इत्यादिक पाहून होतो. मुखाची प्रसन्नता, रोमांच, खेद, अश्रु, स्तंभ इत्यादि सात्विक भावांची उत्पत्ति, भगवत्परायणक्रियांचें आचरण हीं त्याचीं चिन्हें होत. हा रस भक्तिरसास पोषक असल्यामुळें त्याचीं उदाहरणें पंतांच्या केकावल्यादि स्फुट काव्यांत, अंबरीषाख्यानादि लघुकाव्यांत व भारतभागवतरामायणादिमहाकाव्यांत विपुल आढळतात. कृतकर्माबद्दल पश्चात्तापोद्गार काढून देवास करुणा भाकणाऱ्या पंतांच्या स्तोत्रांत भक्तिरसाबरोबरच या शांतरसाचा संगम झालेला आढळतो. याचीं उदाहरणें भक्तिरसाच्या उदाहरणांत येतीलच. तरी थोडीं उदाहरणें येथें देतों:—

आर्याकेकावलींतील पंतांचे उद्गार पहाः-

१ (गीति) "मन हेंचि फार इच्छी कीं आतां सेवणें तुझे पाय, ।
तुजवांचुनि इतरांच्या भजनीं मजलागिं होय फळ काय? ॥ ६३ ॥
केलें म्यां मनुजांचे आर्जव बहु चाटुकारही जालों, ।
परि तेथ ताप पावुनि पुनरपि तुजलागिं शरण मी आलों. ॥ ६४ ॥
दुर्व्यसनी, धर्मरहित, निरक्षर, क्षुद्र त्यांसि मी नमनें ।
करुनि श्रमीच जालों, आलों तुज शरण आज दीन मनें. ॥ ६६ ॥
संतांच्या वदनें मी आयकिलीं बा! तुझीं जयीं चरितें, ।
त्यजुनि विषय मन केलें भरावया गुणसुधा तयींच रितें. ॥ ८४ ॥"

श्लोककेकावलींतील कांहीं उदाहरणांचा नुसता थोडासा निर्देश मात्र करितोः-

२ (गीति) "कळी करिसुनिर्मळीं...काळ भेका करें ? के० २१
"विपाक न गणोनि म्यां...सेतुला ॥" के० ४२
"ह्मणा मज उताविळा...चाकरें. ॥" के० ४४
"कृतांतकटकामलध्वजजरा...कापितो हा गळा. ॥" के० ४५

रामरीतींतील गीतिः-

३ (गीति) "सद्व्यसनीं वेंचावें आयुष्य नसेचि भरंवसा याचा, ।
झालों जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत (भक्तिरसज्ञांत)
भर वसायाचा ॥ ६७ ॥"

'भक्तभूषण'लघुकाव्यांतील पुढील श्लोकांत दिलेलें **अंबरीषराजाचें वर्णन** पहाः-

४ (गीति) "राजा साधुसमागमें समजला संसार निःसारसा,
सेवि श्रीपतिच्या पदा, अलि जसा अत्यादरें सारसा, ।
नामाची धरि कास दास करुनी सद्भक्तिचा आसरा,
प्राशी निर्मळ विष्णुचेंचि यश जे हांसे सुधेच्या सरा. ॥ ५ ॥
ज्यांमध्यें बहुदक्षिणा सुविधिवत् विप्रादिसंतर्पण
प्रेमें यज्ञ करूनि सर्व करिति श्रीविष्णुला अर्पण, ।
आंगें होऊनि सत्तपोहुतवहीं तो सर्वदा सर्पण
स्वच्छत्वें नृप जाहला सुमणिचा जैसा नवा दर्पण. ॥ ६ ॥
तो भूतीं समदृष्टि, साधुभजनीं राबे, सदा सांवरी
आंगें दृग्विकळादिकांसि, भर हा टाकी न दासांवरी. ।
सेवें वांचुनि आपुल्या न विषयीं याचें शरीर क्षण
श्रीशें जाणोनि हें सुदर्शन दिलें त्याचें करी रक्षण. ॥ ७ ॥"

भारत-आश्रमवासीपर्व अ० ३ यांतील कुंतीचें पांडवांशीं भाषण गी० ३९-४३-

५ (गीति) "म्यां भोगिलें स्वपतिच्या राज्याचें, भोगयोग्य जें फळ, तें; ।
सांग महादान सकळ केलें, जितकें पुरोहिता कळतें. ॥ ३९ ॥

विधिवत् सोमरसाच्या म्यां तृप्तिहि मानसा दिली पानें, ।
हे पांडुनें कृतार्था स्त्री, जेंवि सुदक्षिणा दिलीपानें ॥ ४० ॥
मजला पुत्रविनिर्जित राज्यफलाची स्पृहा नसे कांहीं, ।
मेघें मही निवाली इच्छील निवावया न सेकांहीं. ॥ ४१ ॥
या श्वश्रूश्वशुरांच्या सेवेंत तपोवनीं गळो गात्र, ।
पतिलोक प्राप्त असो, आहे हृदयांत काम हा मात्र. ॥ ४२ ॥
त्यजिल कसी निजधर्मा, भजतचि आली पृथा परतरा ज्या ?
धर्मीं बुद्धि असों दे, न करीं आग्रह वृथा, परत राज्या. ॥ ४३ ॥"

आदिपर्व अ० १२ गी० ५-७ यांतील कण्वाश्रमाचें वर्णनही शांतरसाचें उदाहरण आहे. पंतांच्या भारतांत व त्यांच्या रामायणभागवतादि इतर काव्यांतून ही शांतरसाचीं उदाहरणें पुष्कळ आढळतात. स्थळसंकोचास्तव तीं येथें देतां येत नाहींत.

जेव्हां सर्व **रस** व सर्व **भाव** हे अयोग्यप्रसंगीं किंवा अयोग्य रीतीनें वर्णिले असतात तेव्हां त्यांस अनुक्रमें **रसाभास** आणि **भावाभास** ह्मणतात. यांचींही उदाहरणें पंतकाव्यांतून मधून मधून आढळतात. विराटपर्वांतील कीचकाचें सैरंध्रीवरील प्रेमाचें वर्णन हें **शृंगाररसाभासाचें** एक **उदाहरण** होय.

(गीति) "रावणसा बहु विनवी, प्रेम प्रत्यक्षरींहि नव दावी. ।
कीचक नीच कलुषनिधि, त्याची आर्यांत गोष्ट न वदावी. ॥ १४७ ॥
गांठी तिला पुन्हा तो खळ, जेंवि पतंग दीपकळिकेला, ।
प्रार्थुनि ह्मणे, 'सुमुखि ! मज भज,तुजसीं म्यां चुकोनि कळि केला. ॥११६॥

स्त्रीपुरुषांत एकाच पक्षाचें प्रेम, वेश्या किंवा परस्त्रीविषयक प्रेम, एका स्त्रीचें अनेक पुरुषांवर प्रेम, नीच स्त्रीपुरुषांवर उत्तम पुरुषाचें व स्त्रीचें प्रेम असें अनुचित प्रेम वर्णिलें असल्यास शृंगाररसाभास होतो. वरील उदाहरणांत परस्त्रीविषयक प्रेम वर्णिलें ह्मणून तो शृंगाररसाभास झाला. देवादिकांच्या किंवा गुरु, मुनि इत्यादिक मानवीय पुरुषांच्या कर्मांविषयीं हंसणें, त्यांची चेष्टा करणें वगैरे वर्णन केलें असतां **हास्यरसाभास** होतो. याचें उदाहरण हरिवंश अ० ७ गी ७४-७६ यांत पहावें. करुणरसाभासाचें उदाहरण आदिपर्वांत पांडव लाक्षागृहांत जळून मेल्याचें ऐकून धृतराष्ट्र, दुर्योधन व विदुर यांनीं केलेला मिथ्या शोक होय. आदिपर्व अ० ३० गी० ५-६ पहा. **वीररसाभासाचें** एक उदाहरण विराटपर्वांत उत्तरगोग्रहणास जाण्यापूर्वी उत्तरानें दाखविलेला उत्साह होय. अ० ३ गी० ७-११ पहा. त्यांतील दोन गीति अशा आहेतः-

(गीति) "कर्णादिकांसि देता समरीं वैराटिकेसरी करिता, ।
जिष्णुपुढें असुरजनीं कोण्ही वैरा टिके सरी करिता ? ॥ ३.९ ॥

मिळवा कोण्ही तरि हो! धैर्याचा मात्र उदधि सारथि जो, ।
कुरुभटसमूह पावुनि मज, जेंवि हिमासि सुदधिसार थिजो. ॥ १० ॥
ऐसे बहुतचि बोले तो बालिश बोल बायकांमाजी. ।
चित्रपटकटकसें शिशुभाषण येईल काय कामा? जी! ॥ ११ ॥"

अशींच इतर रसाभासांचीं उदाहरणें शोधक वाचकांस पंतकाव्यांत सांपडतील. तसेंच **वीररसाचे** दानवीर, युद्धवीर, दयावीर, धर्मवीर इत्यादि **प्रकार** साहित्यशास्त्रांतून सांगितले आहेत. त्यांचीं ही उदाहरणें पंतकाव्यांत सांपडतात. **दानवीराचें उदाहरण** पहाः–

(गीति) "पृथु सांगे, 'गज ओता, पाहुनि हरिचा करी लपो. कळतो ।
श्रम मज, 'किति घेत्याचें देत्याचें हित करील पोकळ तो?' ॥ ६.४४ ॥
ओतविले कनकरसें सासष्टसहस्र भव्य दंती हो! ।
विप्रांसि दिले. तेव्हां मी होतों, हे न किंवदंती हो! ॥४५ ॥
मणिरत्नभूषिता हे कनकाची करुनि दान दे वसुधा ।
पृथुकीर्तिरत विसरले, रंभा विसरतिल कां न देव सुधा? ॥ ४६ ॥
(द्रोणपर्व)"

**दयावीराचें** एक उदाहरण दधीचि ऋषीनें सुरकार्यार्थ प्राणत्याग करून आपलें शरीर अर्पण केलें त्याप्रसंगींचें होय.

१ (गीति) "नगवर–मंदरसा कीं शतगुण तदधिक उदार तो विप्र ।
थोरांच्या कार्यावरि जड तें पडतें म्हणोनि दे क्षिप्र. ॥ १०० ॥
मोदेंचि दिलें मुनिनें वपु विद्याव्रततपः सुकृतसार, ।
फार प्रहृष्ट झाले तत्सत्वें सकळ सुर सपरिवार. ॥ १०१ ॥"

(मंत्रभागवत षष्ठस्कंध) दुसरें उदाहरण रंतिदेवाचें:–

२ (गीति) "सुयशा भरतसुत वितथ तद्वंशीं रंतिदेव तो करुण, ।
भूतदयेतें झाला वश, तरुणीतें नृपा! जसा तरुण. ॥ २९४ ॥
दे जें अन्नमिळे तें अन्नार्थि प्राणियांसि सारें च, ।
उतरी वैराग्यबळें षडरींचा तो दिसा दिसा रेंच. ॥ २९५ ॥
वारिहि पीतां, नाहीं अन्न म्हणुनि नमुनि पुल्कसा देहा, ।
राववि अर्थिजनाच्या भजनांत गृहीतशुल्कसा देहा. ॥ २९६ ॥
यद्यपि अठ्ठेचाळिस दिवस उपोषित कुटुंबसह होता, ।
क्षुधिता देचि मुखींचें, देतो कवळूनि खग जसा पोता. ॥ २९७ ॥"

(मंत्रभागवत नवमस्कंध) युद्धवीराचीं उदाहरणें वीररसवर्णनांत आलींच आहेत. विराटपर्वांतील युद्धवीराचें एक लहानसें उदाहरण पहा. (कर्णार्जुनयुद्धप्रसंग).

(गीति) "भंगुनि सहाय, मारुनि बंधु, हराया समस्त तन्मद हा ।
पार्थ शरांनीं झांकी; देखोनि ह्मणे तदीयजन्मद 'हा !' ॥९४ ॥
( विराट. अ० ४ )

कर्णापयानकोपें झालीं सैन्यें समस्त एकवट, ।
त्यांत धनंजयरथ तो, जैसा प्रलयार्णवांत एक वट. ॥ ५,१ ॥



नंतरचा अर्जुनाचा अचाट पराक्रम पहाः-

(गीति) "होत्ये यदंशशेषश्वासज्वलनांत हे समिद् धरणी, ।
त्याचा सखा धनंजय होय खलशलभलया समिद्ध रणीं. ॥ ३ ॥
कोणाचें हि शरीर द्व्यंगुळ हि अविद्ध तो न राहूं दे, ।
मुनि ह्मणति, 'खळांस हि गति बा ! नारायण सखा ! नरा ! हूं, दे.' ॥४॥
वाहे शोणितपूरीं शतश इभांचे हि कुणप, टोळांचा ।
मद किति गरुडीं ? सद्भटभुजभुजगहि वरिति गुण पटोळांचा. ॥ ५ ॥
त्या समयीं शंभु ह्मणे, "जरि तूं रुससील तरि उमे ! रूस, ।
गुह्य काय ? विदारिल हा वत्स विजय शक्तिनें सुमेरूस. ॥ १४ ॥
( विराटपर्व अ० ५. )".

**धर्मवीराचें उदाहरण** वनपर्वातील युधिष्ठिराचें भीमाशीं पुढील भाषण पहाः-

(गीति) "प्राणांस तुह्मांसहि मी त्यजिन, न धर्मासि पळहि सोडीन, ।
हें व्रत धर्मचि रक्षू, बापा ! न कदापि अयश जोडीन. ॥ २.८२ ॥
बा ! गा ! धर्माच्या तों कोणी सोडूं नयेचि कासेतें, ।
निष्फळ होती मेघें त्यजिलीं आलींहि जीविका सेतें. ॥ ८३ ॥
अंभोदासि पहाती जैसीं पसरूनि नित्य 'आ' शेतें, ।
धर्मासि तसीं भूतें; करि पूर्ण समर्थ हाचि आशेते. ॥ ८४ ॥
निजहितकर धर्माचें कुशळें विटवूं नयेचि मन कांहीं, ।
यापरि पोषणपालनलालन करिजे न अन्य जनकांहीं. ॥ ८५ ॥
( वनपर्व अ० २ रा )".

वरील तीन उताऱ्यांवरून पंतांना एकच विषय श्लोक, साकी व गीति या विविध वृत्तांत वर्णन करणें किति उत्तम साधलें आहे तें दिसून येईल. तसा प्रकार इतर कवींचा फारसा आढळून येत नाहीं. कोणाला ओवी उत्कृष्ट साधते, तर कोणाला श्लोक उत्कृष्ट साधतात; पंतांना मात्र सर्वच वृत्तांत सुंदर कविता करण्याचें उत्कृष्ट साधलें होतें. त्यांच्या 'दुर्वाससत्त्वपरीक्षा व ब्राह्मणमाहात्म्य' यांवरील ओव्या, व इतर स्फुट अभंग याचीच साक्ष देतात.

## प्रेयान् रस.

वरील नवरसांशिवाय प्रेयान्, वत्सल व भक्ति असे आणखी तीन रस कांहीं साहित्यशास्त्रज्ञ वर्णितात. मित्रविषयक स्नेहास **प्रेयान् रस** व पुत्र, बंधु इत्यादिकांविषयीं वत्सलतारूप स्नेहास **वात्सल्य रस** ह्मणतात. **प्रेयान् रसाचें उत्कृष्ट उदाहरण** श्रीकृष्णसखा श्रीदामा ( सुदामा ) याच्या चरित्रांत आढळतें. कृष्णविजय अ० ८० यांत श्रीकृष्णसुदाम्याच्या भेटीचा प्रसंग वर्णिला आहे त्यांत या **प्रेयान्** रसाचा ( मित्रविषयक प्रेमाचा ) अत्यंत उत्कर्ष झालेला आहे. त्यांतील पुढील निवडक गीतीच पहाः—

१ (गीति) "सदनांगणांत दूरूनि पाहुनि सन्मित्र बंधुला सहसा, ।
सहसात्विक भाव प्रभु धांवे तो होय मूर्तसन्महसा. ॥ ३३ ॥
राहे हर्षीं न मना नमनाचें भान बंधु पाहूनी, ।
बाहूनि प्रेमानें मानें आलिंगिलाचि बाहूंनीं. ॥ ३४ ॥
दोघांचें ही होतां आलिंगन हृत्प्रमोदकारि गळे ।
दाटति, दोघांच्याही नेत्रांतूनि प्रभूत वारि गळे. ॥ ३५ ॥
बैसविला तो बंधु त्रिजगत्तातें मग स्वपल्यंकीं; ।
आधींच भक्तवत्स स्वकृपासत्कामकल्पवल्यंकीं. ॥ ३६ ॥
तोषे तो तीर्थाचा गुरु सेवकपापयवसदव धूतां ।
बंधुपदांतें; दुर्लभ यच्छ्रीपदधूलिलव सदवधूतां. ॥ ३७ ॥"

हें सगळेंच चरित्र ह्मणजे भक्तिरसयुक्त प्रेयान्‌रसमधूनें थबथबलेलें मधाचें पोळें होय. तेथें उतारे किती घ्यावे? वाचकानीं हें सर्व चरित्र अ० ८०–८२ या कृष्णविजयाच्या अध्यायत्रयींत पाहावें, 'पृथुकोपाख्यान' व 'सुदामचरित्र' या पंतांच्या स्फूटकाव्यांतही ह्याच रसाचें मुख्यत्वें वर्णन आढळतें. या रसाबरोबरच भक्तिरसाची यमुना या आख्यानप्रयोगांत उद्दाम घोष करीत वाहतांना आढळते. त्यांतील पृथुकोपाख्यानांतील भेटीच्या प्रसंगाच्या पुढील थोड्याच साक्या पहाः—

२(साक्या) "झडकरि उठला दयाळु माधव, वस्त्रादिक नावरितां; ।
धांवत आला पुढें, रमेला सांडुनि, दासाकरितां. ॥ २३ ॥"
'ये ये बंधो!' ऐसें सद्गद बोलत धांवत आला; ।
कडकडुनी भुजयुग्में स्वसखा हृदयीं धरिता झाला. ॥ २४ ॥
मित्रांगस्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधू, ।
लोचनपद्मापासुनि गळती प्रेमाश्रूचे बिंदू. ॥ २५ ॥
धरुनि करीं स्वसखा श्रीहरीनें पर्यंकीं बैसविला, ।
सात्विकभावें भक्तिप्रेमा देवें बहु दाखविला. ॥ २६ ॥"

सुदामदेव आपल्या पत्नीस द्वारकेस आपल्याला श्रीकृष्णदर्शन झालें तेव्हांचा प्रसंग वर्णन करून सांगतो.

२ (श्लोक) "गेलों मी जेधवां कीं वरतनु ! सुभगे ! अंगणीं श्रीहरीच्या,
होता तेव्हां पलंगीं यदुकुलमणि तो रुक्मिणी सुंदरीच्या, ।
तेथें दूरूनि मातें निरखुनि सहसा धांवला दीनबंधु,
स्थानस्त्रस्तोत्तरीयालकमुकुटपटस्त्रक्कारुण्यसिंधु. ॥ २ ॥
कृष्णानें बाहुयुग्में निजयुवतिपरिष्वंगमृष्टांगरागें,
मातें आलिंगिलें हो सुदति ! धरुनियां पोटिशीं सानुरागें; ।
झाला मद्दर्शनें तो प्रमुदित सुटलें लोचनीं प्रेमवारी,
मित्रांगस्पर्शरोमांचिततनु दिसला चिंतकाचा भवारी. ॥ ३ ॥
पर्यंकीं मज बैसवूनि सुभगे ! अत्यादरें श्रीकरें,
पाद क्षाळूनि घेतलें जळ शिरीं पुण्याकरें तें करें; ।
कर्पूरागुरुकुंकुमें मृगमदें स्त्रग्भूषणें चंदनें
देवाच्या परि पूजिलें सुरनुतें श्रीदेवकीनंदनें. ॥ ४ ॥
धूपें दीपें दिव्यतांबूलदानें, मातें भार्ये ! पूजुनी संमदानें, ।
कांते ! माझ्या पावुनी संगतातें, दीनत्राता बोलिला स्वागतातें. ॥ ५ ॥
तेव्हां चामर तालवृंतक करीं घेउनि शैब्या करी
मन्मार्गश्रम दूर, तें परिसिलें अंतःपुरीं लौकरी. ।
कांता श्रीहरिच्या वरोरु सकळा अत्युत्सुका धांवल्या,
मातें पाहुनि, वंदुनी बहु मनीं त्या विस्मया पावल्या. ॥ ६ ॥

( सुदामचरित्र-भगवद्दर्शन )".

## वत्सलरस.

**वत्सलरसपरिपाक** पाहावयाचा असल्यास कृष्णविजयांतील वैदर्भीची प्रद्युम्नास पाहून झालेली अवस्था व तिचें भाषण ( अ० ५५ श्लो० २९-३६ ), नंद यशोदेची व व्रजस्त्रियांची कृष्णाशीं पुष्कळवर्षांनंतर झालेली भेट, ( अ० ८२ गी० ६-४० ), नंदवसुदेवांची भेट ( अ० ८४ गी० ३१-४८ ), इत्यादि भाग पहावेत. यांतील निवडक उतारे मासल्याकरितां पुढें देतों. सूतिकागारांतूनच लहानपणीं नाहींसा झालेल्या प्रद्युम्नास एकाएकीं पाहून रुक्मिणीची झालेली अवस्था किती वात्सल्यरसपूर्ण आहे ती पहा. ! मूळ भागवतांतील श्लोकांशीं खालील श्लोक ताडून पाहिले असतां पंतांची स्वतंत्र करामत दिसून येईल.

१ (श्लोक)'वैदर्भी यास पाहे, द्रव हृदय धरी, तत्क्षणीं स्तन्य वाहे,
कीं ते आनंद लाहे, जरि तनुज असें ज्ञान होणेंचि आहे; ।

बाष्पानें कंठ दाटे, सकळ तनुवरी क्षिप्र रोमांच थाटे,
शोकाचा सिंधु आटे, त्वरित परम तद्दर्शनीं लाभ वाटे. ॥ ५५.२९ ॥
ह्मणे' 'हा कोण श्रीयदुपतीसम श्रीनरमणी,
गमे या पुत्रास प्रसवलि नराची न रमणी; ।
अशा रत्नाची जी खनि जनिं तिचा धन्य कुसवा
स्वयें याचें वृत्त प्रियसखि! पुसा, गे! न पुसवा. ॥ ३० ॥
या लावण्यांबुधीला अनुसरलि असे जी अनन्या नईचें
पत्नीचें भाग्य लोकीं अतुळ, सुकृत जें मोजवे तें न ईचें, ।
ती धन्या होय ऐसें विमळ उपजलें रत्न जीच्या कुशीला,
न स्पर्शावी तुला बा! रुचिरतरतनो! दृष्टि जी कीं कुशीला. ॥ ३१ ॥
माझाही पहिला अनिर्देश शिशू नेला स्वगेहांतुनी;
दैवें हारपला अनर्घ्य सुमणी जैसा पडे हातुनी; ।
तो जीवंत असेल शंकरदयाधात्रीनिजांकीं जरी
वाटे बुद्धिस येवढाचि सुवयें झाला असावा तरी. ॥ ३२ ॥
हा कैसें पावला हें असुलभ हरिचें दिव्य सारूप्य, शंका
हे मोटी, राजयाच्या तनुजनिविण तल्लक्षणप्राप्ति रंका, ।
वाटे मत्पुत्र आला श्रवण हितमुखें वृत्त जालें असेल;
प्राप्तप्रौढत्व सिंहीतनय न पळही क्रोष्ट्यूथीं वसेल. ॥ ३४ ॥
घडेल काय हें आला मत्सुत द्वारकापुरा? ।
निवेल आलिंगुनि त्या ससुहृद्वार कापुरा? ॥ ३५ ॥
दिसे याच्या ठायीं सहज अधिक प्रीति, भुजही
स्फुरे डावा, 'आहे विदित' म्हणतो 'रीति तुज ही' ।
मला लग्नापूर्वी प्रियकथनदक्षें कळविली
स्वयें कृष्णप्राप्ति स्फुरुनि निजचिंता पळविली' ॥ ३६ ॥
(कृष्णविजय अध्याय ५५)"

पुष्कळ वर्षांनंतर नंदयशोदेची कृष्णाशीं स्यमंतपंचक क्षेत्रांत झालेल्या भेटीचें वर्णनः—

२(गीति) "भेटाया करुणाघनकृष्णाला जाय मोरसा नंद, ।
होय विलोकुनि जैसा पर्वहिमकरा चकोर सानंद. ॥ कृष्णविजय ८२.६ ॥
वसुदेव पुढें धांवुनि आलिंगी त्या सख्यास नंदास, ।
'वंदा सप्रेम' ह्मणे रामास तयाहि मोदकंदास ॥ ७ ॥
श्रीरामकृष्ण वंदिति नंदपदें, एकदांचि दोघांतें ।
आलिंगी तात महाभाग्यें चिरकाल त्या मुदौघांतें. ॥ ८ ॥

मग मातेच्या चरणां नमिती शमितीर्थरूप ते, त्यांतें, ।
भेटे जननी, गंगायमुनौघालागिं लाज देत्यांतें. ॥ ९ ॥
भवजलधिमथनमंदर मंद रडति बैसुनि पित्याजवळी, ।
कवळी माय यशोदा, लुटिती तें साधुधन सखे गवळी. ॥ १० ॥
नीलरजतनग नंदन, नंद न तो घनचि अश्रुजळ वर्षे, ।
मोरचि तदधरपल्लव, बल्लववन विरहदावहत हर्षे. ॥ ११ ॥
भेटे व्रजेश्वरीतें भावें श्रीदेवकी जसी अनुजा, ।
श्रीरोहणीहि भेटे, भेद प्रेमीं न दाविती तनु जा ( ज्या ) ॥ १२ ॥
या दोघीही धात्री दिसती, माता सती यशोदाची, ।
प्राचीन प्रेमा तो म्हणे, 'पिता नंद माय हे साची' ॥ १३ ॥
वसुदेवस्त्री, ह्मणती, आइक बाई ! व्रजेश्वरी ! बोल, ।
हो लक्ष भवत्प्रत्युपकृति, उपकृतिला तुझ्या नसे मोल. ॥ १४ ॥
स्मरति तव स्तन्यास न्यास तुझे हे, तुम्हींच पितरांहीं ।
केलें सादर लालन पालन, करिजेल काय इतरांहीं ? ॥ १५ ॥
आधीं ह्मणति 'यशोदे !' मग येतें नाम आमचें बाई ! ।
बा ! ईश्वरा ! कळो तुज, आह्मीं दाई, व्रजेश्वरी आई. ॥ १७ ॥
कां खेद आमचा कीं याचा प्रेमा गमो जुना न मना, ।
दे आशीर्वाद, पहा बाई ! करिती तुला सुना नमना. ॥ १८ ॥
त्वां आरोग्य पुसावें आधीं, मग अश्रु रामकृष्णाचे, ।
तव धन्यस्तन्यरसानूनोक्तिसुधारसीं सतृष्णाचे. ॥ १९ ॥
गायीसीं वत्सासीं दैवबळें गांठि बहु दिसां पडली, ।
स्थानभ्रमविकळहृदयकृपणाची ठेवि काय सांपडली ? ॥ २० ॥"

कृष्णाची गोपीशीं भेट झाली तेव्हांचें वर्णनः—

३ (गीति) "एकांतीं दर्शन दे गोपींतें हरि तसाचि तत्प्रेमा, ।
क्षेमालिंगन झालें, लाजविलें सेंद्रनीलमणिहेमा. ॥ २१ ॥
तो विद्युन्नवजलधरतरंगिणीसिंधुसंगमापरिस ।
धरि सच्छ्री संग, बसति जेव्हां वेष्टूनि गोपिका हरिस. ॥ २२ ॥
पुसिलें नयनास्यकमल अनामय श्रीकरें स्वआलींचें ।
आलींचें लतिकांच्या काय वसंतें गृहास आलींचें ! ॥ २३ ॥
सखिया हो ! कां होता आतां अन्यत्रदत्तदृष्टि, पहा ।
शोधित होतां ज्यातें विरहीं सर्वत्र तोचि निष्कप हा. ॥ २४ ॥"

या पुढील गीतींत कृष्णाचें गोपींशीं झालेलें भाषण हृदयंगम ह्मणूनच फार वाचनीय आहे. तें वाचकांनीं मूळांतच पाहावें. पुढील ८४ व्या अध्यायांत वर्णिलेलें नंदवसुदेवांचें प्रेम व संवाद यांतील अल्प मासला पहाः—

४ (गीति) "गेले पांडुसुतहि, परि पाहत हरिपादसारसा नंद ।
'आज उद्यां आज उद्यां' ह्मणत वसे सपरिवार सानंद. ॥ ८४.३१ ॥
शौरि ह्मणे नंदातें, 'बंधो ! हा स्नेह ईशकृत पाश, ।
याचा शूरास बळें, ज्ञानें योग्यांसही नव्हे नाश. ॥ ३२ ॥
या अकृतज्ञजनीं बहु मैत्री साधूत्तमीं तुह्मीं केली, ।
पाषाणशिरीं जैसी वृष्टि तसी सर्वथा वृथा गेली. ॥ ३४ ॥
फळ नसतांही मैत्री न विटे, दुष्टात्मजीं जसी माता, ।
बा ! तामसपतिभजनीं साध्वी नाटोपिती मना हाता. ॥ ३५ ॥
प्रत्युपकारा कारावासीं पूर्वी नसेचि अवकाश ।
आतांहि प्रियमधुपा ! बा ! नीरस मी प्रफुल्ल नव काश. ॥ ३६ ॥
... ... ...
बा ! गा ! चुकलों, आतां उपकार असें मुखासि आलें कीं ।
माझें तातपण मृषा, सत्य तुझें सन्मतेंचि या लेंकीं. ॥ ३९ ॥
पालन लालन बाल न पावे मज जवळिही न होता तें ।
सर्वहि तुलाचि घडलें, केलें म्यां अधिक काय हो ! तातें ? ॥ ४० ॥
तूं बाप खरा, नंदन तूझे हे रामकृष्ण, मी चुलता, ।
भेद न हाही, नाहीं तरि विरहें उर पळामध्यें उलता. ॥ ४१ ॥
डाव्या उजव्या अंकीं बसतां तो स्पर्श वेगळा काय ? ।
जाय स्तनद्वयीं मुख एकीं शिशुची न ती दुजी माय. ॥ ४२ ॥
ऐसें बोलूनि रडे वसुदेव, तयासि तातसा नंद ।
समजावी, तेथ वसे मासत्रय तत्प्रियार्थ सानंद. ॥ ४३ ॥
विसरति गोपी बाळें, ज्यासमयीं नंद सिद्धता करवी, ।
मग आठवेल कोणा लोणी दहिं दूध तूप ताक रवी ? ॥ ४५ ॥
जपहोमभुक्त्यलंकृतिविधिमध्यें रामकृष्णही चुकले ।
भवपाशहरासहि न प्रेमगुण च्छेदवे न वा उकले. ॥ ४६ ॥
देव यशोदाकंठीं घालूनि मिठी किशोरसे रडले, ।
अमृतस्त्रावि सितासित मणिकंठे काय ते गळां पडले. ॥ ४७ ॥"

**याप्रमाणें सारेच रस पंतांना चांगले साधले आहेत. तथापि त्यांतल्या त्यांत प्रौढशृंगार, वीर, करुण, वत्सल व भक्ति हे रस त्यांना उत्कृष्ट साधले आहेत. त्यांतही सर्वरसमूर्धाभिषिक्त अशा**

भक्तिरसाची भट्टी तर पंतांना सर्वोत्कृष्ट साधली आहे.

## भक्तिरस.

**भक्तिरसाचीं** उदाहरणें पंतांच्या काव्यांत सर्वत्र आहेत. आर्याकेकावलि, श्लोककेकावलि, भीष्मभक्तिभाग्य, भक्तभूषण, सुदामचरित्र (कृष्णविजय अ० ८०,८१), पृथुकोपाख्यान साकीबद्ध व सुदामचरित्र स्फुटकाव्य हीं तीन प्रकरणें, कृष्णविजयांतील श्रुतदेवबहुलाश्वकथा (अ० ८७), मंत्रभागवतांतील उखलबंधन, रासक्रीडा व इतर भक्तिपर प्रकरणें, उद्योगपर्वांतील कृष्णाचें विदुरगृहीं भोजन (अ० ७,६४–७८), द्रोणपर्वांतील कृष्णाचें भक्तवात्सल्य व त्यानें अर्जुनाच्या अश्वांची केलेली चाकरी (अ०९,६–८; अ० १०,३८–५२), अनुशासनपर्वांतील उपमन्युकथा (अ० २–४), अहिल्योद्धार (साकीबद्ध व गीतिबद्ध) इत्यादि अनेक प्रकरणें या गोष्टीची उत्तम साक्ष देतील. आतां वरच्यापैकीं कांहीं उदाहरणें पुढें देतों:–

१ (अ) अहिल्योद्धार या स्फुट गीतिमय प्रकरणांतील पुढील पद्यें भक्तिरसानें किती थबथबलेलीं आहेत तें पहाः–

(गीति) "स्पर्शमणिस्पर्शानें लोहाची मूर्ति कांचनी होती, ।
प्रभुपदरेणुस्पर्शें होय सुशीला शिलाचि जी होती. ॥ ५ ॥
जी बहु करीत होती पदरज वंदावया नवस, तीतें ।
वंदी सानुज राम प्रभु, दे आनंद तो नव सतीतें. ॥ ६ ॥
पूजी गाधिजमुनिला नमुनि अहल्या, ह्मणे, 'न आग मनीं ।
धरिलें, सत्य दयार्णव, मार्गीं श्रमलां सुदूर आगमनीं.' ॥ ८ ॥
झाडी केशांनीं प्रभुचरण ध्याती शिवादि सुर जांतें (=ज्यांतें), ।
गोळा करूनि पदरीं सादर बांधी नमूनि सुरजांतें. ॥ १० ॥
प्रक्षाळूनि प्रभुच्या चरणांतें तीर्थतोय सांचविलें, ।
माथां वाहुनि केलें प्राशन, पात्रीं न लेश वांचविलें. ॥ ११ ॥
शीतळ सुगंध निर्मळ जळ, बहुसुस्वादुरस फळें अर्पी, ।
प्रेमरसेंचि अहल्या त्या अमृतांधःप्रभूत्तमा तर्पी. ॥ १३ ॥
नत आपणासि झाला ह्मणऊनि करूनि अंजली लाजे, ।
वर्णी मातृशताधिकसदया प्रभुपादकंजलीला जे. ॥ १४ ॥
'बापा! पापाचळपविपदरेणो! मी असी कुधी कुलटा, ।
विश्वगुरो! त्वां केला प्रथम नमस्कार मज कसा उलटा? ॥ १५ ॥
पुण्यश्लोक शिवादि प्रणति करुनि पसरिती पदर जातें (=ज्यातें) ।
पात्र कसें केलें मज असतीला या अशा पदरजांतें? ॥ १६ ॥
जे पाय माय बाप ब्रह्याचे, दृग्द्वयें रमा तृषितें, ।
प्राशी ज्यांसि, मिळाले कैसे ते श्वशुर गौतमा ऋषितें! ॥ १९ ॥

**अर्थसादृश्यः**–'आरण्यकं गृहस्थानं श्वशुरौ पद्रजःकणाः ।
स्वयमौद्वाहिकं गेहं तस्मै रामाय ते नमः ॥' (रघु. १५ मल्लीनाथी)

तूं बाप आजपासुनि, मी कन्या, हें तुझ्या पदीं नातें ।
नांदो दे दाशरथे ! त्वां क्षणहि अव्हेरिलें न दीनातें. ॥ २० ॥
लक्ष्मणजी ! आयकिलें वदली जें धर्मकन्यका कांहीं ? ।
द्यावें स्मरणचि आंदण याहुनि द्यावें न अन्य काकांहीं. ॥ २१ ॥
रडवाया निजकर्मे सर्व सतींची सभा विटाळावें, ।
तें कां चुकेल ? कैसें अबळेनें प्रबळ भावि टाळावें ! ॥ २२ ॥
शांतिक्षमादि सद्गुण जग ज्यांचे ऐकतां निवे कानीं, ।
वेषप्रतारिता हे शापावी या महाविवेकांनीं ! ॥ २३ ॥
शाप न, अनुग्रहचि हा ह्मणुनचि तुज बा ! महायशा ! पाहे, ।
दूषित असेल, गुरुला दंडा, संकोच काय ? शापा हे. ॥ २४ ॥
आतां मनि दुःख नसे झाली स्वपतिव्रतांत कुत्सा हें, ।
कीं भेटलासि आंगें येउनि तूं तीर्थपाद उत्साहें. ॥ २५ ॥
वाटे, अन्याहि अशा गुरुशापा व्हावया शिळा लाहो, ।
हांसों नका अहो जी ! कवणा पदरेणु हा मिळाला हो ? ॥ २६ ॥
ज्याच्या एकेंचि रजें, मी धन्या, हे असे जिला पाय ।
लाभति वर्णूं एका जिव्हेनें भाग्य भूमिचें काय ? ॥ ३० ॥
वाहे शिरीं पदरजें सुकृत त्रिजगीं अनंत पवनाचें, ।
केलें वृष्टिहिमातप साहुनि जें तें खरें तप वनाचें. ॥ ३१ ॥
मज चातकीस आधीं तर्पाया ओळले परि जगाया ।
हे करुणाघन झाले, माझ्या भाग्येंचि कारण जगा या. ॥ ३२ ॥
याला, संरक्षाया, दिधलें म्यां सर्व आयु, धरणीतें, ।
द्यावें सद्वीरकरीं सयश जोडील आयुध रणीं तें. ॥ ३३ ॥"

वरील उताऱ्यावरून या 'अहिल्योद्धार' काव्यांत कवीच्या कल्पनाशक्तीचें व भक्तिरसाचें उदात्त स्वरूप प्रकट झालेलें वाचकांस आढळून येईल.

१ ( आ ) अहिल्योद्धाराच्या साक्याही थोड्या पण फार गोड उतरल्या आहेत. पुढील मासला पहाः–

(साक्या) "इंद्रें छळिली सती, पतीनें कोपें दिधला शाप, ।
झाली शिळा सुशीला आतां वारावे संताप. ॥
रामा ! परमपवित्रा ! । त्रिभुवनगीतचरित्रा ! ॥ २ ॥
प्रायश्चित्तें पापें जळतीं, मूळवासना राहे; ।
ते ही भस्म करावी हें बळ तुझिया चरणीं आहे. ॥
पातककाननदावा ! । आतां कौतुक दावा. ॥ ३ ॥

त्रिभुवनवंद्यपदा ! साध्वीतें दे पादांबुजसंगा ।
हें पद तापविनाशक साचें याची कन्या गंगा. ॥
आतां ऊठ उदारा ! । तारीं गौतमदारा ! ॥ ४ ॥

या विश्वामित्रगुरूच्या आज्ञेवर रामाची शंकाः–

राम ह्मणे गुरुराया ! 'हे कीं साध्वी मुनिची भार्या, ।
पाय कसा लावावा ? माझी माता तैसी आर्या. ॥
वाटे संकट हें प्राज्ञा ! । कैसी लंघावी आज्ञा ?' ॥ ५ ॥

विश्वामित्राचें उत्तरः–

विश्वामित्र ह्मणे, 'बा ! रामा ! ईतें ह्मणसी माय, ।
माय न सुख लोकीं पुत्राचा जरिही लागे पाय. ॥
वत्सा ! मातेला नेटें । धावुनि धन्य करीं, भेटें !' ॥ ६ ॥

पुढील उद्धारप्रकारः–

मुनिशक्रें द्विजपत्नीपातकपर्वत भस्म कराया ।
प्रेरियले अभिमंत्रणयोगें वज्ररुपा रघुराया. ॥
कौतुक संत पहाति, । नेत्रीं बाष्प वहाति. ॥ ७ ॥
मुनिवनितापातकनागावरि नृपसिंहाचा तोक ।
उठला रघुवीर प्रभु आंगें मर्दाया भवशोक. ॥
आलें सुकृत फळाला, । गेला, ताप जळाला. ॥ ८ ॥
श्रीरामाच्या पदपद्माचा रज साचा स्पर्शमणी, ।
केली सुवर्णवर्णी पातकलोहमयी मुनिरमणी. ॥
स्तविती सुरवर मुनि रामा । शुद्धा अतुला सुखधामा. ॥ १० ॥

देवभक्तांना अहिल्योद्धारानें झालेल्या आनंदाचें वर्णनः–

करिती निर्जर रामपदावरि अमरद्रुमसुमवृष्टी. ।
नाचति **भक्तमयूर** विलोकुनि रामदयाघन दृष्टी. ॥
दीनोद्धारसमर्था ! । भजकां देशि पुमर्था. ॥११॥

(अहिल्योद्धार द्वितीय–साकीबद्ध)"

भीष्मभक्तिभाग्य हें सर्वच प्रकरण फार गोड आहे. तें सर्व भक्तिरसज्ञांनीं मूळांतच वाचावें. येथें उगीच थोडेसे उतारे देतों ते पहाः–

(अ) "या प्रभुच्या चित्तींचें करणें कोणी कधींहि जाणेना; ।
जाणों जातां कविहि भ्रमले निश्चय तयांसि बाणेना. ॥ ६४ ॥
तस्मात् सुखदुःखादिक हें सर्वहि होय ईश्वराधीन; ।
जाणुनि असा करावा निश्चय कीं तत्प्रसाद साधीन. ॥ ६५ ॥

व्हावें अनुवर्ती या प्रभुचें, याचि प्रभूत्तमा गावें; ।
'स्वामी! प्रभुजी! पाळा प्रजा अनाथा,' असेंचि मागावें. ॥ ६६ ॥
हा साक्षात् नारायण भगवान् परपुरुष; याचि जगदाद्या ।
ह्मणति मुमुक्षु, 'गुरुवरा! भवशमना! स्वभजना! सदगदा द्या.' ॥६७॥
मायामानुषवेषे वृष्णिकुळीं देवदेव हा नांदे; ।
प्राकृत अभक्त जन जे त्यां तत्व कळों न, साभिमाना दे. ॥ ६८ ॥
जेणें विलया नेली **स्मर**तनु, जसि दीपकप्रभा वातें, ।
तो भगवान् **शिव** जाणे याच्या गुह्योत्तमप्रभावातें. ॥ ६९ ॥
याचा प्रभाव जाणे **नारद** याचीच कीर्ति जो गातो, ।
याणेचि या प्रसादाप्रति केला पात्र याचिजोगा तो. ॥ ७० ॥
ज्याची वाचा, आत्मानात्मविवेकामृतप्रदा, कपिला, ।
ठावा प्रभाव याचा त्या भगवंता मुनीश्वरा कपिला. ॥ ७१ ॥"

श्रीकृष्ण परमेश्वर असून त्यानें अर्जुनसारथ्यादि नीच कर्म कशीं केलीं ? या विषयीं भीष्माचें भाषणः—

(आ) "नीचोच्च कर्म करितां मज योग्य अयोग्य हें असें कांहीं ।
रागादिदोषरहितप्रभुच्या, वैषम्य, बुद्धिला, नाहीं. ॥ ७५ ॥
हें कां ? ह्मणसील तरी, ज्याला यत्नेंकरूनि कवि टाळी, ।
तो दुष्ट अहंकार प्रभुच्या हृदया कधींहि न विटाळी. ॥ ७६ ॥
'हेंहि कसें' ? ह्मणसी तरि, अद्वय समदृष्टि होय हा, राया! ।
श्रुति 'सर्वात्मा' ह्मणती श्रीच्या हरिनीलरत्नहारा या. ॥ ७७ ॥
जरि सर्वत्र समचि हा तरि, या प्रभुची कृपा नृपा! दासीं, ।
जेणें केलें बद्ध प्रेमगुणें निजमन स्वपादासीं. ॥ ७८ ॥
जे निरुपाधिक सेवक, देव करी त्यांवरीच फार कृपा; ।
आला मरणावसरीं मज भेटाया पहा मुकुंद नृपा! ॥ ७९ ॥
भक्तीनें मन, ज्याच्या पदपद्मीं, मधुप करुनियां योगी ।
ज्याचें गातां नाम, त्यजुनि तनु भ्रमहि, मुक्तिपद भोगी. ॥ ८० ॥
तो देवदेव भगवान् हा यदुपति, या प्रमोदसन्निधितें ।
विनवितसें; मज देवूं देहन्यासांत आत्मसन्निधितें. ॥ ८१ ॥
हें सुप्रसन्नहास, प्रांतारुणनेत्र, वदनतामरस ।
मद्दृष्टिभ्रमरीला देवूं प्राशावया प्रकाम रस. ॥ ८२ ॥
चतुर चराचरचेतश्चोर चतुर्बाहु चारु चारुरुची ।
अन्या संन्यासिजनें चिंतावें मात्र हें स्वरूप शुची. ॥ ८३ ॥

जेव्हां मागेल मना, तेव्हां टाकीन या शरीरा हो ! ।
तोंवरि मदग्रभागीं हा गीतामृतनिधी हरी राहो. ॥ ८४ ॥"

प्रभुवात्सल्यदृष्टिवर्णनः–

( इ ) "वात्सल्यदृष्टि जाणे प्रभुची, जाणे तसें न कूर्मी ते, ।
कूर्मी काय इचें यश, हांसे अमृताब्धिच्याहि ऊर्मीतें. ॥ १०७ ॥"

भीष्मकृत श्रीकांतस्तुतिस्तोत्राची प्रस्तावनाः–

( ई ) "देहत्यागावसरीं, भीष्म प्रेम प्रभूत मागाया, ।
श्रीचरणीं स्थिरचित्त स्थापुनि, लागे प्रभूत्तमा गाया. ॥ ११० ॥
गोडी गंगासुतकृतभगवन्नुतिची उदंड असि कांहीं, ।
अमृतनदींतहि नाहीं, केला सिद्धांत सर्व रसिकांहीं. ॥ ११३ ॥
अमृतनिधि प्रभुहि जिला, मानुनि परमामृतप्रपा, प्याला; ।
ते ही न रुचे कवणा ? एकाचि रुचेल हे न पाप्याला. ॥ ११४ ॥
त्या स्तुतिमणिमाळेनें कुरुवर भक्तिस्वयंवरवधूतें ।
मूर्तश्रीभाग्यें वरि; जें मनिं धरिलें शिवेंहि अवधूतें. ॥ ११५ ॥"

भीष्मकृत श्रीकांतस्तुतींतील (भागवत स्कंध अ० ९ श्लो० ३२–४२) श्लोक ३३, ३६ व ४० यांच्या आधारावर रचिलेले पंतांचे निवडक अमोलिक बोलः–

( उ ) मूळ भागवती श्लोक १.९.३३

"त्रिभुवनकमनं तमालवर्णं रविकरगौरवरांबरं दधाने ।
वपुरलककुलावृताननाब्जं विजयसखे रतिरस्तु मेऽनवद्या ॥"

पंत ह्मणतातः–

"सरस तमालश्यामल, रविकरगौरांबरद्वयें युक्त, ।
जें विश्वमनोहर, ज्या, मुक्ति त्यागूनि, वांछिती मुक्त. ॥ १२४ ॥
ऐसें जेणें धरिलें अतिरुचिर शरीर, ज्यांत मुखपद्म ।
शोभे अलकमधुपकुळपरिवृत करुणाविभूतिचें सद्म. ॥ १२५ ॥
त्या जिष्णूच्या सख्या श्रीहरिच्या ठायीं अहैतुकी स्वरती ।
राहो सदा; कदापि न हो, क्षणहि त्यजुनि तत्पदा, परती. ॥ १२६ ॥"

मूळ श्लोक १.९.३६.

"व्यवहितपृतनामुखं निरीक्ष्य स्वजनवधाद्विमुखस्य दोषबुद्ध्या ।
कुमतिरहरदात्मविद्यया यश्चरणरतिः परमस्य तस्य मेऽस्तु ॥"

पंत ह्मणतातः–

"मी स्वजनक्षयकर्ता, इत्यादिक बुद्धि जिष्णुची सारी ।
जो कथुनि आत्मविद्या हरि हरि, गुरुमोहसागरीं तारी. ॥ १३५ ॥

ऐसी ज्याची दासीं भ्रांतीं ही, बुद्धि सादरा, जीवीं. ।
भ्रमरीसम रीति धरो मम रति, त्याच्याचि पादराजीवीं. ॥ १३६ ॥"

मूळ भागवती श्लोक १.९.४०.

"ललितगतिविलासवल्गुहासप्रणयनिरीक्षणकल्पितोरुमानाः ।
कृतमनुकृतवृत्य उन्मदान्धाः प्रकृतिमगन् किल यस्य गोपवध्वः ॥"

या श्लोकावरील पंतांची कारागिरी पहाः-

"सुललितगमनें, रासक्रीडेनें, हृदयमोहनें, हसितें, ।
अवलोकनेंहि, कामोद्भवहेतुप्रेमरसभरोल्लसितें, ॥ १५९ ॥
बहुमान पावल्या, ज्या झाल्या अत्युत्कटें मदें अंधा, ।
नेणति कामविहाराविण, ज्या परमार्थवस्तुच्या गंधा. ॥ १६० ॥
मदनमहोत्सवदायकनायकविरहांत गणिति तनु कारा; ।
भ्रांता, तदेकचित्ता, प्रभुचरितांच्याचि करिति अनुकारा. ॥ १६१ ॥
त्यजिला पतिव्रतापथ, धरिला ज्यांहीं प्रसिद्ध पथ उलटा, ।
तरि पावल्या, जयाचें योगिदुराप स्वरूप त्या कुलटा. ॥ १६२ ॥
त्या भगवंतीं माझी रति अतिशय बैसली सदा राहो, ।
साहो क्षणहि न विरह, श्री जैसी श्रीनिवासदारा हो ! ॥ १६३ ॥"

या 'भक्तिभाग्या'च्या उपसंहाराचे श्लोकही फार गोड आहेत. पुढील तीनच श्लोक पहाः-

"तमें नाशी अंगें सकळहि तमोनाशक रवी,
स्वतेजें इंद्वग्नीकरविंहि तमोनाश करवी. ।
स्वयें भक्तोक्तेही भुवनगुरु अज्ञान हरितो;
उपेक्षू संसारीं, पळहि, मज अज्ञा, न हरि तो. ॥ १९१ ॥
न जें भासे अन्या विधिसमहि सुज्ञा नयशतें,
दिलें भक्ता जेणें, अतुल निज सुज्ञान यश तें; ।
अशाच्या जे पायीं न धरितिल, जे तापस, रती,
अहाहा ! त्यांचे ते तरि मग कसे ताप सरती ? ॥ १९३ ॥
होऊं दे स्वप्रतिज्ञा, त्रिभुवनगुरुही, शक्रही, देव, काची; ।
सत्या अत्यादरानें करि, सुरतटिनीनंदना सेवकाची. ॥
पार्था, स्वार्थासि जैसा कृपण, बहु जपे; दुर्लभा वासवा जी, ।
ती ते भक्तप्रतिष्ठा प्रभुहि बहु करी; खाजवी दासवाजी.॥ १९४ ॥"

भारत उद्योगपर्वांतील विदुरगृहभोजनाच्या थोड्या गीति केकावलि टीका पृ० १५१ त, व अनुशासनपर्वांतील उपमन्युकथेच्या पृ० २७५ त दिल्या आहेत. येथें द्रोणपर्वांत कृष्णानें केलेल्या अर्जुनाच्या अश्वांच्या मोतद्दारीचें वर्णन देतोंः-

३ (गीति) "प्रभुनें मुक्त करुनि हय, चुचकारुनियां हळूच कौशल्यें, ।
निजबोधें श्रितहृद्गतदुःखेंसीं, सकळ काढिलीं शल्यें. ॥ १०.३९ ॥
अश्व परशरांहीं, भवतापाहीं जेंवि दास, पोळविले, ।
ते देवें, भक्तिरसें जाणों स्वचरणरजांत लोळविले. ॥ ४० ॥
देवर्षि मुखीं घालुनि बोट ह्मणे, 'हा!' सुयोधना कुटिला! ।
भक्तिबळेंचि पहा हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला. ॥ ४१ ॥
ज्याचें पदनख, दासां जें सुख दे तापल्यां, न तें विधु, तो ।
भगवान् स्वयें अहा! या विजयहयां, सत्पदास तेंवि, धुतो. ॥ ४२ ॥
आह्मी दत्त तसे, गुण गुरु लघु हो, वर्जुना, नरा बावा! ।
तूं धन्य; खळ हि; नातरि यापरि हा अर्जुना! न राबावा. ॥ ४३ ॥
ज्याच्या श्रीपददास्यें पावे तोखा सदा रमा जाया, ।
हरितो मना, नराचा होउनि तो खासदार, माजा या. ॥ ४४ ॥
पुरुषार्थद ते केले, दासहयहितोदयाकर, खरारे. ।
जालासि दासदास, प्रभुही, तूं बा! दयाकर खरा रे! ॥ ४५ ॥
सुखद स्पर्श श्रीच्या, बहुधा न हयांसम, स्तनांचा या. ।
हें यश गावुनि, शिवसा, लागेल सुधी समस्त नाचाया. ॥ ४६ ॥
प्रेमें माता बाळा न्हाणी, कीं भक्त शंभुच्या लिंगा, ।
तैसाचि नरहयां हरि. कवि हो! याचेचि पाय आलिंगा. ॥ ४७ ॥
औषध सुचणक, कल्पी पीतपट पसाहि तोबरा माप; ।
श्रितसाहित्य कराया न बरा मंदार; तो बरा माप. ॥ ४८ ॥
हरि हरिततृणीं चारी तो प्रभु ज्याचा प्रताप दुर्वार. ।
'हरि हरि!' तई करिति, पद देउनि गणपतिशिरीं हि दुर्वा र. ॥ ४९ ॥
तोकतृषाशमना कीं क्षाळाया तात तोकमळ, पाणी ।
प्यायाचें हि वेची; करि, न पिवुनि तेंवि तो कमळपाणी. ॥ ५० ॥
उच्चैःश्रवा ह्मणावा पार्थाच्या कां न 'नीच' तुरगांनीं ? ।
ज्यां पूजी तो, ज्याचें यश नंदनकाननीं चतुरगानीं. ॥ ५१ ॥
योजुनि तुरगवर रथीं, आपण कुरुबळ पहात देव रिघे; ।
मग विजयातें, मर्दुनि रडवाया खलप, हात दे, वरि घे. ॥ ५२ ॥"

आतां कृष्णविजयांतील श्रुतदेवबहुलाश्वाच्या कथेंतील गीतिवृत्तांत केलेलें भक्तिरसाचें वर्णन पाहून या भक्तिरसाचें प्रकरण आटोपूं. वामनरावजी ओक यांनीं कृष्णविजयाच्या एका टीपेंत पुढील उद्गार काढिले आहेत. ते कृष्णविजयांतील उत्तरार्धाच्या पुष्कळ अध्यायाप्रमाणें याही श्रुतदेव बहुलाश्वकथेच्या ८७ व्या अध्यायास उत्तम प्रकारें लागू पडतात. ओक ह्मणतातः—"पंत स्वप्रतिभाबळानें नूतन

अलंकार घडवून ते मूळग्रंथाच्या सरस्वतीवर घालून तिला कशी साजरी करितात हें पहावयाचें असल्यास त्यास हें काव्य उत्तम स्थळ आहे."

४ मिथिलानगरींत श्रुतदेव ब्राह्मण व बहुलाश्व नृपति असे दोघे श्रीकृष्णाचे अनन्य भक्त होते. श्रुतदेव हा 'वासुदेवाचा मूर्त प्रेमाचि' असा असून.

(गीति) "श्वश्रूवशसीच नियति साहित्य करी, न संग्रहीं कवडी, ।
शमधनकनकनग, न मन विषयीं, सोडूनि माधवा दवडी. ॥ ८७,३ ॥"

दरिद्री पण महाभगवद्भक्त होता. दोघेही श्रीकृष्णास सारखेच प्रिय होते.

"बहुलाश्व श्रीमंत, श्रुतदेव दरिद्र, परि सम प्रेमा, ।
ते मातेस मुत तसे प्रिय विभुस, भुले न भूतिपति हेमा. ॥ ४ ॥"

त्यांना भेटण्यास श्रीकृष्ण गेले. पंत वर्णन करितातः–

"त्या चातकां कृपाघन, चकोर कां यादवेंदु हरि दोघां ।
भेटाया जाय दयासागर त्या भक्तिप्रेमसरिदोघां. ॥ ५ ॥"

त्यावेळेस श्रीकृष्णाबरोबर परमभक्त नारदव्यासादि मुनींद्रही होते. मार्गात भेटतील त्यांचा कृष्णकृपेनें उद्धार करीत ते कृष्णाबरोबर चालले. पंत ह्मणतातः–

"त्यजिते कृष्ण सुरद्रुम मुनिशुक वरिते प्रपंचकिंशुक ते, ।
शुकते जरि न विषयफळ, मुकतेचि सुखासि, समय हा चुकते. ॥ ७ ॥
अक्षय अमृतकलशविभु, सकरुण मुनिवैद्य, कविमना वाटे, ।
भवरोगियांसि वांटुनि जोडिति पुष्कळ यशोधना वाटे. ॥ ८ ॥"

कृष्णास पहावयास येणाऱ्या लोकांच्या उत्कंठेचें वर्णनः–

"जनपदजन पदपंकज परपुरुषाचें पहावया येती, ।
घेती आकंठ अमृत, सुतृषित उद्गार फारसे येती. ॥ ९ ॥
अन्नप्रदसदनातें दूरुनि धांवोनि येति दुष्काळीं, ।
तैसे चतुर्विधहि जन मज्जति अमृतऱ्हदीं जगत्पाळीं. ॥ १० ॥
कृष्णागमनश्रवणीं झाल्या स्नानाशनक्रिया शिथिला, ।
मिथिला सीतोपयमावरि पाहे या सुखप्रदा तिथिला. ॥ ११ ॥"

मिथिलापुरीस प्रभु गेले तेव्हां तिनें केलेल्या उत्सवाचें वर्णनः–

(गीति) "मिथिलापुरीस जातां, करि पुष्कळ मुक्तिमूर्ति उत्सव ती, ।
जसि काय जाय माय स्वसुतासि पहावयासि भाग्यवती. ॥ १२ ॥"

मिथिलापुरस्थजनांच्या हृदयांत श्रीकृष्णदर्शनानें आनंद होऊन अष्टसात्विकभाव प्रकट झाले यांवर पंतांनीं किती खमंग रूपक योजिलें आहे तें पहाः–

"मिथिलोदरांत होते जे सात्विकभाव तीं अनादि सलें ।
तद्वृद्धिसुखप्रसवें यश कृष्णीं वैद्यसज्जना दिसलें. ॥ १४ ॥"

स्त्रीगर्भांतील सर्ले जशीं वैद्याच्या मात्रेनें वाढून प्रसवतात, तद्वत् सूतशेखर कृष्णाच्या दर्शनानें मिथिलोदरांत गुप्त असलेले अष्टसात्विकभाव प्रकट झाले हा भावार्थ. यापुढें मिथिलानगरीवर पतिव्रतेचें रूपक करून तिनें केलेल्या स्वागताचें वर्णन वाचून कोणा रसिक भक्ताचें अंतःकरण आनंदानें उचंबळून येणार नाहीं ? यांत पंतांनीं शृंगाररसवर्णनानें भक्तिरस पुष्ट केला आहे.

"बहु दिवसीं पति येतां करि बहु मिथिला पतिव्रता साज, ।
आज द्वारवती तज्ज्येष्ठसवत्नी मनीं धरी लाज. ॥ १५ ॥
धाडी पुढें स्वजनसुत शृंगारुनि ती पतिव्रता मिथिला, ।
जाऊं पाहे, परि गति लज्जाभूषाभरोत्सवें शिथिला. ॥ १६ ॥"

मिथिलेच्या अंतःकरणांत शिथिलत्व कां आलें याचीं पंतांनीं दिलेलीं तीनही कारणें फार समर्पक व पतिव्रतेस शोभणारीं आहेत. एक तर लज्जा, दुसरें भूषाभर ( दागिन्यांचा भार ), तिसरें श्रीरामचंद्र त्रेतायुगांत सीताविवाहप्रसंगीं लग्नास मिथिलेंत आले त्यानंतर द्वापरयुगांत श्रुतदेवबहुलाश्वाला भेटण्याच्या निमित्तानें आज फारदिवसांनीं श्रीकृष्णपतीचें दर्शन होणार म्हणून झालेला आनंदातिशय. ह्या तिन्ही कारणांमुळें तिच्या गतींत शिथिलत्व आलें. पुढील दोन गीतींतील पूजाप्रकार पहाः-

"मिथिलापुरवासिजनें निजनेत्रसरोरुहें उदश्रुजळें ।
प्रक्षाळिलीं प्रथम, मग भगवच्चरणीं समर्पिलीं उजळें. ॥ १७ ॥
बहुलाश्व श्रुतदेव प्रेमें धांवोनि वंदिती पाय, ।
काय उपायन दुसरें ? अर्पिति चरणीं स्ववाङ्मनःकाय. ॥ १८ ॥"

नंतर प्रभूला दोघांही भक्तांनीं आपल्या घरीं येण्याविषयीं आमंत्रण केलें तेव्हां श्रीकृष्णानें मुनिजनांसह दोन रूपे घेऊन दोघांच्याही घरचा पाहुणचार एकदमच स्वीकारला. तसें करण्याचीं कारणें फार सद्भावपूर्ण अशीं दिलीं आहेत.

"षोडशसहस्रसदनीं लग्नीं केलें तसें करायास ।
तदधिक भक्तप्रेमा कथितो मज आज लोकरायास. ॥ २३ ॥
स्त्रीच्या तोषा केलें, भक्ताच्या तेंहि जरि करीना मी ।
तरि 'दीनबंधु' 'भक्तप्रिय' या अंकित वृथा हरी नामीं. ॥ २४ ॥
श्रीशिव अनंत विधि निजरूपहि न प्रिय जसा मला भक्त ।
व्यक्त स्ववचनतदवन न घडे, तरि सदवनीं कसा शक्त ? ॥ २५ ॥
तो देव दाय, दासहि दायाद, तदर्थ दोन करि वांटे, ।
वाटे तें धन त्यासचि अर्ध न करि सर्व देव घरि सांटे. ॥ २६ ॥
समुनिजन प्रभु मूर्तिद्वय धरि, करि कुतुक थोर सांगाया, ।
रसिककविजना प्याया पुष्कळ दे देव तो रसां गाया. ॥ २७ ॥

दोघां प्रियभक्तांच्या जाय गृहातें कळों न दे त्यांस, ।
प्रभुपदघनां नमूं नतचातकिं ह्या रस वळोन देत्यांस. ॥ २८ ॥"

बहुलाश्वाच्या भावाचें व वैभवाचें वर्णनः–

"बहुलाश्व मुनिजनासह घेउनि जाय स्वमंदिरा हरिला, ।
करि लास्य, हास्य, हर्षवि न रिपुयशोराशिही रणीं हरिला. ॥ २९ ॥
श्रीवरचरणरज पडति शत, न तसा विभव भवसखावासीं, ।
तो भवभक्त असो परि विरळचि याच्या तुळेल भावासी. ॥ ३० ॥
रत्नासनें मनोरम सुसर्शे त्यांवरि द्विजांसहित ।
बैसविला बहुलाश्वें नमुनि श्रीचरण सर्वदासहित. ॥ ३१ ॥
चरण प्रक्षाळुनि तीं तीर्थजळें घे कुटुंबसह माथां, ।
सकुटुंब होय शिव नृप, शिवहि धरी त्यासि मस्तकीं पाथां ॥ ३२ ॥"

राजानें भगवच्चरण स्वांकावर घेऊन त्याविषयीं केलेलें भावपूर्ण भाषणः–

"पूजन करुनि प्रेमें कर जोडुनि तो ह्मणे, 'अहो ! नाथा ! ।
पाथा या पायांच्या कोणा पुण्यें सुपात्र हा माथा ? ॥ ३३ ॥
श्रीपदकें पदकें ही अंकीं माझ्या अहा ! महा चित्र ! ।
हे ! करुणावरुणालय ! अरुणानुज काय या मला मित्र ? ॥ ३५ ॥
त्वत्पदसुरतरु पुरविति भक्ताच्या मनि शिरोनि आवडिला, ।
सुकविजनी ह्मणउनि भवदंघ्रिसरोरुहपराग सांवडिला. ॥ ३६ ॥
बंधु अनंत, तनुज विधि, भार्या श्री, त्यांपरीस कोटिगुणें, ।
भक्त प्रिय परम; खरें आतां या किंकरासि काय उणें ? ॥ ३७ ॥
स्फुरलें पादस्पर्श हें देणें तों तुझें नव्हे देवा ! ।
हें फळ फळली कळली कल्पलता भूमिदेवपदसेवा. ॥ ३८ ॥
येथें बहु दिवस रहा, चरणनखामृतकरांशु सेवूं, दे, ।
या तृषितचकोरांला, देवा ! उद्गार फार येवूं दे. ॥ ३९ ॥
हे पाय माय काय प्रायः स्वायत्त बाळ सोडील ? ।
जोडी लक्ष त्यागुनि आधीं संसारबंध तोडील. ॥ ४० ॥"

श्रुतदेवानें केलेल्या स्वानंदपूर्ण स्वागताचें वर्णनः–

"श्रुतदेवहि मुनिवृंदासह ने आत्माश्रमास, 'सुखकंदा ।
वंदा' ह्मणे निजजना 'वंदारुसुरद्रुमा निजानंदा'. ॥ ४२ ॥
तो उत्तरीयवस्त्र प्रेमभरें उडवुनी करी नृत्य, ।
भृत्य प्रभुचा झाला अमित भवांत भ्रमोनि कृतकृत्य. ॥ ४३ ॥
भेटे करुणाब्द विभु श्रुतदेव मयूर संमदीं नाचे, ।
दीनाचे श्रम सरले, ऱ्हद बुडतां आटले नदीनाचे. ॥ ४४ ॥

व्याघ्रमृगाजिनकंबळतृणकाष्ठकुशासनें तया मांडी. ।
पूजी सिद्धपदार्थीं, प्रेम पुरे, सर्व गडबडी, सांडी. ॥ ४५ ॥
श्रुतदेवाच्या दृष्टी अर्पूनिहि अश्रुजल पुढें होती, ।
जेव्हां श्रीचरणावरि साध्वी शुचि शीतळें जळें ओती. ॥ ४६ ॥
समुनिविभुपद क्षाळुनि करि सादर मानस त्वरा, शिशिरें ।
तीर्थजळें स्वकुटुंबा न्हाणुनि धरि तोहि सत्वराशि शिरें. ॥ ४७ ॥
नाचे श्रुतदेव पुन्हां, पूजेचा राहिला विधी अर्धा; ।
गंगाधर करि तांडव, त्यांसी यासींच लागली स्पर्धा. ॥ ४८ ॥
पूजाक्रम स्फुरेना, प्रेमभरें जें घडे न तें थोडें, ।
केवळ अडे तयाहुनि चालींत मनस्वि तें बरें घोडें. ॥ ४९ ॥"

शेवटील पद्यांतील उपमेनें श्रुतदेवाच्या प्रेमातिशयामुळें पूजाविधींत उडालेली गडबड मोठ्या बहारीनें थोडक्यांत वर्णिली आहे. उपमा साधी व व्यवहारांतील असून तीमुळें श्रुतदेवाच्या तत्कालीन मनःस्थितीचें सुंदर चित्र वाचकांच्या डोळ्यापुढें हुबेहुब उभे राहतें. श्रुतदेवानें केलेल्या भगवंताच्या पुढील पूजाविधीचें पंतकृत वर्णन फारच सुंदर आहे. पुढील गीति पहाः—

"दे मुनि अमृतफळप्रद भगवद्धस्तांत आवळे बोरें, ।
थोरें तयांत बीजें परि देवा नीरसें न न कठोरें. ॥ ५० ॥
विमळ उशीरसुवासित हिम मधुर प्राशनासि दे तोय, ।
तत्प्रेमरससतृष्णा कृष्णाला सत्य अमृत तें होय. ॥ ५१ ॥
होती जीर्णा कांहीं कस्तूरी, लाविला तिचा टिकला, ।
शोभे श्रीपतिभाळीं, मधुकर इंदीवरीं जसा टिकला. ॥ ५२ ॥
घाली कुशपिंजूलग्रथित पवित्रें स्वबंधुच्या बोटीं, ।
मोठीं रत्नें ज्यांवरि त्या मुद्रा फार लाजल्या पोटीं. ॥ ५३ ॥
सात्विकभावें कांपे श्रुतदेव पवित्र घालितां बोटीं. ।
तों वरदवर पसरि करसरसिज निजकिंकरीं कृपा मोटी. ॥ ५४ ॥
बहु कोमळ तुळशीची अर्पी कंठांत मंजरीमाळा, ।
बाळा तद्भक्ति तदा वरि जाणो त्या जगत्रयीपाळा. ॥ ५५ ॥
चरणीं कमळ समर्पी, तें जाणों आपुलेंचि हृत्कमल, ।
शमलघ्न प्रभुचें मग गद्गदगल साधु गाय यश अमळ. ॥ ५६ ॥
भगवद्रूपमुनी ते भगवंतासह समर्चुनी भक्तें ।
आकंठ तर्पिले जो मूर्त विशद आत्मभाव त्या भक्तें. ॥ ५७ ॥
तै तर्क करी मुनि कीं, 'मी दीन गृहांधकूपभेक मला ।
मानससरोवरींचें हंसत्व अलभ्य लाभ हा गमला.' ॥ ५८ ॥"

प्रस्तुत श्रुतदेव ब्राह्मणाच्या भाषणांतील सर्वच रूपकें फार मार्मिकपणें योजिलीं आहेत. 'गृहांधकूप' भेकाची उपमा तर अतिशय समर्पक व खुबीदार आहे. आधीं अंधार कूप, त्यांतून तो घरांतील, तेव्हां प्रकाशाचें नांव नको. अशा स्थळींचा भेक ह्मणजे बेडूक. पहिल्यानें कूपमंडूक एवढाच शब्द पुरेसा निंदावाची होता, त्यांत विशेष दाखविण्याकरितां 'अंधकूप' शब्दाची योजना करून, त्याहीपेक्षां विशेष 'गृहांधकूप' शब्दाची अत्यंत मार्मिक शब्दयोजना करून दाखविला आहे.

यापुढें, 'मी तर कांहींच पुण्य आचरलें नसून भगवान मुनिसह मज दरिद्राच्या घरीं कसें बरें आले असा तर्क करित श्रुतदेव ब्राह्मण भगवंताचे पाय चुरित असतां भगवंताला त्याविषयीं विचारूं लागलाः–

"तीर्थांच्या व्यवहारा चालविती साहुकार जे आद्य ।
ते मुनिचरण दरिद्रा मज देती मान घेउनी पाद्य. ॥ ५९ ॥
या मुनिधनिकांचेही मूर्तमहाभाग्य मद्गृहा आलें. ।
हे सर्वज्ञ न चुकले मार्गातें; हें असें कसें झालें ?' ॥ ६० ॥
तो सकुटुंब प्रभुचे पाय चुरी तेधवां ह्मणे, 'देवा ! ।
जे श्रवणादिपर जन प्रकटसि त्यांच्या मनींच तूं ठेवा. ॥ ६१ ॥
तें मज कांहींच नसे, घडलें प्रत्यक्ष दर्शन स्वामी ! ।
येतिल काय ? दयाळा ! नवनिधि सालसदरिद्रजनधामीं ? ॥ ६२ ॥
आलें असेल काय प्रेमभरें या मुखा तुझें नाम, ।
कीं एखाद्या जन्मीं क्षण सादर पाहिलें तुझें धाम ? ॥ ६३ ॥"

नंतर श्रुतदेवानें भगवंतास भजनरहस्य सांगण्याविषयीं प्रार्थना करितांना ह्मणतोः–

"होय प्रसन्न जेणें मन भजनरहस्य तें पुन्हां बोला. ।
कुक्षींत क्षेत्राच्या अर्पावें बीज जों असे वोला.' ॥ ६४ ॥"

पुढें भगवंतानें श्रुतदेवाजवळ वर्णिलेला संतमहिमाही फार सुंदर आहे. त्याचा उत्कृष्ट मासला चाखून कृतकार्य होत्साते आपणही अत्यंत प्रेमळ व सुरस अशी प्रेमभक्ति, विरक्ति, भगवत्प्रबोध व परा शांति यांना देणारी भक्तिरसाची मेजवानी भगवन्नामसंकीर्तनाच्या गदारोळांत आटोपूं.

श्रीकृष्ण भगवान् श्रुतदेवास संतमाहात्म्य वर्णन करितांना ह्मणतातः–

"देव ह्मणे, 'श्रुतदेवा ! आले घेवूनि हे मुनी मजला, ।
भजला यांसि सुधी जो तो मोक्षपदासि जावया सजला. ॥ ६५ ॥
झाले प्रसन्न यास्तव हें निजधन बांधिलें तुझ्या पदरीं, ।
सांचविले वृत्ति करुनि पक्वापक्कीं उदुंबरीं, बदरीं. ॥ ६६ ॥
कष्टे जोडुनि वांटिति, निजधन हे मुनि उदारकर सर्व. ।
करिती काय कळेना हरिती जो सुरभिकल्पतरुगर्व. ॥ ६७ ॥

सदय उदार शुचिव्रत यास्तव यांच्या धना नये तोटा, ।
करिति क्षणांत राजा रंक, चमत्कार हा जगीं मोटा. ॥ ६८ ॥
तो दानपात्र उत्तम जो जन यांच्या पदावरी लोळे, ।
निजपदपूजन घेउनि देती सर्वस्वदान हे भोळे. ॥ ६९ ॥
हिंडति हे मज घेउनि, निजचरणरजें जगन्मळा धूती, ।
देवक्षेत्रें तीर्थें मिरविति याहींच जी दिली भूती. ॥ ७० ॥
ब्राह्मण उगाचि गुरु, जरि तुष्टि तप श्रुत सुगंध तो हेमीं; ।
साधो ! ऐसाहि जरी मत्पर तरि तो मनुष्य नोहे मी. ॥ ७२ ॥
दयित ब्राह्मण मजला, कौस्तुभ हा दृष्टमणि खरें समज, ।
जगदिष्ट श्री प्रियहि स्वचतुर्भुजरूप हें तसें न मज. ॥ ७३ ॥
विप्रार्चन तें माझें, माझेंचि बरेंहि नावडे मजला; ।
आज्ञा न करि, करि स्तुति दास, तसा ब्राह्मणां न जो भजला. ॥ ७५ ॥

(कृष्णविजय अ० ८७)"

हें श्रुतदेवबहुलाश्वाचें आख्यान भागवतांतील उत्तम भक्तिपर आख्यानांपैकीं एक असून तें पंतांनीं अलंकारादिकांनीं सर्वोत्कृष्ट सजविलें आहे. यांत भक्तिरस जसा कांहीं प्रत्येक आर्येतून उचंबळत आहे! या भक्तिरसाला पंतांनीं पतिव्रतेच्या शृंगाराची पुष्टि दिल्यामुळें तो अतिशयच खमंग झाला आहे.

भागवतांत गोपींचें कृष्णाविषयीं वर्णिलेलें प्रेम पंतांनीं मंत्रभागवत, बृहद्दशम, हरिवंश, व गोपीगोडवा इत्यादि स्फुट प्रकरणें यांतून अत्युत्कृष्ट वर्णिलें आहे. त्यांत भक्तिरस आमूलाग्र सारखा थबथबत आहे. त्यांतील थोडासा नमुना येथें दाखवितों.

५ अक्रूर कृष्णास नेण्यास आला तेव्हां भाविविरहामुळें गोपींस झालेल्या दुःखाचें पंत चटकदार वर्णन करितातः—

(गीति) "भवनें कारागारें, काय महाभार, हार ते साप, ।
पति अतिखळ, विषतरुचीं फुलें मुलें गमति; पावल्या ताप. ॥

(मंत्रभागवत १०.४९८)

गजबजले प्राण सकळ, धैर्यें मन सोडिलेंचि हस्तींचें; ।
गोपींत विरहभय तें शिरलें, कदलींत यूथ हस्तींचें. ॥ ४९९ ॥
वदनीं 'गोविंद ! हरे ! दामोदर ! राम ! कृष्ण ! हे वाणी. ।
चित्तांत चक्रपाणी, गोपींच्या लोचनद्वयीं पाणी. ॥ ५०० ॥"

६ उद्धवशांतवनप्रसंगाच्या पुढील थोड्या निवडक गीति पहाः—

उद्धवाचा रथ गोकुळांत आलेला पाहून अक्रूर पुन्हा आला असें वाटून गोपिका ह्मणतातः—

"वाड्यापुढें सकाळीं रथ पाहुनि ह्मणति गोपिका, 'गेला ।
घेऊनि जीव कंसश्राद्धा नेणार मांसहि, मेला.' ॥
(मंत्रभागवत १०.५९०)"

पुढें उद्धव गोपींचें भाग्यवर्णन करून गोपींस कृष्णानें सांगितलेलें ज्ञान सांगतो. तेव्हांचें वर्णन पहाः-

(गीति) "सुज्ञशिरोमणि उद्धव, बहु त्यांचें प्रेम, भाग्य वाखाणी; ।
त्यांसि ह्मणे, 'बाई हो ! अमृताची प्रेमभाव ही खाणी. ॥ ६०२
देहीं, गेहीं, झालें चित्त उदासीन, कृष्णगुण गातां; ।
झालां कृतार्थ, जन्मुनि उरलें कर्तव्य काय हो ! आतां ? ॥ ६०३
वाचिक तुमच्या दयिता कृष्णाचें सांगतों तुह्मां, परिसा'. ।
ह्मणुनि असें ज्ञान कथी यांसी सुविशुद्धकांचनीं परिसा. ॥ ६०४
यदुनाथें पाठविलें ज्ञानामृत पाजिलें, तथापि सती ।
भगवदधररसतृषिता नाहीं उपदेशिल्या तशा दिसती. ॥ ६०५
नव पीयूषसमुद्रीं पतन चकोरांसि जरि घडे विधिनें, ।
तदपि अमृतकरचि तयां प्रिय, सुख त्यां त्याचियाचि सन्निधिनें. ॥ ६०६
मोठा शुद्धोद असो, घनाविना चातकीस तो मरुची; ।
तैसें सगुणावांचुनि निर्गुण गोपींस लेश दे न रुची. ॥ ६०७
भर बहु सगुणचरित्रीं गोपींचा, नित्य तेंचि आठविती. ।
पढवुनि भक्ति, बहु दिवस ठेवुनि, मग उद्धवासि पाठविती. ॥ ६०८
गवळयांच्या शिष्यपणीं सुरगुरुचा शिष्य जाहला धन्य. ।
अन्य स्पष्टचि, सगुणप्रेमावांचूनि, पंडितंमन्य. ॥ ६०९
(मंत्रभागवत १०)"

उद्धव गोपिकांस ह्मणतोः-

(आ० गी०) "धन्य तुह्मी ! कवि भुवनीं गाति यशा, सेविला त्रिलोकविभु वनीं; ।
बहुसुकृतीं बहुजननीं साधे हरिभक्ति सर्वमंगळजननी. ॥
(कृष्णविजय ४७.६५)

बहु बरव्यापरि चरणीं हरिच्या भक्ति प्रवर्तविलि परिचरणीं. ।
त्यजुनि पतिगुरुकुलभया; मुनिवर्यालाहि नव्हति सिद्धि सुलभ या. ॥ ६६ ॥
तुमचें प्रेम न मापीं सांठे; मोजील कोण त्या ? मन मापीं; ।
जालों कृतकृत्य हिमीं तप्त निवालों तसाचि, हरिभृत्यहि मी. ॥ ६७ ॥"

उद्धव गोपिकांस कृष्णसंदेश सांगतोः-कृष्ण ह्मणतो, 'गोपिकांनो ! मी तुह्मांपासून दूर गेलों याचें कारण विरहावस्थेंत तुमचें मजवरील प्रेम वाढून माझें सतत ध्यान तुह्मांला घडावें हें होय. असें ध्यान प्रियजन जवळ असतां घडत नाहीं.

"स्थिति माने दूर सती! कीं प्रेमाचा विटोंचि नेदू रस ती. ।
मद्ध्यान बहु घडावें, स्वसुखनिधिद्वार आपणचि उघडावें. ॥ ४७.७६ ॥
दूर प्रियजन वसती; देखाया करिति नित्य नवस नव सती; ।
सहवासीं त्यासम न, प्रेम धरुनियां, भजे सदा त्यास मन. ॥ ७७ ॥
मी सुखधाम जपावा, ध्यावा, गावा, पथें अशा मज पावा. ।
सुखनिधिला गिंवसाल स्वपदीं, भेटोनि शांतिलागि, वसाल. ॥ ७८ ॥"

गोपींच्या प्रेमासारखें प्रेम यादवांचेंही नव्हतें, साधूंचेंही नाहीं. पंत ह्मणतातः—

(आ०गी०)"गोपींचें कृष्णीं तें प्रेम जसें, सर्वथा नसे वृष्णीतें; ।
सर्वेहि शुद्ध वरिती ब्रह्म सगुण, गाय तेचि उद्धव रीती. ॥ ४७.१०३ ॥
गोपी सफळजनु जनीं, आत्माधिक इष्ट ज्यासि शौरितनुजनी. ।
भक्त मुमुक्षु ज्ञानी काय अधिक? यांसि पूजिजे सुज्ञांनीं. ॥ १०७ ॥
वांछिति ज्या प्रेम्यातें साधु सकळ, येथ देखिलेसे म्यां तें; ।
जरि गोपवधू तरि ते सिद्धि असे यांसि, अन्य अवधूत रिते. ॥१.१०८॥
'हें ब्राह्मणजननींच प्रेम शुचित्वें घडे, इतर जन नीच,' ।
ह्मणतां अन्यायाची जोडि असे; योग्यताचि अन्या याची. ॥ १०९ ॥
यन्मनबाळक थानीं लावियलें सदयविश्वपाळकथांनीं, ।
त्यांस अशा सन्मानीं काय अधिक विप्रविप्रवरजन्मांनीं? ॥ ११० ॥"

उद्धव ह्मणतोः—महत्वाला कारण जात्याचरण किंवा ज्ञान नसून प्रभुभजनद्वारा प्राप्त होणारा भगवच्चरणप्रसादच होय. ह्मणून सर्व भक्तजन त्याचीच इच्छा करितात.

"हेतु महत्वा चरणप्रसाद हरिचा; तयास जात्याचरण ।
ज्ञानहि न हेतु; भजन प्रभुचें केवळ तदिच्छु सर्व शुभ जन. ॥ १११ ॥
यांचें भाग्य बहुचि; तें वानाया दशशताननेंहि न उचितें. ।
शक्ति नसे, वानावे किति? गाउनि परि करावि सेवा नावें. ॥ ११६ ॥"

उद्धव गोपींच्या दुर्लभपदरजाचा लाभ आपणास व्हावा ह्मणून गोकुळांत लतातृणांत तरी जन्म होवो अशी ईश्वरापाशीं प्रार्थना करितोः—

"कृष्णकृपा होउ घडो प्रार्थित, हें सदय दैव पाहो उघडो. ।
वाटे मज लाभ लतागुल्मतृणोद्भवहि येथ मजला भलता. ॥ ११७ ॥
इच्छीं अवरजनुस, तें यास्तव कीं पदसरोजभवरज नुसतें ।
गोपींचें असुलभ या माथां ठेवूनि पाय हरिल कुलभया. ॥ ११९ ॥
जरि अनुकंपा दीनस्वर्द्रुम हरि करिल, हेंचि संपादीन, ।
गोपींचें पायतण स्पर्शों, व्हावें करूनि सदुपाय तण. ॥ १२० ॥
गोपींच्या पायांला नमन, नसे भेद शार्ङ्गचापा यांला. ।
भजती हरिस ख्यातें चरितें, गाती स्मरोनि हरिसख्यातें. ॥ १२५ ॥"

उद्धव परत जातांना त्याच्यापाशीं नंदगोपिकादि व्रजवासी कृष्णाची प्रार्थना करून मागणें मागतातः–

(आ०गी०)"अस्मन्मानसवृत्तीहंसीला हरिपदाब्जमानस वृत्ती ।
या ऐसें वरदास प्रार्थी जातांचि, मागतों वर दास. ॥ १२९ ॥
वाणीसहि लावु चटी हरिनाम, न विस्मृति क्षण जिला उचटी, ।
आह्मां हा हो सण, तां विनवावा हरि, मुखास ये वोसणतां. ॥ १३० ॥
त्या सदुदारा बावा उद्धवजी ! माग कीं सदा राबावा ।
सेवेंतचि देह, रितें पळ, न टळो फार दास्य रुचि दे हरि ! तें, ॥ १३१ ॥
कर्मेंचि परिभ्रमतां वारावा कर्मभोग न, परि श्रम तां ।
उरवावा न, मनांत प्रेम असो फार माधवा ! नमनांत. ॥ १३२ ॥
निष्कामत्वें शुचितासंपन्ना सत्क्रिया घडाव्या उचिता. ।
त्यावनदक्षभुजातें वद, आश्रय दे पदांबुजेंचि सुजातें. ॥ १३३ ॥
न पदापरती राहो मति, सदय भवांबुराशिपरतीरा हो !' ।
हें हरिस वदा, 'विसरा न तृषार्ता, जो कुळप्रसव दावि सरा.' ॥ १३४ ॥
(कृष्णविजय अ० ४७)"

ज्यांच्या भगवत्प्रेमास सीमा नाहीं; ज्यांचें प्रेम भक्तश्रेष्ठ नारदानें 'नारदस्तु-तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति । अस्त्येवमेव । यथा व्रजगोपिकानाम् ।' या सूत्रांतून सर्वोत्कृष्ट भक्तीचें लक्षण मानिलें आहे त्या कृष्णप्रिय–नव्हे कृष्णरूप–गोपिकांच्या चरणरजांस कोटिशः प्रणाम करितों. या 'मंगलानां च मंगलम्' अशा प्रेमास वैषयिक मानणारे लोक अत्यंत हतभागी होत.

भक्तिरसवर्णनाचीं अशीं आणखी किती तरी प्रकरणें पंतकाव्यांत आहेत ! किंबहुना, हा भक्तिरस पंतकाव्यांत मूर्धाभिषिक्त असल्यामुळें त्याची व्याप्ति कमी जास्ती प्रमाणानें सर्वत्र आढळते. तेव्हां अधिक वर्णनाचा मोह आवरून आह्मी हें भक्तिरसविवेचनरूपी सुंदर पक्वान्न श्रीमंताचे अर्थात् श्रीरामरायाचे चरणीं निवेदन करून त्यांजपासून वारंवार श्रीतुलसीदासांच्या शब्दांनीं पुढील वरदान मागतोंः–

**'बारबार वर मांगिहूं हर्षि देहु श्रीरंग ।**
**पदसरोज अनपायिनी भक्ति सदा सतसंग ॥**

(तुलसीरामायण...)'

सारांश, वर दिलेल्या भक्तिरसवर्णनाच्या मूळाशीं **परमार्थसाधन** हें असल्यामुळें पंतांच्या काव्यांत भक्तिरसाचा पाक अमृततुल्य मधुर झाला आहे असें चाणाक्ष वाचकांस कळून येईल. यासंबंधीं लिहितांना पंतांच्या काव्यांची योग्यता कालिदास, भारवी, दंडी इत्यादि संस्कृतकविवर्यांच्याही वरची आहे

असें एका नामांकित विद्वद्वर्याचें (प्रो. रा. रा. भागवत) ह्मणणें आहे. त्यांच्या मतें पंतांची कविता कालिदासाच्या कवितेप्रमाणें प्रसन्न असून भारवीच्या कवितेप्रमाणें ती भारदस्त आहे. तसेंच, 'मोरोपंती भारतांतील कांहीं आख्यानें नीट समजलीं म्हणजे सगळा कालिदास व सगळा भारवी वाचल्याचें श्रेय मिळून आणखीही अधिक लाभ होतो. तो लाभ भक्तिरसाचा व देवाविषयीं आस्तिक्यबुद्धीचा होय. भक्तिरसाचा लाभ कालिदासाच्या काव्यांत फारसा होण्याचा संभव नाहीं. भारवीनें आपल्या काव्यांत भक्तिरसाचा छटा निःसंशय उडविलेला आहे. पण कोठें मोरोपंती भक्तिसागराचा अलोट पूर व कोठें भारवीची भक्तिरसानें मंद मंद वहात जाणारी छोटी सरस्वती.' सारांश, ज्या ज्या स्थळीं पंतांनीं ईश्वराविषयीं किंवा ईश्वरभक्ताविषयीं उद्गार काढिले आहेत त्या त्या स्थळीं त्यांची वृत्ति लीन व तदाकार झालेली दृष्टीस पडून त्यांचें काव्य सुरस, आनंदजनक व माधुर्यप्रसादादिगुणगणमंडित झालें आहे. पंतांच्या काव्यरूपी महावस्त्रांत नीतितत्त्वांचा बोध करणारीं सुभाषितरत्नें जागोजागीं गुंफिलीं असल्यामुळें काव्याची प्रभा द्विगुणित वाढून वाचकांचीं मनें बोधप्रकाशमय होतात. पंतांच्या काव्यांतील सुभाषितसंग्रह एवढा मोठा आहे कीं, तो सर्व एकवटला असतां मनास बोधपर व उन्नतिपर असें शिक्षण दुसऱ्या कोणत्याही पुस्तकाचें फारसें साह्य न घेतां सहज देतां येईल. त्यांच्या सुभाषितांचीं कांहीं निवडक उदाहरणें परिशिष्ट, 'ञ' मध्यें दिलीं आहेत. मोरोपंत कवि रसिक होते ही गोष्ट त्यांचें काव्य वरवर वाचून पाहाणारांच्या सुद्धां दृष्टीस येईल. त्यांनीं आपल्या काव्यांत रसिकत्वाविषयीं पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केले आहेत (परिशिष्ट 'ई' पहा).

**तसेंच, त्यांच्या काव्यांतून प्रसंगोचित, खुबीदार व बाणेदार भाषणें, व हृदयंगम वर्णनें यांचा सुकाळ दिसून येतो.** विस्तारभयास्तव त्यांचीं उगीच थोडींशीं निवडक उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

(१) **गुरुसेवेचें उत्तम वर्णन.** हृदयंगम उपमाः—

(गीति) "गुरुसदनीं वेद जसा, विषयीं तैसा न देह राबेल, ।
तो दास्यरूप वाहे त्या नित्य, चुकों न दे हरा बेल. ॥
(आदि. २.२५)"

(२) **वात्सल्ययुक्त प्रेमरसाचें सुरेख वर्णन** कृष्णाक्रूरांच्या भेटीच्या प्रसंगीं आलेलें आहे. त्यांतील उपमा तर फारच बहारीच्या आहेत.

(गीति) "सुटला दाव्यापासुनि वत्स स्तन्यार्थ जेंवि गाईला ।
धांवे, अक्रूर तसा भेटाया कडकडूनि आईला ! ॥
(मंत्रभागवत १०.४८१)"

( ३ ) **शिशुलालनसौख्याचें वर्णन** वरोत्कंठित शर्मिष्ठा करित्ये, त्यांतील वात्सल्य पहाः—

( गीति ) "शिशु पाळण्यांत घालुनि, हालवितां, निजवितां, सुखें 'जो जो'।
धात्री ह्मणति, सखीला अमृतरसचि तो, निघे मुखें जो जो. ॥
( आदि. ११.३ )"

ययातिराजानें आपला भार्यात्वानें स्वीकार करावा, ह्मणून शर्मिष्ठेनें त्याजपाशीं केलेली प्रार्थना किती खुबीदार आहे ती पहाः—

"द्वारीं मृगपतिहस्तांतूनि अहो ! वीरराय ! जी मुक्ता, ।
ती सेविजेल इतरें सिंहावांचूनि काय जी ! मुक्ता ? ॥ ( आदि.११.८ )"

राजाचें पुढील उत्तरही तसेंच खुबीदार आहेः—

"नृपति ह्मणे, 'जें वदसी, जाणतसें मी, यथार्थ सुंदरि ! तें. ।
सरस असोचि मधुप बहु मनिं जरिहि रसें करूनि कुंद रितें.' ॥११.९॥"

शेवटीं, शुक्राचार्यांच्या निषेधास्तव स्वीकार करावा किंवा करूं नये याविषयीं उभयतांचें भाषण होऊन अभीष्टवरदानव्रताचें निमित्त करून कामुक राजानें तिचा मनोरथ पूर्ण करण्याचें ठरविलें. तेव्हांचें वर्णन पहाः—

"ऐसें वदे नृपति; मग याया त्या सुंदरीस मुदतिशय, ।
हांसे; ह्मणे, 'धरूं दे सुंदरि ! रंभोरु ! सुभ्रु ! सुदति ! शय' ॥११.१४॥"

वरील गीतींतील संबोधनें शर्मिष्ठासंगेच्छु राजाच्या मुखांत कवीनें मोठ्या चातुर्यानें घातलीं असून तीं भावि रतिक्रीडेचीं सूचक आहेत. पुढील उभयतांचें मीलन कवीनें किती सफाईदार व अर्थपूर्ण शब्दांनीं सरस असें वर्णिलें आहे तें पहाः—

"केली कृपा नृपानें, प्रथम स्वमनीं नमूनि त्या ऋषितें. ।
प्याली तीहि चकोरी पतिमुखचंद्रामृता मनें तृषितें. ॥ ११.१५ ॥"

( ४ ) विश्वामित्राला वश करून त्याचा तपोभंग करण्याविषयीं इंद्राची मेनकेस आर्जवयुक्त आग्रहाची प्रार्थना व त्यावर तिचें उत्तर हीं दोन्हीं फार मार्मिक आहेत. त्यांचा मासला पहाः—

"तूं पात्र, गाधिजाला सदुपायन करुनि देह, तुतितें हो. ।
हरि वारंवार असें, स्वकरेंचि धरुनि, वदे हनु तितें हो !
( आदिपर्व. ॥ १२-१९ ॥ )

भ्रूधनु ओढुनि कज्जलविषदिग्धकटाक्षशर वरारोहे ! ।
सोडुनि लुटीं तपोधन, सौभाग्यश्री तुझी भरारो हे. ॥ १२-२० ॥

ती अप्सरा ह्मणे, 'तो भस्म करिल मज महातपा शापें, ।
जाइल कवण यमाच्या, जोडुनि बळेंचि हात पाशापें ? ॥ १२-२१ ॥
मी अबला भीरु कशी साहों त्या गाधितनय तेजातें ? ।
भ्यालासि असा दुःसह मानुनियां तूं हि सुरपते ! जातें (=ज्यातें) ॥२२॥
जें दुष्कर पुरुषवरा तुजहि, कसें करिल काज रामा तें ?
सदमृततरु तो मुनि, परि कपटें होईल काजरा मातें. ॥
करिल कसें मांजर ? जें दुष्कर हरिहननकाज वाघास. ।
न शकति अग्निविधु; कसा दिनमणिचा करिल काजवा घास ? ॥ २५ ॥
त्या मुनितें मोहाया हा जन काय प्रभु ? प्रभो ! परि तें ।
तेज पहाया जातें; परिजनगत नाथतेज जय करितें. ॥ २६ ॥"

(५) दुष्यंतशकुंतलाख्यानांतील दुष्यंताचें शकुंतलेशीं पुढील भाषण पहाः–

(गीति) "नृपति ह्मणे,' तरि सुंदरि ! सुदति ! मुदतिशय तुला, मलाहि घडो; ।
सत्कृतिशीं रसिकाची; माझी तुजसीं तसीच गांठि पडो. ॥ १२.३७ ॥
कुलशीलगुणांहीं तूं योग्या, नृपकन्यका, महोदारा; ।
घे राज्य सर्व, नाहीं त्वदधिक मज अन्य काम, हो दारा.' ॥ ३८ ॥"

वरील भाषणांतील पदलालित्य, रसिकाची उपमा वगैरे प्रशंसनीय आहेत. तसेंच, दुष्यंताची कामुकता ही त्यांत स्पष्ट प्रकट झाली आहे. यावरील शकुंतलेचें उत्तर फार मार्मिक, सूचक, व मंजुल असून कुलीन स्त्रीला अत्यंत समुचित असें तें एक सुंदर ध्वनिकाव्य आहे.

"हांसुनि तीहि ह्मणे, 'हो ! प्रार्थावें प्रणतपारिजातातें; ।
देवा स्वयें वहावें या निजकारुण्यवारिजा तातें. ॥ १२.३९ ॥
मजकरवीं न तुह्मीं बुध गुरुमर्यादातिपात करवा हो ! ।
सत्पात्रीं स्वधनातें चिंतामणि कण्वतातकर वाहो.' ॥ ४० ॥
भूप ह्मणे, 'गांधर्वें तुजशी होईन शीघ्र अन्वित मी. ।
नाहीं तरि अदयस्मरशरहत झालों, बुडेन तन्वि ! तमीं. ॥ ४१ ॥
सुत युवराज असो, हा वरुनि वर निका शकुंतला आली ।
झाली; करांत याच्या मधुपवरनिकाशकुंतला आली. ॥ ४४ ॥".

वरील गीतींत कण्वाची वत्सलता व कल्पवृक्षासारखा उदार स्वभाव, शकुंतलेचें पितृप्रेम, कुलधर्मोचित शालीनता, राजाविषयीं तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला अनुराग; 'देव' शब्दांतील सुंदर श्लेष (=१ राजा, २ देवता), वडिलांच्या मर्यादेचें उलंघन न व्हावें ह्मणून तिला वाटत असलेली काळजी, राजाची कामुकता, कामुकतेस वश न होण्याविषयीं शकुंतलेनें राजास दिलेला इषारा, वगैरे गोष्टींमुळें

वरील गीति अत्यंत हृदयंगम झाल्या आहेत. यांतील वर्णनास मूळांत फारच थोडा आधार आहे.

( ६ ) पुत्रप्राप्त्यर्थ बोलविलेल्या व 'वर माग' म्हणणाऱ्या अश्विनीकुमारांस माद्रीचें पुढील भाषण किती खुबीदार, समयोचित व हृदयंगम आहे तें पहाः—

(गीति) "माद्री हांसोनि म्हणे 'जाणुनि हृद्रोग, त्यासि अगदानें ।
दूर करा जी ! रोगी न निवे कनकाचियाहि अग-दानें.' ॥
( आदि. १८.९७ )"

अश्विनीकुमार हे देवांचे वैद्य होते तेव्हां वरील गीतींत योजिलेला रोगी व वैद्य यांचा दृष्टांत फारच समर्पक आहे.

( ७ ) **विचित्रवीर्यराजाची कामवशताः-**

"नृप कामात्मा झाला; लावण्य, प्रेम अतुळ दोघींचें; ।
वाहे शृंगाररसीं तन्मानस, जेंवि पुष्प ओघींचें. ॥ १४ ॥ ( आदि १४ )
स्त्रीविषय सातवर्षें रात्रिदिव भोगितां न तो धाला. ।
झाला वश कामाला अहिता; न हिता स्वकीय बोधाला. ॥ १५ ॥"

( ८ ) मदालसोपाख्यानांत ऋतुध्वज नायक व मदालसा नायिका यांची पाताळांत प्रथम भेट झाली. तेव्हांच्या वर्णनांतील 'शुचि' ( शृंगार ) रस पहा:-

"रत्नकनकपर्यंकीं पाहे तो रतिसमा नवी रमणी ।
अवलोकिला तिनेंही सहसा हा स्मरसमान वीरमणी. ॥ अ० २,११ ॥
पर्यंकावरुनि उठे, त्यातें अवलोकितांचि ती मोहे, ।
जळपवनाद्युपचारें स्वस्था तीची सखी ह्मणे, 'हो हे.' ॥ १२ ॥"

दोघांचा विवाहविधिः-

"तो तुंबरु संपादी दोघांच्या सुविधिनें विवाहातें, ।
वंदूनि आखुवाहा, हंसवृषभवाहसह विवाहातें. ॥ ५१ ॥"

नूतन वधूवरांस उपदेशः-

( वधूस उपदेश )

( गीति ) "तुज न लगे शिकवावें, स्नेहें देतें परंतु आठउनी, ।
पतिभजनीं सुख पावो तव मति शीतांत जेंवि पाठ उनीं. ॥ २-५३ ॥
पतिपरमेश्वर याच्या भजनीं अनुकूलबुद्धि हो भावें, ।
लोभावें न तनुसुखीं, त्वां संपादूनि कीर्ति शोभावें.' ॥ ५४ ॥"

( वरास उपदेश )

( गीति ) "त्या नृपपुत्राहि ह्मणे, 'तुज सर्वज्ञासि काय शिकवावें ? ।
स्नेहें वदतें, स्त्रीसह पुरुषार्थत्रय जपोनि पिकवावें. ॥ ५५ ॥

स्त्रीयोगें पुरुषाचे साधति धर्मार्थकाम, सत्या गी ।
हे श्रुतिची सात्विक घे, राजस कीं ईस तामस त्यागी. ॥ ५६ ॥"

(उभयतांस आशीर्वाद)

(गीति) "दोघे चिरकाळ तुह्मी सतत सुखें पुत्रपौत्रसह नांदा, ।
तुमच्या यशासि सज्जन सेवूत, चकोर ते जसे चांदा. ॥ ७७ ॥
(मदालसो. अ० २)"

(९) पांडव वनवासांत असतांना एकदां मृगयार्थ बाहेर गेले होते. मागे धृतराष्ट्राचा जांवई जयद्रथ यानें द्रौपदीस पांडवाश्रमांत एकटी पाहून कामातुर होऊन त्यानें ती आपणास वश व्हावी ह्मणून तिच्याशीं भाषण केलें. त्याचा मासलाः-

"कृष्णेसि ह्मणे, 'माझी राणी हो, लाजतीस कां? बस, ये, ।
अंकावरि घेऊं दे, आइक सुखकर मदुक्त, थांब, सये.! ॥ ९.७ ॥"

(१०) विराटपर्वांत, कीचकानें भरसभेंत सैरंध्रीचा अपमान केल्यावर ती रात्रीं एकांतांत स्वयंपाक घरांत भीमास भेटली. तेव्हांच्या **पतिपत्नीच्या भेटीचा नाजूक प्रसंग** पंत कसा बहारीनें वर्णन करितात तें पहाः-

"भीम गडबडोनि उठे, अंकींच निवास तीस दे वामीं, ।
चित्तीं ह्मणे, 'बहु दिसां आतळलो या सतीस देवा! मीं.' ॥ ८८ ॥
(विराट. १)

'दयिते! कां आलीस? प्रमदे! ह्या आर्द्र कां पदर? जाये! ।
भ्यालीस? भीरु! भय कां? भेटे त्यालाचि कांप, दर जा (=ज्या) ये. ॥ ८९ ॥
तूं काय भार? भामिनि! उतरसि मांडीवरूनि कां? बस, ये, ।
झालें काय? वद सुदति! सुमुखि! सति! रडों नकोचि, थांब, सये!'॥९०॥"

(११) कर्णाला दुर्योधनानें अंगराज्य दिलें. त्यावर मी तुला कोणती प्रिय वस्तु देऊं? असें कर्णानें विचारिलें असतां 'तुझी माझी यावज्जीव तैलधारेप्रमाणें अविच्छिन्न व पर्वताप्रमाणें स्थिर मैत्री असावी' असें दुर्योधनानें कर्णास मागितलें. त्या प्रसंगाची गीतिः-

"भूप ह्मणे, 'अत्रुटिता धारासरळी जसीच तैलाची, ।
यावज्जीव असावी त्वन्मैत्री, स्थिति धरूनि शैलाची.' ॥ ५२ ॥
(आदि. अ० २५)".

(१२) धेनुहरणाख्यानांतील पुढील दोन गीति किती करुणरसद्योतक आहेत त्या पहाः-

"दंडें ताडुनि नेतां फोडी ती धेनु फार हंबरडे; ।
तेव्हां आश्रमवासि द्विजमृगखगदेवताकदंब रडे. ॥ (आदि. ३३.१८)"

वसिष्ठापुढें धेनु येऊन उभी राहिली, तेव्हां तिला तो म्हणतोः-

"साधु म्हणे, 'मज हृदयीं शत, तुज बाहेर हे कशा लागे; ।
मी ब्राह्मण क्षमावान् माते ! रडतीस तूं कशाला गे ! ॥ २१ ॥"

(१३) उत्तरगोग्रहणयुद्धांत अर्जुनानें विराटाच्या गाई सोडविल्या, तेव्हांचें उत्कृष्ट वर्णन. सरस स्वभावोक्तिः–

"खळबळजळनिधिमग्ना धेनु उसळल्या, अलाबु झाल्या हो, ।
हांसुनि विजय मनि ह्मणे, 'कां गोपसख्या मला बुजाल्या हो ! ॥
गेल्या पळोनि गाई, पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी ।
राहोनि निश्चळ क्षण विजय निवे त्यांकडेचि पाहोनी. ॥
(विराट. ४.८८–८९)"

(१४) भरसभेत कीचक सैरंध्रीच्या अंगास झोंबूं लागला, तेव्हां त्या तेजस्वी स्त्रीनें त्याला झिडकारून त्याचा हात आसडला. तेव्हांचें वर्णनः–

"कर आसुडितांचि पडे धडधड, वात्यासवें जसा विटपी. ।
कैचें बल तेज तशा दुर्वृत्तीं जो सुरारसा विट पी. ॥ (विराट. १.६५)"

पुढील उक्ती (१५–१६) किती जोरदार व बाणेदार आहेत त्या पहाः–

(१५) रात्रीं महानसांत जाऊन भीमसेनास उठवून सैरंध्री त्यास म्हणतेः–

"साश्रु गळां पडुनि म्हणे, मेलां किंवा तुह्मी अहां सासु ? ।
होत्ये ह्मणत, 'वियाली माजीच रिपुक्षयावहा सासु.' ॥८५॥ (विराट.१.)
मी काय ? भली निद्रा सुखदात्री ! काय हा लहान सखा ? ।
गमलें वपुचि यशोधिक, तरि अन्नचि, धरुनि हें महानस, खा. ॥ ८६ ॥
**निजलां काय मृतापरि ? व्हा जागे, सिंहसे उठा, राहो ।**
**निद्रा, कीर्ति वरा हो. ! व्हीप्रद हा बाहु भृगुकुठारा हो.** ॥ ८७ ॥
देवी ह्मणे, 'पुसतसां, जाणुनिही खेद काय मातें ? हो ! ।
विनवां तुह्मीं तरि, 'सुकृत' जें बंधच्छेदका, यमातें हो. ॥ १.९१ ॥
पुसतां, नसे स्मृति ह्मणुनि ? बहु उत्तम, सांगत्यें बरें, परिसा ।
परि साच निजाना, कीं लोहाची भीड काय जी ! परिसा ? ॥ ९२ ॥"

पुढें कुरुसभेंतील वस्त्रहरणप्रसंगीची व सध्यांची विराटसभेतील कीचककृत दुर्दशा यांचें वर्णन करून सैरंध्री भीमास ह्मणत्येः–

"पक्का बुद्धि करितसे सुयशाची वृद्धि मृत्तिका काची; ।
हरिंनीं श्ववृत्ति वरिली, कीं हंसांनींच वृत्ति काकाची. ! ॥ १०० ॥
तेज तुह्मां असतें तरि, उरता ह्मणोनि न विट लातेला; ।
अहितायुला न पीतां ? तेजस्वी दीप न विटला तेला. ॥ १०१ ॥
देवा ! वांचाया हे स्त्री मातीसीच तुडविली लाजो, ।
तोही पति, उद्धरिना अरिनें व्यसनांत बुडविलीला जो. ॥ १०२ ॥

हे स्त्री नव्हे, प्रतिष्ठा तुमची, जरि ईस सोडितां पाणी, ।
'धर्मेचार्थेच' असें वदलां कां प्रथम जोडितां पाणी ? ॥ १०३ ॥
मज मरण सुसह, परि हें दुःसह बहु, धातया ! न रामेला ।
रक्षी वरूनि जो, जन ह्मणती बहुधा तया नरा मेला. ॥ १०५ ॥"

कालगतीनें परवश होऊन नीच कामें करणाऱ्या व प्रत्यक्ष आपल्या पत्नीची होणारी दुर्दशा पाहूनही डोळ्यांवर कातडें ओढून तिची उपेक्षा करून स्वस्थ झोंप घेणाऱ्या पतीची द्रौपदीनें काढलेली खरडपट्टी वाचून आमच्या आर्यस्त्रीपुरुषांनीं पुष्कळ बोध घेण्याजोगा आहे. कालाच्या दुर्दशेच्या फेऱ्यांत सांपडून वाटेल तेथें व वाटेल तसा स्वतःचा व आप्तस्वकीयांचा अपमान सोसून निर्जीवाप्रमाणें जीवितयात्रा कंठणाऱ्या आर्यांस जागृत करून त्यांस आपल्या तेजस्वी वाणीनें स्वकर्तव्याची जाणीव करून देणाऱ्या साध्वींची आह्मां भारतवासीयांस हल्लींच्या काळीं फार फार आवश्यकता आहे.

द्रौपदीचें वरील **भाषण** वाचून वर्ड्सवर्थ कवीच्या **उत्तमस्त्रीप्रशंसापर** पुढील पद्याची आठवण होतेः—

"A perfect woman nobly plann'd
To warn, to comfort, and command;
And yet a spirit still and bright,
With something of an angelic light.

(W. Wordsworth.)"

(भावार्थ) 'लोकांस सन्मार्ग दाखविणें, त्यांना सुख देणें व त्यांच्यावर प्रसंगविशेषीं अधिकार चालविणें याकरितां परमेश्वरानें सर्वगुणसंपन्न अशी ही स्त्री निर्माण केली. ती तेजस्वी पण सुशांत असून तिच्यांत देवतेचा अंश होता'. कोणत्याही समाजावर चारित्र्यवान् स्त्रियांचा प्रभाव फार मोठा होतो. आमच्या हिंदुसमाजावर तर भारतीय स्त्रियांचा प्रभाव आजकालचा नसून तो अनेकयुगांपासून चालत आलेला आहे. 'सीतेला हरण केल्यामुळें रावण प्राणास मुकला, द्रौपदीचा अपमान झाल्याकारणानेंच कौरवपांडवांचें तुमुल युद्ध जुंपलें, केवळ दमयंतीसाठीं नलराजानें वनवास भोगला, प्रियतमा पिंगलेकरितां भर्तृहरीनें राज्य सोडिलें, कनोजच्या राजकुमारीकरितां पृथुराजानें आपलें साम्राज्य गमावून, सर्व भारतीयांचें स्वातंत्र्यही नष्ट केलें, आणि त्याची ती अनुपम रूपवती संयुक्ता हीच इस्लामशाहीचा पगडा बसण्यास कारण झाली. आर्यस्त्रियांच्या महिम्याचीं हीं मुख्य मुख्य व ठळक उदाहरणें होत. (भारतीय साम्राज्य पुस्तक ६ वें पृ० ९७-९८)" याविषयीं टॉड साहेबानीं 'राज्यस्थानचा इतिहास' याच्या प्रथम खंडांत सुंदर विवरण केलें आहे. खंड १ पृ० ५४३ पहा.

(१६) भीष्मानें आपला गुरु परशुराम याला दिलेलें बाणेदार उत्तर (Spirited rejoinder):-

"वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शांतनव समज, ।
देवासि मागते ते झाले, मरणीं, करूनि नवस, मज. ॥
( उद्योग. १३.३८ )"

(१७) **दुर्योधनाचीं बाणेदार भाषणें**:-गदा. अ० ६ गी० ३६-४१; अ० ९,११-१८; अ० १०,१४-२३; पद्य. गदापर्वात कृष्णदुर्योधनांनीं परस्परांवर दोषारोप करणारीं धिक्कारयुक्त, भाषणें केल्यावर दुर्योधन स्वतःचें निर्दोषत्व स्थापित 'आतां कर्तव्य राहिलें काय?' असें त्याच्या अभिमानी स्वभावास सर्वथा साजणारें पुढील प्रमाणें बाणेदार भाषण करितोः-

(गीति)(अ) "राजा ह्मणे, "विसरलों मी, सांगा करुनि पाठ वेदा न; ।
पात्रीं न दिलें ऐसें एकहि मजला न आठवे दान. ॥ ६.३५ ॥
अखिला हि भोगिली म्यां पृथ्वी, पर मस्तकीं दिला पाय, ।
स्वंततर कवण मजहुनि? आतां कर्तव्य राहिलें काय? ॥ ३६ ॥
अभिमुखशस्त्राघातें समरमखामाजि वेंचिला काय; ।
स्वंततर कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिलें काय? ॥ ३७ ॥
मद्भोग मदैश्वर्य प्रेक्षुनि वदले समस्त अरि, 'हाय!' ।
स्वंततर कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिलें काय? ॥ ३८ ॥
सत्कारील सुरांचा ससुहृत्सुतसोदरा मला राय; ।
स्वंततर कवण मजहुनि? आतां कर्तव्य राहिलें काय? ॥ ३९ ॥
ज्या वीरसू तयांला झाली मान्या जगत्रयीं माय; ।
स्वंततर कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिलें काय? ॥ ४० ॥
प्रविहतसंकल्प तुम्हीं झालां, सर्वेहि बुडाल शोकांत, ।
सकळ सहायांसह मीं प्रमुदित होईन वीरलोकांत. ॥ ४१ ॥"

मरणद्वारीं टेंकलेल्या दुर्योधनाचें वरील वीरश्रीचें भाषण ऐकून देवगंधर्वाप्सरासिद्धादिकांनीं त्याचा मोठा जयजयकार केला. तो पाहून दुर्योधनाचा अधर्मानें घात केल्याबद्दल धर्मादि पांडव लज्जित, दीन व अधोमुख झाले. तेव्हां भीष्म, द्रोण, कर्ण, भूरिश्रवा व दुर्योधन ह्या पांच पराक्रमी वीरांस मीच कपटानें मारविले, हे धर्मयुद्धांत कधींच मरतेना, असें कृष्णानें सांगून सर्वांचें समाधान केलें.

"म्यां, बुडतें सर्वस्व स्पष्ट, अनृत एक वांचविल यातें, ।
योजुनि असें अधर्मे नेवविले प्रबळ पांच विलयातें. ॥ ६.५६ ॥
संकोचलां वृथा कां? बैसा यानीं, उठा, निघा, चाला; ।
झाला जय, प्रहर्षे गर्जा; जावूं सुखें निवासाला. ॥ ५९ ॥"

(आ) मरणोन्मुख दुर्योधनानें धृतराष्ट्रगांधारीस संजयद्वारें पाठविलेला पुढील निरोप किती बाणेदार व वीरोचित आहे तो पहाः–

(गीति) "ताताते मातेतें नमुनि असें सांग संजया बा! कीं, ।
केलें राज्य अकंटक, पुष्कळ सुख भोगिलें जसें नाकीं. ॥ ९.११ ॥
विष्णुपदीं पिंड तसा शत्रुशिरीं देय पाय जो डावा, ।
तो म्यां दिला, अधिक याहुनि जन्मुनि अर्थ काय जोडावा ? ॥ १२ ॥
होऊनि पराजित परप्रेष्य न मीं जाहलों, न हें थोडें; ।
अरिहृतपदोपजीवन खाजविजे जेंवि आपुलें घोडें. ॥ १३ ॥
हें बहु बरवें, मजवरि असतां मीं श्री कधीं न रागेली; ।
देती लाज तसी हे, त्यागुनियां स्त्री जसी नरा गेली. ॥ १४ ॥
आमरण पांडवांसीं माजा निर्विघ्न चालिला दावा, ।
दैवें सुपुरुषपुंगव अभिमानभरें असाचि लादावा. ॥ १५ ॥
सुक्षत्रियांसि जी गति बहुमान्या तीच हे मला घडली, ।
तनु, मनुपूतघृताहुति मखशिखिकुंडीं, तसी रणीं पडली. ॥ १६ ॥
शस्त्रें विषें वधावा जैसा सुप्त प्रमत्त अनयानें, ।
वधिला तसा अधर्मे हा तेजस्वींद्र पांडुतनयानें. ॥ १७ ॥
या छळवधें परांचें दुर्यश माजें जगीं सुयश जालें; ।
आजन्मसदाचारें यावें तें सुफळ सेवटीं आलें'. ॥ १८ ॥

(गदापर्व अ० ९)"

(इ) भीमानें दुर्योधनाच्या मांडीवर गदेचा प्रहार करून त्याला अत्यंत विकळ केलें व मरणोन्मुखावस्थेत त्याला एकटें सोडून पांडवादि वीर निघून गेले. नंतर दुर्योधनास भेटण्यास कृप, कृतवर्मा व अश्वत्थामा हे तिघे वीर तेथें आले. मृत्यूच्या अत्यंत विपन्न स्थितींत दुर्योधनाला पाहून त्यांनीं फार शोक केला. तेव्हां दुर्योधनानें तशाही स्थितींत त्यांचें सांत्वन करितांना केलेलें बाणेदार व वीरास उचित असें भाषण पुढें दिलें आहेः–

(गीति) "नेत्र पुसुनि सर्वांतें भूप ह्मणे "शोक काय हो! याचा ?।
मर्त्याचा केव्हां तरि भस्मचि विपदोक काय होयाचा. ॥ १४ ॥

(गदापर्व. अ० १०)

तरि होता घात, जरी व्यसनीं सांभाळितों न टेंकेला, ।
मानी हांसुनि म्हणते मंज, 'वीराभिनय या नटें केला'. ॥ १५ ॥
पडला शात्रवशस्त्रें समरांत स्यमंतपंचकीं काय, ।
कां करितां शोक उगे ? पडलों रोगार्त मंचकीं काय ? ॥ १६ ॥

पावे अनंतसुकृतें क्षत्रिय समरांत कायहानि बरा, ।
होइल वांचोनि सुचिर रुचिरगृहीं लाभ काय हा निबरा ? ॥ १७ ॥
उरलें तेज, अधर्मे वधिला धार्मिकपरें, बरें जालें. ।
आलें मनास माझ्या, तीक्ष्णहि परि पथ्य हें जसें आलें. ॥ १८ ॥
मेलों बहुभाग्याचा मीं निहतज्ञातिबांधव स्पष्ट, ।
उरतों, शोकें झुरतों; स्वजनवियोगा असा नसे कष्ट. ॥ १९ ॥
धर्मभ्रष्ट न झालों, हा कृष्णाचा प्रभाव, न दुज्याचा, ।
पूर्वज वसिष्ठनामा सन्महितयशा तसाचि यदु ज्याचा. ॥ २० ॥"

दुर्योधन ह्मणतोः—मी क्षात्रधर्मापासून भ्रष्ट न होतां युद्धांत मला मरण येत आहे हा कृष्णाचा प्रभाव. तो कृष्ण कोणता ? तर ज्याचा पूर्वज वसिष्ठ असा द्वैपायन व्यास कृष्ण व यदुराजवंशांत जन्मलेला भगवान् गोपाळकृष्ण. या उभयतांच्या कृपेनें हें घडलें. दुर्योधन कृष्णाच्या पांडवपक्षपातित्वामुळें त्याचा द्वेष करित असे. तरी तो त्याची खरी योग्यता जाणून होता असें यावरून दिसतें. मरणसमयीं भगवान् कृष्णाचें स्मरण होणें हें दुर्योधनाचें परम भाग्य !

( गीति ) "उरलां प्रळयांत तिघे, जालें प्रिय परम आजि हें माजें, ।
द्याया अशक्य सदमृतरसपाना मेरुतुल्यहेमा जें. ॥ २१ ॥
मज जय जोडुनि द्याया यत्न तुम्हीं साधुंनीं भला केला, ।
'दुरतिक्रमा नियति जनकृतिला' मुनिदृष्टि जसि बलाकेला. ॥ २२ ॥
न करावा शोक तुम्हीं अवलोकुनि हे असी दशा माजी, ।
वेद प्रमाण जरि तरि म्यां अक्षय लोक जिंकिले आजी. ॥ २३ ॥"

वरील गीतींत वर्णिल्याप्रमाणें अगदीं मरणसमयींहि दुर्योधनाच्या ठिकाणीं दिसून येणारी मानी तेजस्विता पाहून पांडवांचा—विशेषतः द्रौपदीचा—छळ करणाऱ्या या दुष्टाबद्दल सहानुभूति वाटूं लागते. भारतांतील सुष्ट दुष्ट सर्वच पात्रें श्रीवेदव्यासांनीं अशा चातुर्यानें रंगविलीं आहेत. त्यांच्यापैकीं प्रत्येकांत कांहीं तरी लोकोत्तर, असामान्य गुण दिसून येतो. ह्मणूनच ह्मटलें आहेः—

'कर्णांतविभ्रमभ्रांता कृष्णार्जुनविलोचना ।
करोति कस्य नाल्हादं रम्या द्वैपायनी कथा ॥'

(१८) अर्जुनानें अग्न्यस्त्र सोडिलें तेव्हांची कौरवसैन्याची दुर्दशा व कर्णाचें अनुपम धैर्य यांचें वर्णन. उत्कृष्ट उत्प्रेक्षा व रूपकः—

( गीति ) "दावानळें जसें वन, अग्न्यस्त्रें सर्व सैन्य होरपळे, ।
जो तो भट माघारा पाहुनि अस्त्रप्रताप घोर पळे. ॥ कर्ण. ४७.६ ॥
जाणों न दग्धुकाम, प्रेमें तेजस्विगुरुसुतास रणीं, ।
आलिंगी अग्नि, सदा दे कर ज्या तम हरावया तरणी. ॥ ७ ॥"

अर्जुनानें सोडलेल्या अग्न्यस्त्राचा प्रभाव कर्णावर फारसा झाला नाहीं ही गोष्ट सांगतांना पंतांनीं उत्कृष्ट उत्प्रेक्षेसह काव्यलिंग अलंकाराचा आश्रय केला आहे. कर्ण हा अग्नीवर उपकार करणाऱ्या सूर्यनारायणाचा पुत्र. ह्मणून अग्नीनें आपली ज्वलन-प्रवृत्ति क्षणभर बाजूस ठेवून प्रेमानें कर्णाला आलिंगन दिलें. अग्नीमध्यें असणारें तेज सूर्याचेंच असतें ही गोष्ट कालिदासाच्या रघुवंशांत 'दिनान्ते निहितं तेजः सवित्रेव हुताशनः' (सर्ग ४ था श्लोक १) यांत सांगितली आहे. सूर्य अग्नीला अंधकाराचा नाश करण्याकरितां तेज देतो ह्मणून अग्नीनें कर्णाला जाळण्याची इच्छा न करितां उलट प्रेमानें त्याला जणूं काय आलिंगन दिलें. 'कर दे' यांत श्लेष (१ हात देणें, २ किरण, तेज देणें) आहे. किती गोड वर्णन हें!

"मेघीं झाल्या अंकापासुनि पतनें परिभ्रमें रुसल्या. ।
आलिंगिति अनुरूपोदारा चपलाचि धैर्यमेरुस त्या. ॥ ८ ॥"

वरील गीतींतील रूपक फारच बहारीचें आहे. 'मांडीवरून दूर झाल्यामुळें व भटकावयास लागल्यामुळें मेघाचे ठिकाणीं रुसलेल्या विद्युल्लताच अशा त्या अग्निज्वाला आपल्या योग्य व उदार अशा धैर्यमेरु कर्णास आलिंगन देत्या झाल्या. मेघ हा जनक, चपला (विद्युल्लता) ही कन्या, अंकापासून पतन ह्मणजे उपवर झाल्यामुळें बापानें मांडीवर न घेणें, योग्य पति मिळावा ह्मणून परिभ्रमण, आपणास कधीं सोडणार नाहीं असा धैर्यमेरु (कर्ण) हा पति, तोहि अनुरूप व उदार ह्मणजे आपल्या-सारखाच तेजस्वी व उदार अर्थात् पत्नीची सर्व प्रकारची इच्छा पूर्ण करणारा, आलिंगन देणें ह्मणजे वरणें, पक्षीं व्यापून टाकणें; अशा प्रकारें या रूपकाची सामग्री आहे. यांत श्लेष असल्यामुळें हें श्लेषगर्भ रूपक झालें.

"साक्षात् प्रलयज्वलनज्वालांहीं कवळिलाचि नग मेरू, ।
ऐसा कर्ण गमे, मग अन्य जन तयांत काय न गमे रू? ॥ ९ ॥"

प्रळयकालीन अग्निज्वालांनीं प्रत्यक्ष मेरुपर्वताला व्यापून टाकावें तसा अर्जुनानें सोडलेल्या अग्न्यस्त्राच्या ज्वालांत कर्ण भासला. ही कर्णासारख्या असामान्य वीराची स्थिति मग इतर लोक कापसाप्रमाणें भुरभुर जळून जातील असें वाटणार नाहीं काय?

"कर्ण महात्मा शमवी योजुनि वरुणास्त्र आश्रयाशास्त्र, ।
संपादिलें श्रमें जें व्यसनीं देतेंचि आश्रया शास्त्र. ॥ १० ॥"

(१९) अर्जुन कृष्णास म्हणतोः—

संशप्तकवीरांचा पराभव करून गुरुपुत्रादि महारथ्यांना जिंकल्यावर इतर वीरां-विषयीं तिरस्कारपूर्वक

(गीति) "वधिले वीर, पळविले, मजसीं कोणी न येति भांडाया, ।
म्यां न वधावें पळतां, चाला, मारूनि काय रांडा या? (कर्ण. ३५.६०)"

'रांडा' हा शब्द भीतीनें पळून जाणाऱ्यांस उद्देशून तिरस्कारपूर्वक योजिला आहे.

(२०) कृष्णानें इंद्रास सत्यभामेकरितां पृथ्वीवर पारिजातक वृक्ष मागितला. तेव्हांची इंद्राची सक्रोध उक्तिः—

(गीति) "सुर सुरतरु पाठवितां हा! म्हणतिल करुनि आठवा नार्की, ।
विटुनि म्हणेल शचीही स्वपरिग्रह हाहि पाठवाना कीं! ॥
(हरि. २७.६५)"

(२१) गदायुद्धाचें थोडक्यांत खुबीदार वर्णनः—

"अत्यद्भुत करिती, ते युद्ध नृपा! होय वायु पंगु, लिही ।
तेव्हां न चित्रगुप्तहि, राहे मुनिची उगीच अंगुलिही. ॥"

भीमदुर्योधनांनीं गदायुद्ध केलें तें अत्यंत अद्भुत होतें. वायुही स्वपुत्राचें युद्ध पाहून पंगु ह्मणजे गतिविहीन (स्तब्ध) झाला, चित्रगुप्ताचा पापपुण्यलेखनाचा नेहमींचा व्यवसाय बंद झाला; नारदमुनीचीही अंगुली वीणा वाजविण्याचें आपलें काम विसरली. नारदाचें गानप्रियत्व सुप्रसिद्ध आहे, तथापि युद्धाचे ठिकाणीं तो तन्मय झाल्यामुळें वीणावादनाचें त्याचें प्रिय कार्य बंद पडलें. पंतांनीं युद्धाचें अद्भुतत्व मोठ्या बहारीनें वर्णन केलें आहे. हें भाषांतर नसून कर्त्रीची स्वकल्पित योजना आहे.

"गमलीं साक्षात् चित्रे प्रेक्षककटकें समस्त बापा! तीं; ।
लवलीं न पाहतां त्या अतुल गदायुद्धकौतुका पातीं. ॥
(गदा. ३.१३-१४)".

(२२) भेदक उपहासाचें उदाहरण गदापर्व अ० ५, २९ यांत उत्कृष्ट दिलें आहेः—

(गीति) "जप करिल ज्येष्ठ पिता घेउनि शतपुत्रशोकमणिमाळा, ।
असते नव पुत्र अधिक घडतें विध्युक्त कर्म भूपाळा. ॥"

भीम ह्मणतोः—धृतराष्ट्राचे शंभर औरस पुत्र मृत झाले. आणखी नऊ पुत्र असते तर तेही माझ्या हातून मरण पावले असते व मग त्याला विध्युक्त पुत्रांचीं नांवें घेऊन जप करितां आला असता. जपमाळेंत एकशेंआठ मणि व एक मेरु मणि असे एकूण एकशेंनऊ मणि असतात. या गीतींतील अत्यंत मार्मिक व खुबीदार कोटी खुद्द पंतांचीच आहे.

(२३) बाह्यात्कारी मधुर पण खोंचदार अशा भाषणाचें एक सुरेख उदाहरण भीष्मपर्व अ० ४ गी० ५ यांत आलें आहे. दुर्योधन पांडवपक्षपाती भीष्मास ह्मणतोः—

(गीति) "जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें; ।
पार्यें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य थानातें? ॥"

या भाषणांतील, मनोहरत्व, व्यवहारनैपुण्य, मर्मभेदकत्व आणि प्रखर पण सभ्य भाषणकौशल्य मूळांत नाहीं.

**खोंचदार व क्रोधावेशयुक्त भाषणाचीं ठळक उदाहरणें** पाहणें असल्यास कर्ण. ४०,४५-७७;४२,२६-४९ पहा.

(२४) कर्णानें युधिष्ठिराला युद्धांत जर्जर करून अपमानसूचक शब्द बोलून पळवून लाविलें. तेव्हां धर्मराज स्वशिबिरांत येऊन अत्यंत संतप्त होऊन शय्येवर पडला होता. रणांगणांत धर्मरथ दिसत नाहीं म्हणून चिंताग्रस्त होऊन अर्जुन कृष्णासह बंधूस पाहाण्याकरितां धर्माच्या शिबिरांत आला. अर्जुनास पाहून हा कर्णास मारूनच आला असेल असें समजून धर्मराजानें अर्जुनाचा मोठा गौरव केला. परतु अद्यापि कर्णास मी मारिलें नाहीं, तुमचा रथ रणांत न दिसल्यामुळें तुमचा शोध करीत येथें आलों, आतां सत्वर जाऊन कर्णाचा वध करितों असें अर्जुनानें धर्मास सांगितलें. याच्या नंतरचा प्रकार व धर्माचें अत्यंत त्वेषाचें भाषण पुढील सुंदर गीतींत वर्णिलें आहे. उतारे जरा लांबलचक आहेत. पण धर्मभाषणांतील संपूर्ण आवेश व त्वेष समजण्यास ते उपयुक्त समजून येथें घेतले आहेत.

(गीति) (अ) "कर्ण असे, हें कळतां, जिष्णुकडे वक्रदृष्टिनें पाहे; ।
क्षतजप्रतिमाक्ष क्षितिनाथ क्षण न क्षमावशीं राहे. ॥४५॥ (कर्ण.४०.)"

धर्माच्या नेहमीं शांत असणाऱ्या अंतःकरणांतहि क्षणभर क्रोध येऊन त्याचे नेत्र रक्तासारखे लाल झाले हें सांगतांना 'क्ष' या कठोर वर्णाची योजना करून कवीनें अर्थानुरूप ध्वनि वरच्या गीतींत किती सुंदर साधला आहे तें चाणाक्ष वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल.

(गीति) "राजा म्हणे, "अहा ! रे बापा ! या पाददर्शनाकरितां ।
व्यसनीं भीम त्यजिला, सांपडला ही उपेक्षिला अरि तां. ॥ ४६ ॥
व्यसनीं बंधु त्यजिला, वृथा पृथाकुक्षिमाजि आलासी; ।
राधेयातें पाहुनि विमुख क्लीबा ! रणांत झालासी. ॥ ४७ ॥
'कर्ण वधीन' असा त्वां द्वैतवनीं मजसमीप पण केला; ।
तो आजि आजिमाजि त्यजितां पुरुषार्थ तव वृथा गेला. ॥ ४८ ॥
भ्यालासि आधिरथिला, सिंहाला मृग तसा, पळालासी, ।
पंचममासीं च न कां पृथोदरांतूनि तूं गळालासी ? ॥ ४९ ॥
जरि म्हणसील 'असा म्यां कार्याचा घेतलाचि न पथकर' ।
तरि सर्वस्वप्राणाधिकदयितमुकुंदपादशपथ कर. ॥ ५० ॥
पण न करितासि तरी कां शिरतों या सकंटांत ? घात कसा ।
केलासि बहु भरंवसा देउनि ? हा न कळलासि घातकसा. ॥ ५१ ॥

विश्वासघात केला, त्यजिलें आणूनि शत्रुभूपांत; ।
त्वां दोर कापिला कीं आम्हां घालूनि अंधकूपांत. ! ॥ ५२ ॥
होता फार भरंवसा तेरा वर्षें तुझाचि कीं अहितें ।
कर्णे छळिलें, त्यातें वधिशील रणीं शिखी जसा अहितें. ॥ ५३ ॥
तें सकळ विफळ झालें, कीं वंध्यद्रुम उपासिला; चुकलों; ।
थुकलों न राज्यरुचिवरि, विषयप्रेमें महासुखा मुकलों. ॥ ५४ ॥"

याप्रमाणें जळजळित भाषण करून धर्मराज अर्जुनजन्मप्रसंगीं झालेल्या आकाशवाणीचा औपरोधिक उल्लेख करितोः—

(गीति) (आ) "जेव्हां शतशृंगनगीं प्रसवलि तुज पांडुची पृथा राणी, ।
तेव्हां सप्तमदिवसीं झाली उच्चैस्तरां नभोवाणी. ॥ ५५ ॥
"देवि पृथे ! तव सुत हा सूर, इतर सर्व शूर नक्षत्रें; ।
याचा क्षणहि पराभव करिजेल रणीं कदापि न क्षत्रें. ॥ ५६ ॥
हा पांडव खांडववनदाहीं जिंकील देवसैन्यांतें, ।
याच्या द्वेषें सर्वहि भूतें वरितील दीर्घ दैन्यातें. ॥ ५७ ॥
केकयमद्रकलिंगप्रमुखांचें यश हरील; कुरुनिधन ।
हाचि करिल; जतन करीं, बहु रक्षी कृपण जेंवि पुरुनि धन. ॥ ५८ ॥
'यासम हाचि धनुर्धर' म्हणतां उपमन्युसुरतरु रुसेना. ।
रण विसरतिल रिपुचमू जेंवि हरिसमक्ष सुरत रुरुसेना. ॥ ५९ ॥
कांतिगुणें चंद्रासीं, वेगगुणें हा समान वातासीं, ।
होईल अतुळ शौर्यें तुल्य महात्मा जयंततातासीं. ॥ ६१ ॥
भस्म करिल अहितकटक, जैसा दवदहन निबिडतम कक्ष; ।
ज्ञाते म्हणतिल भुजबळ पाहुनि 'हा चक्रपाणिसमकक्ष.' ॥ ६४ ॥"

वरील गौरवपूर्ण आकाशवाणीचा उल्लेख करून धर्मराज बंधूला भाषणरूपी चाबकाचे कसे सणसणित तडाखे देतो तें पहाः—

(गीति)(इ) "कर्णभयास्तव पळतां झालीच नभःसरस्वती फोल; ।
नवल गमे, नरचि न हे ते देवहि अनृत बोलती बोल? ॥ ६६ ॥
मुनिवर सदा स्तविति तुज, तद्वचनाचाहि धरुनि विश्वास ।
न सुयोधनासि लवलों, झालों उपहास्य आजि विश्वास. ॥ ६७ ॥
त्वष्ट्यानें रथ रचिला, केतुशिरीं कपिवर, प्रबळ घोडे, ।
गांडीव चाप, भाते अक्षय, उपमेसि सागर हि थोडे. ॥ ६८ ॥
अशनीसहि न वळेसी कांचनपट्टावनद्ध खड्गलता, ।
प्रभु सूत, असें असतां काळासींही करील रण भलता. ॥ ६९ ॥

भीरो ! धीरोचित हें साहित्य असें असोनि जें पळणें ? ।
मरण रुचे वीरांला, न रुचे क्षणमात्र अपयशें मळणें. ॥ ७० ॥
होतासि सूत जरि तूं गांडीव गदाधरासि देतासी, ।
कर्णासि मारिता प्रभु, माझ्या करितांचि पूर्ण हेतासी. ॥ ७१ ॥
अद्यापि तरि करीं हें निजसंधासागरांत तरसील. ।
परि न करीं हें, समरीं कर्णासि विलोकितांचि मरशील ! ॥ ७२ ॥
शस्त्रास्त्रज्ञ स्वाधिक कटकीं कोणीं असेल जो राजा, ।
गांडीव त्यासि दे हें, क्लीबा ! हो शीघ्र पाठिमोरा, जा. ॥ ७३ ॥
क्लीबकरीं ही असतां बहुतचि केला प्रताप चापानें, ।
अघनाश रामनामें जैसा जपतांहि घोर पापानें. ॥ ७४ ॥
भीमचि धीर, तया दे धनु, तो कर्णादि शत्रु मारील; ।
व्यसननरकमग्नांतें आम्हांतें तोचि वीर तारील. ॥ ७५ ॥
शिरतासि न कुंत्युदरीं, किंवा च्यवतासि पांचव्या मासीं, ।
तेंचि श्रेय तुज, न हें; वीरांसीं क्रीडनें न रामांसीं. ॥ ७६ ॥
विरथ विशस्त्र न होतां, कर्ण शर न झोंबतां हि अंत्रासीं ।
केलें अपयान कसें ? झालासि कसा निमग्न संत्रासीं ? ॥ ७७ ॥
ऐसीं वचनें वमला धर्म, पयोनिधि जशीं विषे असितें; ।...॥ ४१.१ ॥"

वरील प्रमाणें धर्माचें अत्यंत तीक्ष्ण व विषाप्रमाणें सर्वांगास पेटविणारें भाषण व त्यांतल्या त्यांत गांडीव धनुष्य दुसऱ्यास दे असे उद्गार ऐकतांच आपली

"जो गांडीव शरासन दे अन्याकारणें ह्मणेल मला, ।
मारावाचि, असो तो प्रिय, अप्रिय; सुज्ञ, मूर्ख; दुष्ट भला. ॥४१.१०॥"

ही प्रतिज्ञा आठवून अर्जुनानें धर्माचा वध करण्याकरिता हातांत खड्ग धारण केलें. तेव्हां श्रीकृष्णानें त्याचा अधिक्षेप करून धर्माची निंदा कर ह्मणजे त्याचा वध केल्यासारखे होऊन तुझी प्रतिज्ञा पूर्ण होईल व तुला ज्येष्ठबंधुवधाचें पापही लागणार नाहीं असें सुचविलें. त्यावरून बीभत्सु पुढील प्रमाणें कठोर व भेदक शब्दांनीं पित्यासमान असणाऱ्या ज्येष्ठबंधु धर्माची निंदा करितोः—

(गीति) (ई) "जिष्णु ह्मणे धर्मातें, "राया ! करिसी वृथाचि कुत्सा; हें ।
तरि शोभतें' तुज जरी टिकतासि रणांगणांत उत्साहें. ॥
कर्णपर्व ४२.२५ ॥"

त्यजुनि रण तुज न टिकवे दूर क्रोशावरीहि, तो मातें ।
निंदिसि, उच्चपदस्थित शिवशिरधत्तूर जेंवि सोमातें. ॥ २६ ॥
निंदो तो मज, मर्दी जो शतशः संगरीं गज, गदीश, ।
जैसा कल्पांतींचा रुद्र महात्मा अभंग जगदीश. ॥ २७ ॥

युद्धीं जो उत्साही साहित्याही रथादिकां न गणी, ।
गजयूथीं सिंह तसा शिरतो स्वबळें भटप्रधानगणीं; ॥ २८ ॥
जों बहुबळ रिपु पाहे तों हर्षे फार भीम, शर भाते, ।
विसरे, भुजीं च कवळी. जिंकिति अरिहरि न भीमशरभाते; ॥ २९ ॥
तो त्वदधिक मदधिक मज निंदो, तूं निंदिसी बळें कवणें ? ।
गुड निंदिजे तदधिकें खंडें, परि कोणत्या गुणें लवणें ? ॥ ३० ॥
जो गांधारीसुतशतघातख्यातव्रत स्वतःक्षम तो, ।
निंदो मज, निजधर्मीं त्वदधिक शिक्षाक्रियादिकें गमतो. ॥ ३२ ॥
खळवळजळधिप्रति मीं वडवानळ, तो अगस्त्य, तूं वटसा; ।
भट साचा नससि, दिससि भटसा, चाळविसि या जना नटसा. ॥ ३३ ॥
गज आजि आठ शत ज्या वीरें घटिकेंत मारिले, जरि, तो ।
निष्ठुर बोलेल तरी बोलो. विक्रम तसा चि तो करितो. ॥ ३४ ॥
जो भुजबळसंपन्न क्षत्रिय तोचि प्रसिद्ध हें लोकीं, ।
वाग्बळ तोचि ब्राह्मण; तूं वाग्बळ वेद सर्वदा घोकीं. ॥ ३५ ॥
ब्राह्मण मृदु, तूं निष्ठुर, निंदिसि मज, तूंचि निंद्य, मी न, जनीं. ।
सर्वस्वें भजतों परि नाहीं सुख पावलों तुझ्या भजनीं. ॥ ३६ ॥
वेंचुनि धन सुतरत्नहि, जीवित संकल्पिलें तुझ्या काजीं, ।
तदपि वदसि असिं वचनें न वदावीं शत्रुला, न रंका जीं. ॥ ३७ ॥
कृष्णातल्पीं बैसुनि अवमानिसि मज महारथघ्नातें. ।
जें काय स्वहितकरीं निष्ठुरपण साजतें कृतघ्ना तें. ॥ ३८ ॥"

द्रौपदीच्या पलंगावर किंवा द्रौपदीसह पलंगावर बसून तूं महारथांचा नाश करणाऱ्या माझा अपमान करितोस व मी तुझें हित साधण्याची खटपट करित असतां माझ्याशीं गोड न बोलतां उलट निष्ठुर भाषण करितोस तेव्हां तूं कृतघ्न ठरतोस. येथें 'कृष्णातल्पीं' हा शब्द साभिप्राय आहे. द्रौपदी मत्स्ययंत्र भेदून अर्जुनानें आपल्या शौर्यानें जिंकिली. 'ही द्रौपदी मी माझ्या शौर्यानें मिळविली. ती माझ्या बंधुनिष्ठेमुळें सर्व पांडवांची भार्या झाली. असें असतां तिच्यासह पलंगावर, किंवा तिच्या पलंगावर बसून माझी निंदा करणारा तूं कृतघ्न ठरतोस,' हा अर्थ यांत अर्जुनानें सुचविला आहे. ही अर्जुनानें केलेली धर्माची निंदा खदिरांगाराप्रमाणें अत्यंत असह्य व धर्माच्या काळजाला घरे पाडणारी आहे यांत संशय नाहीं.

( गीति ) "यद्यपि कथिला स्वमुखें स्ववधोपाय हि तुला, तथापि तया ।
वधिता काय शिखंडी, धृतराष्ट्राच्या महारथा पितया ? ॥ ३९ ॥
पांचाळ रक्षिला म्यां, वधिला म्यां तो हि; काय कापूस, ।
भांडेल ज्वलनासीं ? हें त्याचि सुसाधुनायका पूस. ॥ ४० ॥

तुज राज्य काय होय द्यूतरता ? नैकसीच हितवाचा. ।
स्वाश्रयसह नरकांतचि बुडतो स्त्रीबंधुवर्ग कितवाचा. ॥ ४१ ॥
सहदेव द्यूताचे दोष वदे, तुज न सोडवे गा ! तां ।
केला घात, न शंकसि आम्हांवरि आजि गोडवे गातां ! ॥ ४२ ॥
रिपुबळजळनिधिमाजिहि कोण्ही तरि जन तरेल अक्षत रे ? ।
श्रुत जरि असेल तरि वद, कोणी द्यूतीं धरूनि अक्ष तरे ? ॥ ४३ ॥
शिवलासि जेधवां त्या अक्षांला कुरुसभेंत तूं पूज्य, ।
अस्मत्सुखासि पडलें तेव्हांपासूनि आजवरि पूज्य. ॥ ४४ ॥
दोहीं पक्षीं व्हाया वीरक्षय हेतु हे तुझे पाय, ।
बा ? यज्ञ भला केला; गावें माहात्म्य बा ! तुझें काय. ! ॥ ४५ ॥
मेले नृप नृपनंदन, झाल्या विधवा वरस्त्रिया कोटी, ।
खोटी धरितासि न मति तरि होती हानि कां असी मोटी. ॥ ४६ ॥
करि कुशलक्षयदक्षां अक्षां जो स्पर्श तोचि हा कर कीं, ।
येणेंचि राज्य बुडवुनि आह्मां स्ववशांसि लोटिलें नरकीं. ॥ ४७ ॥
शब्द प्रतोद टोंचिसि, खोंचिसि, पडतात काळजासि घरे; ।
खदिरांगारस्पर्शे बहु कठिनहि लोह तापतां विघरे. ॥ ४८ ॥
आम्हां हतभाग्यांला एक दिलें दुःख, हेंचि बहु; देवा ! ।
भोगूं या तें आधीं; द्यावें न दुजें; दयाकरा ! ठेवा.' ॥ ४९ ॥
ऐसी गुरुनिंदा करि; परि धरि हरिसख असह्य अनुताप; ।
तापप्रद होईलचि घडतां भगवज्जनासही पाप. ॥ ५० ॥"

लहानपणापासून धर्माच्या आज्ञेंत वागणारा व द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगींही चित्ताचें समत्व ढळूं न देतां उलट 'द्यूत खेळणाऱ्या धर्माचे कर जाळूं, तूं पुष्कळसा अग्नि घेऊन ये' ह्मणून सहदेवास सांगणाऱ्या भीमास चार समाधानाच्या गोष्टी सांगून शांत करणाऱ्या अर्जुनानें वरीलप्रमाणें स्वप्रतिज्ञापूर्त्यर्थ धर्मनिंदा केली असतां त्याला स्वतःला असह्य अनुताप होऊन प्राण नकोसे होणें अत्यंत साहजिक आहे. यानंतर श्रीकृष्णानें धर्मार्जुनांचें शांतवन करून कर्णवध करण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या अर्जुनास तो युद्धभूमीवर रथांत बसवून घेऊन गेला. पुढें घनघोर युद्ध झालें.

(२५) पृथ्वीनें कर्णाचें रथचक्र गिळिलें. तेव्हां तें खालीं उतरून काढण्याचा प्रयत्न करित असतां अर्जुन त्याशीं युद्ध करीतच होता. त्यावेळीं कर्ण अर्जुनास 'मी रथचक्र काढीपर्यंत तूं युद्ध करणें क्षणभर बंद ठेव. मला संकटांत पाहून युद्ध करणें हें अधर्मयुद्ध होय', असें ह्मणतो व त्यावर कृष्ण कर्णास खोंचदार उत्तर देतो. हें सर्व वर्णन पंतांनीं फार हृदयंगम केलें आहे. त्याचा थोडासा नमुना येथें दाखवितों:—

( गीति ) "स्ववधोद्यतार्जुनातें कर्ण ह्मणे, 'बळ तुझें अनंत रहा ।
स्वस्थ मुहूर्तभरि रणश्रद्धा पुरवील गा ! अनंतर हा. ॥ कर्ण. ४८,६२ ॥
रक्षावा धर्म बुधें, कुशलाचा धर्म हा निधी; राहें ।
स्थिर जें करिसि निरायुधमथन करिल धर्महानि धीरा हें. ॥ ६३ ॥
रथचक्र उद्धरूं दे; श्रुतिशास्त्रज्ञा ! महारथा ! कुळजा ! ।
साधु न हाणिति अरिला पाहति अधृतायुध व्यथाकुळ जा (=ज्या) ॥६४॥"

वरील ६४ व्या गीतींतील इटालिक्समध्यें घातलेले शब्द सहेतुक ह्मणूनच खुबीदार आहेत. येथें परिकरांकुर अलंकार झाला.

यावर कृष्णाचें उत्तर किती खोंचदार आहे तें पहाः—

"कृष्ण ह्मणे, 'राधेया ! भला बरा स्मरसि आजि धर्मातें; ।
नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवासि न स्वकर्मातें; ॥ कर्ण. ४९,१ ॥
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एकमति झालां, ।
कैसे कपटद्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां ? ॥ २ ॥
जेव्हां सभेसि नेली पांचाळी मानिलें मनीं शर्म, ।
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म. ॥ ३ ॥
फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग, ।
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा ! सांग. ॥ ७ ॥
राज्य न देसी, करवुनि वनवासाज्ञातवासही, जेव्हां, ।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना ! तेव्हां ? ॥ ४ ॥"

या गीतींतीलही 'राधासुता' 'वृषा', 'सूतनंदना' हे शब्द सहेतुक आहेत. तूं आपणास 'वृष' ह्मणजे धर्म ह्मणवितोस पण वास्तविक तुझें वर्तन नीच कुळांत जन्मलेल्या पुरुषाप्रमाणेंच अधम आहेस हा गर्भितार्थ.

याप्रमाणें पांडवांस लाक्षागृहांत जाळण्याचा यत्न, भीमाला विषान्न चारणें व सर्प डसविणें, द्रौपदीची सभेत गांजणूक, बहुतांनीं एकट्या अभिमन्यूशीं युद्ध करून त्याचा वध करणें इत्यादि गोष्टींचा जाब कृष्ण कर्णास विचारितोः—

"पूर्वी धर्म न रुचला, त्यजिला निपटूनि तो जसा कुचला, ।
आतांचि बरा सुचला ? धर्मगृहा सर्व व्हा परासु, चला. ॥ ११ ॥
मागेंचि तुह्मी भजतां धर्माला तरि तुह्मांसि वांचविता. !
आतां मरा, न वांचे दीप्तगृहीं जो न तोय सांचविता. ॥ १३ ॥
आतां रक्षील कसा धर्म, तुह्मी वित्तमद्यमत्तांनीं ।
जो लोटिला दहादां स्वहितहि मानूनि अहित लत्तांनीं ? ॥ १५ ॥

रक्षावा धर्म असा करिसी उपदेश तरि असे मान्य. ।
रक्षितसों धर्मतें, आह्मांला धर्म ठाउका नान्य. ॥ १६ ॥
आश्रितजनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें, ।
निःश्वास वृषें लज्जावनतमुखें सोडिला जसा नागें ॥ १८ ॥

( कर्णपर्व अ० ४९ )"

सर्प सुस्कारा टाकतो त्यांत विष असतें. कर्णानें सुस्कारा टाकला त्यांत घोर कर्म करण्याचा संकल्प हें विष होतें. सर्पाची उपमा देऊन पंतांनीं असें सूचित केलें कीं दुःखोच्छ्वास टाकीत स्वस्थ न बसतां कर्णानें घोर युद्धकर्म आरंभिलें. थोड्यांत समर्पक व बहारीची उपमा देऊन पंतांनीं पुढील कथाभाग ध्वनित केला आहे यांत त्यांचें मार्मिकत्व व सत्कवित्व दिसून येतें.

(२६) खोचदार भाषणांचीं आणखी उदाहरणें पुढील भीमाचीं भाषणें होत. दुर्योधनादिपुत्रांच्या श्राद्धाकरितां धृतराष्ट्रानें पांडवांस द्रव्य मागितलें असतां भीम धर्माला ह्मणतोः-

"दुर्योधनादिकांचीं श्राद्धें जरि वाटलीं मना कार्यें, ।
कां बकहिडिंबकीचककिर्मीरांचीं करूं नये कार्यें ? ॥ (आश्रम. २.१०१)"

धृतराष्ट्राविषयीं भीमाचें मतः-

"बाप म्हणावें याला तरि असतें अरिस काय वा ! शिग ? ॥

( आश्र. २.१०५ )"

(२७) औपरोधिक भाषणाचा एक सुरेख मासला. सर्व सुप्त पुत्रबांधवांचा अश्वत्थाम्यानें नाश केल्याचें ऐकून द्रौपदीचें धर्मराजाशीं भाषणः-

"कृष्णा ह्मणे, 'न झालें ऐसें दैत्यां सुरां नरां जन्य ।
धन्य प्रभु धर्मा ! तूं अन्य नयनिपुण असा न राजन्य ! ॥ ११७ ॥
निज संतान यमाच्या दिधलें शुचिच्या जसेंचि आज्य करीं, ।
बहु बरवें केलें हें निश्चित सुखे यथेष्ट राज्य करीं. ॥ १८ ॥
राज्यसुखें या पांचां त्या सौभद्रासही विसरशील ।
कीं तूं स्वसुखसुविस्मृत देहादि निखिल सुधी विसर-शील. ॥ १९ ॥

( ऐषिकपर्व )".

## (२८) शरसंधानलाघवः-

आतां युद्धवर्णन करित असतांना वीराचें शरसंधानलाघव पंत कसें वर्णन करितात तें पहाः-

( अश्वत्थाम्याचें )

'तूणीर, चाप, तद्गुण, भुज, कर, पद, वदन, लोचन, घ्राण, ।
कर्ण, शिर, अंग, लोमें कवच, रथ ध्वजहि वर्षती बाण. ॥
( कर्ण. ११.२२ )"

( कर्णाचें )

"काढी, जोडी, ओढी, सोडी शर कर्ण, लाघवास्तव तें ।
न दिसे, दिसे शरासनमंडल हतशत्रुबलहि त्याभंवतें. ॥ (कर्ण. ३०.७१)"

वरील गीति वाचून आमच्या काव्यप्रेमी बहुश्रुत वाचकांस रघुनाथपंडितकृत नलोपाख्यानांतील पुढील श्लोकाचें खचित स्मरण होईलः–

"कदा नेणो ओढी, शरिधितुनि काढी शर कदा,
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा; ।
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधानकरणी. ॥"

(२९) भगदत्तराजाच्या उन्मत्त व उग्रहत्तीच्या उग्रयुद्धाचें वर्णन पहा:–

"भासे मागधनृपगज उग्रपणें मूर्तकाळसा, गरसा ।
अविषह्यवेग, केवळ अविलंघ्य प्रलयकाळसागरसा. ॥ कर्ण. १२.७ ॥
वाटे काळाचाचि द्विरदाकृति, तो महाशरीर, गडी; ।
ह्मणी वीरांसि वहन्मदनद रद; पद शिरावरी रगडी. ॥ ८ ॥
पाडी क्षितिवरि, जे नृप गजतुरगरथींहि शोभले; चिरडी ।
चरणीं तृणसे; त्यासीं भिडतां खाती भले भले चिरडी. ॥ ९ ॥
प्रथम विलोकुनिही त्या पांडवसिंहासि, तो करीन खरा ।
नखरा नाराचगणा मानी मानीचना; करी नखरा. ॥ १० ॥"

(३०) घटोत्कचाचें भीमानें स्मरण केलें असतां त्याची पांडवांजवळ येण्याची त्वरा पंत वर्णितातः–

'धर्मानुमतें स्मरतां याया गुरुदास्यपुण्य जनकानें, ।
ऐके घरीं **घ, टोत्कच** नमनीं, तो सत्य पुण्यजन कानें. ॥ (वन.५.२६)'

वरील गीति वाचून गजेंद्रानें अत्यंत आर्त होऊन प्रभूचें स्मरण केलें असतां गजेंद्राजवळ जाण्यासाठीं अत्यंत उताविळ झालेल्या वैकुंठपति भगवंताच्या त्वरेचें वर्णन करणाऱ्या पुढील सुप्रसिद्ध दोह्याची आठवण होतेः–

" 'हा' कहे लछमी 'ती' कहे गजराज ।
आगे गोली छूटत है, पाछे होत अवाज ॥"

वैकुंठपति प्रभु घाबऱ्या घाबऱ्या गजेंद्राकडे जाण्यास निघाले तेव्हां 'कोणा भक्तावर संकट पडलें ह्मणून देवा! चाललां?' असा लक्ष्मीनें प्रश्न केला असतां प्रभूनें 'हाती'

( =हत्ती ) असें उत्तर दिलें. पण तें कसें? तर लक्ष्मीजवळ 'हा' ह्मटलें व गजेंद्राजवळ गेल्यावर 'ती' ह्मटलें. या प्रभूच्या त्वरेला उपमा बंदुकीच्या गोळीची दिली आहे. जसी आधीं गोळी सुटते व मागून आवाज होतो, तद्वत् प्रभु 'हा' असें अर्धवट बोलून गजेंद्राजवळ गेल्यावर 'ती' असें दुसरें अक्षर निघून 'हाती' हा शब्द पूर्ण झाला. हा दोहा पंतांच्या ऐकण्यांत असून त्यावरून त्यांनीं वरील गीतीची रचना केली असावी काय?

(३१) निजलेल्या वीरांना कपटानें मारल्याबद्दल भीम अश्वत्थाम्यावर धांवून गेला; तेव्हां ब्रह्मास्त्रापासून त्याला वांचविण्याकरितां कृष्णाची त्वराः—

( गीति ) "प्रभुनें प्रतोद घेउनि, भीमाच्या संकटांत अवनातें ।
हय हांकिले कराया ऱ्हीत प्रीतहि मनांत पवनातें. ॥ (ऐषिक. २.२)"

श्रीकृष्णाचें घोड्याला त्वरेनें हांकण्याचें कौशल्य पाहून आपला वेग यापेक्षां कमीच ह्मणून वायूला मनांत लाज वाटली. परंतु आपल्या पुत्राच्या ( भीमाच्या ) रक्षणार्थ प्रभु एवढ्या वेगानें धांवून चालले आहेत हें पाहून वायूला त्याबद्दल आनंदही वाटला. थोडक्यांत किती सुंदर व खुबीदार वर्णन कवीनें केलें आहे!

(३२) धृतराष्ट्राचा शोकः—

( गीति ) "हुरहुर बहु खोटी रे! उर! उर न क्षणहि, काळजा! तडक, ।
असुहो! निघाचि, न चुका पुत्रप्रस्थानकाळ, जा तडक. ॥ (शल्य. १.२६)"

(३३) रामकौसल्याभेटः—

( श्लोक ) "कौसल्या, मलिना, कृशा, स्वतनयाश्लेषें तदा हर्षली,
आनंदाश्रुकरूनि, राघव शिरीं हुंगूनियां, वर्षली; ।
पूर्वींच्या परि विघ्न होइल, असें मानूनियां क्षिप्र ती
कोणातेंहि न पूसतां करि जणों राज्याभिषेकाप्रती. ॥

( कुशलवोपाख्यान १.९ )"

चौदा वर्षांनीं रावणवध करून राम परत अयोध्येस आल्यावर कौसल्यामातेची व रामाची भेट झाली. रामानें मातेच्या चरणांवर मस्तक ठेविलें, तेव्हां मातेच्या नेत्रांतून आनंदाश्रु निघून ते रामाच्या मस्तकावर पडले. यावर कवीची उत्प्रेक्षा. कौसल्यामातेस भय वाटलें कीं या खेपेसही विलंब केल्यास कदाचित् रामाच्या राज्याभिषेकास मागच्याप्रमाणें पुन्हां विघ्न होईल ह्मणून तिनें आपले अश्रु रामाच्या मस्तकावर गाळून जणूं काय त्याला कोणाला न विचारितां गुपचुप राज्याभिषेक केला. राज्यारोहणांत मुख्य विधि राजाच्या मस्तकावर अभिषेक करण्याचा असतो. कौसल्येनें तो राममस्तकावर अश्रुजलाभिषेचन करून पूर्ण केला. वरील वर्णन फार गोड असून उत्तरार्धांतील उत्प्रेक्षा तर फारच बहारीची आहे.

(३४) नलदमयंत्याख्यानांतील एक बहारीची गीतिः–

"राधाप्राप्त्यर्थ जसा तो स्वकरगतामला यशा शिनळ ।
सोडी दमयंत्यर्थं क्षिप्तचि अतिदुर्लभा तशाशि नळ. ॥ ॥
(वनपर्व अ० ४१ गी० २५)"

(भावार्थ) त्या सुप्रसिद्ध जारशिखामणि श्रीकृष्णानें राधेच्या प्राप्तीकरितां जसें आपल्या निर्मळ यशास तिजकडे पाठविलें, तसें दमयंती प्राप्त होण्याकरितां तिजकडे नलराजानें त्या आपल्या हस्तांत सांपडलेल्या हंसास पाठविलें.

विविधज्ञानविस्ताराच्या पहिल्या वर्षाच्या ५,७ अंकांत 'मोरोपंत' या मथाळ्याखालीं कांहीं मजकूर लिहिलेला आहे. त्यांत वरील गीतीवर पुढीलप्रमाणें आक्षेप घेतला आहेः–"यमक जोडण्यासाठीं ज्यानें भगवंताला शिनळ असें विशेषण दिलें, त्याची भक्ति केवढी होती ती सहज ध्यानांत येईल. श्रीमद्भागवतांत दुष्टांनीं जी परमेश्वराची निंदा केली आहे त्या श्लोकांचा टीकाकारानें वास्तविक अर्थ सांगून, नंतर टीकेच्या योगानें भगवंताची निदा आपल्याहि तोंडांतून झाली ह्मणून दोषप्रशमनार्थ पुनः त्याच श्लोकांचा अर्थ ओढून ताणून स्तुतिपर केला आहे. मोरोपंताला हें ठाऊक असून त्याला तें अभद्रभाषण करण्यास अगदीं संकोच वाटला नाहीं, किंबहुना लज्जा देखील वाटली नसावी. येथें श्रीकृष्णाला शिनळ ह्मणून, त्यानें राधेसाठीं आपलें निर्मळ यश घालविलें असें कवि ह्मणतो. असें जर आहे तर त्याचे गुण कां गावे? श्रीमद्भागवतांत कृष्णाची आणि गोपींची क्रीडा शुकाचार्यांनीं वर्णिली आहे. परंतु शुकाचार्य एवढा साधु आणि ऊर्ध्वरेता असून त्यानें ती क्रीडा कधीं दूषिली नाहीं; परंतु त्या कृत्याला भगवंताचें यश असें ह्मटलें आहे. मोरोपंताला तीं कृत्यें वाईट वाटत होतीं असेंहि कोठें आढळत नाहीं. दुसरें, जर श्रीकृष्ण जार, तर त्याची उपमा नळाला साजत नाहीं. कारण नळानें हंसाला पाठविलें तें जारकर्माच्या हेतूनें नव्हे."

'विस्तारां'तील वरील विवरणावर निबंधमालाकार लिहितातः–"(प्रस्तुत आर्येचा) अर्थ उघडच आहे कीं, नलराजाच्या हातीं हंस सांपडला असतां तो त्यास सोडून देता झाला; कसा? तर जसें कृष्णानें राधेशीं रममाण होण्याची इच्छा धरून आपल्या हातचें निर्मळ यश घालविलें. या आर्येत नलाचें आणि कृष्णाचें, दमयंतीचें आणि राधेचें, हंसाचें आणि यशाचें, असें तीन प्रकारचें साम्य कवीनें वर्णिलें आहे, व उपमालंकार केला आहे. वरील तीन साम्यांत चित्तास चमत्कार देणारें साम्य ह्मटलें ह्मणजे हंस आणि यश यांचें होय, व उपमेचा मुख्य भाग हाच होय. कृष्ण आणि राधा यांचें नल आणि दमयंती यांशीं जें सादृश्य वर्णिलें आहे तें केवळ गौण आहे. मुद्याची गोष्ट काय ती अमूर्त जें यश त्याशीं संस्कृत कवीच्या

संकेतास अनुसरून मूर्त जो परम शुभ्र हंस त्याची तुलना दोहोंशीं 'सोडणें' या क्रियेचा चमत्कारिक रीतीनें अन्वय करून दिला आहे ही होय. ही तुलना यथार्थ असली ह्मणजे कवीचें काम झालें; व जो खरा रसिक आहे त्याचें लक्ष तिच्या पलीकडे तिळमात्रहि जाणार नाहीं. आमच्या टीकाकारानें कृष्णास 'शिनळ हें विशेषण लावणें बरोबर आहे कीं नाहीं, शुकाचार्यांचा प्रस्तुत प्रकरणीं कसा अभिप्राय व मोरोपंताचा कसा होता, हंसाला जो दमयंतीकडे पाठविला तो जारकर्माच्या हेतूनें नव्हे, अतएव श्रीकृष्णाची उपमा नळाला साजत नाहीं, वगैरे जें पांडित्य केलें आहे तें निवळ अरण्यरोदन आहे. त्याचा वरील आर्येतील उपमेशीं बिलकूल संबंध नाहीं. मोरोपंताच्या धर्मसंबंधीं मतांविषयीं जर विचार कर्तव्य असता, तर प्रस्तुत लिहिणाराचा वरील सर्व ऊहापोह यथायोग्य होता; पण जोंपर्यंत कवित्वाच्या संबंधाचेंच विवेचन आहे तोंपर्यंत वरील धर्ममीमांसा केवळ अप्रस्तुत होय !"

हें शास्त्रीबोवांचें खंडणमंडण एकांगी आहे. 'सोडी' याचा 'घालविणें' असा चुकीचा अर्थ घेऊन शास्त्रीबोवांनीं वरील विवरण केलें आहे. त्यामुळें मोरोपंताच्या धर्ममतावर दिलेला टपका जशाचा तसा राहिला आहे. ह्मणून, त्यानीं केवळ कवित्वदृष्टीनें केलेलें एकांगी मंडण अपुरें वाटून त्यापासून वाचकाचें समाधान होत नाहीं. या गीतीवरील आक्षेपाचें उत्कृष्ट खंडणमंडण बाळकृष्ण मल्हार हंस याचा 'मोरोपंतावरील निबंध' पृ० ५६–५९ यांत सांपडतें. हंस लिहितातः–

"यांत श्रीकृष्णास 'शिनळ' ह्मटलें व शिनळाची उपमा नळराजास विवाहसंबंधीं कार्याचे वेळीं योजिली, यापासून पंताची भगवान् श्रीकृष्णाविषयीं भक्ति निर्मळ नव्हती व उपमाचातुर्यही त्यास नव्हतें असा कोणी दोष दिला त्यावर खंडणें-समाधानेंही केलेलीं आढळतात. तेव्हा रुचिभिन्नत्वासंबंधानें कोणी त्यास दोष ह्मणतात कोणी गुण ह्मणतात असें झालें. यावरून वरील दोषारोप सत्य नाहीं हें प्रथम दर्शनींच दिसतें.

"दुसरें, तत्वतः विचार केला तरी दोषाचा लेशही वरील पद्यात व वरील पद्यावरून पंतांत होता असे दिसत नाहीं:–

( श्लोक ) 'पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः ।
पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥'

या अतिप्रसिद्ध श्लोकाप्रमाणें जनार्दन ( श्रीकृष्ण ) आणि नल ह्यांचें साम्य किती मनोहर आहे बरें! गीतगोविंद, पद्मपुराण या अति पवित्र ग्रंथांवरून राधेचें महत्व व पुण्यसमृद्धि हिंदुलोकांत प्रसिद्धच आहे; त्याचप्रमाणें तिजविषयीं श्रीकृष्णाचें अत्यंत निर्मळ प्रेमही प्रसिद्धच आहे; त्या प्रेमाशीं नळाच्या दमयंतीविषयक प्रेमाचें साम्य

चमत्कृतिजनक नाहीं काय ? त्याही पुढें यशाचें आणि हंसाचें साम्य करितांना तर पंतानें कमाल करून टाकिली आहे हें मार्मिक जन सहज समजतील.

"'तो शिनळ' या पदावरून लक्षणेनें श्रीकृष्ण भगवान् असा अर्थ कवीनें ठेविला आहे. 'तो' ह्मणजे भागवतासारख्या पवित्र व प्रसिद्ध ग्रंथानें ज्याचें प्रेमपुरःसर वर्णन केलें आहे व सर्व लोकांस जो विश्रुत आहे असा शिनळ (जार). ज्याला शुक, व्यास, नारदप्रभृति भागवतोत्तम मोठ्या प्रेमानें सद्गदित होऊन चोरजारशिखामणि ह्मणतात; ज्याच्या राधेसह अनेक गोपांगनाबरोबर झालेल्या जारक्रीडा वर्णन करितां करितां संस्कृत व प्राकृत कविवृंद भाटच बनून गेले आहेत; त्याला आमच्या पंतानें पुण्यश्लोकाचें उपमान कल्पून कौतुकानें व प्रेमानें शिनळ ह्मटलें एवढ्यावरूनच पंताच्या ईश्वरभक्तीवर दोषारोप केला तर तें आरोप करणाऱ्याचें साहसच खरें ! यापेक्षां अधिक काय ह्मणावयाचें आहे !! याविषयीं पुढील श्लोक पहाः–

( श्लोक ) 'नूतनजलधररुचये गोपवधूटीदुकूलचोराय ।
तस्मै कृष्णाय नमः संसारमहीरुहस्य बीजाय ॥ ( मुक्तावली )'

"'यश सोडणें' याचा अर्थ 'पाठविणे' हा इष्ट असतां 'घालविणें' असा कोणी करितात. 'पाठविणें' ह्मणजे राधेला आपली कीर्ति समजे असें करणें आणि 'घालविणें' ह्मणजे राधेशीं जारकर्म करण्याची बुद्धि धरल्यानें यश घालवून अपयश घेणें. राधेच्या प्राप्तीकरितां श्रीकृष्णाची अपकीर्ति झाली अशी कोठें कथा नसून, तसें ह्मटल्यानें नळराजवर्णनांतील सुनीति व पावित्र्य यांस उपमान दूषणकारक होण्याचा उघड संभव आहे. यास्तव 'घालविणें' असा अर्थ करण्यापेक्षां 'पाठविणें' असा अर्थ करणेंच उचित आहे. हें मर्मज्ञांच्या ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं.

"दुसरें, 'सोडणें' ह्या क्रियेचा ज्या अर्थीं हंसावर प्रयोग केला आहे त्याच अर्थीं तो कुशल कवीनें यशावरही योजिलेला आहे. हंसाशीं शत्रुत्व जोडून किंवा पुनः भेट न घेण्याच्या बुद्धीनें नळराजानें त्यास सोडून दिलें आणि हंसवियोगाचें दुःख करित राहिला, असें जेव्हां मानावें तेव्हां 'घालविणें' असा अर्थ करणाऱ्यांच्या मताप्रमाणें उपमानोपमेयाची समानक्रिया होईल ! ! दमयंती प्राप्त होण्याकरितां तिजकडे नलराजानें हंसास पाठविलें, हा इष्टार्थ चमत्कारिक रीतीनें दाखविण्याकरितां, त्या प्रसिद्ध शिनळानें ( श्रीकृष्णानें ) राधेच्या प्राप्तीकरितां आपल्या विमल यशास तिजकडे पाठविलें या मनोहर उपमानाची कवीनें योजना केली आहे हें उघड आहे. **(हंस)**"

भगवान् श्रीकृष्णाची कीर्ति ऐकिल्यावर वृंदावनांत राधाकृष्णाची गांठ पडून ब्रह्मदेवाच्या हस्तें त्या उभयतांचा विवाह झाला. ही कथा पद्मपुराणांत व ब्रह्मवैवर्तपुराणांत आहे. ती लक्ष्यांत घेतली असतां पंतांनीं श्रीकृष्णास केवळ उत्कट प्रेमास्तव **'शिनळ' ह्मटलें. वास्तविक कृष्णाचा राधेशीं पतिपत्नीसंबंध होता.**

'स्वकरगता' या पदावर श्लेष आहे. कृष्णपक्षीं 'आपल्या हस्तगत ह्मणजे आपणास प्राप्त झालेल्या यशास', नलपक्षीं 'आपल्या हातांत सांपडलेल्या ह्मणजे स्वाधीन झालेल्या हंसास.' श्रीकृष्णानें आपली कीर्ति राधेकडे पाठवून ( राधेला आपली कीर्ति ऐकवून ) जशी तिची प्राप्ति करून घेतली तद्वत् नलराजानें हंसास दमयंतीकडे पाठवून तिची प्राप्ति करून घेतली. तात्पर्य श्रीराधेनें श्रीकृष्णकीर्ति आपल्या सख्यांकडून ऐकून त्याच्याविषयीं ती परमानुरागवती झाली व तिनें त्याच्याशीं जसा विवाह केला, त्याचप्रमाणें हंसमुखानें नलराजाची कीर्ति ऐकून दमयंतीनें इतर इंद्रादिदेवांस व राजांस सोडून नलाशीं लग्न लाविलें. या गीतींतील शब्दयोजना फार समर्पक व मार्मिक असून 'शिनळ' या पदांतील पूर्ण माधुर्य तर श्रीकृष्णभक्तच जाणतील. अशा अत्युत्कृष्ट वर्णनास अयोग्य व टाकाऊ समजणाऱ्यास श्रीकृष्णभक्तीचें रहस्य व पंतांचें श्रीकृष्णविषयक गाढ प्रेम समजलेंच नाहीं असें निरुपायानें ह्मणावें लागतें.

(३५) रामराज्याचें वर्णनः–

( श्लोक ) "राज्यातें अज तो करीत असतां, जाले दरिद्री धनी,
रोगी रोगविहीन, बालिश रत ज्ञानाचिया साधनीं, ।
गाई त्या घटदोहनी, बहुरसा सस्यावृता मेदिनी,
यूपस्तंभसमन्विताहि सरयू लोकत्रयाल्हादिनी. ॥ १४ ॥
दिव्यस्वादुफलाढ्य भूरुहलता संशोभती पुष्पिता;
आत्मापत्यमृतिप्रति क्षितितळीं पाहे न मातापिता; ।
वंध्या लब्धबहुप्रजा, सकलही वर्ण स्वधर्मीं रत,
श्रीरामाख्यसुधेसि कर्णचषकें पीती सुखें संतत. ॥ १५ ॥
पापातें न वसावया स्थळ दिसे, कोण श्रमाला पुसे ?
नाहीं आश्रय यास्तव क्षितितळीं चिंता सचिंता वसे, ।
विप्रातें बहु विघ्न होति, रुसली भीति त्रिलोकीं बरी,
साकेतीं रघुनाथ सानुजसुहृत् राज्यासि जेव्हां करी. ॥ १६ ॥

( कुश. अ० १ श्लो० १४–१६ )."

(भावार्थ) रामराज्यांत सर्व प्रकारची सुबत्ता होती. दारिद्र्य, रोग, व अज्ञान ह्या गोष्टी नष्ट झाल्या. गाई घागरभर दूध देऊं लागल्या. पृथ्वीवर सर्व प्रकारचे रस व धान्यें यांची निपज उत्कृष्ट होऊं लागली. वृक्षवनस्पतींना उत्कृष्ट, मधुर व सुवासिक फळें व फुलें येऊं लागलीं. मातापित्यांच्या अगोदर मुलांचा अपमृत्यु कधीं झाला नाहीं. सर्व सौभाग्यवती स्त्रियांना पुष्कळ मुलेंबाळें होत असल्यामुळें वांझपणा उरला नाहीं. सर्व लोक आपल्या वर्णाश्रमांच्या धर्माप्रमाणें वागत असत. सरयू नदीच्या

दोन्ही तीरांवर सारखे यज्ञ होऊं लागल्यामुळें ती यज्ञस्तंभांनीं दोन्ही बाजूंनीं युक्त होऊन त्रैलोक्यास त्यापासून आनंद झाला व सर्व लोक श्रीरामचरितामृताचें श्रवण मोठ्या आनंदानें निरंतर करूं लागले. रामराज्यांत सर्वांना राहाण्याला जागा होती, फक्त पापाला जागा मिळाली नाहीं. सर्वांची विचारपुस होई, पण श्रमाला कोणी विचारीना (उद्योग करण्यांत कोणाला श्रम होत नसत हें तात्पर्य.) कोणाच्या मनांत चिंता नव्हती, चिंतेच्या मनांत तेवढी चिंता उत्पन्न झाली कीं आपणाला पृथ्वीवर कोणी विचारित नाहीं, सर्व लोक निश्चिंत झाले आतां आपलें कसें होईल? कोणच्याही मार्गांत विघ्नें होत नव्हतीं, फक्त विघ्नालाच पुष्कळ विघ्नें होऊं लागलीं. रुसवाफुगवा कोठें नव्हता, भय तेवढें रुसलें कीं मला कोणी जवळ करीत नाहीं. सध्यां पृथ्वीवरील कोणत्या राजाला आपल्या छातीला हात लावून माझ्या राज्यांत वरीलप्रमाणें सुव्यवस्था आहे असें ह्मणतां येईल बरें!

(३६) तसेंच द्रोणपर्व अ० ६ गी० ३५–४६ यांत पृथुराज्याचें वर्णन केलें आहे, तेंही फार वाचनीय आहे. त्यांतील थोडासा मासला पहाः–

(गीति) "पृथुचा पृथु प्रताप प्रेक्षुनि झाली भयें इला दुहिता; ।
गाईस गोपसा, तो राजा झाला स्वयें इला दुहिता. ॥ ६.३५ ॥
पृथ्वी अकृष्टपच्या, सर्वसुखस्पर्श दर्भ कनकाचे ।
झाले, कोणालाही ज्याच्या राज्यांत अर्भक न काचें. ॥ ३६ ॥
वत्सें प्यावें, यावें गाईनीं दुग्ध भरुनि घागर गा! ।
कुसुमरसमिश्रितामृतकल्पोदकपूरपूर्ण सागरगा. ॥ ३७ ॥
वृक्षांच्या वल्लींच्या पुटकीं पुटकीं प्रभूत मधुरस रे! ।
वा! ज्यापुढें न अमृतहि ह्मणावया आपणासि 'मधुर' सरे. ॥ ३८ ॥
जन तुष्ट, पुष्ट, अकुतोभय, नयमय, सर्वेही अ-गद-वार्त ।
पृथु राज्य करित असतां नव्हतेच वनांतही अग दवार्त. ॥ ३९ ॥
बहुतन्चि जन रंजविला लावुनि निजगुणरसीं पृथु-कथांनीं, ।
जननींनीं जेंवि, करुनि तप परम, चरमवयीं पृथुक थानीं. ॥ ४० ॥"

वर दिलेलें रामराज्यवर्णन व हें पृथुराज्यवर्णन वाचून **स्वराज्ययुक्त सुराज्याची** यथार्थ कल्पना आमच्या वाचकांस येईल. राज्यकर्ते वरील राजांच्या प्रजावात्सल्याचें अनुकरण करितील तर पृथ्वीवरच स्वर्ग निर्माण होईल.

(३७) **रंतिदेवाच्या औदार्याचें वर्णन** (दानवीराचें उदाहरण):–

(गीति) "देउनि कोटि ह्मणे 'हे वाहिलि' जोडूनि हात 'पाकोळी! ।
तंतुपटें काय हरिल दिगिभांच्या घनहिमातपा कोळी? ॥' (द्रोण. ६.७)"

कोट्यावधि सुवर्णाचीं नाणीं देऊन हा रंतिदेव ब्राह्मणास हात जोडून विनयानें ह्मणत असे कीं महाराज ! हें अत्यल्प दान आपण 'फूल नाहीं फुलाची पाकळी' या ह्मणीप्रमाणें मान्य करून घ्या. दिग्गजांचें थंडी व उष्ण यांपासून रक्षण कोळयाच्या तंतूंपासून तयार केलेल्या वस्त्रानें कधीं तरी होईल काय ? अर्थात् नाहीं. याप्रमाणें मी रंतिदेव ब्राह्मणांस संतुष्ट करूं शकणार नाहीं.

( गीति ) "कांचनमयगोशतयुत कांचनमयवृष सहस्रशः पूर्ण. ।
शतवर्षे नित्य दिले, कीं हें जाणार सर्वही तूर्ण. ॥ ६. १२ ॥ (द्रोणपर्व)"

**लहानमोठे, गरीबश्रीमंत, स्त्रीपुरुष, संतसंसारी, सुष्टदुष्ट, इत्यादि भिन्न भिन्न पात्रांस शोभतील अशींच भाषणें पंतांनीं त्यांच्या कडून वदविलीं असून वर्णनेंही त्या त्या पात्राला शोभतील अशींच केलीं आहेत.**

(३८) भारतांतर्गत रामचरित्रांत सेतूवर सात उत्कृष्ट उत्प्रेक्षा पंतांनीं रचिल्या आहेत. त्यांतील पुढील दोन उत्प्रेक्षा फार बहारीच्या असून स्त्रीस्वभावास अत्यंत अनुरूप आहेत. पंत ह्मणतातः–

( गीति ) "सेतु न तो, यत्पतिनें स्वसुता नेली वृकें जशी एणी ।
त्या लंकेची श्रीभूदेवीनें ओढिली असे वेणी ! ॥
( वनपर्व १२.११ )"

वरील गीतीच्या योग्यायोग्यत्वाबद्दल 'विविधज्ञानविस्तार' व 'निबंधमाला' यांत मनोरंजक चर्चा आली आहे. 'विस्तारां'तील या गीतीवरील आक्षेपाचें खंडण करून 'माला' कारांनीं केलेलें मंडण फार योग्य आहे. श्रीभूदेवीनें आपल्या कन्येचें निर्दयपणें हरण करणाऱ्या लंकापतीच्या स्त्रीची–लंकेची–लांब, कृष्णवर्ण वेणी ओढून तिच्या नवऱ्यावरील रागाचा तिच्यावर सूड उगवून घेतला व आज मी तुझा सूड घेतें, थोड्याच दिवसांत माझा जांवई तुझ्या पतीचा वध करून सूड घेईल हें तिनें तिला सुचविलें. यांत न्यायान्यायाचा प्रश्न अप्रस्तुत असून स्त्रीस्वभावाचें मार्मिक प्रदर्शन हें मुख्य आहे. या आर्येवर पंतांनीं अपन्हुति, उत्प्रेक्षा, स्वभावोक्ति इत्यादि अलंकार चढवून तिला खूप सजविली आहे.

( गीति ) "कीं पतित पति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे ।
आली जी लंकाश्री तीचा तो सांजनाश्रुपथ वाटे. ॥ ( वन. १२.१४ )"

वरील उत्प्रेक्षेंत करुणारसही चांगला साधला आहे.

**पुष्कळ प्रसंगीं पंतांनीं स्त्रियांच्या मुखांत स्त्रिया नेहमीं बोलतात अशी भाषा, लहान मुलांच्या तोंडांत बोवडी भाषा व रंगेल पुरुषांच्या भाषणांत रंगेल पदयोजना घातली आहे.**

(३९) अक्रूर कृष्णास नेण्यास गोकुळांत आला तेव्हां कृष्णाचा आपणांस आतां विरह होणार हें समजून गोपिकांचीं अंतःकरणें अत्यंत खिन्न झालीं व त्या कृष्णाविषयीं प्रेमळ पण अक्रूराविषयीं अति कठोर भाषणें करूं लागल्या. तेव्हांचें वर्णन व त्यांतील शब्दरचना स्त्रीस्वभावास किती अनुरूप आहे तें पहाः-

(गीति) "बाई! न पारिजातात्रांचुनिया अन्य नंदनानंद; ।
घोषानंदहि ज्याविण, नेतो कीं त्या स्वनंदना नंद. ॥ ४९४ ॥
यमदूतशतक्रूर स्वमुखें अक्रूर म्हणवितो मेला; ।
आला गांव वधाया परि बाई! हा न लेश कोमेला. ॥ ४९५ ॥
मोडिति अक्रूरावरि कंसावरि सत्यपतिवरिहि बोटें. ।
पहिल्यासि वृथा निंदिति; दोघांतें तें न कविमतें खोटें. ॥ ४९७ ॥
(मंत्रभागवत १०)"

(आर्यागीति) "गळती कुंतळ पट हो! स्त्री म्हणता 'अक्रुरा तुझें तळपट हो; ।
हरिसी कामसणास द्वेष्या गेलासि तूं न कां मसणास? ॥
(कृष्णविजय ३९-१९)"

सूर्यग्रहणानिमित्त स्यमंतपंचकतीर्थीं यादवांच्या व पांडवांच्या स्त्रिया एकत्र जमल्या असतां कृष्णस्त्रियांनीं कृष्णभगिनीद्रौपदीस आपल्या स्वयंवरकथा सांगितल्या आहेत. त्यांतील, तसेंच रुक्मिणीहरणगीत, सावित्रीगीत, सीतागीत, सीतारामायण, अहिल्योद्धार यांतील वर्णनें फार बहारीचीं व स्त्रीस्वभावास पूर्णपणें साजेल अशीं असून त्यांतील शब्दयोजनाही स्त्रीजनांस अनुरूप अशीच आहे. यासंबंधीं केका १० तील गंगेची उक्ति व पृष्ठ ४२ वरील टीप १ हीं पाहावीं. तसेंच, 'राधाकृष्णसंवाद' व 'गोपीगोडवा' हीं पंतांचीं लघुकाव्येंहि ह्या संबंधीं वाचनीय आहेत.

(४०) लहान मुलांच्या बोबड्या भाषणांचा मासला पहाः-

कृष्णानें शकटासुराचा वध केला हें वर्तमान गवळ्यांचीं लहान मुलें आपल्या आईबापांना जाऊन सांगतातः-

(गीति) "गोपशिशु म्हणति 'पलिसा, ललतां हलिनेंच झालिला पाय, ।
गाला उलोनि पलला, सत्व खलें, नवल कलितसां काय? ॥
(हरिवंश १३.९)"

ह्या भाषणाची पदरचना किती मृदु, साधी व कोमल, म्हणूनच बालकोचित आहे हें सांगणें नकोच. मोरोपंती भारतांत बकराक्षसवधाख्यानांत (आदि. ३१. ३२), (मोरोपंतचरित्र, पृ० १०८ हास्यवर्णन' पहा), तसेंच कृष्णविजयांत (अ. ७, ९) अशीच स्फुट शब्दरचना केली आहे.

"कलचलनाला, ललतां, झालित असतां, कुमाल बहु आललतां, ।
सकतास उघल घलला पदनखलस्पल्स, तोंचि ह्या घलघलला. ॥
( कृष्णविजय अ. ७ आर्यागीति ९ )"

(४१) रंगेल भाषणाचा एक छोटासा मासला पहा. कामवश कीचक सैरंध्रीला म्हणतोः–

"शृंगाररसतरंगिणि! तळमळतो संगमार्थ **मत्स्य** पहा.
( विराट. १. ११७. )"

मत्स्यदेशस्थ कीचकाच्या मुखांत ही मत्स्याची उपमा फार अनुरूप असून सैरंध्रीला दिलेली 'रसतरंगिणी'ची उपमाही फार बहारीची आहे. यांतील प्रत्येक शब्दाची योजना फार खुबीदार आहे.

याशिवाय हरिवंश. ३५,६४; ३६.५८; इत्यादि स्थळीं रसिक शृंगारिक भाषणें आलीं आहेत. मोरोपंतचरित्र 'शृंगाररसवर्णन' पहा.

**पंतांनीं आपल्या काव्यांतून-विशेषतः आपल्या भारतांतून निरनिराळ्या मनुष्यांचीं स्वभावचित्रें फार मार्मिकपणें रंगविलीं आहेत. मूळांतील वर्णनाचा संक्षेप करितांना त्या त्या पात्रांच्या स्वभावाचा योग्य परिपोष होईल अशी खबरदारी त्यांनीं घेतलेली आढळते.** श्रीकृष्ण, युधिष्ठिर, भीम, अर्जुन, द्रौपदी, सुभद्रा, कुंती, धृतराष्ट्र, विदुर, दुर्योधन, कर्ण, भीष्म, द्रोण, शल्य, गांधारी इत्यादि भारतीय स्त्रीपुरुषांचीं शब्दचित्रे यथायोग्य प्रमाणांत खुलवून रंगविण्यांत पंतांचा हातखंडा आहे. त्यांचें काव्य ह्मणजे विविध पात्रांच्या स्वभावाच्या रंगांचे फवारे उडविणारें कुशल कारागिरानें घडविलेलें उत्कृष्ट कारंजें होय. त्यांतून ज्ञान व आनंदाचें उदक सतत चित्रविचित्र तऱ्हेनें प्रकट होत असतें. याचीं उदाहरणें त्यांच्या भारतांतून मुबलक आढळतात. कृष्णाचा मुत्सद्दीपणा, युधिष्ठिराचा सात्विक स्वभाव, भीमाचा आडदांड शिपाई बाणा, अर्जुनाची सात्विक धीरवीरहीरता, भीष्माचें भक्तियुक्त शौर्य, द्रोणाचें शत्रुपुत्रालाही धनुर्विद्या शिकविण्याचें औदार्य, सरळपणा व शौर्य, दुर्योधनाचा करारी बाणेदारपणा, दुःशासनाची चिकाटी, कर्णाचें अनुपम औदार्य, शौर्य व मैत्री, नारदव्यासांचें सकलजनहितकारित्व, कुंतीचें वीरमातृत्व, गांधारीचें पातिव्रत्य व पुत्रस्नेह, शल्याचा पराक्रम, धृतराष्ट्राचें पुत्रपक्षपातित्व, विदुराचा सडेतोड स्पष्टपणा, द्रौपदीचें वीरपत्नीत्व व तेजस्वी स्वभाव इत्यादि स्वभावचित्रें वाचलीं ह्मणजे आपण उत्कृष्ट चित्रांचें एक रम्य प्रदर्शनच पाहत आहों असें वाटतें. इतकेंच नव्हे तर आपण कित्येक प्रसंगीं त्या त्या काळीं जन्मलों असून त्या त्या पात्रांचे व्यवहार प्रत्यक्ष अनुभवित आहों असा आनंददायी भ्रम आपणास होतो.

**पंतांच्या अंगीं वाचकांस तल्लीन करून टाकणाऱ्या चमत्कारिक कल्पना प्रसवण्याची शक्ति अजब असून त्यांच्या बहुतेक गीतींचीं उत्तरार्धें अलंकारयुक्त किंवा चमत्कारिक कल्पनामय असतात.** ही कल्पना प्रसवण्याची शक्ति उत्कृष्ट कवीचें एक अवश्यक अंग होय ही समजूत पंतांना मान्य होती असें पुढील गीत्यर्धातील उपमेवरून कळतें:-

'बहु कल्पना सुकविसा, विजयहि बहु शरपरंपरा व्याला. ॥ ( विराट.५. २७ ).' कित्येक प्रसंगीं त्यांचा कल्पनाविहंगम स्वप्रतिभाशक्तीच्या जोरावर चिदाकाशांत अत्युच्च भराऱ्या मारून अतिशय उदात्त, उज्वल, व हृदयंगम अशा कल्पनांसह काव्यभूमीवर प्रकट होतो. त्यांच्या बहुतेक उपमा समयोचित व अर्थ-गंभीर असून मूळ वर्णन वाचकांच्या मनांत चांगलें उतरेल अशाच असतात. प्रसंगोचित वर्णनें किंवा भाषणें यांत सुंदर उपमांची भर ह्मणजे दुधांत साखर याप्रमाणें होय. पंतांच्या काव्यवाचकांस याचा प्रत्यय वारंवार येतो.

येथें स्थलसंकोचास्तव अशा थोड्या सरस कल्पनांचीं तेवढीं उदाहरणें देतों.

**सरस व रम्य कल्पनांचीं उदाहरणें:-**

( गीति ) वासुकिनें रम्य गृहीं, करउनि साहित्य सर्व, वसवीला. ।
**मुक्त्यर्थ उमाशंकर जाणों देवालयांत बसवीला.** ॥ १ ॥
( आदिपर्व अध्याय ५.९३ )

असकृत् विरहद, तापद, परि मित्रीं काय सुमुखि ! भीरु ! सती ! ।
दयिते ! नलिनी, न धरुनि चित्तीं स्वप्रेमभंगभी रुसती ? ॥ २ ॥
( आदि. अ० १३ गी० ८६ )

इंद्र ह्मणे, 'मत्सम तुज पुत्र दिला सर्ववीरवर हो ! तो ।
हो तूंहि पुत्रिवर; **बहुगुण सुजनीं अर्पिला सुवर होतो.**' ॥ ३ ॥
( आदिपर्व अध्याय १९.७६ )

त्रिजगत्पूज्यपद प्रभु गुरु पुण्यश्लोक सार्वभौम खरा, ।
त्या निंदी श्रीकृष्णा **कीर्तिश्रीशांतिभूतिच्या मखरा.** ॥ ४ ॥
( सभापर्व अध्याय २.३६ )

दुष्ट ह्मणे 'जें झालें खर दुःख कृतांतरूप मामा ! तें ।
**दावाग्निसें कराया भस्म पहातें तरूपमा मातें.**' ॥ ५ ॥
( सभा. ३.८ )

**पेटे पांडवकोपानल कृष्णादृष्टि होय तद्धमनी ।**
करितील काय हो ! ते निजमर्यादा गुणेंचि बद्ध मनीं. ॥ ६ ॥
(सभा. ५.२७)

तो शतशः पट झटझट फेडुनि भागे, सभेंत वेडावे, ।
किति खळबळ? **जळनिधिचे कीं दुस्तरतर तरंग फेडावे !** ॥७॥
( सभा. ५.८९ ).

**प्रिय पांचजन्य जीस, प्रिय तदितर त्या भुजेसि कंबु कसा ? ।**
झिडकारिला सतीनें **सिंहीनें दुष्टबुद्धि जंबुकसा.** ॥ ८ ॥
( विराट. १.५१ )

तों येउनि सांगे सितवाहचरित हरिनियुक्त, लोमश तें, ।
**प्रत्युत्थान जयांला द्यावें सच्छ्रोतृकर्णलोमशतें.** ॥ ९ ॥
( वनपर्व अध्याय ५.४ )

**खद्योत व्योमपथीं भानुपुढें काय देखिले टिकले ? ।**
**त्रिनयनभालेंदुपुढें सरतिल सित रक्त रेखिले टिकले. ?** ॥१०॥
( वनपर्व अ० ६.४६ )

**तच्छस्त्रास्त्रैकार्णवमध्यंगत तो महाकिरी टिकला, ।**
अपराजिता शिवासी समरीं विजयावहा किरीटि–कला. ॥ ११ ॥
( वनपर्व अ० ७.४६ )

पुष्पकविमान लंका हरितां धनपति ह्मणे 'कुलकलंका ! ।
**त्रासें संप्रति, हर्षें मग पोपू त्वत्क्षयें पुलक लंका.'** ॥ १२ ॥
( वनपर्व. १०.२७ )

करिती सूर्यास्तोदय एकमुहूर्तांत एक शतदा ते, ।
**त्यांत न एकासमही होती मेघां असे हि शत दाते.** ॥ १३ ॥
( विराटपर्व अ० ५.१५ )

युद्ध न हरिसख मांडी, त्या **सद्यःस्वर्गहेतुसत्रास;** ।
जाले सहस्रशः कृतकृत्य, न जाले कृतार्थ सत्रास. ॥ १४ ॥
( विराटपर्व अ० ५.६६ )

निजबाहुबळें तरला मारुति कीं अब्धिला अलाबुबळें ? ।
**होय भला इष्टार्थग्रह उपनेत्रेंचि कीं भला बुबुळें ?** ॥ १५ ॥
( उद्योग. ३.१३ )

यत्प्राप्त्यर्थ श्रीमद्ब्रह्मशिरहि गुरुपदीं सदा लवतें, ।
**रविचेंहि दृगघभंजन अंजन कंजनयनें दिले लव तें.** ॥ १६ ॥
( उद्योगपर्व अ० १०.१८ )

राज्याभिषेक करितिल तुज मजसह विप्र भूमिप दरानें; ।
किंबहुना ? **घेइल तव तांबूल क्षिप्र भूमि पदरानें.** ॥ १७ ॥
( उद्योगपर्व अ० १०.७८ )

भीष्मश्वेताश्वांचा निरुपम मज वाटला तडाखा तो, ।
**कीं ब्रह्मगोल वाटे विशिखांहीं दाटला तडा खातो.** ॥ १८ ॥
( भीष्म. ६.४६ )

ऐसें आधीं मर्मी ताडी अतितापजनक वचनांहीं, ।
मग इषुहीं, ज्यां न फुटे ऐसे कोठेंहि घनकवच नाहीं. ॥ १९ ॥
( भीष्मपर्व अ० ७.४६ )

( गीति ) तेव्हां करील कोणी भलता त्वद्वीर मन्मथन राजा ! ।
**सुगुरु सुशिष्यसुवश कीं, सुस्त्रीवश सुबहु मन्मथ नरा जा**
(=ज्या) ॥ २० ॥ ( भीष्म अ० १.८७ )

( गीति ) हा रक्षोधम मी **निजपातिव्रत्यानलांत होमीन**; ।
परि इच्छा आहे कीं, **जन रामयशोर्णवांत हो मीन.** ॥ २१ ॥
( मंत्ररामायण, सुंदर. ६८ )

( गीति ) **परि रामयशश्चंद्र प्रम्लानद्युति नसो,** ह्मणून मनीं ।
धरिलाचि धीर सीते ! दुष्कर दशकंठनाश हें न मनीं. ॥ २२ ॥
( मंत्ररामायण, सुंदर. ७४ )

हरिनीलकाय शोणितचंदनलिप्तांग तो दशग्रीव ।
**संध्याभ्रसा** दिसे, तें कोपे पाहूनि फार सुग्रीव. ॥ २३ ॥
( मंत्ररामायण-युद्धकांड २६५ )

गुरुभक्ता ! नयनिपुणा ! तुजसम कोणी नसे विशुद्ध मनीं; ।
**धमनी दिसती तूझ्या या माझ्या शोकवन्हिच्या धमनी.** ॥२४
( युद्ध. ३७३ )

दशमुख हें महदप्रिय, ऐकुनियां, फार जाहला खिन्न; ।
खिन्नतनू नतकंधर **सस्रोत जसा महीध्र पविभिन्न** ॥ २५ ॥
( युद्ध. ३९३ )

चाउनियां काय बळें धांवति आंगावरूनियां, हंसती; ।
**मृतवन्यगजास जसे, वायसगण वेष्टिती** तसे दिसती. ॥ २६ ॥
( युद्ध. ४३८ )

**हांसति केश जयाचे, जलदव्याप्ताग्रपारियात्रास;** ।
यात्रा सदैव ज्याची देवांसह दे शचिप्रिया त्रास. ॥ २७ ॥ (युद्ध. ४४६)

बहळक्षतजसमुक्षित कपिबळगत फुल्लपर्णवनवर्ण; ।
**अर्णवकुक्षिग वाडव,** तैसा भासे प्रचंड घटकर्ण. ॥ २८ ॥
( युद्ध. ४७८ )

क्षणदाचरजननाशें रावण नानाविधायुधस्तोमें ।
वर्षे कपिसेनेवर, **उद्गार तधीं दिला यमें व्योमें.** ॥ २९ ॥
(युद्ध. ६४१)

दशमुखदारा पतिला आलिंगिति शोकतापधृतकंपा; ।
**प्रावृट्काळीं गगनीं जयापरी धूमयोनिला शंपा.** ॥ ३० ॥
(युद्ध. ७२१)

**सेवक अमरादि तुजे**, कांचनमय दुर्ग मुदितजनवर्ग, ।
**भर्ग प्रसन्न जाला, अधिक** तुला काय भासला स्वर्ग ? ॥ ३१ ॥
(युद्ध. ७२७)

त्याच्या करीं समर्पण करणें, जो पुत्रतुल्य रक्षील; ।
आम्हांसि शोकहस्तीं दिधलें, हा याक्षणींच भक्षील. ॥ ३२ ॥
(युद्ध. ७२८)

जनकसुता जगतीवर मनुजेंद्राज्ञस वायुपुत्र **घन** ।
**उठवी रोमांचांकुर** जयवागमृतें हरूनि ताप घन. ॥ ३३ ॥
(युद्ध. ७३२)

जाणों विरहमयाग्नि क्षितितनयेला असह्य तो जाळी; ।
**तापें ताप हरावा, ह्मणउनि अनलीं प्रवेशती झाली.** ॥ ३४ ॥
(युद्ध. ७४१)

**हेमांबुजिनी श्रीमत्सरस्वतीच्या हृदीं** तसी साजे; ।
**ज्वलनाधिदेवता कीं,** त्रिलोकपूज्या जगन्निवासा जे. ॥ ३५ ॥
(युद्ध. ७४२)

**कीं स्वच्छपद्मरागग्रावविरचितालवाल हेमलता ।**
**माणिक्यदर्पणांतस्वःस्त्रीप्रतिबिंब हें ह्मणो भलता.** ॥ ३६ ॥
(युद्ध. ७४३)

तेव्हां यानवरावर सानुज सस्त्रीक रामभद्र चढे; ।
**सतडिन्मेघाधिष्ठितरत्नाचलमौलिशींच साम्य घडे.** ॥ ३७ ॥
(युद्ध. ७६९)

त्या स्त्रींस कुसुमयानीं, स्थापुनि **जातां नभःपथें सकल ।**
**योजनसमुच्च पर्वत, केवळ दूरूनि भासती शकल.** ॥ ३८ ॥
(युद्ध. ७७)

त्वरिततर श्रीदाचें विमान जेव्हां नभःपथें चाले; ।
**तेव्हां दिसती प्रभुला सामोरे वृक्ष भूध्र कीं आले.** ॥ ३९ ॥
(युद्ध. ७८१)

वाल्यनुजाचें मस्तक; येथें राज्याभिषेकनीरानें; ।
**मेघें गिरिशिखर** तसें, भिजवीलें या तुझ्याचि वीरानें ॥ ४० ॥
( युद्ध. ७८३ )

पंकजदलायताक्षि ! स्वकरें तूं शिपिलीस जी लवली; ।
तीही फलभारानें **भाग्यानें सज्जनापरी लवली.** ॥ ४१ ॥
( युद्ध. ७८९ )

जे त्वां द्विजराजमुखि ! स्वकरें पूजार्थ लाविली तुळशी; ।
तत्सेवनें **मदंकीं सांबुदविद्युल्लतेसवें तुळशी.** ॥ ४२ ॥
( युद्ध. ७९० )

हीरकशिखराभदति ! **त्वत्स्मितरुचिपुंजशुद्धतोयवहा;** ।
**त्वदलकनिभयमुनेशीं,** संयुक्ता जान्हवी पहा भवहा. ॥ ४३ ॥
( युद्ध. ७९१ )

हे मम पूर्वजदत्ता, **मौक्तिकमालाचि होय पृथ्वीची;** ।
हीच्या अघगिर्येशनीं शोभति कुंदेंदुकांति पृथु वीची. ॥ ४४ ॥
( युद्ध. ७९७ )

मद्दुःखसागराचा अगस्त्य तूं; काय बा तुझें नांव ? ।
**चिंतानदींत बुडतां, दैवें कोठोनि धांवली नाव ?** ॥ ४५ ॥
( युद्ध. ८०८ )

आपण मग राजगृहीं **शिरला देहांत जेविं चैतन्य;** ।
धन्य जनाला केलें, साकेत दिसे क्षणांतरीं अन्य. ॥ ४६ ॥
( युद्ध. ८३४ )

गेली प्रदोषसमयीं दैवानें विप्रसत्तमाजवळी; ।
**अर्कश्रीस शिखीपरि,** तत्सेवा प्रीतिमान् मुनी कवळी. ॥ ४७ ॥
( उत्तर. १६ )

वैरोचनि विस्मयसह दशकंठाला धरोनियां हांसे; ।
**कर्पूरमूर्तिसम तो स्मितभापूरांत रात्रिचर भासे.** ॥ ४८ ॥
( उत्तर. १३३ )

मेकलगिरिराजसुता वरिती झाली महार्णवाला जे ।
**मागें फिरतां वाढे, भूपें आलिंगितां मनीं लाजे.** ॥ ४९ ॥
( उत्तर. १७७ )

आतां कथितों तुज मी सीतेचा हरणहेतु देवास ।
कर्णद्वारें नेवुनि चित्तागारीं कथेसि दे वास. ॥ ५० ॥
( उत्तर. २१२ )

अश्रुप्लुताक्ष तो मग विभुला वंदूनि ऋक्षपति गेला; ।
तेव्हां देवाचें पद **गमलें व्यालेंचि काय गंगेला !** ॥ ५१ ॥
( उत्तर. ४२३ )"

याशिवाय मोरोपंती काव्यांतील सुंदर कल्पना पाहणें असल्यास परिशिष्ट 'ठ' पहा.

पुष्कळ ठिकाणीं पंतांनीं आपल्या काव्यांतून एक एक शब्द मोठ्या मार्मिकतेनें व खुबीनें योजिलेला आढळतो. याचीं उदाहरणें वरील उताऱ्यांतून मुबलक दाखविलीं आहेत.

संस्कृतांत कांहीं सत्कवींच्या काव्यांतून' **'पदलालित्य'** हा प्रकार आढळतो. पंतांच्या काव्यांत हा प्रकार थोडाबहुत सर्वत्रच आढळतो. तरी त्यांच्या कित्येक स्फुट काव्यांतून, स्फुट आख्यानांतून व विशेषत: संस्कृतभाषेंत रचिलेल्या त्यांच्या स्फुट काव्यांतून हा आल्हादकारक पदलालित्याचा प्रकार प्रमुखत्वानें आढळतो. यासंबंधीं 'शिवार्याशतक,' 'रामस्तुति,' 'पांडुरंगस्तोत्र तृतीय' इत्यादि प्रकरणें वाचावीं. 'मुक्तामाला' व 'कृष्णस्तवराज' यांच्या वाचनानें **भाषासौंदर्य** व **अर्थगांभीर्य** हे दोन गुण पंतकाव्यांत किती आढळतात त्याचा अंदाज कळून येईल. कालिदासकवीनें रघुवंशांतील ९ व्या सर्गांत श्लोकाच्या प्रत्येक चतुर्थचरणांत ज्याप्रमाणें यमकावृत्ति साधली आहे, त्याचप्रमाणें पंतांनीं 'विठ्ठलभक्तस्तुति' या प्रकरणांत प्रकार केला आहे. परिशिष्ट 'ऋ' ( आ ) पृ० ३९–४० पहा.

मोरोपंतांनीं आपल्या काव्यांतून 'पदलालित्य, सुंदर अनुप्रास व यमकें हीं साधण्यांत अगदीं पराकाष्टा केली आहे. याविषयीं महाराष्ट्रभाषाकोविद अशा विद्वानांचे पुढील अभिप्राय पहा:–

( १ ) श्रीमंत बापुसाहेब कुरुंदवाडकर हे रसिक कविवर्य ह्मणतात:–

( गीत्यर्ध ) 'पंतोच्छिष्टचि सारें उपमा यमकें सुवेष सुरसत्व.'

( २ ) कै० बा. म. हंस ह्मणतात:–

मोरोपंतानें प्रासयमकादि शब्दचमत्कृतीचा व लहान प्रकरणें रचण्याचा, किंबहुना संस्कृत छंदाप्रमाणें प्राकृत भाषेंत छंदोमय वर्णन करण्याचा कित्ता वामनपंडितापासून घेतला असावा असें वाटतें, ( बीडकर विठ्ठल कवि व आनंदतनय ह्यांनींहि हें काम पूर्वी केलें होतें. तेव्हां त्यांचाहि कित्ता पंतापुढें होता. **श्री. वि. प.** ) वामन पंडितानें सर्वज्ञ पुण्यश्लोकास आपल्या भक्तिबळानें वश केलें तसेंच मयूरपंतानें कुशलतायुक्तिबलानें माया आर्येस वश करून टाकिलें आहे. आरंभीं कोणतीहि गोष्ट करण्यास कठिण असते व तिची भट्टीही चांगलीशी उतरत नाहीं. पण तीच पुनः पुनः केली असतां अधिक चांगली होत जाते. तशी वामनपंडिताची यमकादि चमत्कृति ज्याप्रमाणें साधली व मनोहर झाली आहे त्यापेक्षां मोरोपंताचें शब्दालंकार

फारच सुंदर, व्यापक व मनोहर साधले आहेत. आतां ही शब्दचमत्कृति वामन पंडितांच्या शब्दालंकारावलोकनापासून मोरोपंतास इतकी चांगली साधली आहे, वामनाचें (वामन, विठ्ठल, आनंदतनय इत्यादिकांचें-**श्री. वि. प.**) काव्य त्यास पहावयास मिळालें नसतें तर पंताचे काव्यांत सांप्रत दिसत आहे इतका चमत्कार बिनचूक साधलाच नसता असेंहि ह्मणता येत नाहीं…(परंतु एवढे खरें कीं) मोरोपंताच्या कवित्वरूप सूक्ष्मज्योतीस संस्कृताध्ययनकर्पूरादि साहित्य प्राप्त झालें त्यांतीलच वामनपंडिताचें काव्य एक अनुकूल साहित्य होय." पंतांनीं वामनपंडिताच्या स्तुतींत ह्मटलें आहे तसेंच कांहींसें 'सन्मणिमालें'त आनंदतनयासंबंधीं ह्मटलें आहे. पुढील दोन गीति पहाः—

(गीति) "अन्यत्र नसे कवनीं यावे रस सर्व हा नियम कांहीं ।
केली भाषाकवि जे त्यांची तों गर्वहानि यमकांहीं. ॥
(वामनस्तुति ९)"

(गीति) "आनंदतनय अरणीकर शोभवि फार कवन यमकांहीं. ।
तत्सूक्ति पाठ ज्याला त्याचें पाहे न भवन यम कांहीं. ॥
(सन्मणिमाला ७३)"

(३) प्रसिद्ध महाराष्ट्रग्रंथकार वि. को. ओक ह्मणतातः—

"मोरोपंतांची कविता करण्याची शैली सर्वोत्कृष्ट असून, मराठी भाषा म्हणजे ह्यांचे पुढें साक्षात् जशी हात जोडून उभी होती असें दिसतें. ह्यांच्यापूर्वी जे मराठी कवि झाले त्यांच्या ग्रंथांत अर्थगौरव व अर्थगांभीर्य, हे गुण विपुल आढळतात; हे गुण तितक्याच मानानें मोरोपंतांच्या काव्यांत असून शिवाय अनुप्रास, यमक व श्लेष हे गुण मागच्या सर्व कवींपेक्षां ह्यांस विशेष साधले आहेत. (रा. वि. कों. ओककृत 'हिंदुस्थानकथारस—मराठी भाषेतील प्रख्यात कवि)"

(४) निबंधमालाकार ह्मणतातः—"मोरोपंताची कविता वाचतांना सकृद्दर्शनींहि कळून येणारा तिचा एक मोठा विशेष ह्मटला ह्मणजे लांब लांब यमकें हा होय…मोरोपंतानें वरील शब्दालंकार साधण्यास फार सोयीचें जें आर्यावृत्त तें उचलून प्रकृत शब्दचमत्काराची अगदीं कमाल करून सोडिली. हा यमकरचनेचा प्रकार प्रस्तुत कवीच्या काव्यांत सर्व साधारण असून शिवाय जागोजाग अनुप्रासाचाहि चमत्कार त्यानें केलेला आहे. आतां हा जो मोरोपंताच्या कवितेंत आढळणारा विशेष वर सांगितला तो त्याची प्रसिद्धि प्रथमतः त्वरित होण्यास कारणभूत होऊन पुढें त्याची कीर्ति स्थिरावल्यावरहि तीस मुख्यतः आधारभूत होऊन बसला. अजून पाहिलें तरी प्रस्तुत कवीची जी चहा आढळते ती पुष्कळ अंशीं वरील विशेषावरूनच होय. इंग्लंडांत पोपची प्रख्याति त्याच्या अपूर्व पदलालित्यावरून जशी

झाली, व वीस वर्षांच्या वयांतच वरील कवि तत्कालीन कवींत अग्रगण्यत्व पावून पूर्वीच्या महाकवींशीं टक्कर मारूं लागला; किंबहुना त्याच्याहूनही एकंदर लोकांस अधिक झाला, त्याप्रमाणेंच आमच्या महाराष्ट्र कवीचेंहि झालें असावें. बारामतींतून त्याच्या आर्या जेव्हां प्रथमतः बाहेर पडूं लागल्या असतील, तेव्हां महाराष्ट्रकवितावधूचा हा नवीन थाटमाट पाहून तत्कालीन जन मोठे चकित होऊन राहिले असतील ! 'उदिते तु सहस्रांशौ न खद्योतो न चंद्रमाः'। किंवा 'उदिते नैषधे काव्ये क्व माघः क्व च भारविः'। ( 'सूर्य उदय पावला असतां काजव्याचा उजेड रद्द होतो व चंद्राचाहि फिक्का पडतो.' 'नैषधकाव्य निर्माण झालें असतां माघकवि कोणीकडे व भारवि कोणीकडे ?' ) अशाच प्रकारचा त्यांस अनुभव घडला असेल ! आपल्या धर्मपित्याच्या आश्रमांत तपस्विकन्येप्रमाणें वाढलेली जी शकुंतला तिनें पूर्वस्थितींतील वल्कलें टाकून देऊन महिषीपदोचित राजवेष धारण केला असतां तिच्या स्वरूपांत जसें विलक्षण अंतर दिसलें असेल; त्याप्रमाणेच जी कविता पूर्वी ओंवी व अभंग या छंदांत असून प्रायः अलंकारविरहितच होती तिला

'झणत्कार जीच्या पदीं नूपुरांचा ।
रुणत्कार जीच्या करीं कंकणाचा ॥'

असें स्वरूप एकदम प्राप्त झालेलें पाहून सारा जनसमूह अत्यंत विस्मित होऊन गेला असेल ! गीर्वाणवाणीच्या सुवर्णसूत्रांनीं जागोजाग विणून काढलेलें व अनुप्रासानें स्थळविशेषीं विचित्रित केलेलें असें उज्वल वस्त्र परिधान केलेली वरील अभिनव कविता जनमनःप्रांगणीं जेव्हां नटीप्रमाणें अवतीर्ण झाली असेल, तेव्हां तिचा अलंकारांचा थाटमाट पाहून व चरणांत रुणझुणणाऱ्या यमकरूप पैंजणांचा कर्णमनोहर नाद ऐकून जोशीबोवांसारखी मंडळी तल्लीन होऊन गेली यांत काय आश्चर्य !"

एका आंग्ल ग्रंथकारानें पोपविषयीं दिलेला अभिप्राय मोरोपंतांस तंतोतंत लागू पडतो. पोपच्या काव्याविषयीं **वाट्स** ह्या ग्रंथकाराचा अभिप्राय डॉक्टर जॉन्सन पुढीलप्रमाणें देतोः—

"It is remarked by Watts, there is scarcely a happy combination of words, or a phrase poetically elegant in the English language, which Pope has not inserted into his version of Homer. New sentiments and new images others may produce but to attempt any further improvement of versification will be danger ous. Art and diligence have now done their best, and what shall be added will be the effort of tedious toil and needless curiosity ( Dr. Johnson )"

'काव्यांतील शब्दांचा ध्वनि अर्थाचा प्रतिध्वनि असावा' असें जें पाश्चात्य पोप कवीनें, आपल्या काव्यविवेचनकवितेंत म्हटलें आहे तें पंतांला संमत होतें असें दिसतें. अर्थानुषंगानें शब्दरचना कोमल, कठोर, कटु, मधुर, कर्कश, सरस, नीरस अशी पंतांनीं अनुप्रास, दाम, अश्वधाटी इत्यादि यमकें, लांब समास इत्यादिकांच्या योजनेनें केली आहे. याचीं उदाहरणें त्यांच्या भारतादि काव्यांत भरपूर आढळतात. बाणाचा होणारा खरखर ध्वनि व शरांची त्वरित गति 'र'कार-प्राचुर्यानें, तसेंच विसर्गपूर्वक व सानुनासिक 'ककार' योजनेनें कंदुकक्रीडा, संयुक्ताक्षर-प्राचुर्यानें वाचतांना होणारा बाणवृष्टीचा भास वगैरे गोष्टी सुचविल्यामुळे पंतांचें काव्य पाश्चात्त्यांच्या दृष्टीनेंही उत्तमोत्तम काव्यांत मोडण्याजोगें झालें आहे. कर्णपर्वातील दोनच उदाहरणें पहाः—

"भव्य**प्र**ताप **कर्ण** खपित्याहुनि फार संगरीं तपला ।
कीं ज्याच्या शर**रश्मिव्रा**तपटीं तो सह**स्र**कर लपला. ॥ १.१ ॥"

"करिती रणांगणीं भट शत्रु**शिरःकंजकंदुकक्रीडा**, ।
**अरिगिरिवरि** शरवृष्टिहि, तें प्रेक्षुनि शत्रुही धरी व्रीडा. ॥ ८.१७ ॥"

( परिशिष्ट 'ऋ २' पहा ).

सारांश, पंतांची कविता केवळ शब्दचमत्कारमय, रसहीन व दुर्बोध आहे अशी जी कांहीं लोकांची समजूत आहे ती योग्य नाहीं. संशयरत्नावलि, सन्मणिमाला, पृथुकोपाख्यान, नामरसायन, केकावली वगैरे छोटीं प्रकरणें वाचलीं असतां देखील पंतांविषयींचा दुर्ग्रह निघून जाईल. भारतभागवतादि मोठे ग्रंथ लक्ष्यपूर्वक वाचले, तर पंतांच्या कवितेवर चिरस्थायी प्रेमच जडेल. **पंतांच्या कवितेचा मोठा गुण व्याकरणशुद्धता होय.** छंदोभंग, अशुद्धप्रयोग, चुकीचे समास, समास असून संधि नाहीं, ऱ्हस्वदीर्घाकडे दुर्लक्ष्य इत्यादि प्रकार पंतांच्या काव्यांत अतिशय विरळ असून ( परिशिष्ट 'ए' पहा. ) भाषेच्या ठाकठिकीकडे त्यांच्यासारखें लक्ष इतर फारच थोड्या महाराष्ट्रकवींनीं दिलें आहे. तसेंच पंतांनीं देशावरील निरनिराळ्या ठिकाणची व क्वचित् अस्सल कोंकणची शब्दयोजना आपल्या काव्यांत केलेली आढळते. इलुसी, आखाडा, कानकोंडा, चेंगट, चेव, परसें, बरीक, मुंडासें हे शब्द याचीं थोडीं उदाहरणें होत. ( परिशिष्ट 'ग' पहा. ) फारशी, आरबी, हिंदुस्थानी ह्या परकीय भाषेंतील पुष्कळ शब्दांचा त्यांनीं आपल्या काव्यांत उपयोग केलेला आढळतो ( परिशिष्ट 'क' पहा ).

तसेंच शुद्ध व सरळ मराठी भाषणसंप्रदायाचे मासले पंतांच्या काव्यांत मुबलक आढळतात ( परिशिष्ट- 'ख' ). कांहीं ठिकाणीं भाषेंतील म्हणीही जशाच्या तशाच किंवा थोड्या फरकानें त्यांनीं आपल्या कवितेंत ठेऊन दिल्या आहेत. ( परिशिष्ट

'ज्ञ' पहा. ) वरील परिशिष्टांत ह्मणी दिल्याच आहेत. त्याशिवाय खालील **ह्मणी** पंतकाव्यांत आढळतातः-

( १ ) अर्ध्या आडांत दोर कापणें. ( आदि. ३०-२० )

( २ ) कावीळ झाली त्याला सर्व पिवळें दिसतें ( कृष्ण. ६१.२ )

( ३ ) कोठें मेरू कोठें मोहरी ? ( केका. ६५ )

( ४ ) ज्या गांवीं जावयाचें नाहीं त्याची वाट कशाला पुसावी ?
( कृ० वि० ६५-१९ )'

( ५ ) देव तारी त्याला कोण मारी ? ( कृष्ण. ५५-४१ )

( ६ ) पालथ्या घागरीवर पाणी. ( उद्योग. ७-५ )

( ७ ) पिशाच्या हातीं कोलीत. 'पिशाहातीं स्वयें कांकडा.'
( कृ० वि० ६१-९ )

( ८ ) फुल नाहीं फुलाची पाकळी. ( द्रोण. ६-७ )

( ९ ) सोन्यांत सुगंध. ( कृष्णविजय ८७-७२ )

तसेंच त्यांच्या काव्यांतील **श्लेष** परिशिष्ट ( ऐ ) दिले आहेत. त्याशिवाय खालील आणखी श्लेष आढळतातः-

( १ ) आचार्यपुत्र ( १ गुरुपुत्र, २ द्रोण ) ( कर्ण. ११-१२, २१ )

( २ ) कटक ( १ सैन्य. २ कडें ) ( भारत ).

( ३ ) ईश्वर ( १ शंकर, २ देव ) ( कर्ण. २६.२ )

( ४ ) घाली ( १ आंदण दिलें, २ पसरलें ) ( वन. १२.१२ )

( ५ ) प्रतिनिधि ( १ ऐवजीं मनुष्य, २ राजप्रतिनिधि ) ( नामार्या १०२ )

( ६ ) प्रभु ( १ देव, २ स्वामी ) ( नामार्या १०२ )

( ७ ) योग ( १ अष्टांगयोग, २ युक्ति ) ( कर्ण. ११.२३ )

( ८ ) शकुनी ( १ दुर्योधनाचा मामा, २ एक पक्षी ) ( कर्ण. १५.१४ )

( ९ ) शिरोनिहिता ( १ मस्तकावर ठेवलेला, २ श्रेष्ठ ) ( सौप्तिक. १.४० )

(१०) सगर ( १ राजा, २ विषयुक्त ) ( शल्य. २.१ )

(११) सरणें ( १ पुढें सरणें, २ नष्ट होणें ) (शल्य. २.१ )

(१२) सोम ( १ चंद्र, २ शंकर ) ( सौप्तिक. १.३३ )

मोरोपंतापूर्वी वामन, आनंदतनय, विठ्ठल, रघुनाथपंडित इत्यादि कवींनीं संस्कृत छंदःशास्त्राच्या अनुरोधानें मुख्यत्वें अक्षरगणाच्या विविध वृत्तांत काव्यरचना केलेली आहे. परंतु त्यांपैकीं एकाच्याही काव्यास मोरोपंताच्या काव्याइतकी छंदोवैचित्र्यानें शोभा आलेली आढळत नाहीं. आर्या, आर्यागीति, गीति इत्यादि मात्रागणवृत्तांत त्यांनीं विपुल कविता केलेली असून अक्षरगणाचीं प्रसिद्ध व अप्रसिद्ध समवृत्तें, अर्धसमवृत्तें व विषमवृत्तें यांतही त्यांची कविता पुष्कळच आहे.

त्यांचा कृष्णविजय अ० ५५-७९, अनेक रामायणें, स्फुट काव्यें इत्यादि कविता वाचणारांस याचा चांगला प्रत्यय येतो. विशेषतः त्यांचें छंदोरामायण, व त्रुटित रामायण ह्यांत तर त्यांनीं छंदोवैचित्र्याची कमाल करून सोडिली आहे. संस्कृत वृत्तांचे प्रकार संपल्यावर त्यांनीं साकी, दिंडी, पदें, दोहा, सवाई, छंद, अभंग वगैरे प्राकृत वृत्ते घेऊनही पुष्कळ काव्यरचना केलेली आढळते. सारांश, हंसांनीं ह्मटल्याप्रमाणें 'नाना प्रकारच्या रसालंकारांनीं आपली कविता पुष्ट व सुशोभित करण्यांत इतर सर्व महाराष्ट्र कवींत मोरोपंतानें जसें वर्चस्व मिळविलें आहे; तसेंच तें विविध छंदोरचनेंतही त्यानें मिळविलें आहे.'

आतां काव्याचे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन प्रकार आहेत. त्यांपैकीं पंतांचें काव्य कोणत्या प्रकारांत मोडतें तें पाहूं. कीर्ति, अर्थप्राप्ति, व्यवहारज्ञान, अशुभनाश, तत्कालीन परमानंद व कांतेप्रमाणें मृदुमधुरशब्दांनीं उपदेश हे काव्याचे सहा उद्देश सांगितले आहेत. त्यांतील आनंदजनकता हा मुख्य हेतु होय. हा आनंद स्वभावोक्तीनें—मनोविकारांच्या अथवा सृष्टीच्या हुबेहुब चमत्कारिक वर्णनानें— अत्यंत उत्कर्षास पोंचतो. ह्मणून ज्या कवीच्या काव्यांत स्वभावोक्ति उत्तम साधलेली आढळते तो उत्तम कवि व त्याचेंच काव्य उत्तम. व्यंग्यादि अर्थ स्वभावोक्तींतच येतात. तेव्हां कवीनें यथाशक्ति व यथारुचि कोणाही अर्थास प्रधान करून काव्य लिहिलें तरी स्वभावोक्तीमुळें त्यास कांहीं अडचण नाहीं. व्यंग्यार्थ प्रधान ठेवून स्वभाव सोडून दिला तर तें काव्य उत्तम आनंददायी होणार नाहीं. उलट वाच्यार्थांतच जर खमंग स्वभावोक्ति साधून उत्तम रीतीनें स्वभाव वठवून दिला तर तें काव्य उत्कृष्ट आनंददायी होऊन उत्तम काव्यांत गणलें जाईल. अतिशयोक्ति, श्लेष, यमकें, अनुप्रास इत्यादि गोष्टींनीं जेथें वाजवीपेक्षां फाजील रंग दिला असून ज्यांत स्वभावोक्ति, कमी असेल तर तें मध्यम काव्य व केवळ अर्थचमत्कृतिरहित शब्दचमत्कारता जेथें आढळेल तें अधम किंवा कनिष्ठ काव्य समजावें. वरील काव्यलक्षणाप्रमाणें ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, अमृतराय, रामजोशी, श्रीधर इत्यादि महाराष्ट्र कवींच्या कवितेप्रमाणेंच मोरोपंतांच्या काव्यांतही स्वभावोक्ति पुष्कळ ठिकाणीं आढळते. भारत, रामायण, इत्यादि त्यांच्या ग्रंथांत स्वभावोक्ति फार उत्कृष्ट साधलेली आहे. अनेक स्वभावाचीं व अनेक वर्तनाचीं अनेक पात्रें त्यांत आलीं आहेत. त्यांचीं भाषणें, वर्तन व स्वभाव हीं प्रसंगविशेषीं उत्तम रीतीनें रंगविलेलीं आढळतात. तसेंच त्यांच्या स्फुट काव्यांतून व स्तोत्रांतून "कितीएकांत सार्वभौम राजाजवळ दीन जनांची, कृपाळु आईबापांजवळ लाडक्या मुलांची, सलगीच्या थोर मित्राजवळ दीन स्नेह्यांची वर्तणूक कसकशी होत असते हें ईश्वरापाशीं पंतांनीं केलेल्या प्रार्थनेंत व भाषणांत स्पष्ट दिसून येतें. कितीएक काव्यांत स्वोद्धाराविषयीं आतुर होऊन ईश्वर आपणावर लवकर कृपा करीत नाहीं ह्मणून पंतांनीं

जे तर्क केले आहेत ते फारच मनोहर उतरले आहेत. हीं स्तुतिस्तोत्ररूप काव्यें ह्मणजे मनाचे स्वभावच होत. नामरसायन, आर्या केकावलि, श्लोक केकावलि नामार्या, प्रांतप्रार्थना, संशयरत्नमाला इत्यादि लहान लहान पुष्कळ काव्यें पंतांच्या निर्मल स्वतंत्र कल्पनेनें निर्मिलेलीं आहेत. त्यांत आतुर मनुष्याचा स्वभाव व आणखी कितीएक गोष्टी चांगल्या प्रकारें रेखिलेल्या आहेत. ( हंस )."

वरील विवेचनावरून पंतांचें काव्य सरस स्वभावोक्तीमुळें उत्तम काव्यांत मोडतें असें वाचकांस दिसून येईल.

पंतांच्या काव्यांत **ओज, प्रसाद व माधुर्य** हे तिन्ही गुण उत्तम प्रकारें दृष्टीस पडतात. याविषयीं थोडें जास्त विवरण करितों.

कवितेंतील रसास योग्य अशा पदरचनेस रीति म्हणतात. हिचे पांचाली, वैदर्भी किंवा लाटीया व गौडी असे तीन प्रकार आहेत.

'द्वित्रिपदा **पांचाली लाटीया** पंच सप्त वा यावत् ।
शब्दः समासवन्तो भवन्ति यथाशक्ति **गौडिया** ॥'

जींत चार पदांच्या आंत ( दोन तीन पदें ) समासपदें असतात ती पांचाली रीति. ही प्रसादगुणदर्शक असते. वैदर्भीचे दहा गुण दंडीनें सांगितले आहेत. ते असेः—

'श्लेषः प्रसादः समता माधुर्यं सुकुमारता ।
अर्थव्यक्तिरुदारत्वमोजःकांतिसमाधयः ॥
इति वैदर्भमार्गस्य प्राणा दशगुणाः स्मृताः ॥'

श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारत्व, ओज, कांति व समाधि हे वैदर्भी रीतीचे दहा गुण आहेत. ही मुख्यत्वें माधुर्यगुणदर्शक आहे तरी त्यांत ओज असतोच. मात्र जींत यथाशक्ति—जितके लांब समास कवीला घालतां येतील तितके—लांब समास तेवढे असतात, ती गौडी रीति; व जींत थोड्या प्रमाणांवर फार फार झाले तर पांच सात पदांचे—समास असले तरी चालतात, परंतु श्लेष, प्रसाद, माधुर्यादि गुणही असतात ती वैदर्भी रीति. पंतांच्या अवाढव्य काव्यरचनेंत फार लांब समास, आखुड समास, व मुळींच समास नाहींत, किंवा असले तर क्वचित् हे सर्व प्रकार आढळत असल्यामुळें गौडी, वैदर्भी व पांचाली या तिन्ही रीतींची पदरचना व त्यांना आनुषंगिक असणारे ओज, माधुर्य, प्रसादादि गुण, व त्यांना त्यांना अनुकूल अशी परुषा, मधुरा व प्रौढा ह्या वर्णरचना विपुल आढळतात. जशी रसास पद्यरचना, तशीच वर्णरचनाही अनुकूल असावी लागते. रसानुकूल वर्णरचनेस वृत्ति ह्मणतात. हिचे मधुरा ( कैशिकी ), परुषा ( आरभटी ) व प्रौढा ( सात्वती ) असे तीन भेद आहेत. ज्या रचनेंत 'क' पासून 'म' पर्यंत असणाऱ्या स्पर्शवर्णातील ट, ठ, ड, ढ हे वर्ण सोडून बाकीचे वर्ण, णकार, द्वित्त'ल' ( ल्ल ), य,

र, ल, व अशाप्रकारचे कोमल वर्ण आणि अनुस्वार पुष्कळ येतात, तिला मधुरा किंवा कैशिकी वृत्ति ह्मणतात. ही माधुर्य गुण दर्शविते. ज्यांत संयोग, रेफ, सवर्ण योग, विसर्ग, तसेंच ट, ठ, ड, ढ या प्रकारचे कठोर वर्ण, आणि वर्गातील प्रथम, तृतीय यांचा द्वितीय, चतुर्थ या वर्णाशीं योग असतो तिला परुषावृत्ति ह्मणावें. ही ओजोगुणदर्शक आहे. ज्या रचनेंत कांहीं मधुरा व कांहीं परुषा अशा दोन्ही वृत्तींचें मिश्रण असतें ती प्रौढा वृत्ति. ही प्रसादगुणदर्शक आहे.'

**ओज** किंवा **प्रौढी** ह्या गुणाचे पांच प्रकार दण्डीनें काव्यादर्शात ( प्रथम परिच्छेद ) सांगितले आहेत.

'पदार्थे वाक्यरचनं वाक्यार्थे च पदाभिदा।
प्रौढिर्व्याससमासौ च साभिप्रायत्वमस्यच ॥'

पदार्थाबद्दल वाक्यरचना, वाक्यार्थाबद्दल अभिन्न पदयोजना, विस्तार, समास ( संक्षेप ) व साभिप्राय पदें हे **ओज** किंवा **प्रौढी** या गुणाचे पांच प्रकार आहेत. हे पांचहि प्रकार पंतकाव्यांत मुबलक आढळतात. त्यांच्या लांबसमासयोजनेनें तर ओजोगुण विशेषच झळकतो. ( परिशिष्ट 'ल' पहा ). पदार्थाबद्दल वाक्यरचना ह्मणजेच 'पर्यायोक्त.' याचीं उदाहरणें केकावलीची पुरवणी 'पर्यायोक्त' यांत पहावीं. याचें एकच उदाहरण येथें देतोंः-

( गीति ) 'ऐसें वदोनि हांसुनि सुनिपुण गुण तिसरियासि तो चढवी, ।
स्वमुखें सरहस्य जया राम धनुर्वेद आदरें पढवी. ॥ ( भीष्म. ४-२७ ॥ )'

'भीष्म' असें न ह्मणतां 'स्वमुखें सरहस्य······पढवी' हें वाक्य घातलें ह्मणून 'पर्यायोक्त' झालें.

निबंधमालाकार माधुर्यादि गुण, भाषाप्रभुत्व व चित्रकाव्य या पंतकाव्यांत आढळणाऱ्या गोष्टींविषयीं ह्मणतातः-"पंतांनी महाराष्ट्रभूमींत अठरा पर्वांच्या भारती इक्षुदंडाची लावणी करून रसिकजनांच्या मेजवानीचें अपूर्व व अखंड साहित्य करून ठेविलें असल्यामुळें, त्यांत तर **माधुर्यगुण** अत्यंत उत्कर्षानें वर्तत आहे. तसाच प्रकार मंत्रभागवतांत-विशेषतः दशम स्कंधांत-आढळतो. युधिष्ठिर व जनार्दन यांचीं पुण्यचरित्रें वर्णन करितांना मोरोपंतांस प्रेमाचें भरतें येतें. यास्तव वरील दोन ग्रंथ माधुर्यादि उत्तम काव्यरसांनीं पुष्ट झालेले आढळतात. मराठी व संस्कृत भाषा पंतांच्या अगदीं अंकित असत. त्यांनीं लिहिलेलीं चित्रकाव्यें, त्यांतल्या त्यांत मंत्रमय रामायण, मंत्रमय भागवत, व हरिसंबोधनस्तोत्र हीं वाचलीं असतां त्यांच्या **भाषाप्रभुत्वाची उत्तम साक्ष** पटेल. त्यांचीं रामायणें हीं 'कवीच्या वाग्देवतेची केवळ स्वतंत्र लीला आहे. होमरच्या महाकाव्यांतील वीर युद्ध आटपल्यानंतर जसे रंगयुद्धांत परस्पर झगडले व नानातऱ्हेच्या कसरती करून त्यांनीं करमणूक करून घेतली, किंवा चितारान्यानें मुख्य चित्र तयार झाल्यावर जशी भोंवताली नक्षी

व वेलबुट्टी काढण्यांत आपली करामत खर्चावी, त्याप्रमाणेंच आमच्या कवीनें भारतादि मोठमोठ्या ग्रंथांनीं आपल्या जन्मभाषेस अलंकृत करून शेवटीं आपल्या उपास्य-देवतेच्या प्रीत्यर्थ आपल्या सरस्वतीचा ओघ जलयंत्रोद्वाराप्रमाणें चित्रविचित्रतेनें प्रगट केला आहे. ( निबंधमाला )" भिन्न वृत्तांत रचलेलीं व विविधबंध साधलेलीं त्यांचीं रामायणें वाचलीं म्हणजे पंत भाषानर्तकीला वाटेल तशी नाचवीत असें दिसून येतें.

हंस ह्मणतातः-"मोरोपंताच्या काव्यांत श्लेष, ओज, प्रसाद, माधुर्य इत्यादि गुण चांगले उतरले आहेत. माधुर्य, श्लेष यांचा मासला थोड्याच ठिकाणीं पण उत्तम प्रकारचा आढळतो. ओज आणि प्रसाद हे गुण सर्वत्र उत्कर्षानें वर्तत आहेत. प्राण्याच्या शरीरांतील धातूस ज्याप्रमाणें ओजानें तेजस्विता असते त्याप्रमाणें कवितेच्या भाषासरणींत ओजोगुण असला तर तशा कविताश्रवणापासून अंतःकरणवृत्ति जागृत होतात व शौर्य, उत्साह, क्रोध, अभिमान, आनंद इत्यादि मनोविकारांचा आविर्भाव होऊन मनुष्य अगदीं तल्लीन व गर्क होऊन जातो. हा ओजोगुण आणि कविता वाचल्याबरोबर, शब्दश्रवणसमकालीन चित्ताची प्रसन्नता व विकास होणें हा प्रसादगुण हे स्थलपरत्वें मोरोपंतांच्या कवितेंत अति साधारण झाले आहेत असें आम्हांस वाटतें." ओजोगुणांत वर सांगितल्याप्रमाणें मोठमोठे लांब समास व कठोरवर्णरचना असते. ज्यांत तीन पदांपेक्षां अधिक पदांचा समास नसून कोमल-वर्णरचना असते तें प्रसादगुणविशिष्ट काव्य व दोन्हींचें मिश्रण ज्यांत झालें असतें तें माधुर्यगुणविशिष्ट काव्य होय. प्रसाद आणि माधुर्य ह्यांत फारसा फरक नाहीं. कोमल वर्णरचना व पृथक् पदें ज्या पद्यांत असतात तें माधुर्यगुणविशिष्ट ( 'या पृथक्पदता वाक्ये तन्माधुर्य प्रकीर्त्यते–प्रतापरुद्र' ) व फार लांब समास नसून प्रसिद्धार्थपदें ज्यांत असतात तें प्रसादगुणविशिष्ट ( 'प्रसिद्धार्थपदत्वं यत्स-प्रसादो निगद्यते–प्रतापरुद्र' ) काव्य समजावें. 'कृष्णविजय'पूर्वार्धात प्रसाद थोडा असून रामायण, भारत व स्फुटकाव्यें यांत तो पुष्कळच आढळतो. पंतांचीं लघुकाव्यें तर प्रसादमाधुर्याच्या मातबर खाणीच आहेत. आतां येथे ओज, प्रसाद व माधुर्य यांचीं थोडीं निवडक उदाहरणें देतोंः–

**१ ओजप्रसादाचीं उदाहरणेंः–**

( १ ) मंत्ररामायणांत रावणपुत्र इंद्रजित् युद्धास आला तेव्हांचें वर्णनः–

( गीति ) "पौलस्त्यदेहजन्मा इंद्रजिताख्य प्रतापमार्तंड ।
खरतरशरकिरणगणें शोषीं कपिजीवनासि उद्दंड. ॥ ५६३ ॥
प्रलयसमय तो भासे, संवर्ताभोदतुल्य शरधारा ।
हा राक्षस वर्षे, तों 'हा ! राम !' म्हणे चमू निराधारा. ॥ ५६४ ॥

तों वानराधिराजद्विविदांगदवातपोतनीळनळ ।
जन लक्षावधि वधिति, ग्रीष्मीं विपिनांतरीं जसे अनळ. ॥ ५६५ ॥
रक्षःप्लवंगम क्षतविक्षत फुलले वनीं जणों पळस; ।
पळ सभयांला सुटला; पळसह भू पाहतांचि ये चिळस. ॥ ५६६ ॥
( मंत्ररामायण, युद्धकांड )"

वरील युद्धवर्णनांत ओज व प्रसाद हे दोन्ही गुण चमकत आहेत. तसेंच, त्यांत ओजोगुणाला सहायभूत परुषावृत्ति असून त्यांत मधुरावृत्ति मिश्रित होऊन प्रसादगुणदर्शक प्रौढावृत्ति बनली आहे.

( २ ) रावणाचें लक्ष्मणबिभीषणाशीं युद्ध पहाः—

( गीति ) "शस्त्रास्त्रांचा व्रज मग सोडुन दशकंधरें महापतितें ।
आच्छादिलें रवीनें, विधुंतुदाचेपरी धरापतितें. ॥ ६४७ ॥
सौमित्रिनें प्रयत्नें छेदुनि दशकंठचापलतिकेला ।
अशनिप्रभबाणानें सारथिमूर्धापहारही केला. ॥ ६४८ ॥
मंदोदरीवराच्या स्यंदनसंबद्धवाजिसंघातें ।
मारी स्वयें बिभीषण धाउनियां तेधवां गदाघातें. ॥ ६४९ ॥
कालभुजंगमवज्रज्वलनज्वालांतकोपमा शक्ति. ।
बंधुवधास्तव हस्तीं धरिली दशकंधरें महाशक्ति. ॥ ६५० ॥
तेव्हां त्वरित श्रीमांल्लक्ष्मण निःसीमवीर्यचंचु कवी ।
रिपुला मोहुनि बाणें, मित्राला शक्तिपासुनी चुकवी. ॥ ६५१ ॥
जनरावण रावण तो सौमित्रिस त्याच शक्तिनें ताडी; ।
दुःखार्तदेवलोचनजलवृष्टिसह क्षमातळीं पाडी. ॥ ६५२ ॥
अशनिच्छिन्नमहीधरशिखरासम रामचंद्रबंधु पडे; ।
वेगें प्रभंजनाच्या समूळ जैसा महातरू उपडे. ॥ ६५३ ॥
( मंत्ररामायण, युद्धकांड )"

### ओजाचें सर्वोत्कृष्ट उदाहरणः—

( ३ ) मारुति रावणसभेत आला असतां 'तूं कोण ? कोठचा ? इत्यादि प्रश्न प्रहस्तप्रधानद्वारा रावणानें विचारिले. तेव्हां मारुति रावणाला उत्तर देतो. यांतील समासघटित गीत्यर्धांतून ओजोगुणाचा अत्यंत उत्कर्ष झालेला आढळतोः—

( गीति ) "तेव्हां ह्मणे मरुत्सुत, 'दशकंठा ! मी तनूज पवनाचा; ।
सेवक सुग्रीवाचा वाल्यनुजाचा प्रतापभवनाचा; ॥ १११ ॥
रविवंशजदशरथनृपसंतानक्षीरसिंधुचंद्राचा, ।
गाधिजमुनिमखनाशकराक्षसमथनक्रियावितंद्राचा, ॥ ११२ ॥

श्रीकंठसायकासनभंगकुपितभार्गवस्मयहराचा, ।
गौतमभार्याशापक्लेशमहाघांधकारमिहिराचा, ॥ ११३ ॥
सत्यव्रतजनकाज्ञात्राणार्थंत्यक्तराज्यकामाचा, ।
त्वद्भगिनीवैरूप्यक्रुद्धखरायसुरबळविरामाचा, ॥ ११४ ॥
कांचनकायमृगच्छलहृतकांताविरहतप्तदेहाचा, ।
निजभार्याचोरासुक्षयप्रतिज्ञाविलासगेहाचा, ॥ ११५ ॥
तावकपराक्रमार्यमराहुप्रभवालिवीरकाळाचा, ।
अभिमतवितरणहर्षितसुग्रीवादिप्लवंगपाळाचा, ॥ ११६ ॥
वरविक्रममंडितभुजदंडनिहितचंडचापदंडाचा, ।
मी दूत राघवाचा, त्वद्विधदुष्टैककालदंडाचा. ॥ ११७ ॥

( मंत्ररामायण, सुंदरकांड )."

## २ प्रसाद आणि माधुर्य या गुणांचा मासलाः–

(१) (गीति) भीष्मद्रोणकर्ण हे वीर मेल्यावरही कौरवपक्षीयांचें शौर्य वर्णन करून जयाशा दाखविणाऱ्या संजयाला धृतराष्ट्र ह्मणतोः–

( गीति ) "भूप ह्मणे, 'रे ! सूता ! जयवार्ता दूर, काय तूं वदसी ! ।
उरले खरे परेतचि, बहुत परजिती कबंधही सदसी ! ॥ १२ ॥
गुरु कर्ण भीष्म मेले, उरले ते मृतचि काय परिसों गा ! ।
वीर खरे ते गेले, शुद्ध यशश्री कधीं न वरि सोंगा. ॥ १३ ॥
स्वजयप्रासादाचे पडले मोडोनि भीष्म गुरु खांब, ।
शोकभरें मज मूर्छा आली, क्षणमात्र संजया ! थांब. ॥ १४ ॥

( कर्णपर्व अ० ५.)"

( २ ) वनपर्वात सत्यभामा व द्रौपदी यांचा पतीस स्ववश कसें करून घ्यावें याविषयीं संवादः–

( गीती ) "सत्या कृष्णेसि ह्मणे, 'वदतें तें तूं खरेंच मान, सये ! ।
लोक ह्मणोत, परि पळहि माझ्या हातीं न कांतमानस ये. ॥ ६.५७ ॥"

सत्यभामा कृष्णभगिनी द्रौपदीस ह्मणतेः–'सखे ! मी कृष्णाची लाडकी बायको असून पति श्रीकृष्ण हा माझ्या पूर्णपणें स्वाधीन आहे असें लोक समजतात, परंतु खरी गोष्ट तुला सांगतें कीं कृष्णाचें मन माझ्या हातांत पळभर देखील येत नाहीं, अर्थात् कृष्णाला माझ्याच्यानें मुळींच वश करवत नाहीं. हें तुला खोटें वाटेल पण मी तुला स्नेहभावानें आपली सखी समजून खरी हकिकत सांगत आहें. ह्मणून ती तूं खोटी मानूं नकोस.

( गीति ) "त्वां हे पांच पति कसे वश केले ? भजति सर्व एकीते; ।
थोडें याहुनि, पाहुनि नटती कादंबिनीस केकी तें. ॥ ५८ ॥"

मी सौंदर्यादिगुणयुक्त असून माझा एक पति कृष्ण मला क्षणभरही वश करवत नाहीं. तुझ्याकडे पाहावें तर तुझे पति पांच; स्वभावतः त्यांनीं परस्परां-विषयीं साशंक राहून त्यांतून एकानेंही तुजवर प्रेम करूं नये. असें असतां ते पांचहि तुला अगदीं वश होऊन राहिले आहेत. त्यांना तूं असे वश कशामुळें केलेंस ? हे तुला किती वश झाले आहेत ह्मणून सांगूं ! कादंबिनीस ह्मणजे मेघमालेस पाहून मयूरास आनंद होतो व ते नृत्य करितात. इतकें मोरांचें मेघपंक्तीवर प्रेम आहे. परंतु धर्मभीमार्जुननकुलसहदेव या पांचांचें तुजवर जें प्रेम आहे त्या मानानें हें मयूरकादंबिनीप्रेम मला अगदींच थोडें वाटतें. इतकें तूं यांस वश कसें केलेंस ? यांतील मयूरकादबिनीचा दृष्टांत कविसंमत असून फार सरस आहे. मयूर हा कांत व कादंबिनी त्याची कांता असें दर्शवून कवीनें कादंबिनीदर्शनानें मयूराचे ठिकाणीं आनंदानें नृत्य करण्याची उत्सुकता व तिजविषयीं केवळ पराधीनता सुचवून तिच्या आल्हादजनक गुणांनीं मयूराच्या ठिकाणीं नृत्यानें आल्हादजनकत्वही सुचविलें. यावरून द्रौपदीच्या पातिव्रत्यादिगुणांचें आनंदजनकत्व व तिच्या गुणांनीं धर्मादि पांडवांचें तिच्या ठिकाणचें लुब्धत्व अथवा परमासक्ति ह्या गोष्टी उत्कृष्ट रीतीनें दिसून येतात. यांत उत्प्रेक्षा, व्यतिरेक इत्यादि अर्थालंकार साधून सुंदर अनुप्रासही साधिला आहे.

( गीति ) "सांग, वशीकरण कसें केलें त्वां देवि ? कोणत्या मंत्रें ? ।
कीं दिव्यौषधिमूळें, किंवा वात्स्यायनोदितें यंत्रें ? ॥ ५९ ॥"

स्त्रिया आपल्या पतीस वश करण्याकरितां तंत्रशास्त्रोक्त वशीकरण प्रयोग करितात, तसें कांहीं तूं मंत्र जपून वशीकरण केलेंस ? किंवा दिव्यौषधीचें मूळ उगाळून पतींस पाजिलेंस, किंवा तें पतींच्या वस्त्रास बांधलेंस ? किंवा वात्स्यायन ऋषीनें कामशास्त्रांत सांगितलेल्या यंत्रानें ( रतिबंधानें ) तूं त्यांस स्वाधीन करून घेतलेंस ? केलेंस तरी काय ? तें मला सविस्तर सांग. 'देवि' हें संबोधन येथें श्लिष्ट असून खुबीदार आहे. वशीकरणादिप्रयोग व मंत्रजपादिक्रिया सर्व देवताविषयक असल्यामुळें देवीस माहित असणारच. द्रौपदी ही देवी ह्मणजे कृताभिषेका राज्ञी होतीच.

( गीति ) "कृष्णा हांसोनि ह्मणे, 'भामे ! मोहावयासि पतिला जे ।
मंत्राद्युपाय करणें, या श्रवणें बहु मदीय मति लाजे. ॥ ६० ॥
प्रेमें पतिचरणांसि न देउनि, दे हात तायिताला जे ।
ते स्त्री न रुचे पतिला, कीं तीतें आततायिता लाजे. ॥ ६१ ॥"

वरील गीतींपैकीं पहिलींत सत्यभामेच्या प्रश्नाचें किंचित् निंद्यत्व सुचवून द्रौपदीच्या मनाचा थोरपणाही कवीनें सुचविला आहे. कृष्णा, भामा ( =क्रोधपूर्ण स्त्री ) इत्यादि

शब्दही फार सूचक आहेत. प्रेमयुक्तपतिचरणसेवेनें त्याला स्ववश करण्याचें सोडून मंतरलेल्या तायिताच्या योगानें पतीला स्वाधीन करून घेण्याचा यत्न करणारी स्त्री आततायि (महादोषी) ठरते. ती स्त्री अशा उपायांनीं पतीला वश करून घेऊं शकत नसून उलट त्याला अतिशय अप्रिय मात्र होते. वरील दुसऱ्या ह्मणजे ६१ व्या गीतींत सुंदर अर्थ साधून शिवाय षडक्षरी यमकही कवीनें साधिलें आहे.

( गीति ) "जाणें वशीकरण हें, करिते जेणें कधीं न कोपति तें, ।
सखि ! तूंहि असेंचि करीं, मदमत्सर दाखवूं नको पतितें. ॥ ६२ ॥"

मला एक वशीकरण ठाऊक आहे. तें हेंच कीं ज्या आचरणानें पतीस कधींही कोप येणार नाहीं तसें आचरण करणे. दुसरें वशीकरण मला माहित नाहीं. सखे ! आपल्या पतीनें आपल्यावर प्रेम करून आपल्या स्वाधीन व्हावें असें तुला वाटत असेल तर तूं त्याला कधींही क्रोध येणार नाहीं अशा प्रकारचें वर्तन कर. 'तें कसें करावें?' असें विचारशील तर सांगतें. तूं आपल्या सौंदर्यादिकांचा मद व सपत्नीविषयीं मत्सर पतीला दाखवूं नकोस. असें तूं केलेंस ह्मणजे तुझा पति तुला पूर्णपणें वश होईल.

( गीति ) "पतिपरमेश्वरचरणा जी तत्सेवार्थ न नवशी करणें, ।
ती मुग्धा कैशी गे ! वळवील स्वामिमन वशीकरणें ? ॥ ६३ ॥"

जी स्त्री पतीला परमेश्वर समजून आपल्या सर्व इंद्रियांचे व्यापार त्याची नम्रपणें सेवा करण्यांत लावीत नाहीं ती स्त्री मूढ होय. तिनें कितीही जादुटोणा केला तरी तिला स्वामीचें मन वश करितां येणार नाहीं. येथें पतीला परमेश्वर व स्वामी समजून इंद्रियांचे व्यापार त्याच्या चरणीं अर्पण करण्यांत पतिव्रतेचा उत्कृष्ट धर्म व नम्रभाव सुचविला आहे. आतां पतिप्रसादाचें महत्फल द्रौपदी सत्यभामेस सांगतेः–

( गीति ) "पतिचे प्रसाद देती ज्या सद्गतितें, न योग सव तीतें; ।
वाहे पहा शिरीं शिवदेहार्धमता शिवा स्वसवतीतें. ॥ ६४ ॥"

पति प्रसन्न झाला असतां पतिव्रता स्त्रीला जी सद्गति प्राप्त होते ती तिला योगाभ्यासानें किंवा यज्ञ करण्यानें मिळणार नाहीं. याला दृष्टांत पार्वतीचा. तिनें आपल्या सौंदर्यादिगुणांचा अभिमान व मत्सर सोडून आपल्या सपत्नीला आपल्या मस्तकावर धारण केलें. त्यामुळें महादेव प्रसन्न होऊन त्यानें पार्वतीला आपल्या अर्धांगीं धारण करून ते अर्धनारीनटेश्वर बनले. या पार्वतीच्या दृष्टांतानें 'मदमत्सर दाखवूं नको पतितें' ह्मणून जो द्रौपदीनें सत्यभामेस वर ६२ व्या गीतींत उपदेश केला त्याचें समर्थन केलें आहे. पुढच्या गीतींत हा द्रौपदीचा उपदेश सत्यभामेस फार रुचला असें सांगून साध्वीचरित्राचें सर्वत्र आनंददायित्व वर्णून कवि 'पातिव्रत्यमाहात्म्य' वर्णन करणारें उपाख्यान संपवितातः–

( गीति ) "श्रुतिला कविधीसी ती मानवली फार शुद्धवदलीला ।
न पतीसचि कर्णांसहि सत्य सती होति उद्धवदलीला. ॥ ६५ ॥
( वनपर्व अ० ६ )"

कवि–व्यासवाल्मीकादि–यांची बुद्धि जशी वेदवाणीला मान देते तशी सत्यभामा शुद्ध उपदेश करणाऱ्या द्रौपदीला फार मान देती झाली. साध्वींचें चरित्र त्यांच्या पतीस आनंद देतें, इतकेंच नाहीं, तर त्यांचें चरित्र ऐकणाऱ्या जनांच्या कर्णांसही तें अत्यंत मधुर लागतें.

( ३ ) प्रसाद व माधुर्य याचें तिसरें उदाहरण आदिपर्वांतील ( अ० ३७ गी० १०–३४ ) सुंदोपसुंदाख्यान होय. त्यांत मधून मधून ओजोगुणही झळकतो. त्याचा थोडासा उतारा पुढें देतोंः–

( गीति ) "त्रस्त–तर–सुर–प्रार्थित–विधि–वचनें चतुर विश्वकर्मा तें ।
व्यसन हराया, द्याया निजकौशल्ये सुरांसि शर्मातें, ॥ १ ॥
लोकत्रयस्थ तिळ तिळ उत्तम लावण्य मेळउनि यत्नें ।
स्त्री–रत्न रची, जाणों अवयव ते न, खचिलींच तीं रत्नें. ॥ २ ॥"

**अर्थसादृश्यः**–वरील द्वितीय गीतीशीं पुढील शेक्सपीयरची उक्ति किती सदृश आहे ती पहाः–

"Full many a lady
I have eyed with best regard, and many a time
The harmony of their tongues hath unto bondage
Drawn my too diligent ears.
*But you, Oh! you*
*So perfect and so peerless, are create*
*Of every creature's best.*"—( *Shakspeare* )

( गीति ) "नामें तिलोत्तमा ती लावण्य तिचें नृपा अपारचि तें, ।
जेणें वेधावेंचि क्षण तरि जें मन महातपा रचितें. ॥ ३ ॥
तीस ह्मणे द्रुहिण, 'अये ! देवि ! त्रैलोक्यसुंदरि ! पुनीते ! ।
वारीं ताप जगा जे दिधले सुंदोपसुंदरिपुंनीं ते. ॥ ४ ॥
ती भुलले सुर, हरिहर, पाहुनि त्रैलोक्यसुंदरा ज्याला, ।
ब्रह्मनियोगे दावी तें मोहकवदन सुंदराजाला. ॥ ५ ॥
विंध्यवनीं ललना–जन–परिवृत ते दैत्यराज पीत-सुर ।
स्वर्गाधिपत्य साधुनि होते स्वबळेंकरूनि भीतसुर. ॥ ६ ॥
पुष्पावचयव्याजें जैसी चपळा घनीं, वनीं चपळ ।
फिरतां तिला पहाती, स्थिर पाहुनि बैसती, न नीच पळ. ॥ ७ ॥

अवलोकितांचि चित्तें तद्रूपीं जेंवि सुंद रमला हो ! ।
उपसुंदही ह्मणे, 'हें प्राप्त स्त्रीरत्न सुंदर मला हो'. ॥ ८ ॥
धांवुनि धरिति कर तिचे सोडुनि सुंदोपसुंद रीतीतें, ।
दोघांसही कटाक्षें अनुमोदी कृत्य सुंदरी ती तें. ॥ ९ ॥
सुंद ह्मणे, 'म्यां वरिली सर परता, धरुनि हात, तो डावा ।
गुरुदारधर्षणोद्यत जो तो लागेल हात तोडावा'. ॥ १० ॥
उपसुंद ह्मणे, 'माझी न करावी धर्महानि करकरुनी ।
कां धरिला मृदुकर ? सर, हरहर ! मरसील हा निकर करुनी. ॥ ११ ॥
सुंदीं जैसा काम क्रोध उठे तदनुजीं तसाचि, तदा ।
बिंब प्रतिबिंबचि तें घे ज्येष्ठ कनिष्ठही तशीच गदा. ॥ १२ ॥
सुंदाची उपसुंदीं उपसुंदाची गदा पडे सुंदीं, ।
तन्मरणमुदुद्वासें गणपतिच्या कळ नुठेल कां तुंदीं. ॥ १३ ॥
परमसखे होते, परि एक-स्त्री-रत्न-भोग-कामुक ते ।
मेलेचि, जरि न ऐसें करिते तरि जीवनासि कां मुकते ? ॥ १४ ॥
(आदि. अ० ३७)"

वरील पंतवर्णनाशीं मुक्तेश्वराचें आदिपर्वातील सुंदोपसुंदाख्यान ताडून पाहिलें असतां पंतांचें वर्णन विशेष डौलदार असून मुक्तेश्वराच्या काव्यांत रसोत्पत्ति अधिक आहे हें स्पष्ट दिसून येईल.

(४) वनपर्वांत द्यूतांत राज्य हरवून वनांत गेलेल्या पांडवांस यादवपांचाळ भेटण्यास गेले असतां श्रीकृष्णद्रौपदीची भेट झाली. तेव्हां द्रौपदी प्रथम आपले केश कृष्णाला दाखवित भाषण करितेः–

(गीति) "श्रीकृष्णा श्रीकृष्णा दाउनि खळ-पाणि-कृष्ट-केश वदे; ।
उक्तिकडे मन दे, परि नयन तदास्याकडे न केशव दे. ॥ १३ ॥
(वनपर्व अ० २)"

द्रौपदीच्या दुःखाचें कवीनें वरच्या गीतींत किती मार्मिक वर्णन केलें आहे ! श्रीकृष्णाचें लक्ष्य द्रौपदीच्या भाषणाकडे होतें परंतु देवाला सारखे टपटप अश्रु गाळित असणाऱ्या द्रौपदीच्या मुखाकडे पहावेना !

या पुढील द्रौपदीचें भाषण किती हृदयद्रावक आहे तें पहाः–

(गीति) "हे केश धरुनि वोढुनि नेलें दुःशासनें सभेंत सख्या ! ।
तेव्हां मज आठवली त्वत्पदयुगली सखी, न अन्य सख्या. ॥ १४ ॥
ईणेंचि राखिली बा ! लज्जा, उघडी पडों दिली न सती; ।
यदुकुरुकीर्ति न उरती जरि मज हे ठाउकी किली नसती. ॥ १५ ॥

होते समीप पांचहि पति अति-मति हे मनें उदासीनें; ।
म्यां व्यसन साहिलें तें, न असेल विलोकिलें कुदासीनें. ॥ १६ ॥
सोडी पुनःपुन्हा खळ न धरुनि लज्जा भया दया लुगड्या; ।
उघडें पडतें वपु तरि तूं अंतरतासि बा ! दयालु गड्या ! ॥ १७ ॥
जे पाप गरद अग्निद सर्वस्वहर स्वदारवस्त्रहर ।
तदुपेक्षा करिति कशी ! हे साक्षात् एकमुख सशस्त्र हर. ॥ १८ ॥
गुरु, तात, बंधु, पति, सुत कोणीच मला नसे; जिला असती ।
तीस घडेल असें कां ? हंसतील सती-जन-व्रता असती. ॥ १९ ॥
स्त्रीलंघन करित्यातें प्राकृतहि न साहती, पहा लावा, ।
हा ! लावावा कर मज ? वार्तेहि न पदरही न हालावा. ॥ २० ॥
यांचीं शस्त्रें अस्त्रें दोर्दंड-बळें खळें वृथा केलीं, ।
धिक् कष्ट सर्व यशें सुज्ञानें एकदा लया गेलीं. ॥ २१ ॥
ऐसें वदोनि रडतां कृष्ण ह्मणे, 'अंब ! तूं नकोचि रडों, ।
कळवळतें मन्मन सखि ! या शोकाचळभरें नको चिरडों'. ॥ २२ ॥
( वनपर्व अ० २ )"

( ५ ) दुर्योधनानें दुर्वास ऋषीला सेवेनें प्रसन्न करून घेऊन त्याला दहा हजार शिष्यांसह मध्यरात्रीं द्वैतवनांत पांडवांकडे भोजन मागण्यास पाठविलें. द्रौपदीचें भोजन झाल्यावर सूर्यदत्तस्थाली रात्रीं घांसून ठेविली असतां तीपासून पुढें दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर तिची पूजा केल्याशिवाय अन्नोत्पत्ति होत नसे, हें दुर्योधनाला माहित होतें. तेव्हां मध्यरात्रीं दुर्वासानें भोजन मागिलें असतां त्याला तें पांडवगृहीं मिळणार नाहीं व मग सहजच दुर्वास त्यांना शाप देईल. मध्यरात्रीं पांडवांकडे दुर्वासऋषीला पाठविण्यांत दुर्योधनाचा हा दुष्ट हेतु होता. दुर्योधनाच्या सांगण्या-प्रमाणें दुर्वासानें मध्यरात्रीं शिष्यांसह पांडवाश्रमांत जाऊन भोजन मागितलें. त्या प्रसंगाचें पंतांचें वर्णन मधुरप्रसादादिगुणांनीं परिपूर्ण व फार सरस असें उतरलें आहे. त्याचा मासला पहा:-

( गीति ) "प्रार्थुनि धर्में मुनि तो स्नानासि सशिष्यकटक पाठविला, ।
त्या संकटीं सतीनें श्रित-कल्पद्रुम मुकुंद आठविला. ॥ १४ ॥
( वनपर्व अ० ८ )

स्वमनिं म्हणे ती कृष्णा 'श्रीकृष्णा ! धांव, पाव, नाश तदा ।
हीचा होऊं न दिला, स्मरतें मज तेंचि पावना ! शतदा. ॥ १५ ॥
सत्य असो, जें म्हणती कवि भवसिंधूंत नांव नामातें, ।
संप्रति चुडे भरावे त्वां करूनि श्रितजनावना मातें. ॥ १६ ॥

नेसविता झालासि प्रेमें तूं करुनियां दया लुगड्या, ।
आतां चुडे भरीं बा !, आश्रय मज एक तूं दयालु गड्या ! ॥ १७ ॥
तुजहुनि इतरें कोणें वारावा क्षिप्र अंतराय महा ? ।
दंडीलचि, साहेल न, देवा ! स्वल्पा हि अंतरा यम हा.' ॥ १८ ॥
स्मरतांचि ये प्रभु, दया सत्य सुरभि, भक्त-वत्स, लागावें ।
कांसेसि याचियाचि त्यजुनि सकळ याचि वत्सला गावें. ॥ २२ ॥
येतांचि दीनबंधुप्रति कळवी ती नमूनि आधीतें, !
भगवान् म्हणे, भुकेलों 'सखि ! वाढ मला असोचि, आधीं तें.' ॥ २३ ॥
कृष्णा ह्मणे, 'अहा ! बा ! वाढावें काय गा ! पहा, हातें ।
क्षाळूनि घातलेंसे आतां कीं पालथें अहाहा ! तें. ॥ २४ ॥
अन्न मदशनावधि रविदत्तस्थालींत, मग नसे लवही, ।
त्वद्दृष्टि सर्व जाणें, यमधर्माची असी नसेल वही.' ॥ २५ ॥
कृष्ण ह्मणे, नर्म पुरे, तर्पाया योग्य सर्व थालीला, ।
मीच नव्हे काय ? इची सखि ! सुरभि सखीच सर्वथा लीला. ॥ २६ ॥
आण बरें, पाहों दे, ऐसा आग्रह करूनि आणविली, ।
कृष्णेसि सत्सभेसि स्थालीसहि बहु दयाचि जाणविली.' ॥ २७ ॥
त्या पात्राच्या कंठीं स्वल्पचि शाकान्न लागलें होतें, ।
सत्परिचर्येंचि जडही समयीं सत्वासि जागलें हो ! तें ॥ २८ ॥
तो यज्ञभुक् तशाही त्या शाकान्नासि ओढवी पाणी, ।
कृष्णेकरवीं आपण सांगुनि संकल्प सोडवी पाणी. ॥ २९ ॥
प्राशुनि ह्मणे प्रकट हरि, 'विश्वात्मा देव तुष्ट हो येणें,' ।
हळुचि ह्मणे 'मुनि किति हे घेउनि शतकोटि दुष्ट हो ! येणें. ॥ ३० ॥"

कृष्ण भाजीपान खाऊन तृप्त झाल्याबरोबर तिकडे मुनींची काय अवस्था झाली त्याचें वर्णन पंत करितातः—

( गीति ) "अघमर्षणींच तो मुनि झाला आकंठ तृप्त सहसा, जे ।
शिष्य अयुतमित होते गार्भिण्यापरि तयांहिसह साजे. ॥ ३२ ॥
जो तोहि पूर्ण चाळी विप्र यथापूर्व न वपु, ढेंकर वी ।
तृप्ति, प्रतिपदिं 'सोऽहं छळ' हा संकल्प नव पुढें करवी. ॥ ३३ ॥
हरिला स्वजन प्राणाधिक, तैसें वित्तही न लोभ्याला ।
चितूनि अंबरीषच्छळपरिणामहि मुनींद्र तो भ्याला. ॥ ३४ ॥
ते शिष्य ह्मणति 'गुरुजी ! न सुचे, कर्तव्य काय तें कळवा, ।
गुरु त्यांसि ह्मणे, 'मळवा यश परि सत्वर पळा, मला पळवा. ॥ ३५ ॥

म्यां आजिपासुनि शपथ करुनि नमस्कार सच्छला केला, ।
दृग्घित न विषशलाका टाकुनि कर्पूरसच्छलाकेला. ॥ ३६ ॥
झालों गुरूदर, जशा अत्यासन्नप्रसूति गरवारी; ।
सच्छळकर्म स्वल्पहि सद्यःक्षयहेतु जेंवि गर-वारी. ॥ ३७ ॥
अस्मदुदरें सदन्नें न कळत अघमर्षणींच कीं भरलीं; ।
विश्वंभरें सुरद्रुमाचिंतामणिकामधुग्यशें हरिलीं. ॥ ३८ ॥
काय गिळावें आतां मज एकहि तुहिनपर्वताभसित; ।
मी किति ? करील कृष्णाकोपानल तुहिनपर्वता भसित. ॥ ३९ ॥
त्या श्रीमदंबरीषाहुनि धर्म तपोबळें नसे ऊन; ।
हा मी मंदचि केवळ सच्छळगरळा जळेन सेऊन. ॥ ४० ॥
त्या पांडुसुतामध्यें भीम महात्मा उदार बलसत्वें; ।
चारील मुष्टिमोदक अतिथ्यासि न चुकेल अलसत्वें. ॥ ४१ ॥
ऐसें ह्मणतचि पळतां प्रबळ भयचि होय बळद दुर्वाशा, ।
धांवे लंबोदरसा तो, गळल्या तज्जटाहि दुर्वाशा. ॥ ४२ ॥"

वरील गीतींतील साधुच्छळ केल्याबद्दल दुर्वासास उत्पन्न झालेलें भय किती उत्कृष्ट रीतीनें पंतांनीं वर्णिलें आहे बरें ! नंतर, दुर्वास ऋषि सच्छळभयास्तव पळून गेला वगैरे हकिकत समजल्यावर द्रौपदीच्या भक्तीस्तव प्रभूनें हा संकटसमय टाळिला ह्मणून धर्मराज द्रौपदीच्या कृष्णभक्तीचें मोठ्या गौरवानें अभिनंदन करित ह्मणतोः-

( गीति ) "धर्म ह्मणे, 'मतिमति ! सति ! संसारामाजि अन्य कुणगा तो ।
केवळ अनिष्ट, परि हा बहु धन्य तुझा ह्मणोनि गुण गातो. ॥ ५३ ॥
तुजविण न दीपिके ! सति ! कृष्णे ! तरतो नयज्ञहि तमातें; ।
करितों जरि तरि गमता कृष्णेतर तो न यज्ञ हित मातें. ॥ ५४ ॥
देव तुझा कैवारी, शुद्धें प्रेमें तुझ्याचि वळला गे !
दे धेनु दुग्ध धांवुनि वत्सा, इतरां तदर्थ बळ लागे. ॥५५॥ (वनपर्व अ० ८)"

६ वनपर्वांत नलदमयंत्याख्यानांत द्यूतांत राज्यभ्रष्ट होऊन दमयंतीसह वनांत हिंडणारा व दमयंतीसह एक वस्त्र धारण करणारा नल कलिग्रस्त होऊन दमयंती निद्रित असतांना तिला सोडून जाण्याची इच्छा करितो व शस्त्रानें वस्त्र फाडून मोठ्या कष्टानें निघून जातो. या प्रसंगाचें वर्णन पंतांनीं फारच बहारीचें केलें आहे.

( गीति ) "एका सभेंत ( =धर्मशाळेंत ) रात्रौ निजला, मग आठवूनि निजलीला ।
कलिमलिनबुद्धि नल तो सोडुं पाहे श्रमोनि निजलीला. ॥ १११ ॥
जावें कसें न कळतां ? मज पाशचि दारसंग हा निपट, ।
आपण असोनि अक्षत होऊं देइल न संगहानि पट. ॥ ११२ ॥

फाडावा सकरें तरि आतां पट जागवील निजलीला, ।
होता मदर्थ जरि हरि असि, असि ह्मणता दुजी न निज-लीला. ॥ ११३ ॥
शोधुनि सभा पहावी ऐसी आधीं दिली नळास मती, ।
मग खङ्गलता कलिनें वाटे त्या सुकृतसत्फळासम ती. ॥ ११४ ॥
कलियोगे जें धरिलें रायें तीक्ष्णत्व कापिता वस्त्रा ।
न धरील कधींहि तसें शाणशितें गरळलेपनें वस्त्रा. ॥ ११५ ॥
खङ्गें पट कांपविला न, तिचा अर्धा गळाचि तो कलिनें, ।
न मळावेंचि कधीं तें प्रेम कसें मळविलें खळें मलिनें. ॥ ११६ ॥"

यापुढें दमयंतीला टाकून जातांना नळाच्या मनाची झालेली दोलायमान स्थिति कवि किती चटकदार रीतीनें वर्णन करितात ती पहाः—

( गीति ) "जाय, पुन्हा नल परते, पाहे येउनि तिच्या मुखाला हो ! ।
साश्रु नल ह्मणे, 'देवा ! हे वामाक्षी सती सुखा लाहो. ॥ ११७ ॥
जाय पुढें, ये मागें परतोनि सवेंचि, जेंवि दोला हो ! ।
तो लाहो भेटीचा घे, कीं न पुढें स्वदृष्टि लोला हो. ॥ ११८ ॥
विश्वंभरे ! क्षमे ! ह्या साध्वीला रक्ष, म्यां निरविली हो ! ।
सर्वसहे ! तुजपुढें न स्वाधिकता इणें मिरविली हो ! ॥ ११९ ॥
बापा ! सतीव्रता ! हे तुज बहु जपली, न जीवितासि सती ।
तूंहि इला बहु जप गा ! त्वां त्यजिल्या न क्रिया बऱ्या दिसती. ॥१२०॥
कलिदमयंतीप्रेमा हे दोघे ओढिती नळाला हो ! ।
प्रेम्याला त्याचें मन सांपडलें, देह त्या खळाला हो ! ॥ १२१ ॥"

नळानें शस्त्रानें वस्त्र फाडिलें, तेव्हां फाडतांना आवाज झाला नाहीं यावर कवीची सुरेख कल्पनाः—

( गीति ) "सत्याश्रित, गुणमय, शुचि कापुनि घे, परि न देचि हाक पट, ।
पुण्यश्लोकीं राहुनि, उघडिल त्याचेंचि केंवि हा कपट ॥२२॥ (वनपर्व अ० ४)

जसा सत्याचा आश्रय करणारा, सद्गुणी, सदाचारसंपन्न व पुण्यकीर्ति सज्जनाच्या संगतींत राहणारा थोर पुरुष त्या सज्जनानें आपल्या अंगचे तुकडे केले तरी कबूल करितो परंतु त्याचें कपट लोकांत प्रकट करीत नाहीं, तद्वत् सतीचा ( दमयंतीचा ) आश्रय केलेलें, सुतानें विणलेलें, शुभ्र व पुण्यश्लोक नळराजाच्या कंबरेस गुंडाळलेलें तें वस्त्र नळानें फाडलें तेव्हां त्याचा आवाज झाला नाहीं. तसें झालें असतें तर दमयंती जागृत होऊन नळाचें कपट स्पष्ट झालें असतें हें तात्पर्य. यांतील 'सत्याश्रित', 'गुणमय', 'शुचि', 'पुण्यश्लोक' हीं पदें श्लिष्ट आहेत. किती मधुर व प्रसादयुक्त वर्णन हें ! पंतांच्या भारत भागवतादि महाकाव्याप्रमाणें त्यांच्या 'महद्वि-

ज्ञापना', 'सन्मणिमाला', 'रामरीति', 'आर्याकेकावलि' इत्यादि स्फुट कवितेंतही प्रसादमाधुर्यादि गुणांचे मधुबिंदु सारखे टपकत असलेले आढळून येतात. त्यांचीं लहानमोठीं काव्यें ह्मणजे नवरस व माधुर्यप्रसादादिगुण यांचे रत्नाकरच होत. रत्नाकरांतील रत्ने किती निवडून काढावीं ! वाचकांनीं कोणतेंही एक प्रकरण यदृच्छेनें उघडलें असतां त्यांत त्यांना यांचीं उदाहरणें आढळतील.

याशिवाय भारतांतर्गत उद्योगपर्वातील शिष्टाईहून परत जातांना झालेला कृष्णकर्णसंवाद, भीष्मपर्वातील भीष्मपतनानंतर भीष्मकर्णसंवाद, सन्मणिमालादि स्फुटप्रकरणें, स्तुतिस्तोत्रे वगैरे प्रसादमाधुर्याचीं सुंदर उदाहरणें आहेत. भारतांत भीष्मपर्वापासून गदापर्वाच्या शेवटपर्यंत मुख्यत्वें युद्धवर्णन असल्यामुळें त्यांत ओजोगुणाचा अत्यंत उत्कर्ष झालेला आढळतो.

'आपल्या देशांतील साधारण वक्ते ह्मणजे हरिदास. त्यांच्या वाग्देवतेस मोरोपंतकृत गुणालंकारांनीं युक्त केलें तर तिच्या अवलोकनानें रसिक श्रोतृसंघ महानंदांत गर्क होऊन जातो. वक्त्याच्या मुखांतून मोरोपंताची आर्या निघूं लागली ह्मणजे सर्व रसिकजन एकाग्र होऊन तिला आलिंगायास हृदयबाहु पसरून तयार होतात. तिचें पदलालित्य, निर्दोषता, निष्कलंकता, नखरा, प्रसाद, भगवत्पदलीनता इत्यादि अवलोकन केलें ह्मणजे खरे रसिक आनंदमग्न होतात. (हंस).'

असो. तर पंतांची कवितासुता इतकी सरस, निर्दोष व रूपयौवनसंपन्न कशामुळें झाली तें वरील अल्प विवेचनावरून वाचकांच्या थोडें तरी लक्ष्यांत येईल. पंतांची प्रतिभाशक्ति ईश्वरदत्त, संस्कृतप्राकृतभाषा त्यांस करतलामलकवत्, काव्यसाहित्यांचा त्यांचा अभ्यास उत्तम, प्रांजळ, एकाग्र, भगवद्भक्तिपरायण व व्यापक बुद्धि, चांगलें व्यावहारिक ज्ञान व उत्कृष्ट सहृदयता इतके गुणगण जनकाचे ठिकाणीं असल्यावर कन्या मनमोहिनी होईल यांत नवल काय ? तिच्या पायांतील नूपुरांचा झणत्कार व हातांतील सुवर्णकंकणांचा रुणत्कार ऐकूनच रसिकजन आनंदानें डोलूं लागतात; मग ती तारुण्यांत येऊन जेव्हां परपुरुषासक्त होऊन बुद्धिपुरःसर कटाक्ष फेंकते, तेव्हां तिच्या अप्रतिम सौंदर्यास भुलून ते भृंगाप्रमाणें तिजभोंवतीं मंजु गुंजारव करावयास लागतात व आपले हृदयबाहु पसरून तिला प्रेमालिंगन द्यावयास सज्ज होतात यांत आश्चर्य कसचें ? याविषयीं रसिक वाचकांस पुढील शृंगारवैराग्यपर दोह्याची आठवण करून दिली असतां त्यांस ती खचित मोदप्रद होईल.

(दोहा) 'नहिं पराग, नहिं मधुरमधु, नहि बिकास, नहिं काल, ।
अली कलीसे रम रह्यो, आगे कौन हवाल ? ॥'

(भावार्थ) [शृंगारपर] कोणी एक वेश्या आपल्या वयांत न आलेल्या कन्येशीं एका तरुण, श्रीमंत गृहस्थास हास्यविनोद करितांना पाहून ह्मणतेः–'पुष्पाच्या कळींत

अजून पराग नाहीं, गोड मधु नाहीं, अद्यापि विकासाचा काळ आला नाहीं, तोंच भ्रमरा! तिच्यासह रममाण झालास, मग पुढें ती पूर्ण विकास पावून पुष्पवती झाल्यावर तूं तिजविषयीं किती उल्लू बनशील! (वैराग्यपर) प्रयाग, मथुरा, मधु क्षेत्र, काशी महाकाळेश्वर, यापैकीं कोणतीही यात्रा न करितां हे विषयी पुरुषा! तूं कलीबरोबर रमून पापकर्मे करितोस, तर पुढें मरणोत्तर तुझी काय स्थिति होईल?' पंताची कवितावधू इतकी मनमोहिनी असून मराठी काव्यवाङ्मयावर 'ज्ञानकोश'कारासारख्या विद्वानांनीं संपादिलेल्या सुप्रसिद्ध विश्वकोशांतून पुढीलप्रमाणें अभिप्राय दिला आहे. तो अत्यंत धार्ष्ट्याचा असून लेखकाच्या मराठी काव्यविषयक दृढमूल दुर्ग्रहांचा प्रदर्शक आहे असें आमचें नम्र मत आहे. **ज्ञानकोशकार** ह्मणतातः—"एकंदरीनें पाहतां मराठींतील काव्यवाङ्मय ह्मणजे उष्टे आणि भिकार होय यांत शंका नाहीं. सुशिक्षित शृंगारिक वाङ्मय अलीकडच्या मासिकांतील भीत भीत प्रसिद्ध केलेल्या पद्यांशिवाय मराठींत नाहीं. आणि आहे तें अगदीं कनिष्ठ प्रतीचें आहे. भावना सुशिक्षित होऊन त्यांचा विकाश ज्या समाजांत नाहीं त्या समाजांत खरें प्रेमवाङ्मय कोठून दृष्टीस पडणार? पोवाडे देखील निर्बुद्ध अशा लोकांनींच लिहिले असल्यामुळें त्यांत कवित्व जरी मधून मधून दृष्टीस पडलें तरी तें आजच्या वाङ्मयप्रेमीवर्गावर छाप टाकील असें नाहीं, आणि मोठमोठालीं चांगलीं काव्यें मराठीत झालींच नाहींत. इंग्रजी राज्यांतील ज्या मराठी कवींत कांहीं कवींचे कौशल्य दृष्टीस पडतें, आणि ज्या कवींचा दम जरा जास्त वेळ टिकला असें दिसतें अशीं नांव घेण्याजोगी मराठी काव्यें आमच्या मतें दोनच आहेत. एक चिंतामणि पेटकरांचें 'गंगावर्णन' आणि दुसरें रेव्हरेंड टिळकांचें 'एक वनवासी फूल' हीं होत. काव्याचे विषय शोधण्यांत स्वातंत्र्य, जन्मभर काव्याचा हव्यास, विविध प्रकारचा अनुभव या गोष्टींचा लाभ महाराष्ट्रीय कवितेस कधींच प्राप्त झाला नाहीं. *आजपर्यंत झालेले मराठी वाङ्मय सर्व जळून गेले तरी जगाचे काव्यनाश या दृष्टीने कांही एक नुकसान व्हावयाचे नाही.* (इटालिक्स ज्ञानकोशकारांचें नसून आमचे आहेत.) झालें तर तें भाषेचा इतिहास, खुंटलेल्या राष्ट्राच्या मनःस्थितीचें व ज्ञानमर्यादेचें उदाहरण व स्त्रीशूद्रांच्या धार्मिक शिक्षणासाठीं झालेल्या प्रयत्नाचा इतिहास या नात्यानेंच होईल. (**ज्ञानकोश,** विभाग अकरावा, पृ० ४४४)". इंग्रेजी वाङ्मयवारुणीनें धुंद होऊन पूर्णविचार न करितां झोकून दिलेल्या वरच्यासारख्या अभिप्रायावर जास्त काय लिहावें!! मोरोपंतांच्या कवित्वासंबंधीं आह्मी या प्रस्तावनेंत जो सविस्तर विचार केला आहे त्यावरून वरील विचार किती फोल आहे तें कळून येईल. वरील विचार वाचून आह्मांस **मेकाले** साहेबांनीं एका प्रसंगीं प्रौढीनें झोकून दिलेल्या **'प्राच्य वाङ्मय'** यावरील

अभिप्रायाची आठवण होते. वरील विचार प्रकट करितांना मेकाले साहेबांचा अभिप्राय लेखकांच्या मनांत तर घोळत नसेलना ! मेकाले साहेब ह्मणतातः—

"I have no knowledge of either Sanskrit cr Arabic. But I have done what I could do to form a correct estimate of their value. I have read translations of the most celebrated Arabic and Sanskrit works. I have conversed both here and at home with men distinguished by their proficiency in the eastern tongues. I am quite ready to take the oriental learning at the valuation of the Orientalists themselves. I have never found one among them who could deny that *a single shelf of good European library was worth the whole native literature of India and Arabia*....I suppose, that the department of literature in which the Eastern writers stand highest is poetry. And *I certainly never met with any orientalist who ventured to maintain that the Arabic and Sanskrit poetry could be compared to that of the great European nation.* ( Minute on Education by Lord T. B. Macaulay )".

(भावार्थ) 'युरोपियन राष्ट्रांतील चांगल्या पुस्तकसंग्रहांतील पुस्तकांची एक फळी एकीकडे व हिंदुस्थान व आरबस्थान यांतील सर्व वाङ्मय एकीकडे...थोर युरोपियन राष्ट्रांतील कवितेशीं आरबी व संस्कृत कवितेची तुलना करण्याचें साहस कोणीही प्राच्यविद्यापारंगतानें केल्याचें मला ठाऊक नाहीं. हें माझें मत मी आरबी व संस्कृत भाषांशीं माझा बिलकुल परिचय नसून त्यांतील सुप्रसिद्ध ग्रंथांचीं भाषांतरें वाचून व सुप्रसिद्ध प्राच्य-भाषाकोविदांशीं संवाद करून बनविलें आहे.' ज्ञानेश्वराची भावार्थदीपिका, एकनाथांचें 'रुक्मिणीस्वयंवर,' नामदेवतुकोबांचे अभंग, मुक्तेश्वराचीं भारतावरील पांच पर्वे, वामनपंडिताचीं स्फुट प्रकरणें, आनंदतनयाचें सीतास्वयंवर, रघुनाथपंडितांचें 'नलोपाख्यान,' अमृतरायाचे कटिबंध, विठ्ठलकवीची स्फुट कविता, मोरोपंती महाभारत, मंत्ररामायण, मंत्रभागवत, कृष्णविजय उत्तरार्ध नामरसायनकेकावल्यादि स्फुट प्रकरणें, रामजोशाच्या लावण्या एवढी जरी महाराष्ट्र कविता लक्ष्यपूर्वक वाचली तरी सहृदय वाचकांस त्यांत उत्तम कवित्व गुण दिसून येऊन ते मराठी कवीची तरफदारी करितील. यासंबंधीं श्रीविठ्ठल-भक्त पांगारकरांचें 'मोरोपंताचें चरित्र' व 'श्रीतुकारामाचें चरित्र' हे दोन ग्रंथ, सहस्रबुद्ध्यांचें 'श्रीएकनाथचरित्र,' भिंगारकरबोवांचें श्रीज्ञानेश्वरचरित्र, आजगांवकराचीं महाराष्ट्रकविचरित्रें, निबंधमालेंतील 'मोरोपंताची कविता' हा निबंध, व हंसाचे 'मोरोपंत,' 'तुकाराम,' 'वामन,' 'मुक्तेश्वर' इत्यादि निबंध फार वाचून पाहण्यासारखे आहेत. मेकालेच्या अभिप्रायासंबंधीं **निबंधमाला** अंक ६९ त 'सांप्रतच्या पंडितांचें ज्ञान' या लोकहितवादीच्या निबंधावर टीका करितांना विष्णुशास्त्र्यांचे उद्गार मनन करण्याजोगे आहेत. ज्ञानकोशांतील मराठी कवितेवरील अभिप्रायांतील फोलपणावर यापेक्षां जास्त टीका करण्यास आह्मांस

येथें सवड नाहीं. तें काम आह्मी मराठी कवींच्या चिरकाल व्यासंग केलेल्या सहृदय व रसज्ञ पंडितांकडे सोंपवितों. आह्मांस तरी, महाराष्ट्र वाङ्मयांतील हृदयास प्रकाशमय करणारी उदात्त श्री, कर्णमनोहर व रम्य पदलालित्य, अष्ट सात्विकभाव जागृत करणारें अपूर्व रसमाधुर्य, प्रौढी, प्रसाद व सरलता, रमणीय श्लेष व सुकुमारता, अर्थगांभीर्य व औदार्य, ओज व कांति, अर्थव्यक्ति व माधुर्य ह्या गुणरत्नांची वारंवार शोभा पाहून प्रत्येक वेळीं त्यांत अदृष्टपूर्व व नूतन अशी चमक भासते; व कालिदासकृत मालविकाग्निमित्रांत अग्निमित्र राजाला पाहून हरदत्ताला ज्याप्रमाणें प्रतिक्षणीं अत्यंत विस्मय वाटूं लागला व त्याचे नेत्र वारंवार कौतुकयुक्त आश्चर्यानें दिपूं लागले त्याप्रमाणें या महाराष्ट्रकवितावधूकडे पाहून आमची स्थिति होते.

'न च न परिचितो न चाप्यगम्यश्चकितमुपैमि तथापि पार्श्वमस्य ।
सलिलनिधिरिव प्रतिक्षणं मे भवति स एव नवो नवोऽयमक्ष्णोः ॥

( मालविकाग्निमित्रनाटक अंक. १ श्लो० ११ )"

महाराष्ट्रकवितावधूवर ज्ञानेश्वर, एकनाथ, वामन, मुक्तेश्वर, मोरोपंत, रामजोशी इत्यादि कवींनीं अलंकार चढवून तिला रमणीयतेच्या निधीची अधिदेवता व उत्कृष्ट सौंदर्याची खाणच बनविली आहे. ह्मणूनच सहृदय रसिकांस ती भवभूतीच्या मालतीप्रमाणें

'सा रामणीयकनिधेरधिदेवता वा ।
सौंदर्यसारसमुदायनिकेतनं वा ॥' अशी वाटते.

पंतांच्या मराठी कवितेच्या मानानें पाहिलें असतां त्यांचें संस्कृत काव्य थोडें ह्मणजे एकवारांश इतकेंच भरेल. त्याचा विचार केल्यास कालिदास, भारवि, माघ, श्रीहर्ष, भवभूति, जगन्नाथराय इत्यादि दिग्गज संस्कृत कवींच्या तोलाचें पंतांचें संस्कृत काव्य भरलें नाहीं तरी पण 'मुक्तामाला', 'कृष्णस्तवराज', 'संस्कृत मंत्ररामायण' इत्यादि पंतांच्या संस्कृत काव्याचा दर्जा वर सांगितलेल्या संस्कृत महाकवीसारखे कवि सोडल्यास इतर संस्कृत कवींच्या मानानें बराच वर लागेल असें वाटतें. मंत्ररामायणांत मंत्र साधून पंतांनीं प्रसादादि गुण चांगले साधले आहेत. 'मुक्तामालें'तील स्वतंत्र वर्णन व त्यांतील अप्रस्तुतप्रशंसा, व्याजस्तुति, वक्रोक्ति वगैरे अलंकार पाहिले असतां पंतांनीं मनांत आणून तसा प्रयत्न केला असता तर त्यांना बाबा पाध्ये यांच्या सूचनेप्रमाणें महाकवीच्या तोडीचें संस्कृतांत उत्कृष्ट महाकाव्य निर्माण करितां आलें असतें अशी खात्री वाटते. परंतु पंतांनीं तसें न करितां महाराष्ट्रभाषेतच मुख्यत्वें काव्यरचना केली हे त्यांचे महाराष्ट्र भाषेवर महदुपकार झाले आहेत.

सारांश, पंतांचें 'काव्यगुणदोषविवेचन' या प्रस्तुत सदरारंभीं जीं अवतरणें दिलीं आहेत त्यांपैकीं एकांत पंतांनीं आपल्या काव्यास इंदूची उपमा दिलेली आहे ती यथार्थ नाहीं असें कोण रसिक ह्मणेल ? पंतांची कविता काव्यसंग्रहांतून विस्तृत टीपा देऊन लोकप्रिय करण्याचा मान निर्णयसागरासच आहे. तेव्हां 'संपूर्ण **कलांचें** आश्रयस्थान, **तमो**विनाशकुशल, परमाल्हादप्रद, **जड**राशीस ( जलराशीस, पक्षीं जडांस ) **तरल** करणारा, **कुमुदायामदक्ष** ( रात्रिविकासी कमलांस विकास करणारा, पक्षीं पृथ्वीवर हर्ष वाढविणारा ), **दोषाभावाचा** प्रवर्तक ( रात्रीचा अंधार दूर करणारा, पक्षीं दोष दूर करणारा ), **पाषाणहृदया**सही द्रव आणणारा ( चंद्रकांत मण्यास पाझर फोडणारा, कठोर हृदयांसही आर्द्र करणारा, अर्थात् निष्ठुर माणसांचें चित्त मृदु करणारा ), सुधेचें वसतिगृह, **विबुधांनीं** (देवांनीं, पक्षीं पंडितांनीं) **आस्वादितरस, रुचिरमूर्ति, तापहारक, ईश्वरांनींही** शिरसामान्य ( शंकरानें, पक्षीं मोठ्या लोकांनीं शिरोधार्य ), **हरिणालंकृत** ( मृगलांछित, पक्षीं हरीनें ह्मणजे भक्तिरसानें पूर्ण ) अशी ज्याची **अंकशोभा** आहे व **सागरोत्पन्न** ( समुद्रांतून उत्पन्न झालेला, पक्षीं निर्णयसागरांतून छापून प्रसिद्ध झालेला ) असा मोरोपंतांचा काव्येंदु खलविरहिजनांशिवाय इतर सर्व संसारतप्तजनांस निःसंशय सुख देईल. याविषयीं पंतांचे सहृदय टीकाकार हंस ह्मणतातः-"आह्मांस असें वाटतें कीं सहृदय जनमनःसमुद्रास मोरोपंतांच्या निष्कलंक काव्यचंद्रोदयानें अपरिमित भरती आली आणि तो लागलींच काशीपासून रामेश्वरापर्यंत वाढून उचंबळूं लागला. व त्यानंतर दिवसानुदिवस सचंद्रसमुद्राची वृद्धिच होत आहे असें जेव्हां कित्येक मत्सरी पंडितांच्या दृष्टीस पडलें, तेव्हां त्यांनीं आपल्या स्वभावास अनुरूप असा निंदाकज्जलीचा राहू बनवून त्याची, पंतांच्या काव्यचंद्राकडे मोठ्या झपाट्यानें प्रेरणा केली. पण ती व्यर्थ झाली. ठीकच आहे. 'निंदकाचें घर असावें शेजारीं' ह्या तुकारामाच्या वचनाप्रमाणें मोरोपंताच्या काव्येंदूची प्रभा अधिक शुभ्र दिसण्यास मत्सरी पंडितांचें वरील कृत्यच कारण झालें. अनेक वेळां तप्त केलेलें सुवर्ण जसें अधिक मोलास चढतें, त्याप्रमाणें पंतांची कविता पाहतां पाहतां सर्व महाराष्ट्रकवितादेवीचा मुकुटमणि होऊन बसली; आणि कदाचित् संस्कृतांतील प्रख्यात कवितांशीं ती स्पर्धा करूं लागेल तर क्षणभर तिचेही डोळे दिपवील अशा स्थितीला येऊन पोंचली."

पंतांनीं आपल्या काव्यांत प्रसंगविशेषीं निंदकांस वाग्बाण मारून आपल्या कवितेची तरफदारी केलेली आढळते. परिशिष्ट 'उ' पहा. मंत्ररामायणाच्या उपसंहारांतील पुढील एकच श्लोक पहाः-

'माजी सत्कृति दूषिली जरि खळें उच्छृंखळें आग्रहें ।
सेवावीच परंतु नित्य रसिकें हे सद्गुणाच्या गृहें. ॥

चंडाळ त्रिदशापगेंत वमला, कीं धेनुला स्पर्शला, ।
त्यांचें श्रोत्रियदेवसेव्य पयही, त्याही सदा निर्मला. ॥ १३ ॥'

यावरून मोरोपंतांच्या जिवंतपणीं मत्सरी लोकांनीं त्यांच्या काव्यास निष्कारण भलतीं भलतीं दूषणें लावून किती त्रासवून सोडिलें असेल ह्याची कल्पनाच करावी. नाहीं तर पंतांनीं निदकांविषयीं लिहितांना 'उच्छृंखळ, चंडाळ, वमला' अशीं जहाल विशेषणें खचित वापरलीं नसतीं.

## १० मोरोपंतांच्या काव्यांतील दोष.

येथवर त्यांच्या गुणांचें व कांहीं विशेष गोष्टींचें विवरण झालें. आतां त्यांतील दोषांकडे पाहूं.

(१) पंतांच्या कवितेंतील पहिला दोष **दुर्बोधता** होय. संस्कृताचें अंग नसलेल्या निवळ महाराष्ट्रवाचकांस त्यांचें काव्य कठिण वाटून तें पुष्कळ ठिकाणीं समजणारही नाहीं. संस्कृताच्या धर्तीवर केलेले लांब समास ( परिशिष्ट–ऌ ), संस्कृत शब्दांचा, पदांचा, वाक्यांचा भरगच्च प्रयोग ( परिशिष्ट–ॡ ), तसेंच लांब यमकांची सांखळी ( परिशिष्ट–'ऋ' ) ह्यामुळें पंतांची कविता थोडीशी क्लिष्ट झाली आहे.

प्रसिद्ध महाराष्ट्र वैयाकरण दादोबा पांडुरंग 'यशोदा पांडुरंगी'च्या प्रस्तावनेंत लिहितातः–"कालिदास, भारवि, माघ आणि श्रीहर्ष, यांचीं अनुक्रमें रघुवंशकिरातादि जीं प्रसिद्ध महाकाव्यें, त्यांमध्यें शब्दांच्या काठिण्यावरून श्रीहर्षाचें जें शेवटलें नैषध काव्य, त्याचें दुर्बोधत्व बहुधा लोकानुभूत आहे; तसेंच ज्यांस संस्कृत भाषा अवगत नाहीं, अशा प्राकृत जनांस मोरोपंताच्या काव्यांत संस्कृत शब्दांचा भरणा पुष्कळ असल्यानें, साहजिक, त्या शब्दांच्या अपरिचयामुळें, आणि प्राकृत जनांस अप्रसिद्ध असे संस्कृत शब्द, आणि निवळ प्राकृत व ग्राम्य शब्द, यांचें मिश्रण असल्यानें संस्कृतभाषाभिज्ञ अशा पंडितांसहि त्यांची निवड करून अर्थयोजना करण्यांत अवघड प्रसंग असण्याच्या दृढ संभवामुळें तसेंच समयविशेषीं शब्दांचा दूरान्वय असल्यानें अर्थज्ञानाच्या दुःसाध्यामुळें, मोरोपंताचें काव्यहि दुर्बोध आणि कठिण ह्मणून बहुधा सर्व जनांस अनुभूत आहे."

(२) दुसरा दोष पंतांची **यमकाधीनता.** प्रथमार्धात 'आतेला', 'ते लटिके', 'बोलका नाहीं', 'पाप डसे' इत्यादि शब्द शेवटीं आले कीं, 'आ तेला', 'तेल टिके', 'बोल कानांहीं', 'पापडसे' इत्यादि यमक द्वितीयार्धांत पंतांनीं शिरकविलेंच ह्मणून समजावें ( परिशिष्ट–'अं', 'अः' ). त्यामुळें कांहीं आर्यांचें पूर्वार्ध कथानुसंधानानें मोठें सुंदर रचिलें असून उत्तरार्ध पहावें तों यमकाकरितां म्हणून दूरान्वित, कृत्रिम व कवितेंत न शोभणाऱ्या अशा ग्राम्य किंवा अप्रकृत अर्थानें युक्त असें आढळतें ( परिशिष्ट 'ठ' पहा ). पंतांच्या काव्यांत प्रौढ अर्थाचें मंडन कधीं कधीं जें ग्राम्य दृष्टांतांनीं केलेलें

आढळतें तें बहुशः लांब किंवा ठरींव यमक साधण्याकरितां म्हणून असतें. याचीं उदाहरणें:–

( अ ) (गीति) "तो प्रळयकाळघनसा लागे सर्वत्र शक्र वाढाया, ।
सुर म्हणति **फुटाण्यापरि** याच्या नग रगडतील दाढा या.
( हरि. ४८. ११२ )"

यांतील पूर्वार्धातील उपमा मोठी भारदस्त असून खालची फुटाण्याची उपमा ग्राम्य व नीरस होय. येथें 'मोहरी'चा दृष्टांत जास्त समर्पक झाला असता. असल्या दाखल्यांनीं वाचकांच्या मनाचा विरस होतो.

( आ ) (गीति) "चितेनें नीज नसे, स्वप्न नव्हे, हा नखाक्ष **मायावी** ।
कपिरूपें आलासे पीडाया; यांस कां **क्षमा यावी** ? ॥
( मंत्ररामायण मोठें, प्राकृत सुंदरकांड ५६ )"

समुद्रोल्लंघन करून मारुति लंकेंत अशोकवनांत येऊन वृक्षावर बसून सीतेशीं बोलूं लागला; तेव्हां त्याच्याशीं न बोलतां सीता आपल्याच मनाशीं विचार करितेः–'काळजीमुळें मला झोंप लागत नाहीं तेव्हां स्वप्न कोठून पडणार ? म्हणून मी स्वप्न तर पहात नाहीं. मग वानररूपानें राघवगुणवर्णन करणारा हा कोण ? मला वाटतें विंशतिनेत्रधारी रावण मला फसवून पीडा करण्यास कपिरूपानें आला असावा. या दुष्टाला माझी दया कोठून येणार ?' हा अर्थ सरळ जुळत असतां 'कां दया यावी' असें न म्हणतां यमकास्तव 'कां क्षमा यावी ?' असें म्हणून पंतांनीं अर्थाची हानि केली. अपराध्यास अपकार न करणें ती क्षमा व एखाद्यावर निष्कारण उपकार करणें ती दया. सीतेनें रावणाचा कांहीं अपराध केला नव्हतां तेव्हां त्याच्या पासून ती क्षमेची अपेक्षा करीत नसून त्यानें आपल्यावर केवळ दया करावी एवढाच तिचा हेतु होता. हा घोंटाळा यमकाधीनत्वास्तव झाला. असेंच एक आणखी उदाहरण आढळतें.

( इ ) (गीति) "क्रीडाप्रसक्त यादव असतां दानव निकुंभ **मायावी** ।
भानुसुता भानुमती ने, खळ हृदयांत कां **क्षमा यावी** ? ॥
( हरिवंश ३४.१ )"

येथेंही क्षमेचा प्रसंग नसून दयेचा आहे.

**यमकाकरितां संस्कृतपदयोजनाः–**

( ई ) (गीति) "शशिकुलज नहुषसुत जन हा नाम ययाति येथ **तोया मी** ।
आलों मृगानुसारें आपृच्छे त्वां तदहमि**तोयामि** ॥ (आदि. ९.६६)

यमकाशिवाय संस्कृतपदरचना करण्याचें दुसरें कांहीं समर्पक कारण या गीतींत दिसत नाहीं. त्यामुळें दुर्बोधता मात्र आली. कदाचित् ब्राह्मणकन्यादेवयानीशीं

ययाति राजा भाषण करितो ह्मणून संस्कृतवाक्यरचना पंतांनीं केली असल्यास **कांहीं ठिकाणीं संस्कृतभाषेच्या योजनेनें गुणवृद्धिहि झालेली आढळते.** उदाहरणार्थ दुष्यंताचें शकुंतलेस क्रोधयुक्त भाषणः–

"राजा ह्मणे, 'कवण तूं ? कोणाचा पुत्र ? काय गे वदसि ।
का च स्मृतिरपि तापसि ! मैवं प्रलपाऽत्र भूभुजः सदसि ! ॥
( आदि. १२.६३ )"

मुनिचें संस्कृतांत समुचित भाषणः–

"मुनि वदले 'मामैवं पीडय पापाय बालकौ शल्य ! ॥ (भीष्म. ८.३१)"

केकावलिटीपा पृ० १६१ परिशिष्ट–'ऌ' पहा. यमकाकरितांहि अयोग्य उपमा क्वचित् योजिल्या आहेत. याचीं उदाहरणें परिशिष्ट–'ठ' त पहावीं.

**यमकास्तव अयोग्य उपमा योजल्याचीं दोन ठळक उदाहरणें** येथें देतोंः–

( उ ) (गीति) "सांद्रानंदभरानें तेव्हां प्लवगेंद्रसंघ ते **लवले**; ।
लव लेखर्षिस्वांतीं दुःख नसे, तापदीप **मालवले.** ॥
( मंत्ररामायण युद्धकांड ७६० )"

रावणवधानंतर रामाच्या सांगण्यावरून इंद्रानें मृतकपिसैन्य उठविलें, तेव्हां देवांचा आनंद

"सुरजन जयजयशब्दें गर्जति, वाद्ये अनेक वाजविती; ।
सुमवर्षे वर्षतुसि, चपळांसि वराप्सराहि, लाजविती. ॥ ( युद्ध. ७५९ )"

असें सुरस झोंकदार वर्णन केल्यावर पुढें ही गीति आली आहे. कपिसैन्य उठल्यामुळें सुग्रीवांगदहनुमदादि कपिश्रेष्ठ अतिहर्षभरानें नम्र झाले, युद्धप्रिय देवर्षींच्या मनांत युद्ध बंद झाल्यामुळें किंचित् देखिल खेद झाला नाहीं, व सर्वांचे तापरूपी प्रकाशदीप विझले, अर्थात् सर्वांचीं सर्व प्रकारचीं दुखे नष्ट झालीं. यावरील हंसांची टीका नीरक्षीरविवेक करणारी, अर्थात् मार्मिक आहे. ते ह्मणतातः–

" 'दिवे मालवणें' हें उत्सववर्णनांत कोणत्याहि प्रसंगीं अपशकुनासारखें अप्रशस्त मानलें आहे. असें असतां रामचंद्राच्या अत्युत्तम उत्साहवर्णनप्रसंगीं मोरोपंतानें अशा प्रयोगाची छाया आणिली हें बरोबर झालें नाहीं. सामान्यतः जेव्हां उत्सवप्रसंग प्राप्त होतो तेव्हां होईल तितक्या प्रयत्नानें अनेक दीप प्रज्वलित करण्याचा योग लोक आणितात. दिवे मालवणें हें नेहमीं अभद्र आहे असें लोक गणितात. ह्या लौकिकाचा कवीनें या ठिकाणीं कांहीं विचार केला नाहीं असें वाटतें. दुसरें, तापाचे दिवे कोठें ऐकण्यांत नसून तापाला दिव्याचे उपमान योजण्याविषयीं कविप्रसिद्धिही नाहीं. तेव्हां 'तापदीप मालवले' असा प्रयोग करून पंतांनीं मोठाच दोष केला असें वाटतें". तापाला अग्नीची उपमा सर्वसंमत असून तिचा उपयोग पंतांनीं आपल्या काव्यांत

पुष्कळ ठिकाणीं केला आहे. येथें ती उपमा 'मालवले' या यमकाला जुळणारी नसल्यामुळेंच त्यांनीं ती न योजतां यमकाधीनत्वास्तव दोषाचा विचार न करितां तापाला दीपाची उपमा योजिली असावी असें वाटतें.

( ऊ ) यमकास्तव अयोग्य उपमेचें दुसरें उदाहरण. धर्मराजाचें श्रीकृष्णाशीं भाषणः–

( गीति ) "झाले सुयोधनाला भीष्मद्रोण प्रसन्न सुरतरुसे ।
व्यर्थ असुभगा, पतिशीं सुभगेचें आठवूनि सुरत, रुसे. ॥ ( भीष्म. ९ )."

भगवान् श्रीकृष्णाशीं भाषण करितांना यमक जुळण्याकरितां धर्मराजाच्या मुखांत घातलेला हा सौभाग्यवती स्त्रीच्या सुरताचा दृष्टांत अत्यंत अनुचित म्हणूनच अप्रयोजक आहे.

( ३ ) पंतांच्या काव्यांतून **क्वचित् सत्काव्यांत न शोभणारे असे हलके शब्द व अप्रौढ भाषापद्धति आढळून येते** हा तिसरा दोष. थान, ( कानांतला ) फोड, मिशावर ताव देणें, नाकास चुना लावणें हे शब्द व वाक्यांश याचीं उदाहरणें होत.

( ४ ) मोरोपंतांचें काव्य जरी अगदीं सोवळ्यांतलें सोंवळें आहे तरी पण **क्वचित् अश्लीलशब्दयोजना, फाजील शृंगारिक उपमा व फाजील शृंगारिक वर्णनही** त्यांत आढळतें. साधुरीति गी. १८,२६, केका. ७,२४ ( तसेंच पृ. ६७–६८ तील उदाहरणें पहा. ) हीं त्यांचीं उदाहरणें होत. हा चवथा दोष.

( ५ ) संस्कृत काव्यनाटकादि ग्रंथांत मूळग्रंथांतील वर्तनांत कमी अधिक करून नायकनायिकांच्या स्वभावाला व गुणांला योग्य अशी रचना केलेली असते, तसा प्रकार पंतांनीं केलेला आढळत नाहीं. मूळग्रंथांत उत्तम नायकनायिकांच्या स्वभावाविरुद्ध कांहीं रचना आहे ती पंतांनीं गाळून टाकिली नाहीं किंवा पात्रांच्या स्वभावानुसार तिचें रूपांतरही केलेलें नाहीं. यामुळें महाकवि या दृष्टीनें पंतांच्या काव्यांत वैगुण्य आलें आहे. हा पांचवा दोष. याचीं उदाहरणेंः–

( अ ) किष्किंधाकांडांत तापसवेषधारी, देवतुल्य कांतिमान व धनुर्धारी अशा रामलक्ष्मणांस पाहून वालीनें आपल्याला मारावयास तर ह्यांना पाठविलें नसलेना ! असा संशय येऊन सुग्रीव भ्याला, तेव्हांचें वर्णनः–

( गीति ) "पंपेंत स्नान करुनि विभु गेला ऋष्यमूकगोत्रास; ।
त्यातें दुरुनि पाहुनि पावे सुगल प्लवंग तो त्रास. ॥ ९१ ॥
पवनसुतासि ह्मणे ते तापस परि कार्मुकी शरी रानीं ।
येताति कोण पुस जा, स्पष्ट गमति देवसे शरीरांनीं. ॥ ९२ ॥"

शुद्धांतःकरणी व देवांश सुग्रीवाला रामदर्शनानें भय न वाटतां आनंद वाटावयास पाहिजे होता, तसें न होतां भीति वाटली हें नुसतें वर्णन पुण्यश्लोक रामप्रभूच्या चरित्रांत अयोग्य दिसतें.

( आ ) तसेंच पुढें अग्नीला साक्षी ठेवून रामसुग्रीवांनीं सख्य केलें तेव्हां उभयतांनीं शपथा घेतल्या. तरी सुग्रीवाला राम वाळीला मारील अशी खात्री वाटेना. म्हणून रामानें एक बाण मारून सप्ततालभेद केला इत्यादि कलियुगांत साजणारें वर्णन त्रेतायुगांत रामचंद्रासारख्या दिव्य व उदात्त नायकासंबंधीं केलें आहे.

( गीति ) "सुगल ह्मणे रामा ! म्यां शोधावी जानकी शपथ करतों; ।
राम ह्मणे कार्य तुझे जें तें मी जानकीश पथकरतों. ॥ ९९ ॥
शिखिसाक्षिक सख्य करुनि, राम करी कार्य मान्य, वालिशतें ।
क्षण ज्यापुढें नुरावें प्रभुबळ नुमजे सुकंठ बालिश तें. ॥ १०० ॥
( वनपर्व अ० ११ )"

"परि हा रानट वानर न धरी विश्वास ह्मणुनि एक शरें ।
छेदूनि सप्त ताली पर्वतही फोडिला रघुप्रवरें. ॥ ५१ ॥
( मंत्ररामायण किष्किंधाकांड )"

'त्रेतायुगांत रामचंद्र व सुग्रीव ह्यांच्या वचनाविषयीं त्यांस इतका बंदोबस्त करून घ्यावा लागला तर, हल्लीं कलियुगांत शपथप्रमाण बेलभंडारादिक्रिया होतात तेव्हां कांहीं विश्वास वाटतो हा कलिप्रादुर्भाव मानणें अप्रशस्त होय. युगपरत्वें मनुष्याच्या अंतःकरणप्रकृत्यंशांत फेरफार होत असतो अशी पुष्कळ लोकांची व ग्रंथांची समजूत आहे व तशी समजूत असणें हें लोकांचें सदाचरण व भक्ति वाढण्यास उत्तम कारण आहे. यास्तव भगवान् रामचंद्राच्या काव्यांत वरील गोष्ट प्रकारांतरानें वर्णावयाची होती, ह्मणजे रामचंद्राच्या भाषणाबरोबर तें सुग्रीवानें निःसंशय अनन्यभावानें मान्य केलें असें वर्णन असावयाचें होतें. अशा वर्णनानें रामचंद्रस्वभावास भूषण होऊन, त्रेतायुगांतील मनुष्यस्वभाव कलीहून भिन्न होता असेंही लोकांस दिसलें असतें. दुसरें, सुग्रीव हा वनचर होता यामुळें त्याची स्वाभाविक बुद्धि निष्कपट आणि श्रद्धाळु असलीच पाहिजे. त्याहून विपरीत वरील वर्णन झालें हाही प्रकृतिविपर्ययदोष झाला.

( इ ) असेंच मंत्ररामायणांत रामानें अन्यायानें वालीचा वध केला असें ग्रंथरचनेंत स्पष्ट दाखविलें आहेः—

सुग्रीवाचा रामचंद्र मित्र झाला आहे, तो मोठा पराक्रमी आहे, यास्तव तुम्ही सुग्रीवाबरोबर युद्ध करण्यास जाऊं नये ह्मणून वालीस त्याच्या स्त्रीनें सांगितलें असतां तो तिला ह्मणालाः—

( गीति ) "धर्मज्ञ, राजनंदन, सज्जन, सद्विद्य, तो कुलीन सती ! ।
वैरहि त्यासीं नाहीं शंका चित्तीं धरूं नको नसती. ॥ ६७ ॥
( मंत्ररामायण )"

याप्रमाणें उदार व निष्कलंक मनानें वालीनें रामचंद्रावर भरंवसा ठेविला असतां:-
"दोघे भुजयुद्धातें प्रवर्तेतां परम तीव्र तत्काळ ।
गुल्मांतरित रघूद्वह सोडी दूरूनि बाण तत्काळ. । ॥ ६९ ॥
( मंत्ररामायण )"

अशा प्रकारें कपटयुक्तीनें रामचंद्रानें वालीचा वध केला. हें चरित्र पाहून रामचंद्राच्या नीतिवर्तनाविषयीं क्षणभर तरी रोमांचयुक्त होऊन कोण साशंक होणार नाहीं बरें ! तेव्हां अशा प्रकारचें चरित्र अभियुक्त कवींनीं रूपांतर करून लिहिलें पाहिजे, तसें मोरोपंतानें केलें नाहीं." पंतांस श्रीरामानें गुप्त राहून केलेला वालिवध व रजकनिंदावचनश्रवण करून त्यानें केलेला सीतात्याग या गोष्टी पसंत नसल्याविषयीं त्यांनीं पुष्कळ स्थळीं प्रकारांतरानें उद्गार काढिले आहेत. श्रीरामकृत वालिवधाविषयीं द्रोणपर्वांत पुढीलप्रमाणें वर्णन आढळतें:-
( गीत्यर्ध ) "वालिवधीं रामाचें द्रोणवधीं हें तुजें अयश राजा ! ।
( द्रोणपर्व २२. १७ )"

( ई ) 'रावणाचा वध करून लंका हस्तगत करण्यापूर्वींच रामानें लंकाराज्य बिभीषणास दिलें असें वर्णन आहे तेथें राज्य देण्याचें वचन दिलें असें वर्णन केलें असतें तर तें श्रीरामचंद्र व कवि या उभयतांस भूषणप्रद झालें असतें.'
( गीति ) "लंकानगरीराज्यप्रदानसंकल्प जो तयास हित ।
हृदयीं धरिला रामें बिभीषण प्राज्ञ मान्यतासहित. ॥ ९३ ॥
सत्वर मग मकरालयजल आणवुनि स्वदासनंदिकरें, ।
शरणागतासि केला लंकाराज्याभिषेक बंधुकरें. ॥ ९४ ॥
( मंत्ररामायण, युद्धकांड )".

( उ ) आदिपर्वांतील शकुंतलोपाख्यानांत दुष्यंतानें शकुंतलेच्या आईबापाविषयीं व तिच्याविषयीं दुरुत्तरें बोलून शकुंतलेचा अपमान केला तेव्हां ती चवताळून राजास ह्मणते:-
( गीति ) "साध्वी ह्मणे, 'मिळविलें ज्ञानतपःकीर्तिभाग्य मत्तातें ।
कैचें तुझ्या कपाळीं नीचा अतितुच्छभाग्यमत्ता ! तें ? ॥ ७३ ॥
जी ब्रह्मयोनि देवी मन्माता मेनका, सुरांस मता; ।
नीचा तुझीच माता; करिल सुधेची कशी सुरा समता ? ॥ ७४ ॥
जरि मुख्य सत्यधर्मच्युत आपण, विश्वनिंद्य जन; नीचा ! ।
निंदिसि कसें पदातें मत्ताताच्या; मदीय जननीच्या ? ॥ ७५ ॥

पौरवरौरवगौरवकर्ता, भर्ता भला मला गमसी; ।
समशील बुद्धि होउनि नीतीनें आजि बोलुं लाग मसीं. ॥ ७६ ॥
बहुधा तुझें कपाळ न साहे सुतरत्नसन्निधानातें; ।
हतभाग्य न घे, देतां दाटुनि आणूनि, सन्निधानातें. ॥ ७७ ॥
क्षितिपति मत्सुतचि असो तेजाचा मूर्तिमंत हा निकर; ।
हा निकर मांडिला तूं; देशील कर स्वकीर्तिहानिकर. ॥ ७८ ॥"

यांत शकुंतलेला साध्वी ह्मटलें असून तिच्या मुखांत साध्वीला बिलकूल न शोभणारीं अशीं पतीला उद्देशून काढलेलीं दुरुत्तरें घातलीं आहेत. हा पंतांनीं मोठा दोष केला आहे. याविषयीं हंस ह्मणतातः—"शकुंतला पुराणप्रसिद्ध साध्वी असून तिच्या मुखांत आपल्या पतीला केवळ अभद्र शिव्यागाळी घालून त्या योगानें आर्यांस व साध्वीच्या गुणांस पंतांनीं दूषण लाविलें असें आह्मांस वाटतें. साध्वीच्या ठिकाणीं आत्मनिग्रहशक्ति उत्तम असते, यामुळें तिचा क्रोध कोणत्याही कारणानें मर्यादेबाहेर जावयाचा नाहीं. कदाचित् तो पातिव्रत्यदूषकवचनांनीं अतिप्रज्वलित झाला तरी पतिहृदयाला चंदनस्पर्शतुल्यच लागेल असा तो तिनें सोडिला पाहिजे. असें जिजकडून आचरण होणार नाहीं ती कशाची साध्वी ! ! ग्रंथरचना करितेसमयीं पंतांनीं ह्या गोष्टीचा विचार करून ती केली नाहीं हा दोष आहे.

( हंसकृत निबंध पृ० ९९ )".

(ऊ) तसेंच, ध्रुव चरित्रावर पंतांनीं कांहीं स्फुट गीति रचिल्या आहेत. त्यांत ध्रुवमाता परमसाध्वी सुनीति हिच्या मुखांत पंतांनी घातलेल्या स्वपतिविषयक पुढील दोन गीति पतिव्रतेस शोभण्यासारख्या नाहींत. पंतांनीं वर्णिलेल्या गीतिबद्ध व साकीबद्ध ध्रुवचरित्रांत कोणत्याही प्रकारचें पतिसंबंधीं त्वेषयुक्त, संतापपर भाषण सुनीतीच्या मुखांत घातलें नाहीं. सुनीति पतीवर संतापून ह्मणतेः—

( गीति ) "हाय ! ह्मणे माय, सुता ! काय तुझा सायसा मुलायम हा, ।
काय करूं ? जाय वना; राय नव्हे तात हा, मुला ! यम, हा ! ॥
रायासि बायको मी सांपडले जेवि गाय गा ! यवना, ।
दीनावना मनामधि जाउनियां ध्याय पाय, गाय वना. ॥"

( ६ ) आणखी **'कालविपर्यास'** म्हणून एक सहावा दोष पंतांच्या काव्यांत क्वचित् आढळतो. ज्या काळाला जें वर्णन योग्य नाहीं त्या काळीं तें वर्णन केलें असतां हा दोष उत्पन्न होतो. गोपीगोडवा गी. ६१, राधाकृष्णसंवाद गी. १५, कुशलवोपाख्यान. ३.१६, शल्य. २.२८,६०, मौसल. १.१५; हीं याचीं उदाहरणें होत. गोपीगोडव्यांत गोपी कृष्णाविषयीं म्हणतातः—

( अ ) (गीति) "हरियशचि व्रजहृदया धाम, जसें तोय धाम यादासी; ।
भजुनि हरिजनां पावो हरिला, ती जेंवि **नामया दासी**. ॥ ६१ ॥"

यांत नामदेवाच्या जनीदासीचा उल्लेख केला आहे तो द्वापारयुगांत होऊन गेलेल्या गोपींच्या मुखांत अयोग्य म्हणून हा कालविपर्यास दोष झाला.

(आ) (गीति) "यातें अपत्य होइल, जें आयस घोर मुसल, माना तें, ।
त्यातें बुडाल पावुनि सर्व, जसे वेद **मुसलमानातें**. ॥
(मौसल. १-१५)"

(इ) (श्लोक) "सौमित्रि क्रोधतप्त क्षितिपतिसि ह्मणे, 'प्रार्थना ऐक रामा ! ।
मिथ्या लोकापवादें करुनि विकलुषा त्वां त्यजावी न रामा; ॥
**म्लेच्छांहीं निंदिजेते श्रुति**, ह्मणउनियां काय ते विप्रलोकीं ।
टाकावी ? हें विचारें करुनि बुधपते ! शास्त्रनेत्रें विलोकीं. ॥ ३.१६ ॥
(कुशलवोपाख्यान)"

या 'कालविपर्यास' दोषाला इंग्रजींत *anachronism* ह्मणतात. याविषयीं *De Quincey* डे क्वीन्सी नामक इंग्रज ग्रंथकार आपल्या 'The Caesars' नामक ग्रंथांत ह्मणतोः—

"We mean by an anachronism, in common usage that sort of blunder when a man ascribes to one age the habit, customs or inalienable characteristics of another. This, however, may be a mere lapse of memory, as to a matter of fact, and implying nothing at all discreditable to the understanding, but only that a man has shifted the boundaries of chronology a little this way or that.... A far worse kind of anachronism, though rarely noticed as such, is where a writer ascribes sentiments and modes of thought incapable of co-existing with the sort or the degree of civilisation that attained, or otherwise incompatible with the structure of society in the age or the country assigned".

(भावार्थ) भिन्न देशांतील किंवा भिन्न काळांतील लोकांचें आचार, विचार-किंवा व्यवहार हे इतर देशांतील किंवा काळांतील लोकांना लागू केल्यास हा **काल-विपर्यास** दोष होतो.

कृतयुगांतील ऋतुपर्ण राजाच्या मुखांत वृक्षपर्णगणना करितांना कलियुगांतील भास्कराचार्यांची लीलावती घालणें (मुक्तेश्वर वनपर्व ८-११२), वेदव्यासाच्या तोंडीं कालिदासाची किंवा भवभूतीची उक्ति घालणें, दाशरथिरामानें लंकेत हनुमंताला तार पाठविणें, अकबराची व शिवाजीची लढाई करणें, युधिष्ठिराला नारदानें राज्या-संबंधीं उपदेश करितांना वर्तमानपत्रांचा उल्लेख करणें, जगन्नाथ पंडिताचा व आरिस्टाटलचा वादविवाद होणें वगैरे गोष्टी वरील दोषांचींच उदाहरणें होत. हा दोष इतिहासाच्या अभावामुळें व कालविस्मृतिमुळेंही होतो.

आणखीही बारिकसारिक दोष मार्मिक वाचकांस सांपडतील; पण त्यांची व्याप्ति अत्यल्प अशीच आढळून येईल. मोरोपंतांच्या एकंदर अवाढव्य काव्यरचनेच्या मानानें हे सर्व दोष अत्यल्प असून त्यांतील गुणांचें पारडें अत्यंत जड भरत असल्यामुळें ते दोष त्यांना कमीपणा आणत नसून उलट गालबोटाप्रमाणें त्यांच्या काव्यांस शोभाच देतात. हंसांनीं ह्मटल्याप्रमाणें "पंतांच्या काव्यांतील दोष इतके क्षुल्लक आहेत कीं, त्यांच्या काव्यगुणसूर्यरश्मींपुढें ते गिरिगुहांतील अंधकारासारखे दूरच्या कोपऱ्यांत कोणाच्या दृष्टीसही न येण्यासारिखे आहेत." विद्यापति **बिल्हणानें** 'विक्रमांकदेवचरितांत काढिलेली पुढील उक्ति मोरोपंतांच्या काव्यांस लागू पडतेः-

'अलौकिकोल्लेखसमर्पणेन विदग्धचेतःकषपट्टिकासु ।
परीक्षितं काव्यसुवर्णमेतल्लोकस्य कंठाभरणत्वमेतु ॥
(विक्रमांकदेवचरितम् १.२४)'

(भावार्थ) ह्या काव्यरूपी सुवर्णाची परीक्षा विद्वानांच्या अंतःकरणरूपी कसोटीवर उल्लेख समर्पण करून (घांसून, अर्थात् त्यांना आनंद देऊन) झालेली आहे. ह्मणून रसिकांनीं हें काव्यरूपी सुवर्ण अलंकाररूपानें कंठांत धारण करावें.

## ११ मोरोपंतांची इतर कांहीं कवींशीं संक्षिप्त तुलना.

**'सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची ।**
**ओंवी मुक्तेशाची, किंवा आर्या मयूरपंतांची ॥'**

### (अ) कालिदास व मोरोपंतः-

(श्लोक) "पुरा कवीनां गणनाप्रसंगे कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासः ।
अद्यापि तत्तुल्यकवेरभावादनामिका सार्थवती बभूव ॥"

(भावार्थ) पूर्वी एकंदर कविसमूहाच्या परिगणनेंत प्रथमतः जी करांगुली (कनिष्ठिका) मोडली, ती कालिदासाच्या नांवानें; पुढें तत्समान दुसरा कवि न आढळल्यामुळें दुसरें बोट मोडण्याचा प्रसंग न आल्यामुळें तिचें अनामिक हें नांव सार्थ झालें.

कालिदास व मोरोपंत या दोघांनींही आपलीं काव्यें इतिहासपुराणाधारें लिहिलीं. लोकस्थिति, वनशोभा, ऋतुवर्णन, स्वयंवरें, विरहवर्णनें इत्यादि गोष्टींसंबंधानें स्वतंत्र, विस्तृत व सुरस वर्णन जसें कालिदासाच्या कवितेंत वाचावयास मिळतें तसें पंतांच्या काव्यांत मिळत नाहीं.

हंस ह्मणतातः-"शृंगारवीरादि रसविशेष उत्कर्षानें दाखविण्याचा प्रसंग आला कीं, त्याठिकाणीं साहित्यशास्त्रकथित लक्षणाप्रमाणें तो तो रस मूर्तिमंत उभा करून देण्याचा कालिदासादि संस्कृत कवीनें अंतःकरणपूर्वक उद्योग केलेला दृष्टीस पडतो. यामुळें रघुवंशादि काव्यांत नाना प्रसंगीं अनेक वर्णनें मोठ्या कारागिरीनें

केलेलीं व ओतप्रोत रसानें भरलेलीं दिसतात. तसा प्रकार मोरोपंताच्या काव्यांत झाला नाहीं. एकंदर भारत, भागवत, रामायण ( इत्यादि ) संस्कृत ग्रंथांत कोणाविषयीं काय काय इतिहास लिहिला आहे तो संक्षेपानें प्राकृत भाषेंत कवितारूपानें मात्र मोरोपंतानें उतरला आहे. "कालिदासादि संस्कृत कवींच्या काव्यांत पक्व फलभरानें लवलेल्या वृक्षांच्या मोठमोठाल्या राई दृष्टीस पडतात; तशीं झाडें उभीं केलेलीं पंतांच्या कवितेंत सांपडणार नाहींत. काव्यसृष्टींतील नानारसयुक्त फळांनीं ओथंबलेल्या वृक्षांचीं व वेलींचीं हिरवीं गार मैदानें पाहून रसिकांस जसा आनंद होतो; तसाच फळाफुलांनीं गजबजलेल्या बाजारास पाहूनही होतोच. पण बागाचा देखावा बाजारास येणार नाहीं, असें ह्मणणाऱ्या रसिकांची संख्या अधिक निघेल असें वाटतें. यामुळें कालिदासादिकांच्या काव्याची बरोबरी पंताचें काव्य करणार नाहीं. तरी जी त्यानें रचना केली आहे तींत त्याच्या स्वतंत्र कल्पनांचा व कारागिरीचा त्यानें पुष्कळ सरस उपयोग केला असून त्याची ग्रंथसंख्या एकंदरींत फार मोठी आहे; यास्तव त्याच्या ग्रंथास महाकाव्य ह्मणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. दुसरें, महाराष्ट्र भाषेंत पंतांचा ग्रंथ महाकाव्यांतच मोडण्यासारखा आहे. तो प्राकृत भाषा जाणणाऱ्याकरितां मात्र निर्माण झाला आहे. त्या पक्षीं, प्राकृत भाषेंत तो स्वतंत्रच आहे यांत कांहीं संशय नाहीं." पंतांचें लक्ष्य विस्तारपूर्वक वर्णनाकडे फारसें दिसून येत नाहीं. बहुतेक वर्णनसंक्षेपाकडेच त्यांचा कल दिसतो. तरी प्रसंगविशेषीं पंतांनीं मूळ ग्रंथांहून भिन्न असेंही वर्णन कमी अधिक विस्तारानें केलेलें आढळतें. भारत, भागवत, हरिवंश, मंत्ररामायण ह्या ग्रंथांत बऱ्याच स्थळीं ज्याला मूळग्रंथांत बिलकुल आधार नाहीं, किंवा फारच थोडा आहे, असें वर्णन पंतांनीं क्वचित् विस्तारपूर्वकही केलें आहे. भागवतांत रुक्मिणीनें आपलें स्वयंवरवृत्त द्रौपदीस एका श्लोकांत सांगितलें असून पंतांनीं त्याचा ९२ गीतींत विस्तार केला आहे. ( परिशिष्ट 'ऊ' पहा ). यावरून स्थलविशेषीं व प्रसंगविशेषीं मूळग्रंथाहून अगदीं निराळ्या प्रकारची काव्यसृष्टिही पंतांनीं निर्माण केलेली आहे असें दिसून येतें. तसेंच कुशलवाख्यानांतही बरेंच विस्तृत वर्णन आहे. त्यांतील कांहीं श्लोक तर कालिदासाच्या श्लोकांचें प्रतिबिंब आहेत. त्यावरून कालिदासाचें काव्य पंतांचें फार आवडतें असावें असें दिसतें. सारांश, शृंगारादि नवरसांच्या तरंगिणींत पंतांनीं प्रसंगविशेषीं झटपट स्नान मात्र केलें असून कालिदासांनीं त्या त्या प्रसंगीं अंगास सुवासिक द्रव्यें लावून इतर मंडळीला बरोबर घेऊन यथेच्छ घटका घटका जलक्रीडा केलेली आढळते. याचें एक मुख्य कारण असें दिसतें कीं कालिदासादि कवींच्या काव्यरचनेचा उद्देश मुख्यत्वें कीर्तिलाभ करून घेण्याचा असून ईश्वरप्राप्ति व्हावी हा मोरोपंतादि महाराष्ट्रकवींचा मुख्य उद्देश होता. ( पृष्ठ १२० व परिशिष्ट 'छ' पहा ). यास्तव त्यांचा कल सृष्टिदेवतेची

निरनिराळ्या प्रसंगीं दिसून येणारी शोभा वर्णन करण्याकडे फारसा नसून भगवंताचें किंवा त्याच्या भक्तांचें गुणवर्णन करण्याकडेच सर्वस्वीं आहे. 'प्रसाद' गुण कालिदासाच्या काव्यांत उत्कर्षानें वर्तत असून मोरोपंतांच्या काव्यांत 'ओज' किंवा प्रौढता हा गुण मुख्यत्वें आढळतो.

'उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम् ।
दंडिनः पदलालित्यं माघे सन्ति त्रयो गुणाः ॥'

(भावार्थ) उपमाचातुर्य कालिदासाचें उत्तम, अर्थगौरवांत भारवि श्रेष्ठ व पदलालित्यांत दण्डि कवि थोर. माघ कवीची गोष्ट काय सांगावी ? 'त्यांच्या काव्यांत' उपमाचातुर्य, अर्थगौरव व पदलालित्य या तिन्ही गोष्टी उत्कृष्टपणें आढळतात.

अशी संस्कृत कवींत काव्यगुणांची वांटणी केलेली आहे. पंतांच्या काव्यांत वरील तिन्ही कवींचे गुण उत्कर्षानें वर्तत असल्यामुळें 'कालिदासाची, भारवीची व दंडीची मिळून त्रिवेणी एकत्र्या पंतांच्या काव्यांत एकत्र संगम झालेली उघड आढळते.' (प्रो. रा. रा. भागवत)' कालिदास हा विक्रमादित्याचा समकालीन असल्यामुळें त्याचा काळ इ. स. पूर्वी सुमारें ५६ वर्षे हा होता.

भरतखंडांत भिन्न भिन्न काळीं जे संस्कृत कविश्रेष्ठ आजपर्यंत होऊन गेले, त्यांत वाल्मीकि, व्यास व गुणाढ्य यांची गणना अतिश्रेष्ठ ह्मणून गोवर्धनाचार्यांनीं आपल्या काव्यांत पुढीलप्रमाणें केली आहे:-

(आर्या) "श्रीरामायणभारतबृहत्कथानां कवीन्नमस्कुर्मः ।
त्रिस्रोता इव सरसा सरस्वती स्फुरति यैर्भिन्ना ॥"

एका आंग्लकवीनें युरोपखंडांतल्या भिन्नभिन्न काळाच्या, निरनिराळ्या देशांतील व फार नांवाजलेल्या अशा तीन कवींचें-होमर (ग्रीस देशांत), व्हर्जिल (इटालींत) व मिल्टन (इंग्लंडांत)-जें वर्णन केलें आहे, त्याची आह्मांला येथें आठवण होतेः-

"Three poets in three distant ages born,
Greece, Italy, and England did adorn.
The first in loftiness of thought surpassed;
The second in majesty; in both the last.
*(John Dryden)*"

(गीति) "कालीच्या लीला जो ऱ्हस्व करी असुनि दास, निजलीला ।
कवितेला जागउनि प्रकटुनि कवि कालिदास निजलीला. ॥"

(श्लोक) "श्रीकालिदासकविवर्यसरस्वतीयं किं वर्णयाम्यतितरां रसवाहिनीति ।
यत्कालिका भगवती शुचिभावयोगाद् यस्यामहो मुहुरनुग्रहमादधाति ॥
(विठोबा अण्णा 'सुश्लोकलाघव' श्लो० ४१७-४१८)"

( भावार्थ ) श्रीकालिदासकविश्रेष्ठाची ही वाणी रसवाहिनी ( नदी, पक्षीं नवरसवर्णनानें युक्त ) आहे. यापेक्षां हिचें वर्णन मी अधिक काय करूं ? कारण, भगवती कालिकादेवी शुद्धभक्तीमुळें त्या वाणीवर वारंवार कृपा करीत असते. (दुसरा अर्थ) कारिका ह्मणजे मेघपंक्ति ही 'शुचिभावयोगात्' ह्मणजे आषाढाच्या महिन्यांत रसवाहिनीवर ह्मणजे नदीवर वारंवार अनुग्रह करिते ह्मणजे पर्जन्यवृष्टि करून नदीचें उदक जळबंब करून सोडते.

**( आ ) क्षेमेन्द्र व मोरोपंतः**–क्षेमेन्द्र हे काश्मिरी संस्कृत महाकवि होत. अनन्तराज व कलश या इ. स. च्या अकराव्या शतकांत झालेल्या काश्मीर राजांच्या कारकिर्दींत हे होते. या गोष्टीचा उल्लेख यांनीं स्वरचित औचित्यविचारचर्चा, कविकण्ठाभरण, दशावतारचरित इत्यादि ग्रंथांत केला आहे. हे जातीनें काश्मिरी ब्राह्मण. यांच्या पित्याचें नांव प्रकाशेन्द्र होते. मोरोपंतांना जसा बारामतीकर नाईकांचा आश्रय होता, तसाच यांना वरील दोन राजांचा होता. साहित्य, तत्त्वज्ञान इत्यादि शास्त्रांत पारंगत ह्मणून त्याकाळीं सुप्रसिद्ध असलेले अभिनवगुप्तपादाचार्य हे यांचे गुरु होते. पंतांप्रमाणेंच न्याय व व्याकरण या शास्त्रांशीं यांचा परिचय कामापुरताच असून साहित्यशास्त्रांत मात्र हे अत्यंत निष्णात होते. हे पंतांप्रमाणेंच जबरे वाचक व लेखक होते. रामायणभारत हीं ऐतिह्यें, पुराणें व त्यांशिवाय इतर बहुतेक उपलब्ध संस्कृत ललितवाङ्मय यांनीं वाचलें होतें. तसेंच पंतांप्रमाणेंच आपल्या अंगीं असलेल्या कवित्वशक्तीचा यांनीं दिव्य व पौरुष या उभयविध यत्नांनीं पूर्ण विकास करून घेतला होता. त्यांच्याप्रमाणेंच रामायणभारतांचें यांचें अध्ययन फार सूक्ष्मरीतीनें केलेलें होतें. व्यासावर व व्यासकृत महाभारतादि ग्रंथांवर तर यांचें मोठें प्रेम असून ते आपल्याला 'व्यासदास' ह्मणवीत असत. यांनीं पुष्कळ ग्रंथरचना केली होती. पण आज त्यांपैकीं सुमारें बत्तीस ग्रंथ उपलब्ध झाले असून त्यांपैकीं कांहीं काव्यमाला, ओरिएंटल संस्कृत सीरीज ( संस्कृत प्राच्यग्रंथमालिका ), इत्यादि स्थळीं छापिले आहेत. साहित्यशास्त्रावर यांचे सुवृत्ततिलक, औचित्यविचारचर्चा, कविकण्ठाभरण इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. रामायण, भारत, कथासरित्सागर इत्यादि प्रचंड ग्रंथांचा रमणीय व सुरस संक्षेप करण्याची यांची हातोटी पंताप्रमाणेंच विलक्षण होती. यांचे 'भारतमंजरी' 'रामायणमंजरी' हे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. पंतांप्रमाणेंच यांच्या ग्रंथांत धर्मनीतीचा जागोजागीं उपदेश केलेला आहे. 'कलाविलास,' 'समयमातृका,' 'दर्पदर्पण,' 'चतुर्वर्गसंग्रह,' 'चारुचर्या' इत्यादि यांचे पुष्कळ ग्रंथ मुख्यत्वें उपदेशात्मकच आहेत. 'गुमानी'कविप्रमाणें यांनींही आपल्या 'चारुचर्या' या ग्रंथांत पुराणेतिहासांतील प्रसिद्ध कथांतून सारांशरूपानें निघणारा बोध मोठ्या मार्मिकतेनें दिला आहे. पंतांच्या काव्यांतील सुभाषितसंग्रहही तसाच फार मोठा आहे. त्याची थोडीशी कल्पना परिशिष्ट 'ज' मध्यें दिलेल्या उदाहरणांवरून

होईल. भगवान् गौतम बुद्धांच्या पूर्वजन्मचरित्रकथा क्षेमेंद्रांनीं 'बोधिसत्वावदान-कल्पलता' या आपल्या बृहत्काव्यांत मोठ्या रमणीयतेनें वर्णिल्या आहेत. त्यांतील 'मणिचूडावदानकथा'रूपी तृतीय पल्लव तर आमच्या विश्वविद्यालयीन विद्यार्थि-मित्रांच्या चांगल्या परिचयाचा आहे. मोरोपंतांनीं ज्याप्रमाणें आपल्या वृद्धावस्थेंत केकावल्यादि करुणास्तोत्रे रचिलीं, त्याप्रमाणेंच ह्यांनींहि आपल्या आयुष्याच्या उत्तर-भागांत संसारतापामुळें विरक्त होऊन पुण्यारण्यांत एकांतवासांत जाऊन तेथें हरिभक्ति करित असतांना 'दशावतारचरित' नामक विष्णुस्तुतिपर काव्य रचिलें. याविषयीं क्षेमेंद्र व मोरोपंत या दोघां कवींचीं एक दोन वचनें येथें देतोंः–

(क्षेमेन्द्रोक्ति)'सज्जनस्थितिखिन्नस्य पुण्यारण्यविहारिणः ।
हरिभक्तिरसासिक्ताः श्रूयन्तां मम सूक्तयः ॥ ( दशावतारचरित ६३ )'

पंत ह्मणतातः–

'सद्व्यसनीं वेंचावें आयुष्य नसेचि भरंवसा याचा; ।
झालों जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत (=भक्तिरसज्ञांत )भर वसायाचा. ॥
( रामरीति ६७ )'

'मन हेंचि फार इच्छी कीं आतां सेवणें तुझे पाय; ।
तुजवांचुनि इतरांच्या भजनीं मजलागिं होय फळ काय? ॥
( आर्याकेकावलि ६३ )'

क्षेमेन्द्राची कविता शुद्ध, अस्खलित व सुश्राव्य असून त्यांत काव्यसौंदर्य व कल्पनाचातुर्य स्थळोस्थळीं दिसून येतें. त्यांची भाषा आलंकारिक, प्रसंगविशेषीं जोरदार, अनुप्रासयोजनेनें कर्णमनोहर व वाचकांचें मन वर्ण्यविषयाकडे वेधून टाकणारी आहे. पंतांच्या भाषेविषयीं जास्त सांगणें नकोच. त्यांच्या भाषेस लांबसमास, व लांबयमकें यांच्या योजनेनें जास्त प्रौढत्व व क्लिष्टत्व आलें आहे. क्षेमेन्द्राची भाषा फार सरळ व रसाळ आहे.

( इ ) **श्रीहर्ष व मोरोपंतः**–'वामन आणि मोरोपंत यांस अनुक्रमें महाराष्ट्र भाषेचे व्यास व श्रीहर्ष ह्मटल्यासहि साजेल. प्राकृत भाषेविषयीं नाक मुरडणारे शास्त्री व पंडित यांस त्यांनींच लाजविलें' ( दादोबा पांडुरंग–महाराष्ट्र भाषेचे व्याकरण, प्रस्तावना ). मोरोपंतांनीं 'संस्कृतशब्दांची भरपुर योजना, समासांची रचना आणि यमक व प्रास यांचा थाटमाट हें सर्व आपल्या कवितेंत आणून तीस संस्कृत कवितेचें साम्य आणिलें. ही स्फूर्ति त्यास पंचकाव्यावरून व विशेषतः नैषधावरून, तसेंच लक्ष्मीसहस्र, वासवदत्ता, कादंबरी वगैरे ग्रंथांवरून झाली असावी असें कित्येक लोक समजतात. हें पंतांचें श्रीहर्षाशीं साम्य सर्वस्वीं खरें नाहीं. "तें इत-क्यापुरतें मात्र खरें धरतां येईल, कीं संस्कृत भाषेचें अत्यंत उज्ज्वल स्वरूप जसें

'नैषधांत' दृष्टीस पडतें तसें मराठीचें मोरोपंतांच्या काव्यांत आढळतें. 'नैषधां'त जशी अनुप्रासांची गर्दी आढळते व रचनेची कृत्रिमता नजरेस येते, त्याप्रमाणेंच आमच्या महाराष्ट्र कवीच्या कवितेंतहि अनुप्रास व यमकें हीं दोन्ही भरपूर असून पदरचनाही प्रायः केवळ सुगम नसते. पण एवढ्याखेरीज बाकी कोणत्याहि प्रकारचें सादृश्य वरील दोघां कवींत किंवा त्यांच्या कवितेंत बहुधा आढळणार नाहीं. (निबंधमाला)." श्रीहर्षाच्या काव्यांतील पदलालित्य व कमालीची श्लेषयोजना पंतांच्या काव्यांत आढळत नाहीं. संस्कृतांत श्रीहर्षानें जशी भाषा कमावण्यांत मेहनत घेतली, तशीच मेहनत पंतांनीं आपल्या काव्यांतून मराठी भाषा कमावितांना केलेली आहे. त्यांनीं आपल्या कवितेंत संस्कृतप्राकृतांतील निवडक, समर्पक व सुंदर शब्दांची योजना करून उत्कृष्ट, सरस व सालंकार अर्थ अभिव्यक्त व्हावा म्हणून फार खबरदारी घेतलेली आढळते.

**( ई ) श्रीएकनाथ व मोरोपंत.**

( अभंग ) 'शरण शरण एकनाथा । चरणीं माथा ठेविला ॥ १ ॥
नका पाहूं गुणदोष । जालों दास पायांचा ॥ २ ॥
आतां मज उपेक्षितां । नाहीं सत्ता आपुली ॥ ३ ॥
**तुका** म्हणे भागवत । केलें श्रुत सर्वांसी ॥ ४ ॥'

( गीति ) "नमिला शमिलास्यप्रद, शांतिजलधि, एकनाथ तो भावें. ।
शोभावें ज्याचें यश विश्वीं ज्या देववृंद लोभावें. ॥ १ ॥
( मोरोपंतकृत सन्मणिमाला ८ )"

"अत्यद्भुत यश हरिचें जेंवि, तसें एकनाथपंतांचें. ।
तें तें साचें, जें जें वर्णितसें चरित वृंद संतांचें. ॥ २ ॥
विश्वेश्वर अविमुक्तीं, विठ्ठल पंढरपुरीं, प्रतिष्ठानीं ।
प्रभु एकनाथ, वरिला सर्वे महितदैवतप्रतिष्ठांनीं. ॥ ३ ॥
भक्तासि नाथ, जैसा विश्वाचा मायबाप हर पावे; ।
साक्षात् भगवान् हा कीं या भजतां सर्व ताप हरपावे. ॥ ४ ॥
( मोरोपंतकृत एकनाथस्तव ४,१०,१३ )"

नाथांचा काळ शके १४७०–१५२१ हा होता. यांनीं भावार्थरामायण, व भागवताच्या एकादशस्कंधावर टीका हे दोन मोठे ग्रंथ व रुक्मिणीस्वयंवर, चतुःश्लोकी भागवतावर टीका, स्वात्मसुख, आनंदलहरी, हस्तामलक व स्फुट अभंग, पदें वगैरे लहान ग्रंथ रचिले. त्यांत रुक्मिणीस्वयंवर व भावार्थरामायण हे दोन ग्रंथ चरित्रविषयक असून स्फुटाखेरीज बाकीचे ग्रंथ अध्यात्मविषयक आहेत. यांनीं आपले लहान मोठे सर्व ग्रंथ त्याकाळीं विशेष प्रचलित असलेल्या ओवी छंदांत लिहिले

आहेत. ज्ञानेश्वरींतील अपाठ काढून टाकून ती यांनींच शुद्ध केली. यांच्या कवितेंतील भाषा सुबोध व साधी पण जोरदार असून, स्वतंत्र कवि व भाषांतरकार या दोन्ही दृष्टींनीं यांची योग्यता फार मोठी आहे. सत्कवींत अवश्य असणारी कल्पनाशक्ति यांच्या ठिकाणीं भरपूर होती. तसेंच संस्कृतांतील अर्थ महाराष्ट्रभाषेंत हुबेहुब उतरविण्याची करामत यांना उत्कृष्ट साधली होती. भागवतासारख्या संस्कृत कठिण अध्यात्म ग्रंथांतील आशय महाराष्ट्रभाषेंत आणण्याचें अवघड कार्य यांनीं फारच उत्तम रीतीनें केलेलें आहे. भागवतावर संस्कृतांतही पुष्कळ टीका झाल्या आहेत. परंतु एकादशस्कंधावरील नाथांची टीका व दशमस्कंधावरील कृष्णदयार्णवाची 'हरिवरदा' टीका या दोन टीकांसारख्या विस्तृत व व्यासाचें हृद्गत उत्कृष्ट रीतीनें प्रकट करणाऱ्या टीका संस्कृतांतही आढळत नाहींत. चरित्रविषयक वर्णनांत व खेळ, भारुड यांतून रूपकांची योजना करून अध्यात्माचा बोध व नीत्युपदेश करण्याची यांची हातोटी उत्कृष्ट आहे. यांच्या काव्यांत कृत्रिम रचना नाहीं. भाषा साधी, सुबोध व गोड असून शब्द मार्मिक आहेत. शृंगार, वीर, व करुण हे रस यांच्या काव्यांत मुख्यत्वें उत्तम साधले असून हास्य, भयानक, रौद्र इत्यादि दुसरे रसही प्रसंगविशेषीं चांगले साधलेले आढळतात. यांच्या काव्यांतून वर्णनाच्या भरांत क्वचित् ग्राम्य शब्दांचा प्रयोग व ग्राम्य वर्णनही आढळतें. भारूड, खेळ वगैरे यांची स्फुट कविता पाहिली ह्मणजे तात्कालिक स्फूर्तीनें अध्यात्मासारख्या गहन विषयावर शीघ्र कवित्व रचण्याचें यांचें विलक्षण कौशल्य पाहून फार आश्चर्य वाटतें! यांच्या काव्यांत प्रसाद व माधुर्य हे गुण उत्तम दृष्टीस पडतात. पारमार्थिकजनांस यांच्या 'परमहंससंहिता' ह्मणून सुप्रसिद्ध असलेल्या भागवतग्रंथांतील एकादश स्कंधावरील टीका व चतुश्लोकी टीका जशा आदर्शभूत झालेल्या आहेत, तद्वत् प्रपंच साधून परमार्थाचा लाभ घेऊं इच्छिणाऱ्या स्त्रीपुरुषांकरितां याचे रुक्मिणीस्वयंवर व भावार्थरामायण हे दोन ग्रंथ आदर्शभूत आहेत. या चरित्रग्रंथांतील निरनिराळ्या प्रसंगांचीं यांनीं केलेलीं वर्णनें वाचून हर्ष, शोक, करुणा, प्रसन्नता, आनंद, आश्चर्य, गांभीर्य, त्वेष इत्यादि मनोवृत्तींचे ठसे अंतःकरणावर तंतोतंत उमटतात. रामचरित्रांत राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, दशरथ, मारुति, सुग्रीव, रावण, बिभीषण इत्यादि पुरुषपात्रें व सीता, कौसल्या, सुमित्रा, कैकेयी, तारा, मंदोदरी, सुलोचना इत्यादि स्त्रीपात्रे यांचीं स्वभावचित्रें नाथांनीं उत्कृष्ट रंगविलीं असून त्या त्या स्वभावांचा योग्य परिपोषही त्यांनीं फार चांगल्या रीतीनें केलेला आहे. मोरोपंतांनींही रामायणभारतांतील पात्रांचे स्वभाव चांगले रेखाटलेले आहेत. पण या कामांत नाथांची कडी आहे. मूळांतील वर्णनांत बऱ्याच ठिकाणीं फरक करून नाथांनीं नायकनायिकांच्या थोरपणास जास्त शोभेल असें वर्णन केलेलें आहे. रुक्मिणीस्वयंवरांत कृष्णरुक्मिणींचें

व भावार्थरामायणांत सीतारामांचें परस्परांवरील प्रेम, तसेंच विरहव्यथा झाली असतां पाषाणहृदयांचाही भेद करून पाणी करणारे त्यांचे करुण उद्गार, त्यांचे नीतियुक्त पवित्र आचरण वगैरे शेकडों गोष्टींच्या वाचनानें वाचकांचीं मनें बोध-प्रकाशमय होऊन सात्विक आनंदानें भरून जातात. सीतारामांचा किंवा कृष्ण-रुक्मिणींचा विवाह ह्मणजे जीवशिवांचें लग्न व त्यांचें पुढील चरित्र ह्मणजे शिवाशीं संलग्न झाल्यावरही उभयतांस स्वानंदसाम्राज्याचा अभिषेक होईपर्यंत जीवाच्या पुढील मार्गक्रमणाचा हर्षशोकयुक्त इतिहास होय. हा आध्यात्मिक इतिहास नाथांनीं फार मनोरंजक रीतीनें वर्णिला आहे. पंतांच्या भूमिकेपेक्षां नाथांची भूमिका जशी फार उच्च दर्जाची होती, तसेंच त्यांचें कवित्वही उच्च दर्जाचेंच आहे. पंतांप्रमाणें शब्दालंकार व अर्थालंकार योजून काव्य रसभरित करण्याचा नाथांनीं मुद्दाम प्रयत्न केलेला नाहीं तरी त्यांच्या काव्यांतील रूपकबाहुल्य व मधून मधून आढळणारे स्वभावोक्ति, उत्प्रेक्षा, उपमादि अर्थालंकार व वृत्त्यनुप्रासादि शब्दालंकार यांच्या योगानें त्यांचें आधींच श्रोत्यांस तल्लीन करणारें काव्य फार रसाळ झालें आहे. गुरुगृहीं असतांना पावआण्याच्या चुकीनें वैराग्य झाल्याची गोष्ट उभयतांच्या चरित्रांत आढळते. नाथ व मोरोपंत यांना संस्कृतभाषेचें उत्तम ज्ञान असून महाराष्ट्रभाषेचा अभिमान धरून उभयतांनीं लोकोपकारार्थ आपली कविता त्या काळीं पंडितांस अत्यंत अप्रिय असून त्यांनीं तिरस्कार केलेल्या मराठी भाषेंत रचिली. श्रीएकनाथज्ञानेश्वरादि संतकवींनीं मराठीचा पुरस्कार केल्यामुळेंच पंतांनाही निंदकांस न भितां संस्कृत सोडून मराठींत ग्रंथरचना करण्याचें धैर्य आलें असावें. श्रीनाथांच्या चरित्राचा व काव्याचा पंतांवर फार मोठा परिणाम झाला असला पाहिजे. उत्तम रीतीनें प्रपंचपरमार्थाची सांगड, अलौकिक गुरुभक्ति, शांति, समदृष्टि, दया, क्षमा, निरपेक्षत्व, निरहंकारता, भगवद्भक्ति इत्यादि गुणगणांचा समुच्चय यांची पराकाष्ठा नाथचरित्रांत दृष्टीस पडत असल्यामुळें त्याचा कायमचा ठसा तुकाराममोरोपंतादि भावी संतांवर अतिशय झाला यांत नवल तें काय? पंतांनींही नाथांच्या योग्यतेचें व सद्गुणांचे फार रसभरीत वर्णन केलेलें आहे. नाथस्तवनाच्या कांहीं गीति शिरोलेखांत दिलेल्या आहेत. त्याशिवाय पुढील चार गीति पहा.

( गीति ) "भूतदया संसारीं एकोपंतांस निरुपमा घडली; ।
जडली आंगासीच क्षांति सदा; शांति तों गळां पडली. ॥ १ ॥
भूताराधनयज्ञीं समदर्शी एक परम हा रमला. ।
द्रवुनि ह्मणे, 'पित्रन्नें भोज्य जगन्निंद्य पर महार मला.' ॥ २ ॥
एकोपंत जनार्दनपंताचें भजनही असीम करी; ।
याची मति गुरुचरणीं, भक्ष्यीं घालि न मिठी असी मकरी ॥ ३ ॥

ग्रंथ श्रीभागवत, श्रीरामायण करी सुविस्तर; ते ।
जरि न रचिता दयानिधि, केवळ जड जीव तरि कसे तरते ? ॥ ४ ॥
( एकनाथस्तव २,५,६,९ )"

विठोबा अण्णा सुश्लोकलाघवांत ह्मणतात:-

( श्लोक ) "युक्तायुक्ततया किमप्यगणयन् जागर्त्यहो सर्वथा
सत्संकल्पसमर्थनाय भगवान् विन्यस्तपर्यस्तिकः ।
यन्नाथस्य जनार्दनो घनरसं यच्छत्विति ध्यातवान्
दत्तस्तावदिहोदवीवधमपि स्कंधे दधार स्वयम् ॥ (सुश्लोकलाघव ३९६)"

( भावार्थ ) भगवान् युक्तायुक्ततेचा सर्व विचार सोडून देऊन सज्जनांचा संकल्प पूर्ण करण्याकरितां सदा वीरासन घालून जागृत असतात. याचें उदाहरण एकनाथांचें. दत्तांनीं जनार्दन रूपानें एकनाथाला घनरस ( आत्मज्ञानरूपी रस, पक्षीं पुष्कळ उदक) देण्याचे वचन दिलें होतें तें पूर्ण करण्याकरितां प्रथमतः घनरस-आत्मज्ञानरूपी रस-देऊन नंतर घनरस-पुष्कळ उदक-देण्याकरितां खांद्यावर कावड वाहून त्यांच्या घरीं पुष्कळ पाणी वाहिलें.

## ( उ ) तुकाराम व मोरोपंतः-

( गीति ) " 'भक्तिरसचि मूर्त,' असा करिति बृहस्पतिशतक्रतु कयास, ।
कीं वाटे भगवद्यश सुरभीपय, अमृत तक्र, तुकयास. ॥ १ ॥
ज्याचे अभंग लागति खळहृदया, जेंवि बाण रामाचे; ।
ज्या परवाद न मोहिति, शर जैसे ईश्वरासि कामाचे. ॥ २ ॥
वाटे भगवत्कीर्तनरुचिनें याहून आन नारद न. ।
सद्वृंदा शोभविती ज्याचे गुण, जेंवि आनना रदन. ॥ ३ ॥
ज्याच्या सदभंगातें सेवी जन जेंवि बाल आम्यातें. ।
घनसा म्हणे, 'भरावें सुरसें, जें मुख करील आ, म्यां तें.' ॥ ४ ॥
( मोरोपंतकृत तुकारामस्तुति १०,१५,१७,१८ )."

तुकोबा हे मोठे भगवद्भक्त असल्यामुळें त्यांच्या काव्यांत कवित्वस्फूर्ति जास्त आहे. त्यांचे अभंग साधे, सरळ, पण मोठे जोरदार असून, हृदयाला पाझर फोडणारे आहेत. अभंगांतून नीत्युपदेश सणसणीत असून भगवद्भक्तीचा त्यांच्या काव्यांत मूर्तिमंत कळस उभारिला आहे. याशिवाय बाळक्रीडेवर किंवा रुक्मांगदादि चरित्रांवर त्यांचे थोडे अभंग असून बहुतेक अभंगांत त्यांच्या स्वतंत्र व प्रेमळ विचारांचाच भरणा आहे. यांच्या विषयीं रा. भिडे आपल्या तुकारामावरील निबंधांत ह्मणतात:-

"तुकारामबोवांच्या कृतीचें बाह्यांग ओबडधोबड आहे, यांत संशय नाहीं. परंतु याच खडबडीत कातडीच्या आंतील गाभा केवळ दिव्य व तेजस्वी आहे. गारेच्या पोटांत जसा हिरा असावा, त्याप्रमाणेंच वरून बेडौल दिसणाऱ्या तुकारामी रचनेंत विलक्षण सरसत्व व मनोहारित्व सांठविलेलें आहे. तुकारामाच्या कवितेचें सौंदर्य जिव्हाळयांत आहे, वरपांगी नाहीं. खडखडीत खडकांतून झऱ्याच्या रूपानें जशी रसोत्पत्ति व्हावी, किंवा निशांतीं काळयाकुट्ट भासणाऱ्या अस्तगिरीच्या पश्चाद्भागांतूनच जशी प्रभोत्पत्ति व्हावी, तशीच बाह्यतः अगदीं साध्या व क्वचित् प्रसंगीं गांवढळ भासणाऱ्या तुकारामोक्तींतून रस व प्रभा यांची उत्पत्ति होते. बोवांची वाणी फारच मार्मिक आहे. थोड्या व साध्या शब्दांत पुष्कळ व गंभीर अर्थ सांठविण्याची त्यांची हातोटी विलक्षणच आहे. यामुळें त्यांच्या अभंगाचे बरेचसे चरण ह्मणीवजाच झालेले सर्वतोमुखीं आढळतात. (बा. अ. भिडे–तुकाराम बोवा)".

मोरोपंतांची वाणी ओजस्वी, प्रौढ, जोरदार व बहुधा व्याकरणशुद्ध अशी आहे; मुक्तेश्वराची रसभरित, समयानुसार मृदु अथवा कठोर व ठसकेदार आहे; तीच वामनपंडितांची वाणी साधी, मृदु व तेजस्वी आहे. तुकारामबोवांच्या वाणीचें वर्णन काय करावें ?. ती अत्यंत जिव्हाळयाची, तशीच भेदक असून भक्तिरसाची केवळ मूर्ति आहे. मोरोपंत, मुक्तेश्वर व वामन हे पंडित होते. त्यामुळें त्यांच्या वाणीला गीर्वाण वाणीचे पुष्कळ संस्कार झालेले आहेत. या सर्वांत पंतांच्या सरस्वतीला तर व्याकरणसाहित्यालंकारादि शास्त्रांचे संस्कार झालेले त्याच्या कवितेंतून जागोजागीं आढळून येतात. तुकोबांची गोष्ट तशी नाहीं. 'विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥' असें ह्मणणाऱ्या त्यांच्या वाणीस पांडित्याचा गंधही नसून ती निसर्गातील स्वयंभूवस्तुप्रमाणें अकृत्रिम आहे. त्यांच्या काव्यरचनेविषयीं पूर्वोक्त मार्मिक टीकाकार ह्मणतातः–"साहित्यशास्त्रांचे नियम, अलंकार शास्त्रांतील व्याख्या, संस्कृत शब्दांचा सांठा, किंवा व्याकरणाची उत्तम ओळख, यांच्या जोरावर तुकारामबोवा काव्य प्रसवले नाहींत, तर तें त्यांच्या उत्कट मनोवृत्तींचें स्वाभाविक ठळक प्रतिबिंब आहे. कवितेच्या बाहेरील चट्टीपट्टीकडे त्यांचें लक्ष्य न फांकल्यामुळेंच, तें अंतर्मुख होऊन, त्यांचें काव्य त्यांच्या अंतर्वृत्तीची हुबेहुब तसबीरच आहे. अशा काव्याचें अनुकरण अंतःकरण तद्रूप झाल्याशिवाय कधींच साधावयाचें नाहीं. (बा. अ. भिडे. तुकाराम)" हरि व हरिभक्त यांचीं चरित्रें वर्णन करून व सगुण परमेश्वर व संत यांचीं स्तवनें करून चित्तशुद्धिद्वारा स्वोद्धार करून घेणें हा मोरोपंताच्या काव्यरचनेचा मुख्य उद्देश असून, आपल्या निःसीम भगवद्भक्तीनें स्वोद्धार करून घेतल्यावर भगवद्भक्तीचा गौरव, भागवतधर्मप्रसार, आत्मानुभवकथन, कळकळीचा व सणसणीत नीत्युपदेश इत्यादि लोकोपकारक गोष्टी ह्या तुकोबाच्या कवितारचनेच्या मूळाशीं आहेत. मोरोपंत उत्तम पंडित

होते. तुकोबाचें शिक्षण अगदींच सरासरीचें. पंतांनीं भाषा कमाविण्याचा फार प्रयत्न केला. तुकोबास ज्या वेळेस जशी स्फूर्ति झाली तशा प्रकारचे अभंग त्यांच्या मुखांतून निघाले. पंतांच्या कवित्वाचा झरा त्यांच्या डोक्यांतून निघाला; तुकोबाच्या कवित्व-सागराचा उगम त्यांच्या हृदयांतून झाला. पंतांची कविता पुण्याच्या नखरेदार पण भाविक कुलवधूप्रमाणें असून तुकोबाची कविता एखाद्या साध्याभोळ्या पंढरपुरच्य वारकरिणीप्रमाणें दिसते. एकीच्या कपाळावर रेखींव व कोरून लाविलेला कुंकुम-तिलक असून दुसरीनें कपाळभर मळवट भरलेला आहे. सारांश तुकोबाची कविता 'कृताभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता धवलवसना' अशी असून पंतांच्या कवितेचा थाटमाट व एकंदर वर्तणूक.

'लज्जा व्यालोलदृष्टीं, स्मित-रुचिर-मुखीं, भ्रूयुगीं नृत्य, नर्म ।
व्याहारीं, कोमलांगीं अभिनव मिरवे घर्मरोमांचवर्म. ॥'

अशी आहे. अर्थातच भाषेची शुद्धि, व्यवस्थित वाक्यरचना, सुरस नवरसवर्णनें हे प्रकार मोरोपंतांच्या काव्यांत जास्त दृष्टीस पडतात. ब्रह्मानंदी टाळी लागल्यावर देह संभाळणेंच ज्यांना जड वाटतें ते संतमुकुटमणि अशा बाह्य गोष्टीकडे कसचे लक्ष्य देतात. "मयूरकवीची अत्यलंकृत भाषा आणि थोडीबहुत कृत्रिम कविता, व तुकारामाची साधी वाणी आणि त्याचे स्वभावसिद्ध अभंग, यांची तुलना केली ह्मणजे तुकोबांची भाषासरणी विशेष प्राचारिक आणि व्यावहारिक होती, असें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. आतां जशी तुकोबांची कवित मराठी होती, तशी मोरोपंतांची देखील मराठीच खरी. परंतु तुकारामाच्या अभंगांत मराठी भाषेला सजविण्याचा तिळभर देखील प्रयत्न नसून, तीच अनंत शब्दरत्नांनीं अलंकृत करून नांवारूपास आणण्यासाठीं, मयूर कवीनें तींत भाषागांभीर्याची जणूं काय मूसच ओतली; अर्थ गौरवाचें जणूं काय त्यानें कोंदणच केलें; आणि पदलालित्याची तींत अगदीं गर्दी करून देऊन, महाराष्ट्रभाषारूपी आयसास त्यानें आपल्या प्रासादिक वाणीचा जणूं काय परीसच लाविला, व तिला मोठ्या उच्च पदवीप्रत चढविलें. ( नाना पावगीकृत भारतीय साम्राज्य पुस्तक नववें पृ० १०४-१०५ )"

तुकोबाच्या कवित्वाविषयीं पुढील दोन इंग्रजी उतारे फार वाचनीय आहेतः-

( १ ) तुकोबाची कविता प्रसिद्ध करणारे मुंबई शिक्षणखात्याचे रसिक विद्वान् मुख्याधिकारी सर् अॅलेक्झांडर ग्रॅंट साहेब तुकोबाच्या कवितेविषयीं ह्मणतातः-

"If intense personal religion can be found anywhere it can be found in Tukaram. It is impossible to avoid comparing his songs with the psalms of David. They are the natural expression of a mind holding constant communion with God, poured out like the notes of a bird, in all the occasions and various modes of life. ( Sir Alexander Grant )".

( २ ) तुकोबाच्या कवित्वगुणासंबंधानें ख्रिस्तलोकवासी महाराष्ट्र कवि रेव्हरेंड नारायण वामन टिळक यांचा अभिप्रायः–

"Tukaram is still the most popular poet of the day in the 20th century. This shows how Tukaram's literary characteristics appealed to the people of Maharashtra and still appeal. Tukaram is still unequalled among all the Marathi poets, The flow and force of Tukaram's music is simply wonderful, his diction is easy, his illustrations are homely and exact, he had glimpses of the past, but he mainly dealt with the present and the .future. He was an investigator and a painter of human nature and he did his work so well that none among the Marathi poets merits comparision with him. (The late Revd. N. V. Tilak–Life and Teachings of Tukaram by Revd. J. Edwards P. 133)"

पंतांनींहि सन्मणिमालेंत ( गी० ४७ ) व तुकारामस्तुतींत ( गी० १–३१ ) तुकोबाचें अत्यंत पूज्यतेनें सुरस वर्णन केलें आहे. पुढील गीति पहाः–

( गीति ) "विष्णुयशाचें, घाली, द्याया अमृता त्रपा, दुकान तुका; ।
जरि याशि न देवाशीं, श्रीरामाशीहि पादुका न तुका. ॥ १ ॥
जो कुलजहि अभिमानी, ज्याचा प्रद्वेष या तुकारामीं, ।
ह्मणतों, 'तद्वियेतें सीता, तन्मतिस यातुकारा' मी. ॥ २ ॥
भगवद्भक्ति कराया बहु जड जीवांसि जो तुका शिकवी; ।
त्याच्या दुसरा धरणीवरि येइल कोण हो तुकासि कवी ? ॥ ३ ॥"

( मोरोपंतकृत तुकारामस्तुति १,२९,३० )"

( पद ) "धन्य धन्य, तुका वाणी. ॥ ध्रु० ॥
अमृतरसाची क्षितिवर साची । सिंधुचि ज्याची वाणी ॥ १ ॥
डोलवितोचि जडा अजडाही । प्रभुच्या वेणूवाणी. ॥ २ ॥
**मोरास** घनीं, श्रोत्या ज्याचे । अभंगिं नाहीं वाणी ॥ ३ ॥ (मोरोपंत)"

एकंदरींत श्रीतुकाराम महाराजांची योग्यता श्रीतुकाराममहाराजांनाच.

विठोबा अण्णा सुश्लोकलाघवांत ह्मणतातः–

( श्लोक ) "अभंग–कीर्तिग्रामेण तुकारामेण साधुना ।
अजो दशरथो नित्यं परमानन्दसंभृतः ॥ (सुश्लोकलाघव ४०३)"

(भावार्थ) संत तुकारामाच्या अभंगवृत्ताच्या कीर्तिसमूहाचें श्रवण करून वास्तविक अजन्मा असून दहा अवतार घेणाऱ्या परमात्म्याला निरंतर परमानंद होतो. ( दुसरा अर्थ ) ज्याची अखंडकीर्ति सर्वत्र पसरली आहे अशा रामरूपी सदपत्यामुळें

अज ह्मणजे रामाचा आजा व बाप दशरथ ह्या दोघांनाही निरंतर (स्वर्गांत) परमानन्द प्राप्त होतो.

**(ऊ) रामदास व मोरोपंतः**–श्रीसमर्थाविषयीं मोरोपंत 'रामदासगुणवर्णनां'त ह्मणतातः–

(गीति) "कामजयें रघुवीरप्रेमें हनुमदवतार हा सत्य; ।
भवरोग हरुनि येणें लाजविले देववैद्य नासत्य. ॥ १ ॥
शिवराजास ज्ञानद जो, जैसा याज्ञवल्क्य जनकास, ।
तरले भवार्णवीं बहु दृढतर ज्याची धरूनि जन कास. ॥ २ ॥
स्वर्वल्लिसुरभिसुरसरिदधिका श्रितसर्वकामदा साची ।
श्रीरामाची जैशी, तैशीच सुकीर्ति रामदासाची ॥ ३ ॥"

(गी० २,९,१०)

श्रीरामदासांची सर्व कविता ओंवी, श्लोक व अभंग ह्या छंदांत रचिली आहे. त्यांचीं बरींच पदें, भूपाळ्या व आरत्याही आहेत. त्यांच्या ग्रंथांतून व्यवहारज्ञान व अध्यात्मविद्या यांचे उत्तम विवेचन असून त्यांत त्यांचा हातखंडा होता. पंतांच्या काव्यांत वरील प्रकार इतका दृष्टीस पडत नाहीं. आर्यावृत्त जसें पंतांचें तसें भुजंगप्रयातवृत्त श्रीसमर्थांचें आवडतें दिसतें. तें मुसलमानी 'करीमा'वृत्तासारखे आहे. त्यांचें काव्य सोपें व रसाळ असून त्यांत अनुप्रास पुष्कळ ठिकाणीं साधले आहेत. व्याकरणशुद्धतेकडे त्यांनीं फारसें लक्ष्य दिलें नसून त्यासंबंधीं

'ताल जाती एकीकडे । माझें गाणें भलतीकडे ॥
शेंडा मूळ तें न कळे । माझें गाणेंचि मोकळें ॥ (आळसपंचक)'

अशा प्रकारची त्यांची कविता आहे. भाषा साधी पण जोरदार व अधिकारयुक्त अशी असते. त्यांच्या काव्यांत व्यवहारज्ञान, भक्ति, नीति व तत्त्वज्ञान ह्यांचा सर्वत्र उपदेश केलेला आढळतो. त्यांच्या काव्यांत कोमलता, माधुर्य या गुणांपेक्षां सृष्टीचा व सत्याचा अत्यंत कठोरपणा आढळतो. शृंगारवीरकरुणादि रस विद्वत्तेच्या व कल्पनाशक्तीच्या जोरावर एखाद्या ग्रंथकारास आपल्या ग्रंथांतून आणतां येतील. परंतु दासबोधांतील भाषेत जो जोरदारपणा, तेजस्विता, निस्पृहता व बाणेदारपणा सर्वत्र भरलेला आढळतो तो कधींही उसना आणता यावयाचा नाहीं. समर्थाचा मुख्य हेतु प्रसंगीं न्यायनिष्ठुर बोलून लोकांच्या चुका व दुर्गुण स्पष्टपणें त्यांच्या पुढें मांडणें व त्यांच्या डोळ्यांत चरचरीत ज्ञानांजन घालून त्यांस जागृत करून त्यांना उद्योगी व राष्ट्रकार्यक्षम ईश्वरभक्त बनविणें हा असल्यामुळें त्यांच्या ग्रंथातून कोमलपणा, पदलालित्य, व नवरस हे अगदीं बेताचे आढळतात. परंतु अत्यंत परिणामकारक तेजस्विता व बाणेदारपणा हे गुण मात्र ठळकपणें दृष्टीस

पडतात. दासबोधादि समर्थांची कविता कविकल्पनासाम्राज्यांतील शृंगारिक काव्य नसल्यामुळें त्यांत मदनमंजरी सुंदरींच्या हस्तकंकणांतील रुणत्कार, पदांतील नूपुरांचा झणत्कार किंवा त्यांच्या क्षणक्षणविलक्षण अशा विलासक्रीडा ऐकावयास किंवा पाहावयास सांपडणार नाहींत. तर 'काळनिद्रा सोडून जागे व्हा, उठून बसा व उपासनेचा मोठा आश्रय मिळवून राष्ट्रप्रपंच करण्यास कंबर बांधा व स्वातंत्र्याचा भगवा झेंडा उभारून रामकथा ब्रह्मांड भेदून पलीकडे न्या व कृतकृत्य व्हा' या गंभीर घोषणेच्या दुंदुभिनादाची प्रचंड गर्जनाच कर्णपथावर येईल. आपल्यावेळीं रूढ असलेल्या कोणत्याही पंथाचे अनुयायी न होतां रामदासांनीं स्वतंत्रविचारांचा व राष्ट्रोन्नतीस साहाय्यक असा स्वतंत्र **रामदासी** पंथ स्थापिला. त्यांच्या काव्यांत अगदीं घरगुती भाषा वापरली असून त्यांत म्हणींचाही समावेश केलेला आहे. व्यवहारांत व परमार्थांत कसें वागावें या गोष्टींचा उत्तमोत्तम उपदेश त्यांच्या दासबोधांत केला आहे. प्रपंच आणि परमार्थ या दोन गोष्टींचा उत्कृष्ट मिलाफ त्यांच्या काव्यांत (विशेषतः दासबोधांत) केलेला आढळतो. त्यांच्या ग्रंथाच्या वाचनानें स्वाभिमान व परमार्थबुद्धि जागृत होऊन 'रुक्मांगद होता नर । आह्मी काय आहों खर ॥' अशा प्रकारची स्थिति होऊन कर्तव्यजागरूकता उत्पन्न होते. '**मराठा** तितुका मेळवावा । **महाराष्ट्र धर्म** वाढवावा' हा त्यांनीं देशभक्तांस केलेला उपदेश कालदेश वर्तमान पाहून वाटेल तितका व्यापक होण्याजोगा आहे. तो इतका कीं भविष्यकाळीं सर्व जगावर प्रेम करणारा तो **मराठा** व राष्ट्रसंघांतील सर्व राष्ट्रांस सामान्य असा धर्म तो **महाराष्ट्रधर्म** असेही अर्थ होऊं शकतील. 'राजकीय बाबतींत, स्वतंत्रेच्छा उत्पन्न करण्याच्या कामीं व स्वराज्याचा उपक्रम करण्याविषयीं' संतमंडळी बहुधा उदासीनच असतात. तसा प्रकार मुक्तेश्वर-रामदासांचा नव्हता. मुक्तेश्वराच्या काव्यांत स्वराज्यविषयक आकांक्षा दृष्टीस पडतात. परंतु 'राजकारणांत मन घालून लोकांना कळकळीचा उपदेश करून त्यांच्या अंतःकरणांत स्वराज्य व स्वातंत्र्याची स्पृहा उत्पन्न करणारे प्रसिद्ध कवि श्रीरामदास हे एकच होत. ते 'स्वतः अत्यंत विरक्त व निरिच्छ' होते; त्यांची सहनशीलता व निस्पृहता इतर श्रेष्ठ संतांच्या तोलाचीच होती; परंतु सबंध राष्ट्राचा ते जेव्हां जेव्हां विचार करीत, तेव्हां तेव्हां विरक्ति ही अखिल राष्ट्राला योग्य आहे असें त्यानीं कधींही मानलें नाहीं. उलट, 'चळवळ सुरु ठेवावी, ईश्वरावर भरंवसा ठेऊन व सत्पक्षाला धरून राजकारण करावें, संसार चांगला थाटावा पण ईश्वराला विसरूं नये, लोकांचे जमाव करावे, स्वराज्यसंरक्षण करावें, मनुष्य पूर्णपणें पारखून त्यांना योग्य कामांत गुंतवावे' वगैरे प्रवृत्तिपर उपदेश समर्थांनीं पावलोपावलीं केलेला आहे. त्यांचीं अनेक 'पंचकें,' 'मनाचे श्लोक,' 'पंचीकरण' व 'अन्वयव्यतिरेक' इत्यादि ग्रंथ फार वाचनीय आहेत. कवित्व कसें असावें याविषयीं

श्रीसमर्थांनीं दासबोधांत उत्तम विवेचन केलें आहे. त्यांच्या रामायणांत भक्ति, करुण, अद्भुत व रौद्र रस प्रामुख्यानें दिसून येतात. वत्सल रसही रामायणांत कांहीं स्थळीं आढळतो. त्यांच्या करुणाष्टकांतून तर करुणरसाची वृष्टीच झालेली आहे. रामायणाशिवाय इतर काव्यांत भगवल्लीलावर्णन फारसें आढळत नसून व्यावहारिक व आध्यात्मिक विचारच ग्रथित केले असल्यामुळें श्रीसमर्थांच्या काव्यांत मोरोपंत, वामन, मुक्तेश्वर यांच्या काव्यांप्रमाणें रसभरित वर्णन फारसें आढळत नाहीं. तरी प्रसंगविशेषीं त्यांच्या दासबोधमनोबोधादि ग्रंथांतून उत्कृष्ट प्रतिभासंपन्नकवीला शोभण्यासारखीं स्थळेंही पुष्कळ आढळतात. 'तुकाराम, नामदेव, रामदास इत्यादि साधुकवींची वाणी, केवळ निस्पृहता व जनोपहासाविषयीं निर्भयता या योगानें अकृत्रिम झाली आहे. मोरोपंत, मुक्तेश्वर, वामन, रघुनाथपंडित यांचें तसें नाहीं. यांच्या काव्यांत ठाकठिकी व बातबेत साधलेला आहे. यामुळें त्यांच्या कवितेचें कृत्रिमरूप आपोआप व्यक्त होतें'. वाचकांस 'हरिकथानिरूपणा'ची अर्थात् भक्तियुक्त ज्ञानमार्गाची गोडी तर अत्यंत लागावी व त्यांची संसारयात्राही करवेल तितकी सुखरूप करावी अशा द्विविध हेतूंनीं श्रीसमर्थांनीं काव्यरचना केलेली आहे. कांहीं ठिकाणीं राजकारणाचा त्यांच्या काव्यांत उल्लेख आहे. तरी इतर संतकवींप्रमाणें त्यांचा मुख्य रोख भक्ति, ज्ञान, वैराग्याकडे अर्थात् परमार्थाकडेच आहे. स्वकर्तव्याची ओळख, स्वाभिमान व प्रपंच साधून परमार्थलाभ करून देण्याची लोकशिक्षणाची अजब हातोटी त्यांच्या काव्यवाचनापासून प्राप्त होते. ह्मणून परमार्थयुक्त प्रपंच साधण्यास सध्यांच्या काळाला दासबोधासारख्या प्रपंचपरमार्थाची सांगड घालणाऱ्या तेजस्वी व स्वतंत्र विचारांच्या ग्रंथांचीं पारायणें होणेंच फार अगत्याचें आहे. फार काय सांगावें ? श्रीसमर्थांचा **दासबोध** हा ज्ञानयुक्त भक्तीचा झरा, देशसेवायुक्त देवभक्तीची मूर्तिमंत देवता व महाराष्ट्रवाङ्मयांतील अमूल्य कोहिनूर हिरा होय. मोरोपंतांच्या काव्यरचनेचाही उद्देश व्यावहारिक नसून पारमार्थिकच आहे. भारतीय साम्राज्यकार नाना पावगी ह्मणतातः—

"मुकुंदराज, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, चांगदेव, नामदेव, जनाबाई, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, महिपति, तुकाराम, इत्यादि संतांनीं महाराष्ट्र देशांतील भूमीवर भक्ति, श्रद्धा, दृढनिश्चय, शुद्धभाव, पवित्रता व अनन्यशरणता यांचें यथेष्ट बीजारोपण केल्यावर त्याजवरच रामदासांनीं नीति, धैर्य, इतिकर्तव्यता आणि स्वदेशाभिमान यांचें भरपूर सिंचन केलें. त्यामुळें लोकांच्या अंगचें प्रथमचें दौर्बल्य जाऊन, त्यांच्या अंगीं नैसर्गिक सामर्थ्य आलें, त्यांचें असह्य तेज बाहेर पडून तें प्रकाशमान झालें, 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं' अशी त्यांची शक्ति वाढून ते अचाट कृत्यें करूं लागले. दासबोधांत रामदासांचा देशाभिमान ठायीं ठायीं व्यक्त होतो. अर्थात्, आमच्या राष्ट्राचें मन तयार करण्यास, तें ताळ्यावर आणण्यास, त्याला पारतंत्र्याचा

तिटकारा स्वयमेव येऊन, श्रृंखलाबंधन दुःसह होण्यास व स्वातंत्र्याचा खरा आनंद वाटण्यास केवळ तेच कारणीभूत झाले, यांत लेशमात्रही संशय नाहीं. ...त्यांचीं (कर्तव्यजागृति करून देणारीं) वचनामृतें प्रत्यक्ष मेलेल्यांस देखील जिवंत करणारीं आहेत. मग, शिवाजी महाराजासारखा कुशल नेता, भारतांसारखे गुणज्ञ जानपद व महाराष्ट्रासारखी सुपवित्र भूमी, यांजवरच त्यांचें शब्दामृत पडल्यावर, ते सचेतन उठून, सर्व देश त्यांनीं इतस्ततः हालवून सोडिला, यांत नवल तें कोणतें? ...गोवर्धनाचार्यास अनुसरून आजपर्यंत झालेल्या (महाराष्ट्र) कविजनांपैकीं फक्त कवित्रयांचीच निवड करणें झाल्यास ज्ञानदेव, एकनाथ व रामदास यांजलाच पद्यमालेंत गुंफणें योग्य दिसतें.

(श्लोक)'**ज्ञानेश्वरें** रचुनि गीत यथार्थबोधी। ज्ञानेश्वरी प्रकटिली तरणी भवाब्धीं ॥
तैसाचि **नाथ** दुसरा कवि मन्मनाला। वाटे **समर्थ** तिसरा जगिं धन्य झाला. ॥'

श्रीरामदासांचीं (दासबोधादि ग्रंथांतील) अमृतवचनें व सदुपदेश प्रत्येक भारतानें आपल्या हृत्पटिकेवर, आपल्या घरावर, व आपल्या घराच्या प्रत्येक भितीवर, प्रत्येक दारावर, आणि जेथें जेथें म्हणून अवकाश मिळेल तेथें तेथें निरंतर स्मरणार्थ खचितच कोरून ठेवण्यासारखा आहे. आणि ह्याच कारणासाठीं, देशोन्नत्यर्थ अपूर्व प्रयत्न केल्याबद्दल, महाराष्ट्र वाङ्मयांत, रामदासांच्या कृतीस खचितच अत्युच्च स्थान दिलें पाहिजे, हें कोणी सुद्धां विसरतां कामा नये. समर्थांच्या ह्या अशा प्रकारच्या उदात्त कृतीनें व त्यांच्या त्या विलक्षण काव्यस्फूर्तीनें आणि लोकांच्या मनावर अमोघ संस्कार करणाऱ्या त्यांच्या वाङ्मयानें, त्यांची गणना उत्तम कवींतच करणें भाग पडतें. खरोखर स्वदेशाभिमान ही एक अपूर्व वस्तु

---

१ स्वदेशाभिमानाविषयी सर वॉल्टर स्कॉट कवीची पुढील कविता फार वाचनीय समजून पुढें देतों:-

"Breathes there the man, with soul so dead,
Who never to himself hath said,
This is my own my native land!
Whose heart hath ne'er within him burn'd,
As home his footsteps he hath turn'd,
From wandering on a foreign strand!
If such there breathe, go, mark him well;
For him no minstrel rapture swell;
High though his titles, proud his name,
Boundless his wealth as wish can claim:
Despite those titles, power, and pelf,
The wretch concentrated all in self,
Living shall forfeit fair renown,
And, doubly dying, shall go down
To the vile dust, from whence he sprung,
Unwept, unhonoured, and unsung.
(Scott's Lay of the Last Minstrel, Canto VI. I.)"

असून, ती बहुतकरून राष्ट्राच्या अभ्युदयकाळीं सर्व देशांतल्या कवींत सदैव वास करित असते. ( भारतीयसाम्राज्य, पुस्तक अकरावें भाग ८६ वा )." 'आनंदवन-भुवन' महाराष्ट्रांत आपल्या काव्यानें वर सांगितल्याप्रमाणें स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान जागृत करून लोकसेवा व रामसेवा करणाऱ्या अखिलमहाराष्ट्रगुरुवर्य श्रीसद्गुरुसमर्थांस शंकरकवीच्या शब्दांनीं आमचे शतशः प्रणाम असोत.

(श्लोक) "यदीयवक्त्रनिर्गलत्सुवर्णपट्टिकान्वितं मनःप्रबोधदासबोधनामकं तरीद्वयम् ।
भवांबुधिं तितीर्षुणा जनेन सेव्यतेऽजसा गुरो नमामि रामदास,पादपंकजं तव॥"

(ओवी) "श्रीरामउपासक निर्मळ । जो भजनसरोवरींचा मराळ ।
तो रामदास महाराज केवळ । भक्ति प्रबळ लावी जनां ॥
( श्रीधर रामविजय. १.१०० )"

( गीति ) "श्रीगुरुराया ! जाया आयासा पारतंत्र्यमरणाच्या, ।
स्मरणाच्या कासेला लागावें बा ! तुझ्याचि चरणाच्या. ॥ २ ॥"

( श्लोक ) "अकिंचनवरेण्योऽपि समर्थपदवीं गतः ।
दासोऽपि यः किल स्वामी स साधुः कोऽपि राजते ॥३॥ (सुश्लोक०३२२)"
"जो अग्रगण्य असतांहि अकिंचनांत ।
मोठी समर्थपदवी मिरवी जगांत ॥
स्वामी जयास ह्मणती असुनीहि दास ।
तो साधुवर्य नमिला गुरु **रामदास**. ॥ ४ ॥ ( लक्ष्मणशास्त्री लेले )."

### ( ऋ ) वामन व मोरोपंतः—

(ओवी) "जैसा चंडांशु सतेज व्योमीं । तैसाचि केवळ वामनस्वामी ।
ज्याची श्लोकरचना या भूमी-। मंडळावरी अपूर्व॥(श्रीधर रामविजय. १.९८)"

( गीति ) "नमिला साष्टांग श्रीपतिभक्तिरसज्ञ वामनस्वामी, ।
रसभवना तत्कवना मानीं या तेंवि वाम न स्वा मी. ॥१ ॥ (सन्मणि.१७)
सगुण, श्रीहरिभक्त, ख्यात, झाल्या जनांत हा शुकसा. ।
बहुजन्मसिद्ध; ऐसा साधेल सुपक्वयोग आशु कसा ? ॥ २ ॥
काम न वामनचित्तीं मोक्षाचा कृष्णभक्तिवांचून; ।
भगवद्भजनचि केलें अनुदिन; किमपि न तदन्य, वांचून. ॥ ३ ॥
श्रीहरिचीं, बहु रचिलीं, देती जीं हर्ष नित्य नव, चरितें, ।
भक्तिज्ञानरसभरित यत्कवन; जयांत एक न वच रिते. ॥ ४ ॥
केली श्रीगीतेची व्याख्या, बहु भक्ति जींत गाजविली; ।
लाजविली साधुसभा; भाषा, कविकवनशक्ति लाजविली. ॥ ५ ॥
रीति समश्लोकीची अतुला साधेल काय नव्यास ? ।
या सुयशें होइल कां रोमांचव्याप्तकाय न व्यास ? ॥६॥(वामनस्तुति२-६")

मोरोपंत जसे उत्तम पुराणिक होते, तसेच वामनपंडित हे मोठे षट्शास्त्रवेत्ते पंडित होते; पंडितांचा भर जसा केवळ अद्वैतप्रतिपादनाकडे आहे, तसा पंतांचा नाहीं. पंतांनींही एकादशस्कंधांत (मंत्रभागवत) अद्वैतप्रतिपादन केलें आहे. पण त्यांचा सगुणावतारकथावर्णनाकडे विशेष भर होता ह्मणून त्यांनीं देवाचीं स्तुति-स्तोत्रेंच फार केलीं आहेत. पंडितांनीं ओंवी व श्लोक या वृत्तांतच आपल्या काव्यांची रचना केली आहे. त्यांच्या 'यथार्थदीपिका' नामक प्रचंड टीकेंत सांख्य, बौद्ध वगैरे मतें खोडलीं असून अद्वैतप्रतिपादन उत्कृष्ट केलेलें आढळतें. ह्या टीकेवरून त्यांची जाडी विद्वत्ता व स्वमतप्रतिपादनाची विलक्षण शैली दृष्टीस पडतात. पंडितांची मुख्य प्रसिद्धि त्यांच्या मधुर श्लोकांवरून झाली आहे. त्यांच्या श्लोकांत प्रसाद व माधुर्य हे गुण उत्तम नजरेस येतात. ओजोगुण बहुधा त्यांच्या काव्यांत आढळत नाहीं. स्वभावोक्ति अलंकाराचा त्यांनीं आपल्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं बहारीनें उपयोग केलेला आढळतो. स्वभावोक्ति अलंकाराविषयीं हंस ह्मणतातः—'अलंकाराचें साम्य चित्राशीं करितां येईल. इच्छेस वाटेल त्याप्रमाणें मनोहरत्वाची कल्पना करून तदनुरूप काढिलेल्या चित्रापेक्षां ईश्वरनिर्मित मूर्तिविशे-षाप्रमाणें हुबेहुब काढिलेलें चित्र किती मनोहर व बहारीचें दिसतें! ही गोष्ट जुन्या चिताऱ्यांनीं काढिलेलीं चित्रें आणि फोटोग्राफांतील चित्रें ह्यांची तुलना करून पाहिली ह्मणजे ढळढळीत दिसूं लागतें. स्वभावोक्ति हा अलंकार फोटोग्राफांतील तसबीरी-प्रमाणें विविक्षित व्यापाराचें हुबेहुब चित्र होय'. शृंगारवर्णनांत वामनाचें पंतांपेक्षां तादात्म्य जास्त होत असल्यामुळें रासक्रीडा, रुक्मिणीविलास, भामाविलास इत्यादि शृंगारिक काव्यांत पंतांच्या प्रासंगिक शृंगारवर्णनापेक्षां पुष्कळपटीनें जास्त रसोत्पत्ति झाली आहे. भामाविलासांतील शृंगारवर्णन तर फार खुबीदार व मार्मिक उतरलें असून त्यांत माधुर्य, प्रसाद, अनुप्रास, यमकें, स्वभावोक्ति वगैरे गुणालंकार फार चांगले साधले आहेत. या काव्याशीं पंताच्या हरिवंशांतील (अध्याय २६) भामाविलास ('मोरोपंताचें चरित्र' पृ० ५९-६० पहा) ताडून पाहतां सरसत्वाचा बहुमान कोणाला द्यावा याची पंचाईत पडते, तरी शेवटीं कांटा थोडासा तरी पंतापेक्षां पंडितांकडेच झुकतो असें ह्मणणें भाग पडतें. भक्तिरस व वीररस यांच्या वर्णनांत जसे पंत तद्रूप होतात तद्वत् अद्वैतप्रतिपादन व शृंगाररसवर्णन या गोष्टींत पंडित तन्मय होऊन कमाल करितात. पंतांचा शांत पण तेजस्वी स्वभाव जसा त्यांच्या काव्यांत प्रतिबिंबित झाला आहे, तसाच वामनांचा शृंगारप्रिय व आनंदी स्वभाव त्यांच्या काव्यांत दृग्गोचर होतो. पंडितांच्या काव्यांत ध्वनिकाव्य मुळींच नाहीं, पण पंतांच्या काव्यांत ध्वनिकाव्य बरेंच दृष्टीस पडतें. यमकरचनेचा कित्ता पंतांनीं मुख्यत्वें आनंदतनय व वामनपंडित यांपासून उचललेला दिसतो, तरी या कामांत शिष्यानें गुरूवर ताण केली आहे. पंतांनीं सगुणचरित्रेंच विशेष वर्णन केलीं असल्यामुळें

त्यांच्या काव्यांत अद्वैती पंडितांच्या काव्यापेक्षां जास्त सरसत्व व गुरुत्व आलें आहे. पंतांची कविता फार शुद्ध असून त्यांत छंदोभंग, यतिभंग, ऱ्हस्वदीर्घाकडे दुर्लक्ष्य, अग्राह्य समास व चुकीचे संधि हे प्रकार फार कमी असतात. पण पंडितांच्या काव्यांत असंगति, यमकास्तव शब्दांची ओढाताण, ऱ्हस्वदीर्घाकडे दुर्लक्ष्य, छंदोभंगादि व्याकरणदोष, 'पैं,' 'म्हणि' इत्यादि पादपूरणार्थक अव्ययें इत्यादि दोषांची व्याप्ति बरीच मोठी आहे. पंतांच्या काव्यांत ज्याप्रमाणें वर्णनाची संगति, प्रौढ व झोंकदार भाषापद्धति, 'बव्हर्थ, जनमनोहर व स्वल्पाक्षर' असें वर्णन, गांभीर्य, अर्थालंकार व शब्दालंकार यांची गर्दी वगैरे प्रकार आढळतात तसे ते पंडितांच्या काव्यांत दृष्टीस पडत नाहींत. पंतांचें शृंगाररसवर्णन मर्यादशील असतें. पंडित शृंगाररसाच्या ओघांत वाहून कित्येकदां बीभत्सवर्णनरूपी कर्दमांत जातात. उदाहरणार्थ, त्यांचें 'राधाभुजंग' हें काव्य पहा. 'भक्तिरसवर्णन जरी पंतांना चांगलें साधलें आहे तरी पंडितांचें अंतःकरण भक्तिरसवर्णनांत कवितेशीं जसें सुलीनतेनें तद्रूप बनून गारीगार होतें तसा प्रकार पंतांचा फारसा होत नाहीं.' अद्वैतवर्णनांत पंडितांचा हातखंडा होता. मोरोपंतांनींही भागवताच्या एकादशस्कंधगीतींत अद्वैतवर्णन केलें आहे. परंतु तें एखाद्या नदीच्या प्रवाहासारखें अगदीं बेताबाताचें असून पंडितांनीं तर आपल्या लघुकाव्यांतून व यथार्थदीपिकेंतून अद्वैतवर्णनाचा समुद्र निर्माण केला आहे. अद्वैतवर्णनाच्या आवडींत पंडितांनीं 'रुक्मिणीविलासा' सारख्या शृंगारप्रधान काव्यांतही शृंगाररसाच्याविरुद्ध असणारें विषयविडंबन करून यथेच्छ आत्मज्ञानकथन केलें आहे. अद्वैतवादी पंडित हे बहुधा सगुणोपासनेच्या विरुद्ध असतात. तसा प्रकार वामनपंडितांचा नव्हता. पंताप्रमाणें तेही प्रेमळ सगुणोपासक असून त्यांनीं आपल्या काव्यांत ज्ञान व भक्ति यांची सांगड घालून भक्तीला स्वानंदसाम्राज्यसिंहासनावर अधिष्ठित केलेलें आढळतें.

(ओव्या) 'आणि भगवंता ! तुझें मत । कीं निर्गुणात्मक अद्वैत ।
कळोनि माझे चरणीं रत । भक्त सकळांत तो थोर. ॥

(यथार्थदीपिका १.७६)'

मोरोपंतांनीं आपल्या कृष्णविजयाच्या ६९ व्या अध्यायांत भागवत दशम स्कंधांतील ६९ अध्यायाच्या आधारानें 'षोडशसहस्र स्त्रियांच्या मंदिरांतील कृष्णाचा गृहस्थाश्रम पाहून नारद विस्मित होऊन भगवंताची स्तुति करूं लागला' हा कथाभाग वर्णिला आहे. तोच कथाभाग वामनपंडितांनीं आपल्या 'द्वारकाविजय' नामक स्फुट प्रकरणांत वर्णिला आहे. त्याचे पांच सर्ग आहेत. 'विवाहविजय' नामक प्रथमसर्गांत भागवत अ० ५२-५४, ५६, ५८-५९ यांच्या आधारानें प्रथम २१ श्लोकांत थोडक्यांत विवाहकथा सांगून नंतर श्लो० २२-५४ यांत विवाहविधीचें

सविस्तर वर्णन केलें आहे. पुढील 'हरिमंदिरविजय', 'नारदातिथ्यविजय', 'लीलाविनोदविजय' व 'मुक्तिप्रदविजय' ह्या चार सर्गांत भागवत अ० ६९ तील कथा विस्तारानें वर्णिली आहे. ह्याच्या आधारानें कै० हंसांनीं **मोरोपंत व वामनपंडित यांच्या काव्यगुणांची तुलना** केली आहे. हंस ह्मणतातः-

"भगवान् श्रीकृष्णानें भौमासुराचा वध करून सोळा सहस्रस्त्रिया द्वारकेस आणून वरिल्या. हा चमत्कार पाहाण्याकरितां नारदमुनि द्वारकेस आले, व त्यांनीं श्रीकृष्णाची अगाध माया अवलोकन केली. हा कथाभाग वामनपंडितानें 'द्वारकाविजय' नामक प्रकरणांत वर्णन केला असून तीच कथा मोरोपंतानें 'बृहद्दशमाच्या' (कृष्णविजयाच्या) ६९ व्या अध्यायांत वर्णिली आहे. हीं उभय कवींचीं वर्णनें श्लोकवृत्तांत आहेत. ह्या वर्णनाच्या संबंधानें पंडित व पंत यांची तुलना केली असतां पंडितांची कविता पंतांच्या कवितेपेक्षां सरस आहे असें दिसतें. आपला उपास्य देव भगवान् श्रीकृष्ण यानें एकसमयावच्छेदेंकरून सहस्रावधि रूपे धारण करून सोळा सहस्र स्त्रियांबरोबर विवाह केला, इत्यादि अद्भुत लीला मनांत आणून वामनानें त्या मोठ्या प्रेमोल्हासानें गाइल्या आहेत. वर्णनीय विषयाशीं ग्रंथकर्त्याचें तादात्म्य झालें असतां, वर्णनाचा पाक चांगला उतरतो, व तो वाचकांसही आनंदजनक होतो. त्याप्रमाणें वामनाच्या द्वारकाविजयांतील कवितांचा रसपरिपाक चांगला उतरला आहे. सोपे शब्द, सरळ अर्थ, लहान लहान पदें, मधुरवर्णरचना, या योगानें नेहमींप्रमाणें वामनाचें हें प्रकरणही माधुर्य आणि प्रसाद यांचें सदन झालें आहे. प्रास, यमकें, स्वभावोक्ति इत्यादि अलंकारही यांत चांगले साधले असून ग्रंथसंगतीही मनोहर आहे. हें वामनाचें वर्णन मोरोपंताच्या वर्णनाशीं लावून पाहिलें तर, मोरोपंतानें एका श्लोकांत जी गोष्ट सांगितली आहे तिचें वर्णन वामनानें एका सर्गांत छप्पन्न श्लोक करून केलें आहे. तेव्हां विस्तारानें वर्णन करण्याचा जो गुण वामनांत आहे तो मोरोपंतापेक्षां स्तुत्यर्ह आहे. दुसरें माधुर्य, प्रसाद हे गुण वामनांत मोरोपंतापेक्षां अधिक स्पष्ट असून, वामनाचें अंतःकरण जसें कवितेशीं सुलीनतेनें व भक्तीनें तादात्म्य पावलेलें दिसतें, तसें मोरोपंताच्या कवितेवरून त्याचें अंतःकरण त्यांच्या कवितेशीं एकीभाव झालेलें दिसत नाहीं. वामनाच्या ह्या कवितेवरून त्याची भक्ति सोज्वल व जागृत दिसते, ती खुबी पंतांच्या काव्यांत नाहीं असें आह्मांस वाटतें. क्वचित् च्युतसंस्कृति, असंगति हे दोष वामनाच्या वर्णनांत आहेत, त्या मानानें ते पंताच्या वर्णनांत नाहींत. तथापि ह्याच गोष्टीवरून कवीचा कवितेशीं झालेला तादात्म्यभाव चांगला व्यक्त होतो. प्रेमपुरःसर वर्णन करण्याच्या भरांत व झोंकांत वामनानें क्वचित् स्थळीं व्याकरणाकडे किंवा संगतीकडे दृष्टि दिली नाहीं, यामुळें तो दोषच गुणरूपानें त्यांच्या ह्या काव्यास शोभादेत आहे.…केवढाही विद्वान् असो, कसाही कुशल असो, मोठा कवि असो, वर्णनीय विषयाशीं मनानें ऐक्य पावून

मिळून जाणार नाहीं तर त्याचा ग्रंथ रसभरित होणार नाहीं. तसा प्रकार वरील वर्णनाच्या संबंधानें पंताच्या कवितेचा झाला आहे. आतां इतकें मात्र खरें कीं, पंताच्या कवितेची झोंकदार भाषा, मोठमोठालीं समासपदें, प्रौढवर्णनाची सुसंगति व एकसारखा प्रवाह, मनास आनंदानें पुष्ट करणारे शब्दालंकार व अर्थालंकार, थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ, सुशोभित इमारतीस कारागिरीनें जोडलेल्या सुंदर चिताऱ्याप्रमाणें केलेली शब्दरचना इत्यादि पंताच्या कवितेचे सर्वसाधारण गुण ह्याही प्रकरणांत तसेच चांगले उतरले आहेत. तथापि वर दाखविलेल्या कित्येक कारणांवरून व संस्कृत शब्दांचें मिश्रण फार झाल्यामुळें रुचिभिन्नत्वसंबंधानें पंताचें हें काव्य जितकें लोकमान्य होईल, त्यापेक्षां सुगम व मधुर ह्मणून वामनाचें वर्णन अधिक लोकप्रिय होईल यांत संशय नाहीं. (वामनावरील 'हंस' यांचा निबंध)."

वामनपंडितांनीं विराटपर्व रचिलें असून त्यांनीं सुदामचरित्रही वर्णिलें आहे. पंतांचें विराटपर्व सुप्रसिद्ध असून त्यांनीं सुदामचरित्रावर गीति, साकी व श्लोक अशा तीन वृत्तांत काव्यरचना केली आहे. याच्या संबंधानें उभय कवींत तुलना केली असतां पंडितांचें काव्य नीरस व पंतांचें काव्य अत्यंत सरस ह्मणून सर्वतोपरी श्रेष्ठ ठरतें. तुकाराम व मोरोपंत यांच्या काव्याशीं वामनाच्या कवितेची तुलना करून कृत्रिम अकृत्रिम कवितेविषयीं चर्चा केल्यावर वामनाची कविता कोणत्या सदरांत येते हें ठरवितांना हंस ह्मणतातः-"तुकोबाच्या अकृत्रिम वाणीची सर वामनाची कविता करणार नाहीं व मोरोपंताच्या उत्तम कारागिरीनें बनविलेल्या वाणीसही ती सर्वांशीं पोंचणार नाहीं, असें सूक्ष्मावलोकन केलें असतां दिसून येतें. या संबंधानें तीन वर्ग करितां येतीलः-(१) स्वयंभु पर्वतादि, (२) कांहीं ओबड-धोबड व भव्य असें कोरलेलें लेणें, व (३) उत्तम कारागिरानें बनविलेली मूर्ति किंवा इमारत. यांत साधारणपणें पहिल्या वर्गांत तुकारामासारख्यांची वाणी, दुसऱ्यांत वामनाची आणि तिसऱ्यांत मोरोपंताची कविता घालितां येईल. वामनानें कठिण वृत्तें घेतलीं, यमकांवर फार प्रीति ठेविली, दोषांची पर्वा केली नाहीं अथवा गुणांचा आदर केला नाहीं; यामुळें त्याच्या कवितेस सर्वत्र एकसारखी विशुद्धाकृति प्राप्त झाली नाहीं. जर त्यानें कठिण वृत्तें घेतलीं नसतीं व शब्दालंकारावर अभिरुचि ठेविली नसती, तर त्याच्या कवितेस अकृत्रिमत्वाची सुंदर शोभा आली असती. व जेथें दोषांचा अनादर व गुणांचा आदर ह्या गोष्टीची पर्वाच नाहीं, तेथें शब्दालंकाराच्या व कठिणवृत्तांच्या बंधनांत तरी रहावयाचें नव्हतें; तसें वामनानें केलें नाहीं. दुसरें दोषांचा त्याग व गुणांचें ग्रहणही केलें नाहीं; यामुळें तिला कृत्रिमत्वाचें सौंदर्यही आलें नाहीं. आतां वरील तीन वर्गांपैकीं कोणत्या वर्गांतील कविता चांगली ह्या प्रश्नाचा निर्णय ठरविला पाहिजे. तो वर दिलेल्या तीन प्रकारच्या उपमानांवरूनच चांगला ठरवितां येईल. स्वयंभू पर्वतादि पदार्थ पाहिल्याबरोबर मनास कांहीं विलक्षण

आनंद होतो. त्याची अतिविशालाकृति; अनियमित वळणांनीं पडलेल्या भयंकर दऱ्या व झालेल्या वृक्षरचना; भव्य, शांत आणि उदात्त असा देखावा; गंभीर ध्वनि, प्रतिध्वनि; पक्ष्यांचे मधुर मंजुल शब्द; स्वच्छ वायू व उदकांचे प्रवाह ह्या सर्वांचें एकीकरण मनावर झालें ह्मणजे विस्मयादि विकारांनीं अंतःकरण विस्तृत होऊन आनंद पावतें. त्याप्रमाणें अकृत्रिम कवितेंतील कल्पनाप्रवाहांचे लोटचे लोट स्वयंभू पाहिले ह्मणजे अकृत्रिम मानसाची मूर्तिच पुढें उभी राहिली आहे, ती गुणदोषांची पर्वा करित नाहीं, टीकाकाराकडे किंवा दोष काढणाऱ्या दुर्जनाकडे ती ढुंकून पहात नाहीं, निर्गुण परपुरुषाकडे तिनें फेकलेले प्रेमरसपूरित लीलाकटाक्ष अवलोकन करून, गर्वपर्वतदुर्जनही द्रवीभूत होऊन क्षणभर सुलीनतेनें जिचें सेवन करित आहे, पूर्वापरसंगतीची संगति धरित नाहीं, लीलाभरांत आडवे तिडवे पाहिजे तसे शब्दावयव चंचल करित आहे, असें पाहिलें ह्मणजे तोही आनंद विलक्षणच होतो.

उत्तम कारागिरानें बनविलेली मूर्ति किंवा इमारत घ्या. अतिशय द्रव्य, कुशलता आणि काल खर्च करून बनविलेल्या ताजमहालासारख्या इमारतींत जाऊन उभें राहिलें असतां, इहलोकीं मी स्वर्गभुवनांतील मंदिराचाच सुखानुभव घेत आहें कीं काय असें कोणास वाटणार नाहीं! त्या इमारतीचा भव्य देखावा, तिची अतिसूक्ष्म व मनोहर कारागिरी, दिव्य शोभायमान पाषाणादि द्रव्यांची प्रमाणयुक्त जोडणी पाहून कल्पनेनें यथेच्छ मनांत आणिलेलें मनोराज्यांतील ऐश्वर्य व सौंदर्य मूर्तिमंत झालें आहे काय! असा तर्क कोणाच्या मनांत येणार नाहीं बरें! अशी वैभवासह शोभा व कुशलता पाहिली ह्मणचे तद्दर्शनानें जो आनंद होतो, त्यापुढें पर्वतादि स्वयंभू आकारविशिष्ट पदार्थदर्शनानें होणारा आनंद कांहीं कमी असावा, असें आह्मांस वाटतें. त्याप्रमाणेंच महाकवींनीं केलेल्या कृत्रिमकाव्याच्या अवलोकनानेंही अतिशय आनंद होतो व तो रसिकांस अकृत्रिमकवितावलोकनापासून होणाऱ्या आनंदापेक्षां अधिक होत असतो यांत कांहीं संशय नाहीं. वाल्मीकीच्या अकृत्रिम कवितेपेक्षां भवभूति, कालिदास, बाण, जगन्नाथराय, माघ इत्यादिकांचें कृत्रिम काव्य आल्हादजनक अधिक आहे असें कोण ह्मणणार नाहीं! रानटी मनुष्याच्या उत्तम कल्पनेपेक्षां श्रीहर्षाची कल्पना उत्तम व आल्हादजनक अधिक आहे असें झोंपेंत देखील कोण चावळणार नाहीं! एक बिन घडलेला संगमरवरी पाषाण आहे. तो वस्तुतः दुर्मिळ, दर्शनीय आणि गुळगुळीत आहे ह्मणून त्याच्या अवलोकनानें आनंदच होईल; तथापि त्या पाषाणावर एखाद्या कुशल कारागिराची टाकी लागून त्याच्या सुंदर मूर्ति बनल्यानंतर, तिच्या अवलोकनानें जो आनंद होईल त्याचें महत्त्व फारच अधिक आहे हें सांगावयास नको. तसें ईश्वरदत्तकविता प्रसविण्याची बुद्धि उभय प्रकारच्या कवींस सारखीच असते; परंतु पहिल्यास शास्त्रकौशल्यादि शिक्षण नसतें आणि दुसऱ्यास तें असतें, इतका फरक असतो. तेव्हां शिक्षित लोकांनीं

केलेल्या कार्यापासून होणारा आनंद, अशिक्षित लोकांनीं केलेल्या कार्यापासून होणाऱ्या आनंदापेक्षां खचित अधिकच होईल. अर्थात् तत्त्वदृष्टीनेंही अकृत्रिम-कवितेपेक्षां कृत्रिमकाव्य चांगलें असें सिद्ध होतें. वर दोन प्रकारांची परस्पर तुलना करून पाहिली; त्यावरून स्पष्टच झालें कीं, राहिलेली तिसऱ्या प्रकारची कविता मध्यमांत गणिली जाईल. वामनपंडिताची संपूर्ण कविता, वर सांगितलेल्या कोणत्या एकाच वर्गांत घालतां येईल असें वाटत नाहीं. कारण भामाविलास, भीष्मयुद्ध, रुक्मिणीविलास, सीतास्वयंवर, भरतभाव, हरिविलास, नामसुधा, ब्रह्मस्तुति इत्यादि प्रकरणांतील पुष्कळ पद्यें फार चांगलीं साधलीं आहेत. यास्तव त्यांची काव्यांत गणना करावयास कांहीं हरकत नाहीं. माधुर्य व प्रसाद या गुणांत तर वामनाची वरील कविता मोरोपंताच्या काव्यापेक्षां पुष्कळ चांगली आहे असें आह्मांस वाटतें. तुकारामाप्रमाणें वामनाच्या मनाचा मूर्तिमंत ओघच कविता बनला असें यथार्थदीपिकेशिवाय दुसरें कोणत्याही प्रकरणांत शोधल्यास आढळणार नाहीं. यथार्थदीपिकेंत मुळीं कवितात्मक भाग फारच थोडा आहे. यामुळें वामनाची कविता तुकारामाच्या कवितेच्या वर्गांत फार थोडी जाईल. बाकी राहिलेल्या दोन वर्गांत तिचा मोठा भाग समाविष्ट होतो. तथापि जीं वामनाचीं पद्यें कवितेंत मोडलीं जातात त्यांत मध्यम प्रतीच्या कवितेचा भाग अधिक निघेल असें वाटत नाहीं. उत्तम कवितेचीच संख्या अधिक होईल असा अजमास आहे."

सारांश, पंत व पंडित हे दोघेही आपआपल्यापरि श्रेष्ठ आहेत. कांहीं गुणांत एक अधिक आहेत तर दुसऱ्या कांहीं गुणांत दुसरे अधिक वाटतात. तेव्हां एकंदरींत पाहतां दोघेही सारख्याच योग्यतेचे कविश्रेष्ठ आहेत असें ह्मणावयास हरकत वाटत नाहीं.

पंत ह्मणतातः–

(गीति) "वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहि डोलविला; ।
प्रभुनें भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि बोलविला. ॥ १ ॥
याच्या सद्रसभवनें कवनें तो नाचलाचि नाकर्षी; ।
हरिजन हरिजनहृदया, जैसा चुंबक अयास आकर्षी. ॥ २ ॥
(वामनपंडितस्तुति ७,८)."

(श्लोक) "स्वबोधयुक्तिकौशल्यं वामनस्य महाद्भुतम् ।
गिरेरपि समुद्भूता येन चिद्घनता द्रुतम् ॥ ३ ॥
(विठोबाअण्णा 'सुश्लोकलाघव श्लो० ४११)."

वामनपंडिताचें आत्मबोध करून देण्याचें चातुर्य अत्यंत अद्भुत आहे. कारण, त्यामुळें पर्वतासारख्या जड पदार्थाचे ठिकाणीं सुद्धां शीघ्र चैतन्यज्ञान उत्पन्न झालें. (दुसरा अर्थ) 'गिरि' हें वामनपंडिताच्या पत्नीचें नांव असून त्यांनीं तिला शीघ्र आत्मज्ञान करून दिलें ह्मणून त्यांचें स्वबोधयुक्तिकौशल्य विलक्षण वाटतें.

हंस म्हणतातः-

( गीति ) "गगनसम ब्रह्मातें स्पर्शुनि सानंद लीन मन केलें ।
वामन असून यानें (त्रिविक्रमें) सर्व विश्व आक्रमिलें. ॥ ४ ॥
सरसा वामन वाणी त्यावरि हरिगुणसुधेमधें मुरली, ।
दुग्धीं साकरशी प्रिय, भासे प्रभुचीच वाजली मुरली. ॥ ५ ॥"

## ( ऋ ) मुक्तेश्वर व मोरोपंतः—

( गीति ) "श्रीमुक्तेश्वर कविवर, यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।
बंदी लक्ष जयाचें, ज्याचें यश भव्य जेवि मंदील. ॥ (सन्मणिमाला ३२)"

( श्लोक ) "मुक्तस्थितेः पर्वचतुष्कमार्या वदंति सर्वत्र सलोकतादि ।
तामन्यथाऽसौ कथमंग कुर्याद् धुर्या न संतः सदतिक्रमस्य ॥
( सुश्लोकलाघव ४०१ )"

( भावार्थ ) श्रेष्ठ जन मुक्तस्थितीच्या सलोकतादि चार पायऱ्या आहेत असें ह्मणतात. ती सज्जनांची उक्ति असत्य कशी करावी? कारण, साधु लोक सदतिक्रम करण्यांत कधीं पुढाकार घेत नाहींत. ह्मणूनच कीं काय मुक्तेश्वरांनीं भारताचीं प्रथमचीं चार पर्वेंच केलीं.

मुक्तेश्वराची वाणी मोरोपंतांच्या वाणीपेक्षां अधिक प्रासादिक आहे. काव्यास अत्यावश्यक जी सहृदयता ती पंतांपेक्षां मुक्तेश्वरांत जास्त होती म्हणूनच माधुर्य व प्रसाद या गुणांत मुक्तेश्वर दोघांत श्रेष्ठ ठरतो. त्यांस शृंगारादि सर्व रस उत्कृष्ट साधले असून त्यांच्या वाणींत मार्दव फार आहे. त्यांची वर्णन करण्याची हातोटी इतकी खुबीदार व मनमोहक आहे कीं वाचकांपुढें ते ते प्रसंग प्रत्यक्ष दिसून ते कांहीं वेळपर्यंत आपलें स्वत्व विसरतात. अतिशयोक्ति व सृष्टिसौंदर्यवर्णन ह्या गोष्टींत त्यांचा हात धरणारा महाराष्ट्रकवींत क्वचित् सांपडेल. त्यांचीं भारताचीं पहिलीं चार व सौप्तिकपर्व हीं पांच पर्वें उपलब्ध असून पंतांच्या अठराही पर्वांवर आर्या आहेत. या शिवाय हरिश्चंद्राख्यान, शुकरंभासंवाद इत्यादि स्फुटप्रकरणें ही त्यांनीं रचिलीं आहेत. आजमितीला त्यांची सुमारें सतरा हजार कविता उपलब्ध होऊन प्रसिद्ध झालेली आहे. या दोघां कवींचीं भारताचीं पांच पर्वें व हरिश्चंद्राख्यान यापुरती तुलना केल्यास मोरोपंतांपेक्षां मुक्तेश्वरांच्या काव्यांत ईश्वरीप्रसाद जास्त दृष्टीस पडून त्यांची काव्यप्रतिभा तप्तसुवर्णप्रतिमेप्रमाणें सर्वत्र उज्ज्वल दिसते. मुक्तेश्वरांचीं भारताचीं चार पर्वें उत्कृष्ट साधलीं असून आदिपर्व तर सर्वोत्कृष्ट आहे. राष्ट्रीयत्वाची स्पष्ट कल्पना मुक्तेश्वरी काव्यांत श्रीसमर्थ रामदासस्वामीच्या खालोखाल दृष्टीस पडते व त्यांनीं महाराष्ट्रासंबंधानें काढलेल्या 'महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रांसि राजे । जयाच्या भयें व्यापिले देव लाजे ( रामायण )' या व इतर

अभिमानोद्गारांवरून त्यांच्या ठिकाणीं राष्ट्रीय आकांक्षा वसत असून त्यांना भावी स्वराज्याचीं गोड स्वप्नें पडत असावीं असें स्पष्ट दिसतें. त्यांच्या कवितेंत उज्ज्वल प्रतिभा, दिव्य ओजस्विता, अनुपमेय व हुबेहुब सृष्टिसौंदर्यवर्णन व लोकोत्तर प्रसाद हे गुण प्रमुखत्वानें आढळतात. त्यांची बुद्धी विशाळ, सृष्ट्यवलोकन विस्तृत व व्यवहारनिरीक्षण सूक्ष्म होतें. वर्णनप्रसंगीं निरनिराळ्या विषयांवर रमणीय व सर्वांगसुंदर रूपकें रचण्याची त्यांची हातोटी विलक्षण आहे. क्वचित् प्रसंगीं त्यांत थोडासा शृंगारिक मसाला जास्त घातलेला आढळतो. त्यांचें कल्पनाचातुर्य सर्वस्वीं सत्कवीस शोभण्याजोगे असें अत्युच्च दर्जाचें आहे. भारतांत पुष्कळ ठिकाणीं त्यांनीं आपल्या पदरच्या कल्पना व मूळांत ज्यांचा मागमूसही नाहीं अशीं अपूर्व वर्णनें रचिलीं आहेत. तीं फारच गोड अतएव रसिकांस तल्लीन करून टाकणारी आहेत. म्हणूनच पंतांनीं मुक्तेश्वराविषयीं लिहितांना पुढीलप्रमाणें आनंदोद्गार काढिले आहेतः—

"मुक्तेश्वरकृत भारत आवडतें विठ्ठलासि; कीं पर्वं ।
सर्वं श्रवणें हरितें आशा कविच्या, अशेषही गर्व. ॥ (पांडुरंगदंडक २३)"

मोरोपंताप्रमाणें मुक्तेश्वरांचाही संस्कृत काव्यनाटकादिग्रंथांशीं दृढ परिचय होता असें त्यांच्या ग्रंथावरून दिसून येतें.

मुक्तेश्वराची भाषा साधी, गोड व सरळ आहे; पंतांची ऐटदार, पांचापेंचांनीं भरलेली व खुबीदार अशी आहे. पंतांपेक्षां मुक्तेश्वर अधिक सात्विक व भावार्थी दिसतात. प्रास, यमक, श्लेष इत्यादि शब्दालंकार मुक्तेश्वराच्या काव्यापेक्षां पंतांच्या काव्यांत पुष्कळच अधिक आहेत. म्हणून त्यांचें काव्य समजावयास साधारणपणें कठिण आहे. मुक्तेश्वराची भाषा साधी व सोपी असून प्रासादिक व हृदयंगम असल्यामुळें त्यांचें काव्य वाचकांस समजण्यास सुलभ जातें; व म्हणूनच तें सर्वप्रकारच्या लोकांच्या आदरास जास्त पात्र झालें आहे. जरा निराळ्या तऱ्हेनें म्हणावयाचें म्हणजे मुक्तेश्वराचें काव्य द्राक्षापाकाच्या वर्गांत मोडणारें असून पंतांचें काव्य नारिकेलपाकाच्या वर्गात मोडेल. दोघांचींही काव्यें रुचिपरत्वें लोकांस कमी जास्ती आवडतील. तरी मुक्तेश्वराच्या काव्याचा रसस्वाद सुलभ रीतीनें मिळण्याजोगा असल्यामुळें तिकडेच बहुजनसमूहाची प्रवृत्ति झाल्यास त्यांत नवल नाहीं. परंतु मांडवावर पक्व व मधुर द्राक्षांचे घड लोंबत असले तरी माडावर चढून नारळ काढण्याचे परिश्रम ज्यांस करतां येत असतील असे लोक जसे ते नारळ सोलून फोडण्याचे श्रम पत्करून नारळांतील पाणी व खोबरें खाण्यांत आनंद मानतात तद्वत् संस्कृत शब्दांचा ज्यांस परिचय असून समासांची मोडणी व मोरोपंतांची पद्धति थोडीशी तरी ठाऊक असेल अशा लोकांस पंतांच्या काव्यवाचनापासून निःसंशय मोठा आनंद होईल. खेड्यांतल्या श्रीमंत पाटलाची शहाणी आणि भावार्थी बायको, आणि शहरांतल्या साधारण कारकुनाची हुशार आणि पक्की वस्ताद बायको; किंवा कालिदासाची कण्वा-

श्रमांतील शकुंतला व भवभूतीची मालती ह्यांच्यामध्यें जें अंतर दिसून येतें तें मुक्तेश्वर आणि मोरोपंत ह्यांच्या काव्यांत आहे. मुक्तेश्वराच्या काव्यवधूचा स्वैर विहार पुढील श्लोकांत सांगितलेल्या सुंदर स्त्रीच्या क्षणक्षणविलक्षण लक्षणाप्रमाणेंच आहेः–

( श्लोक ) 'क्षणं रजसि खेलनं क्षणमतीव भूषादरः
क्षणं द्रुततरा गतिः क्षणमतीव मंदा गतिः ।
क्षणं सरलवीक्षणं क्षणमपांगसंवेक्षण
क्षणक्षणविलक्षण जयति लक्षणं सुभ्रुवः ॥'

( भावार्थ ) क्षणभर धुळींत क्रीडा, तर क्षणभर दागिन्यांनीं मढलेली; क्षणभर अति शीघ्रगतीनें चालणारी, तर क्षणभर अतिमंदगामिनी; क्षणभर सरळ पाहणारी, तर क्षणांत कटाक्षावलोकन करणारी; अशा रीतीनें क्षणोक्षणीं विलक्षण रीतीनें भिन्न रीतीचा विहार करणारी सुंदरी आपल्या लक्षणांनीं उत्कर्ष पावते.

महाराष्ट्रवाङ्मयविशारद व रसिक विद्वान् कै० **हरिभाऊ आपटे** हे आपल्या 'मराठी वाङ्मयाचा अभ्यास' या व्याख्यानांत मोरोपंत, वामन व मुक्तेश्वर यांच्या संबंधानें ह्मणतातः–"ज्यांस विद्वत्व आणि कवित्व यांचें मिश्रण पाहावयाचें असेल, त्यांनीं वामनपंडित व मोरोपंत यांचे ग्रंथ पहावे. रसपरिपाक, वर्णनसौदर्य व भाषेची अव्याजमनोहरता ज्यांस हवी असेल, त्यांचें मन रंजविण्यास मुक्तेश्वर तयार आहेत. मुक्तेश्वरांचें महाभारत वाचतांना त्यांच्या वर्णनशैलीमुळें ते ते देखावे व त्या त्या व्यक्ति आपुल्या डोळयांपुढें दिसत आहेत असेंच वाटतें. त्यांच्या भाषेंत कृत्रिमता बिलकुल नाहीं. निसर्गमनोहर अशा युवतीच्या दर्शनानें जो आनंद होतो, तो आनंद मुक्तेश्वराच्या काव्यापासून होतो. तसा शुद्धानंद पंडितांच्या किंवा पंतांच्या काव्यापासून होत नाहीं. पंडित व पंत हे कवि नव्हते, किंवा त्यांच्या काव्यांतून कवितेचा परिपोष नाहीं असें माझे ह्मणणें नाहीं. पंतांच्या काव्याबद्दल माझा फार आदर आहे. त्यांचीं काव्यें आनंदकारक असून विविधरसांचीं पोषक आहेत. परंतु चित्रकाव्य जेथें साधेल तेथें साधण्याकरितां रसहानि होते कीं काय इकडे लक्ष न दिल्याचीं उदाहरणें त्यांच्या काव्यांतून किती तरी सांपडतील.…त्यांच्या काव्यांत व वामनपंडितांच्या काव्यांत कृत्रिमता विशेष…त्यांचा भर यमकांवर व शब्दचमत्कारावर फार. मुक्तेश्वराचा भर शब्दचमत्कारावर मुळींच नाहीं, अर्थावर फार. यामुळें त्यांचीं महाभारतांतील आख्यानें पंताच्या आख्यानांपेक्षां सहृदय वाचकांस अधिक आल्हादकारक होतात."

काव्यसंग्रहाचे माजी संपादक रा. **बा. अ. भिडे** हे मुक्तेश्वराच्या कवितेवर पुढील प्रमाणें अभिप्राय देतातः–"मुक्तेश्वरांची रचना जशी प्रसंगविशेषीं कठोर व सणसणीत आहे, तशीच प्रसंगानुरूप ती कोमल, प्रेमल व नाजूकही आढळते. रसभेदाप्रमाणें त्यांच्या शब्दसरणींत तत्काळ भेद झालेला प्रत्ययास येतो.

जो वाक्प्रवाह एका ठिकाणीं नायगाऱ्याच्या प्रचंड धबधब्याप्रमाणें भूमंडळ दणाणीत, आवर्तशतानें खळबळत, गंभीर गर्जनेनें अंतराळ धुमधुमवीत, प्रचंड आवेशानें मेडसावित जातो; तोंच दुसऱ्या ठिकाणीं लहानशा झऱ्याप्रमाणें मंजुळस्वरानें गात, लतातृणाशीं खेळत, सुमदलांना कवळीत, व पशुपक्ष्यांना हंसवीत, झुलुझुलु वाहतांना पाहिला, ह्मणजे कोणास बरें कौतुक वाटणार नाहीं? कालभैरवाचें अकांडतांडव व अप्सरेचा नाजूक नाच हीं दोन्हीं एकाच व्यक्तीला साधलेलीं पाहून मन चकित झालेंच पाहिजे. मुक्तेश्वरांची भाषा जितकी एके ठिकाणीं कर्कश, तितकीच दुसरे ठिकाणीं प्रेमळ; जितकी एके ठिकाणीं खणखणीत, तितकीच दुसरे ठिकाणीं लुसलुशीत; जितकी एकेठिकाणीं आवेशी, तितकीच दुसरे ठिकाणीं संथ; अशी अनुभवास येते व याच गोष्टीनें त्यांचें वाक्प्रभुत्व सिद्ध होतें."

विठ्ठलभक्त **पांगारकर** मुक्तेश्वर व मोरोपंत यांची तुलना करितांना ह्मणतातः— "मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारताची आख्यानाची महानदी खळखळाट वाहविली आहे; पंतांनीं दुतर्फा मनोहर घांट बांधून व जागोजाग उपवनांचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही पात्रांमधून अचूक सोडून दिला आहे! मुक्तेश्वराची कविता एखाद्या खेडवळ पण कुलीन देशस्थ ब्राह्मणाच्या मुलीसारखी साधीभोळी, काळीसांवळी, पण ठसठसीत, मोकळया मनाची व सशक्त अशी आहे; व मोरोपंताची कविता ही सुस्वरूप, टापटिपीची व सुगरण अशा नगरवासी कऱ्हाड्याच्या मुलीसारखी आहे! दोन्ही संपन्न शुचि व ईश्वरपरायण आहेत. पहिली वाटेल त्याला भुलविते, दुसरीला भुलणारा सुविद्य, रसज्ञ, नागरिकच पाहिजे! पहिलीच्या अंगावरचीं वस्त्रें उंची आहेत, पण तीं कशीं तरी घेतलीं आहेत, दुसरीच्या वस्त्राभरणांत नीटनेटकेपणा विशेष आहे. पहिली आपल्या काळ्या पाणीदार डोळ्यांनीं व सहज विलासांनीं मोहील, दुसरी आपल्या नानाविध चेष्टांनीं जिंकील. पहिलीची धिटाई व दुसरीची मर्यादशीलता, पहिलीचें अकृत्रिम हास्य व दुसरीचें मंदस्मित, पहिलीचें सहज-प्रेक्षण व दुसरीचें कटाक्षक्षेपण, पहिलीचा दांडगेपणा व दुसरीचा संभावितपणा दोन्हीही आपापल्या परीनें मनमोहकच आहेत!! तथापि मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करितां 'दूरीकृता खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः' या दुष्यन्ताच्या उक्तीचें स्मरण होतें. (मोरोपंताचें चरित्र पृ० ३८३-३८४)."

महाभारतांतील कित्येक प्रसंगांचें वर्णन मुक्तेश्वरापेक्षां मोरोपंतास जास्त चांगलें साधलें आहे. याचें एक उदाहरणः—सभापर्वात धर्मराजाबरोबर व कौरवांतर्फे शकुनी कपटद्यूत खेळून पांडवांचें सर्वस्व हरण करित आहेत हें पाहून विदुराला अतिशय संताप आला व तो बंधु धृतराष्ट्रास क्रोधावेशानें दुर्योधनाचा निग्रह करण्याकरितां उपदेश करितो. या प्रसंगाचें वर्णन मोरोपंतांनीं मोठ्या प्रौढ,

आवेशयुक्त, अर्थगंभीर व झोंकदार वाणीनें केलें असून त्यांतील शब्दयोजना निवडक असून यमकादिशब्दचमत्कृतिही चांगली उतरली आहे. त्याच प्रसंगाचें मुक्तेश्वराचें वर्णन साधलेलें तितकें चांगलें दिसत नाहीं. मोरोपंती सभापर्व अ० ४ गीति १२-२७, मुक्तेश्वर सभापर्व अ० १४ ओव्या ९४-१०९ पहा. उलट पक्षीं, भारतांतील कित्येक प्रसंगाचीं वर्णनें काव्यदृष्टीनें जसीं मनोवेधक व हुबेहुब मुक्तेश्वरास साधलीं आहेत तशीं पंताला साधलीं नाहींत. दुष्यंतशकुंतलाख्यान, सुंदोपसुंदकथा, वगैरे याचीं उदाहरणें होत. अतिशयोक्तीचें वर्णन करण्यांत महाराष्ट्रकवींत मुक्तेश्वराचा हात कोणाही कवीला धरवत नाहीं. वामनपंडित, अमृतराय, रामजोशी ह्या कवींची स्वभावोक्ति जशी चित्ताकर्षक असते, तशीच मुक्तेश्वराची अतिशयोक्ति अत्यंत गोड लागते. विस्तारभयास्तव त्या सर्व गोष्टींचीं उदाहरणें येथें देण्यास सवड नाहीं.

ओंवीछंदांत जशी मुक्तेश्वराला उत्कृष्ट कविता करितां येत होती तशी श्लोकवृत्तांत करितां येत नसे. मुक्तेश्वरानें श्लोकवृत्तांत रामायण रचिलें आहे. त्यांत ओंवीछंदांत प्रसन्न व प्रफुल्लित दिसणारी त्यांची कवित्वस्फूर्ति या बिकट छंदोबंधनांत सांपडल्यामुळें कीं काय अत्यंत म्लान झालेली दिसते. त्यांत ऱ्हस्वदीर्घादि चुक्या, यमकास्तव शब्दांची ओढाताण, यतिभंगादि इतर छंदःशास्त्रीय व व्याकरणांतील दोष बरेच आढळत असून तें बऱ्याच ठिकाणीं दुर्बोधही झालें आहे. याच कारणास्तव हें काव्य बरेंच नीरस वाटतें. मोरोपंतांचा असा प्रकार नाहीं. त्यांना आर्या जशा उत्कृष्ट रचितां येत असत, जवळ जवळ तितक्याच चांगल्या तऱ्हेनें त्यांना भिन्न भिन्न वृत्तांतील श्लोक, अभंग व ओंव्या रचितां येत असत. पंताच्या वाग्देवीला अनेक वृत्तरूपानें व अनेक बंधनें सांभाळून प्रकट होण्याची विलक्षण कसरत झाली असल्यामुळें व लांब संस्कृत समासाच्या बळावर वाटेल तसें आपलें अंग चोरावयास सांपडत असल्यामुळें कोणत्याही वृत्तांत कोणत्याही विषयावर काव्य रचणें हें त्यांना हत्तीला आपल्या शुंडादंडावर माळ झेलण्याप्रमाणेंच सोपें वाटत असे. अशा रीतीनें अनेक वृत्तांत पंतांनीं प्रौढ, सुरस व विस्तृत काव्यरचना केली असल्यामुळें मुक्तेश्वरांतील व त्यांच्यांतील कवित्वासंबंधीं अंतर अगदीं कमी होऊन बरोबरी होते व महाराष्ट्रकाव्यसरस्वती उभय कविवर्यांचे अनेक उत्कृष्ट गुण पाहून त्यांच्या गळ्यांत कीर्तिसुमनहार घालून त्यांचा आत्मभावानें सारखाच सन्मान करिते.

( गीति ) "श्रीविश्वंभरलीलायोगो मुक्तेशभूतिमातनुते ।
या हि महाभारतरणसमुद्यमे प्राकृतान् सतृणयति ॥
(विठोबा अण्णा सुश्लोकलाघव ३९८)"

( भावार्थ ) लीलाविश्वंभरनामक मातापित्यांपासून जन्मलेल्या मुक्तेश्वराचीं पहिलीं चारपर्वे वाचून पुढील युद्धपर्वे वाचण्याविषयीं महाराष्ट्रभाषारसिकांस उत्कंठा लागून राहाते. (दुसरा अर्थ) श्री विश्वपालक भगवंताच्या लीलेनें मुक्तांमध्यें श्रेष्ठ अशा पुरुषांचें पारमार्थिक वैभव वाढतें. तें पाहून बद्धासही आपण या जडसंसारसमुद्रांतून केव्हां तरून जाऊं अशी उत्कट इच्छा होते.

**( ऌ ) रघुनाथपंडित व मोरोपंतः**–संस्कृत व मराठी या भाषांतील पुष्कळ कवींनीं भारतकथा वर्णन करितांना किंवा स्वतंत्रपणें नलदमयंतीकथा वर्णिली आहे. संस्कृतांत कृष्णानंद कवीनें 'सहृदयानंद' काव्यांत, त्रिविक्रम भट्टानें आपल्या 'नलचंपू'त हरिदत्तसूरि यानें 'राघवनैषधीय' काव्यांत, व श्रीहर्षकवीनें 'नैषध' काव्यांत व आणखी कांहीं कवींनीं ही पुण्यश्लोकाची कथा वर्णिली असून मराठींतही मोरोपंत, मुक्तेश्वर, श्रीधर इत्यादि कवींनीं भारतकथा वर्णितांना ही कथा गायिली आहे. रघुनाथपंडितांनी ही सबंध कथा वर्णिली नसून फक्त नलदमयंतीची स्वयंवरकथा तेवढी वर्णिली आहे. या कवीचा एवढाच ग्रंथ उपलब्ध आहे व तो संस्कृतांतील नैषधमहाकाव्याच्या आधारानें रचिला असल्याचें त्यांतील अंतिम भागांत त्यानींच सांगितलें आहे. हें रघुनाथपंडितांचें नलोपाख्यान सर्वोत्कृष्ट उतरलें आहे. आधीं सर्व स्त्रीपुरुषांस आवडणारा लग्नाचा, त्यांतून स्वयंवराचा अर्थात् शृंगाररसप्रधान विषय. त्यांत रघुनाथपंडितानें तो आपल्या अत्यंत प्रौढ व रसाळ वाणीनें श्रवणप्रिय अशा विविध वृत्तांची योजना करून प्रास, यमक व श्लेष या मनोहर शब्दालंकारांनीं व उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, स्वभावोक्ति इत्यादि उत्कृष्ट अर्थालंकारांनीं नखशिखांत सजविला आहे. शब्दयोजना संस्कृतशब्दमिश्रित व श्लेषघटित असून क्लिष्टत्वाचा दोष फारसा आढळत नाहीं. यांतील विविध प्रसंगांचीं वर्णनें ( उदाहरणार्थ हंसाचा नलाशीं व दमयंतीशीं, व नलाचा दमयंतीशीं झालेला संवाद, उद्यानवनश्रीवर्णन, नलदमयंतीच्या विरहव्यथेचें करुण वर्णन, नलदमयंतीच्या स्वभावाचें वर्णन, स्वयंवरवर्णन इत्यादि ) फार मार्मिक, चमत्कारिक, मधुर, हृदयंगम व बहारीचीं उतरलीं असून त्यांच्या योगानें वाचकांचीं मनें वर्ण्यविषयाशीं तादात्म्य पावतात. पंतांचें व मुक्तेश्वराचें वर्णनही चांगलें आहे. पण रघुनाथपंडितांनीं संस्कृतसाहित्यशास्त्राचा पूर्ण उपयोग करून आपली सर्व करामत या काव्यांत खर्चिली असल्यामुळें हें लघु काव्य अत्यंत सरस व सर्वांगसुंदर वठलें आहे. यांत रघुनाथपंडितांच्या उज्ज्वल प्रतिभेची वर्णनचातुर्याची साक्ष वाचकांस क्षणोक्षणीं पटून त्यांचीं अंतःकरणें सात्विक आनंदानें भरून जातात. मराठींतील उत्तमोत्तम काव्यांत या रघुनाथपंडितकृत स्वयंवराची गणना करितात ती अगदीं यथार्थ आहे.।

## (ऌ) श्रीधर व मोरोपंत.

(गीति) "हरिविजयग्रंथातें मग, आधीं श्रीधरासि वंदीन, ।
शिववंदनकामांहीं लंघावा प्रथम देव नंदी न. ॥

(मोरोपंत, सन्मणिमाला ३१)."

मोरोपंताचा जन्म शके १६५१ त पन्हाळगडावर झाला त्याच वर्षी श्रीधरस्वामी माघकृष्ण तृतीयेस पंढरीस समाधिस्थ झाले. यांचे 'हरिविजय' (समाप्ति शके १६२४ चित्रभानु संवत्सरीं मार्गशीर्ष शुक्ल द्वितीयेस), 'रामविजय' (स०–श० १६२५ सुभानु, श्रावण शुक्लसप्तमी रविवारीं), 'पांडवप्रताप' (स०–श० १६३४ विजय, माघ शुक्लदशमी बुधवारी), 'शिवलीलामृत' (स०–श० १६४० विलंबी, फाल्गुनी पौर्णिमा रविवारीं) हे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. 'जैमिनी अश्वमेध'ही (स०–श० १६३७ दुर्मुख पौष शुक्ल सप्तमी सोमवारीं) यांच्या नांवानें मोडतो. पण अंतःस्थप्रमाणांवरून तो यांच्या कोणीतरी शिष्यानें लिहून गुरूच्या नांवानें प्रसि[illegible] केलेला असावा असें वाटतें. यांची सर्व कविता ओवीछंदांत रचिलेली आहे. त[illegible] यांचीं कांहीं पदें वगैरेही आढळतात. श्रीएकनाथांचे भावार्थरामायणादिग्रंथ, [illegible]क्तेश्वराचीं भारतपर्वें व वामनपंडिताचीं काव्यें यांनीं वाचलीं असून त्यांचा यांच्या 'विजय', 'प्रताप' वगैरे ग्रंथांवर परिणाम झालेला आढळतो. यांचें काव्य सरळ, सुबोध व रसभरित आहे. प्रसंगविशेषीं स्तवन वगैरे करितांना लांबसमास घालून ओजोगुणही यांनीं आपल्या कवितेंत आणिलेला आहे. पंताप्रमाणेंच अनुप्रासांची यांना फार आवड होती व आपल्या काव्यांतून त्यांनीं त्यांची ठिकठिकाणीं योजना केली आहे. श्लेषालंकार यांच्या काव्यांत क्वचित्च आढळतो. अर्थालंकारापैकीं उपमा, उत्प्रेक्षा, रूपक या दृष्टांतसूचक अलंकारांची यांच्या काव्यांत गर्दी आहे. यांनीं योजिलेले दृष्टांत खरोखरीच सुंदर व समर्पक असतात. तथापि भिन्न ग्रंथांतून त्याच दृष्टांतांची कधीं कधीं पुनरावृत्ति झालेली आढळते. पंतांच्या भारतादि काव्यांतील अलंकाराविषयीं तर बोलणेंच नको. त्यांनीं अलंकारशास्त्रांत सांगितलेल्या बहुतेक सर्वच अलंकारांची (शब्दालंकार व अर्थालंकार) आपल्या काव्यांत भरपूर योजना करून तें अत्युत्तम रीतीनें सजविलें आहे. तसा प्रकार श्रीधरी काव्यांत आढळत नाहींत. भारतीय कथा यांच्या पूर्वीं व नंतर विष्णुदास नामा, नरहरि, मालुनाथ, मुद्गल, गोपाळ, शुभानंत, मुक्तेश्वर, मोरोपंत वगैरे पुष्कळ कवींनीं वर्णिली आहे. वामनपंडितांनीं भारतीय स्फुट आख्यानें घेऊन त्यावर काव्यरचना केली आहे. श्रीधरस्वामींनींही आपल्या 'पांडवप्रताप'ग्रंथांतून भारतकथा वर्णिली आहे. मुक्तेश्वराचें व मोरोपंताचें भारत श्रीधरी 'प्रतापा'च्या मानानें विस्तृत आहे. याचप्रमाणें रामायणाच्या आधारें रामचरित्र, भागवतादिकांच्या आधारें कृष्णचरित्र

गातांनाही स्वामींनीं कथासंक्षेपच केलेला आढळतो. कथासंक्षेप करितांना यांनीं फार कौशल्य दाखविलें आहे. काव्यदृष्टीनें पाहिल्यास मोरोपंत, वामन, व मुक्तेश्वर यांचे ग्रंथ जसे अलंकाररसादिकांनीं उत्कृष्ट उतरले आहेत, तसें श्रीधरी ग्रंथांबद्दल ह्मणतां येणार नाहीं. मुक्तेश्वरी भारत तर सर्वोत्कृष्ट उतरलें आहे. तथापि त्यांत कोठें कोठें पाल्हाळ आढळतो. श्रीधरस्वामींनीं सर्व पाल्हाळ गाळून कथेंतील स्वारस्य जाऊं न देतां आटोपशीर रीतीनें खुबीदारपणें रामायण, भारत व भागवत इत्यादि बृहद्ग्रंथांतील कथांचा आपल्या 'लीलामृत,' 'विजय,' 'प्रताप' वगैरे ग्रंथांतून संक्षेप केला असल्यामुळें यांचे ग्रंथ सर्वसाधारण लोकांत फार लोकप्रिय झाले आहेत. मोरोपंत, मुक्तेश्वर यांचे रामायण भारत भागवतादि ग्रंथ हे विद्वन्मान्य असूनही त्यांच्या विस्तारास्तव कठिण वृत्तास्तव व अर्थकाठिन्यास्तव सामान्यजनांस फारसे परिचित नाहींत. श्रीधराचे ग्रंथ सुलभ अशा ओवी छंदांत रचिले असल्यामुळे अगदीं खेडोखेडीं देखील लोक ते आवडीनें व भक्तीनें वाचतात. कथेच्या ओघांत ओवीच्या चवथ्या चरणांत अर्थांतरन्यास, सुभाषित किंवा एखादें उत्कृष्ट नीतितत्व घालून त्याचा चारपांच ओवीपर्यंत विस्तार करून तें वाचकांच्या मनावर उत्तम रीतीनें ठसविण्याची यांची हातोटी खरोखरीच अपूर्व आहे. 'तरी तो शंकर निर्धारें' (शिवलीलामृत अ० ७–[illegible]५–५२ ), 'विष्णुचिंतन करीन मी' ( रामविजय अ० २ ओ० ५६ ५८ ), 'तेथें विकल्प बाधीना' ( राम. ९,११९–१२४ ), इत्यादि स्थळें पहा. यांना अतिशयोक्ति अलंकार चांगला साधला होता. सृष्टिवर्णनही मधून मधून यांच्या काव्यांतून आढळतें. तथापि मुक्तेश्वरी काव्यांत जशीं विस्तृत रसभरित वर्णनें मार्मिक स्वभावलेखन, सुंदर सृष्टिवर्णनें इत्यादि प्रकार आढळतात तसा प्रकार यांच्या काव्यांत तीं संक्षेपरूप असल्यामुळें फारसा आढळत नाहीं. तसेंच मोरोपंती काव्यांतील प्रौढी, ओज, डौलदार वर्णन व दरबारी ऐट हेही प्रकार यांच्या काव्यांत फारसे नाहींत. तथापि यांच्या कवितेंत भाविकपणा जास्त आढळतो. रूपकद्वारा अध्यात्मबोध करण्याचा प्रकार यांनीं श्रीनाथापासून घेतलेला असून त्याचा त्यांनीं आपल्या सर्व कवितेंतून भरपूर उपयोग केलेला आढळतो. यांनीं अध्यायारंभीं घातलेलीं मंगलाचरणें फार सुरेख उतरलीं आहेत. सारांश, भाविकपणा, सरळ, सुबोध व सरस वर्णन, मार्मिक संक्षेप, सोपे दृष्टांत, नीतितत्वोपदेश, सुंदर रूपकें योजून केलेला अध्यात्मबोध चित्ताकर्षक पदयोजना वगैरे गुण श्रीधरी काव्यांत प्रामुख्यानें आढळत असल्यामुळें त्यांचे ग्रंथ व त्यांतल्या त्यांत त्यांचे हरिविजय व रामविजय हे, आजकाल अत्यंतात्यंत लोकप्रिय झाले आहेत.

### (५) महिपति व मोरोपंत.

( गीति ) "श्रीहरिभक्तजनांचीं श्रीहरिभक्तिरसत्सुधाभरितें ।
चरितें गातां, जेणें आयुष्य क्षण पडो दिलें न रितें. ॥ १ ॥

ज्याचा ग्रंथ हरिजना सेव्य, चकोरां जसा सदा इंदु. ।
जो पसरला जगांत, स्नेहाचा सत्सरीं जसा बिंदु. ॥ २ ॥
साधूंचें यश गाया, प्रेमें देवूनियां सुभा केला, ।
निःसंशय, ताराया जड महिपति विठ्ठलें उभा केला. ॥ ३ ॥

(मोरोपंतकृत महिपतिस्तुति १,४,६)"

सुप्रसिद्ध भक्तचरित्रकार महिपति यांचा जन्म मोंगलाईत ताहराबादेस शके १६३७ त होऊन ते शके १७१२ श्रावण कृष्ण द्वादशीस आपल्या वयाच्या ७५ व्या वर्षी वैकुंठवासी झाले. हे पंतांचे समकालीन असून त्यांच्यापेक्षां चौदा वर्षांनीं वडील होते. हे ऋग्वेदी वासिष्ठ गोत्री ब्राह्मण. यांचें उपनाम कांबळे. यांचे तीर्थरूप दादोपंत कुळकर्णी पांडुरंगाचे भक्त असून पंढरीचे एकनिष्ठ वारकरी होते. त्यांच्या पश्चात् महिपतीनें वारीचा नेम चालविला. यांना आपली मातृभाषा मराठी तिच्याशिवाय हिंदी, गुजराथी व कानडी या भाषांचें चांगलें ज्ञान असून संस्कृतभाषेतही यांची थोडीबहुत गति होती. लहानपणापासूनच भगवद्भक्तीकडे यांचा ओढा असून यांनीं वरील भाषांतील पुष्कळशी संतकवींची कविता लक्ष्यपूर्वक वाचली होती. मोरोपंत पन्हाळगडावर कारकून असतांना कांहीं गोष्टींमुळें अनुतप्त होऊन त्यांनीं जशी आपली लेखणी भगवच्चरणीं वाहिली, तसाच प्रकार महिपतीचा सांगतात. महिपति आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षापासून कुळकरणपणाचें सरकारी काम करूं लागले. एकदां महिपति देवपूजा करित असतां मुसलमान जाहगीरदाराकडून कचेरीच्या कामाकरितां निकडीचें बोलावणें आलें. 'देवपूजा आटोपून येतों' असें सांगून पाठविलें तरी तगादा सुटेना. तेव्हां त्यांच्या मनास फार खेद वाटून ते लवकर पूजा आटोपून जाहगीरदाराकडे गेले व तिकडचें काम आटोपल्यावर त्यांनीं अतःपर मी व माझे सातपिढीपर्यंतचे वंशज कोणतेंही सरकारी काम करणार नाहीं व भगवत्कार्याशिवाय इतर कामांत लेखणी हातीं धरणार नाहीं अशी देवापुढें लेखणी टेवून शपथ घेतली. ही शपथ त्यांनीं व त्यांच्या वंशजांनीं आजपर्यंत पाळली आहे. द्रव्यैषणा, दारैषणा व लोकैषणा या तिन्ही एषणा (वासना) पूर्ण करण्याचें लोकमान्य साधन' जी राजसेवा, तिचा मोह तोडून भगवच्चरणसेवेचा निश्चय करून तो आमरण चालविणारे एकनाथ, महिपति, मोरोपंत यांच्या सारखे करारी पुरुष किती थोडे सांपडतील! नोकरी सोडल्यावर हे अधिकच उल्हासानें एकनिष्ठपणें भगवद्भक्ति करूं लागले. या घोर कलियुगांत चहूंकडे अधर्माचें साम्राज्य असतां आपण कोणती भगवत्सेवा करावी व कोणाचे पाय धरिले असतां आपणावर परमेश्वर लवकर कृपा करील याचें चिंतन करित उत्कट भगवद्भजन करित असतां एक चमत्कार झाला. महिपति ह्मणतातः—

(ओवी) 'जो भक्तिज्ञानवैराग्यपुतळा । ज्याचे अंगीं अनंत कळा ।
तो सद्गुरु तुकाराम आह्मांसि जोडला । स्वप्नीं दिधला उपदेश ॥ १.२० ॥
मी तरी सर्वाविषयीं हीन । ऐसें साक्ष देतसे मन ।
परी कृपा केली कवण्यागुणें । त्याचें कारण तो जाणे ॥ २१ ॥

(भक्तलीलामृत)'

'तो विश्वव्यापक चैतन्यघन । सद्गुरु तुकाराम आह्मांलागून ।
महिपति तया अनन्य शरण । देहाभिमान टाकोनी ॥ ५२.३२२ ॥
त्यानें कृपा करून एकांतीं । ग्रंथ लिहविला माझे हातीं ।
तरी येविषयीं विचक्षणश्रोतीं । संशय चित्तीं न धरावा ॥ ३२१ ॥

(भक्तविजय)'

तुकोबानें महिपतीस स्वप्नांत अनुग्रहोपदेश देऊन भक्तचरित्रें वर्णन करण्याची आज्ञा केली. त्यावरून यापुढें भगवद्भक्तांचीं चरित्रें आमरण वर्णन करावयाचीं असें आपलें ध्येय महिपतिबावांनीं ठरवून त्याप्रमाणें उद्योग सुरू केला. भक्तचरित्राची महती त्यांस किती पटली होती याविषयीं पुढील थोड्या ओव्या पहाः-

(ओव्या) "जे भक्तचरित्रें अखंड गात । तयांसि ज्ञान होईल अद्भुत ।
कृपा करूनि पंढरीनाथ । भेटेल निश्चित त्यांलागीं ॥ ५७.१०२ ॥
कलीचा प्रारंभ होतांचि त्वरित । सुरवर आनंदले बहुत ।
कीं औट घटिका करितां एकाग्र चित्त । वैकुंठनाथ भेटेल कीं ॥ २०६ ॥
तंव नारदमुनीनें कौतुक केलें । जिव्हा शिश्न हातीं धरिलें ।
सकळ देवांस आश्चर्य वाटलें । मग पुसते जाहले तयासी ॥ २०७ ॥
यावरी बोले ब्रह्मसुत । हे दोनी नावरती कलियुगांत ।
सुरवरीं ऐकतां हे मात । चिंताक्रांत झाले मानसीं ॥ २०८ ॥
मग नारद सांगे तयांप्रती । कलियुगीं वैष्णवभक्त जे होती ।
त्यांचीं चरित्रें जे ऐकती । त्यांसी वैकुंठपति भेटेल ॥ २०९ ॥

(भक्तविजय अ० ५७)"

महिपतीचें पांडुरंगास मागणेंः-

"शेवटील विनवणी आतां । माझी ऐकें गा पंढरीनाथा ।
तूंचि श्रोता आणि वक्ता । ग्रंथरक्षिता निजकृपें ॥ २१७ ॥
अवीट आवडी धरूनि चित्तीं । तुझिया दासांची वर्णावी स्तुति ।
हेंचि उचित महिपती । मागे निजप्रीती निरंतर ॥ २२२ ॥

(भक्तविजय अ० ५७)".

मोरोपंतांनींही तुकोबांनीं महीपतीस अनुग्रह केल्याचा उल्लेख महिपतिस्तुतींत पुढीलप्रमाणें केला आहे:–

( गीति ) 'सत्य तुकारामाचा, या महिपतिवर, वरप्रसाद असे; ।
सदनुग्रहाविणें हे निघतिल उद्गार सार काय असे? ॥'

नंतर त्यांनीं भक्तविजय (अ० ५७ समाप्तिशके १६८४ वैशाख वद्य द्वादशीस), संतलीलामृत (अ० ३५ स०-श० १६८९ फाल्गुन शुक्ल चतुर्थी) भक्तलीलामृत (अ० ५१), संतविजय (अ० २६ अपूर्ण[1]) कथासारामृत (अ० ३६), पंढरीमाहात्म्य (अ० १२), तुलसीमाहात्म्य (अ० ५), गणेशपुराणाचा त्रुटित भाग वगैरे लहान मोठे चौदा ग्रंथ ओवीछंदांत रचिले. तसेंच नामदेव, हरपाळ, चोखामेळा, राकाकुंभार, कमाल, संतोबा पवार, माणकोजी बोधला, नरसी मेहता, जगमित्र नागा या नऊ संतांचीं चरित्रें पूर्वीं ओवी छंदांत भक्तविजयांत गाइलीं असतां पुन्हा अभंगवृत्तांत वर्णन केलीं. यांचीं कांहीं स्फुट पदें व अभंगही आढळतात. यांचे वरील सर्व ग्रंथ मोठ्या भाविकपणानें सरळ, सुबोध व रसाळ भाषेंत लिहिले आहेत व त्यापैकीं पहिले चार पांच ग्रंथ, त्यांतही भक्तविजय–हे अत्यंत लोकप्रिय झाले आहेत. यांनीं रचिलेल्या संतचरित्रांत कालविपर्यासाचा दोष पुष्कळ ठिकाणीं घडलेला असून अद्भुत चमत्कारावर थोडा जास्त जोर दिलेला आढळतो. तथापि एकंदरींत हीं चरित्रें फार सुरस, मनोवेधक व भगवद्भक्तीकडे अंतःकरण खेंचणारी अशीं उतरलीं आहेत. नाभाजी, प्रियादासजी व उद्धवचिद्घन यांचीं चरित्रें वाचून त्यांच्या आधारानें त्यांत स्वतःच्या अवलोकनानें पुष्कळशी भर टाकून हीं चरित्रें लिहिलीं आहेत. कांहीं ठिकाणीं मूळ नाभाजीच्या चरित्रांतील हकीकत प्रशस्त न वाटल्यामुळें थोडेंसें वेगळें वर्णनही केलेलें आढळतें. नामदेव व कबीर यांच्या जन्मांची नाभाजीची हकिकत फिरवून महिपतीनें ते अयोनिसंभव शिंपल्यांत जन्मले असें आलंकारिक वर्णन केलें आहे. संतचरित्रांची आवड यांची अशी कांहीं विलक्षण होती कीं थोड्या माहितीवरून एकदां लिहिलेलीं संतचरित्रें नंतर जास्त माहिती मिळाल्यावर त्यांनीं पुन्हा दुसऱ्या ग्रंथांतून सविस्तर वर्णिलीं आहेत. श्रीसमर्थ, एकनाथ, तुकोबा इत्यादि संतांचीं चरित्रें भक्तविजयांत त्रोटक वर्णन करून फिरून संतविजय व भक्तलीलामृत या ग्रंथांतून त्यांनीं पुष्कळ विस्तारानें वर्णिलीं आहेत. त्यांतल्यात्यांत त्यांचें भक्तलीलामृतांतील तुकारामाचें विस्तृत चरित्र तर फार फार गोड आहे. ते पंढरीचे एकनिष्ठ वारकरी होते. पण कांहीं वारकऱ्यांत दिसून येणारी

---

१ संतविजयाची पूर्ण अध्यायांची हस्तलिखित प्रत अलीकडे उपलब्ध झालेली आमच्यापाशीं आहे. त्यांत मनोरंजक कथा आल्या आहेत. कोणी छापणारा भेटल्यास 'संतविजया'च्या नवीन आवृत्तिबरोबर आजपर्यंत न छापलेला हा भाग छापला जाईल.

आकुंचित दृष्टि व एकांगीपणा यांच्यांत मुळींच नसून त्यांनीं वारकरी संप्रदायांत असलेल्या नसलेल्या सर्व संतांचीं चरित्रे सारख्याच पूज्यभावानें समदृष्टीनें वर्णिलीं आहेत. पंतांचाही सर्व संतांविषयीं सारखाच आदर असून संतचरित्राची फार आवड होती. त्यांनीं 'साधुस्तव', 'सत्संगस्तव,' 'साधुसत्कार,' 'सद्वर्णन' इत्यादि स्फुट प्रकरणांत संतमहिमा सामान्यपणें वर्णून 'साधुरीति' या प्रकरणांत विशिष्ट संतांच्य चरित्रांतील गुणचमत्कारादि गोष्टींचा उल्लेख स्पष्टपणें नामनिर्देश न करितां केला आहे. तसेंच, त्यांनीं आपल्या सन्मणिमाला, ज्ञानदेवस्तव, चांगदेवस्तुति, नामदेवस्तव, कबीरस्तव, नरसीमेहतास्तव, एकनाथस्तव, रामदासगुणवर्णन, वामनपंडितस्तुति, तुकारामस्तुति, माधवदासस्तुति, वामनादिकीर्तन, महिपतिस्तुति इत्यादि स्फुट प्रकरणांतून त्या त्या संतांचा नामनिर्देश स्पष्टपणें करून त्यांचे चमत्कार, शांति-क्षमादयासमदृष्ट्यादि त्यांचे गुण, त्यांची कविता वगैरे गोष्टींपैकीं कांहीं ठळक गोष्टींचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे. परंतु रामायणभारतभागवतादि ग्रंथांतून वर्णिलेल्या भगवल्लीला बऱ्याच विस्तारानें वर्णन करण्याचा त्यांचा उद्योग चालू असल्यामुळें अर्वाचीन संतांचीं चरित्रें विस्तारपूर्वक वर्णन करण्यास त्यांस सवड–तसें करण्याची पंतांची इच्छा असूनही मिळाली नसावी. संतचरित्रांचें विस्तारपूर्वक वर्णन करण्याचें हें काम महिपतीनें उत्तम केलें आहे. मोरोपंतांची महिपतिबावाविषयीं फार पूज्यबुद्धि असून ते त्यांस विठोबारूप समजत. त्यांनीं त्यांचा भक्तविजय ग्रंथ वाचला असून त्याच्याविषयीं त्यांचे उद्गार असे आहेतः-

( गीति ) 'हरि**भक्तविजय**नामें रचिला सद्ग्रंथ, दोष साराया; ।<br>
वाराया तापांतें, प्राणी भवसागरांत ताराया. ॥'

पंतांनीं महिपतिबावांचें दर्शन घेतलें असावें असें पुढील गीतीवरून वाटतें:-

( गीति ) 'त्या महिपतितें पाहुनि, ऐकुनि, सच्चित्त कां न लोभावें ? ।<br>
शोभावें यश ज्याचें चिर, नमिला विष्णुदास तो भावें. ॥'

महिपतीची वाणी ज्ञानोबा, एकनाथ व मुक्तेश्वर यांच्या वाणीप्रमाणेंच रसाळ व उपकारक असल्यामुळें तिचें लोक प्रेमानें गंगेप्रमाणें स्वोद्धारार्थ सेवन करितात, व त्यांनीं वर्णिलेलीं संतचरित्रे वाचून किंवा ऐकून विषयांत रंगलेल्या लोकांचीं मनें सच्चरित्रांत रमून परमार्थप्रवण होऊन तरतात असें खुद्द पंतांचें ह्मणणें आहे.

( गीति ) 'महिपतिच्या वाणीतें सेवुनि तरतात, जेंवि गंगेतें; ।<br>
विषयांत रंगलें जें जनमानस सद्यशींच रंगे तें. ॥<br>
ज्ञानोबाची जैशी, एकोबाची सुधा जशी वाणी; ।<br>
कीं मुक्तेश्वर कविची; महिपतिची सेवती तशी प्राणी. ॥

( महिपतिस्तुतिगीति ७–८ )'

महिपतीच्या कवितेंत पंतांच्या कवितेंतील प्रौढी, मुक्तेश्वराच्या काव्यांतील कल्पनेची भरारी, वामनी कवितेंतील अध्यात्मबोध, श्रीधराची रसवत्ता व तुकोबाची नैसर्गिक स्वयंस्फूर्ति नाहीं तरी ती फार प्रेमळ, भाविक व रसाळ असून त्यांतील उपमा फार समर्पक, वर्णनें मनोवेधक व नीत्युपदेश उत्तम आहे. संतचरित्रवर्णनांत महिपति तल्लीन होऊन गेला असतां त्यांच्या वाणींतून भक्तिरस ह्या आर्टेशियन जलोद्वारयंत्राप्रमाणें सारखा उसळया मारित बाहेर पडतो. महिपतीच्या ओवीची धाटणी मुक्तेश्वरासारखी नसून श्रीधरस्वामीसारखी आहे. तृतीयचतुर्थचरणांत किंवा चतुर्थ चरणांत एखादें सामान्य तत्व देऊन त्याचा विस्तार करण्याची त्यांची शैली श्रीधरकवीप्रमाणेंच आहे. 'ऐसा शिष्य करूं नये' २. ६७–७०, 'सत्समागमावांचून । प्राप्त नव्हे सर्वथा' २.७३–७५, 'हेंचि लक्षण संतांचें' २.१४७–१५०, 'आह्मा स्त्रियांचे संगतीन । नाश बहुत पावले' ३.५४–५६, 'भूत प्रसन्न जाहलें की' ३.७६–८६ इत्यादि स्थळें पहा. त्यांची वाणी फार विनम्र असून श्रीधरस्वामींप्रमाणें 'आपणास पांडुरंगराय बोलवितो तेवढेंच आपण बोलतों, आपल्या पदरचें यांत कांहीं नाहीं' असे उद्गार त्यांनीं वारंवार काढिले आहेत. ते ह्मणतातः–

'जैशी आज्ञा दिली रुक्मिणीवरें । तितुकींच ग्रंथीं लिहिलीं अक्षरें ।
जैसा वाजविणार फुंकितो वारें । तैशीं वाजंत्री वाजती ॥'

भक्तविजयारंभीं एकनाथ, नामदेव, मुक्तेश्वर, वामन, श्रीधर, बोधलेबोवा, रामदास, केशवस्वामी, गणेशनाथ, साळया रसाळ व कबीर या वरदानी संतांच्या वाणी जशा भगवत्कृपेनें प्रसादसंपन्न आहेत 'तैसीं माझीं प्रसाद बोलणीं वरदवाणी नसे कीं' असें जें महिपतीनें ह्मटलें आहे त्यांत बराच सत्यांश असला तरी शालीनताही असून त्यांची वाणी निःसंशय प्रासादिक असून तींतून भक्तिप्रेमाचे अमृतबिंदु सारखें टपकत असतांना आढळतात. ती 'तार्किकांचा संग टाकून पांडुरंगाचें स्मरण करविणारी' असल्यामुळें तींत तार्किकांची कर्कशता नसून ती अतिशय भाविक, प्रेमळ, सुबोध व रसाळ आहे व ह्मणूनच त्यांचे ग्रंथ श्रीधरस्वामींच्या ग्रंथाप्रमाणेंच अत्यंत लोकप्रिय होऊन खेडोखेडीं लोकांच्या वाचण्यांत येतात. महाराष्ट्रकाव्यवाङ्मयांत संतचरित्रकार ह्मणून महिपति खरोखरीच अप्रतिम आहेत. महिपतिचे चिरंजीव विठोबा गोसावी व मोरोपंत यांचा फार स्नेह होता व विठोबागोसाव्यांनीं सुचविल्यावरून पंतांनीं त्यांच्या वडिलांच्या स्तुतिपर तेरा गीति केल्या. त्यांत महिपतिबावांचें वर्णन फार मार्मिक व गुणग्राहक दृष्टीनें फार सरस केलें आहे. आपणास समकालीन अशा रामजोशी, महिपति वगैरे कवीविषयीं गुणग्राहक दृष्टीनें पाहाणारे पंतासारखे थोर पुरुषही विरळा. शेवटीं, पंतांच्या गोड वाणीनें महिपति-

बावांस नमन करून सच्चरित्रश्रवणवर्णनाची त्यांनीं आह्मांस आवड द्यावी ह्मणून त्यांची प्रार्थना करून हें प्रकरण संपवितों:-

( गीति ) 'अंजलि करूनि असतो गरुड उभा जेंवि अहिपतिसमोर, ।
हरिभक्तिप्रेमगुणें नम्र सदां तेंवि महिपतिस **मोर.** ॥
( महिपतिस्तुति गीति १३ ).'

## ( ऐ ) रामजोशी व मोरोपंतः—

( श्लोक ) "जी नाचली तुणतुण्यावरि पूर्वरंगीं । झाली पवित्र पुढतीं हरिनामसंगीं ।
ती रामजोशिकविची नवपद्यलीला । नाहीं कशी रमविणार महन्मतीला ॥
( लक्ष्मणशास्त्री लेले 'पद्यमंजरी' )"

या सोलापुरकर पंतमित्राची हकिकत मागें ६ व्या प्रकरणांत थोडीशी दिलीच आहे. यांचा जन्म शके १६८४ त होऊन ते शके १७३४ पन्नासाव्या वर्षी मरण पावले. हे दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत होऊन गेले. यांच्या वडिलांचें नांव जगन्नाथ जोशी होतें. त्यांस मुद्गल व राम असे दोघे पुत्र झाले. त्यांत वडील बंधु मुद्गल जोशी ह्यांची संस्कृतज्ञानाविषयीं त्यावेळीं फार ख्याति असून त्यांनीं कालिदासाच्या रघुवंशाच्या धर्तीवर संस्कृतांत यदुवंश नामक काव्य रचिल्याचें सांगतात. रामजोशी हे वीस वर्षांचे झाले तरी त्यांना संस्कृत भाषेचा गंध नसून त्यांचा सर्व काळ तमाशे पाहण्यांत व कडें वाजविण्यांत जातो असें पाहून यांच्या वडील बंधूस यांचा फार राग आला व त्यांनीं अशा मूर्खाचें मी मुखावलोकन करूं इच्छित नाहीं असें ह्मणून यांस घरांतून काढून दिलें. पुढें हे तेथून पंढरपुरास जाऊन मोरोपंतांचे व्याही काशिनाथबावा पाध्ये यांच्या जवळ संस्कृत शिकण्यास तीन वर्षे राहिले. तेथें असतां यांनीं संस्कृतभाषेचा व त्यांतील काव्यसाहित्यादि ग्रंथांचा उत्तम परिचय करून घेतला. पुढें त्यांनीं कर्नाटक प्रांतांत जाऊन तेथें कानडी भाषेचा अभ्यास करून त्यांत चांगलें प्रावीण्य मिळविलें. नंतर ते घरीं सोलापुरास आले. त्यांचें पुराणसमयीं अस्खलित वक्तृत्व व संस्कृतभाषानैपुण्य पाहून वडील बंधूचा यांजवरील राग जाऊन ते यांच्यावर प्रेम करूं लागले. मोरोपंतांच्या संगतीनें यांच्या हातांतील तमाशाचा डफ फुटून त्याच्या जागीं कीर्तनकाराचा तंबोरा आल्याची गोष्ट सुप्रसिद्ध आहे. कीर्तनांत स्वकृत उपदेशपर लावण्याखेरीज हे पंतांच्या आर्या ह्मणत असत. त्यामुळें पंतांच्या आर्यांची चहूंकडे फार प्रसिद्धी झाली. यांच्या लावण्याचे शृंगारपर, वैराग्यपर, उपदेशपर व वर्णनपर असे मुख्य चार भाग पडतात. गणपति, सांब, देवी, राम, कृष्ण, पंढरी, बारशीचा भगवंत, गिरीचा व्यंकटेश इत्यादि देवतांचीं तसेंच सैरंध्री, कृष्णशिष्टाई, भारतीयुद्ध, रुक्मिणी वगैरे कथाप्रसंगांचीं यांनीं केलेलीं वर्णनें फार सरस आहेत. शृंगारप्रेमाच्या लावण्या

यांच्या पुष्कळ असून त्या फार मनोवेधक आहेत. शृंगारपर लावण्यांतच कृष्णचरित्राच्या लावण्या येतात. वैराग्यपर व उपदेशपर लावण्याही यांच्या बऱ्याच आहेत. हे फार बुद्धिमान्, यांची कविताशक्ति लोकोत्तर, वक्तृत्व अस्खलित व वाणी रसाळ असल्यामुळें कीर्तनांत शृंगारवीरकरुणशांत्यादिपैकीं जो रस ते वर्णन करीत तो श्रोत्यांपुढें मूर्तिमंत उभा राही त्यामुळें यांच्या पुराणकीर्तनाला विलक्षण रंग येऊन श्रोते चित्रवत् तटस्थ होत. यांची शृंगारिक कविता ऐकिली ह्मणजे प्रणयी जनांच्या हृद्गत विचाराशीं पूर्णपणें परिचित अशी शृंगारविलासमूर्ति आपल्या पुढें आहे असें वाटतें तर, यांच्या वैराग्यबोधपर लावण्या ऐकून कडकडीत ज्ञानवैराग्याचा पुतळा आपणांस बोध करीत आहे कीं काय अशी भ्रांति पडते. संध्येच्या चोवीस नांवावरील 'केशवकरणी अघटित लीला' ही लावणी ह्मणून यांनीं शंकराचार्यांस प्रसन्न केल्याची आख्यायिका आहे. यांच्या लावण्यांपैकीं पुढील फार प्रसिद्ध आहेतः–उद्धव व गोपी संवाद ('उद्धवजी मधुवनीं…,' 'हरिवांचुनि संसार…'), गोपींचीं गाऱ्हाणीं ('राधा मुखरणमधें मिळाल्या…'), वेणुवादन ('कुंजांत वाजवी वेणू…'), छेकापन्हुति ('राधासखिसंवादी छेकापन्हुति…'), स्त्रीसौंदर्य ('किति गोड सुभगसुंदरी…', 'सुंदरा मनामध्यें भरली…', 'कोण्या ग सुभगाची मदनमंजरी…'), पंढरीवर्णन ('क्षमातळीं इज समान नाहीं…'), वैराग्यपर ('मंदा किति करशिल...', 'नरजन्मामधि नरा…', 'ऐक सज्जना'! अरे मनमोहना' उपदेशपर 'दोंदिवसांची तनु हे साची…' 'भला जन्म हा...', 'बा काय घालिशी...,' 'अरे सख्या ! समजधर…,' 'श्रीनाथ सद्गुरुपदा…,') वसंत ('कुंजांत मधुपगुंजारव…'), कृष्णलीला ('बाई नको जाऊं यमुनातीरीं…,' 'या नंदनंदनें फटफट मन विटविलें…,' 'कारटा तुझा हा द्वाड…,' 'श्रीरंग गोपिकोत्संग…,'), चार भाषांची गैाळण ('याहि याहिं निजभुवनं प्रति…') शृंगारपर ('साजणी समयिं घरधणी...,' तरुणि तवेदं कुचतट…,' 'झाली तरुणपणाची धूळ…,' 'सोन्याचे पायजिवतळीं…,' 'सति सुमति गुणवती…), रामजन्म ('वसिष्ठ मुनिवर ह्मणे नृपाळा!... कौसल्योदरीं,') वरील पैकीं, 'उद्धवजी ! मधुवनीं,' 'हरिवांचुनि संसार,' राधासखिसंवादीं छेकापन्हुति, 'तरुणि तवेदं,' हीं पद्यें केकावलीटीपांतून आलीं आहेत. पृ० १४८,५३२,५४३,५४४. पहा. जोशीबोवांचा स्वभाव फार निर्भीड असून त्यांच्या ठिकाणीं समयसूचकताही चांगली होती. एकदां इचलकरंजीकर घोरपड्यांचे वाड्यांत जोशीबोवांचें कीर्तन अगदीं ऐन रंगांत आलें असतां बोवांस बिदागी काय द्यावी ह्मणून कारभाऱ्यांत कुजबुज चाललेली ऐकून त्यांनीं तेथल्यातेथें पुढील आर्या रचून ह्मटलीः–

'भोजासम कविताप्रिय कर्णासम दानशूर घोरपडे ।
ऐसें असतां माझ्या देणगिचा कां तुह्मांस घोर पडे ? ॥'

ही समयसूचकता पाहून घोरपडे सरदारांनीं खुष होऊन तत्काळ आंगावरील बहुमोलाची शालजोडी काढून जोशीबोवांस पांघरविली व कीर्तन समाप्त झाल्यावर चांगली बिदागी देऊन बोवांचा बहुमान केला. जोशीबोवांनीं लावणी छंदांत काव्य-रचना करून त्यांत बोधवैराग्यपर लावण्या रचून त्या कीर्तनांत ह्मणण्याचा प्रघात पाडल्यामुळें बीभत्स समजला जाणारा हा लावणी छंद तमासगिराच्या फडावरून निघून कीर्तनाच्या सभेत येऊन प्रतिष्ठा पावला. लावण्यांखेरीज 'छंदोमंजरी' ह्मणून छंदःशास्त्रावर यांचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे. तसेंच यांनीं 'मदालसाचंपू' नामक काव्य रचिल्याचेंही ऐकिवांत आहे. यांच्या कवितेनें अप्रबुद्धाप्रमाणें प्रबुद्धांसही चटक लावून सोडली आहे. यांच्या कवितेविषयीं पितापुत्र चिपळूणकरशास्त्री, यशोदा-पांडुरंगीकार दादोबा पांडुरंग इत्यादि आधुनिक विद्वानांनीं फार गौरवाचे उद्गार काढिले आहेत. **कृष्णशास्त्री** ह्मणतातः–'रामजोशाच्या लावण्यांनीं तो तो शृंगार-वीरादि रस, किंवा वैराग्यपर उपदेश जसा मनावर ठसतो तसा इतर छंदांत रचलेल्या कोणत्याही काव्यानें ठसत नाहीं ( शाळापत्रक ).' केकावलीच्या प्रस्तावनेंत **दादोबा** ह्मणतातः–"रामजोशांच्या वेळेस लावण्यांच्या छंदावर कवनें करण्याचा चांगला प्रघात पडून गेला होता; आणि तो छंद साहजिक कर्णास मधुर असल्यानें लोकांची त्यावर आवड पाहून जोशीबोवानेंही आपलीं कवनें बहुधा त्याच मधुर छंदावर रचण्यास आरंभ केला. प्रापंचिक जनाचें मन लुब्ध करण्याकरितां केव्हां केव्हां या रसिक पुरुषानें या छंदांत शृंगाररसही प्रौढ आणि कोमल अशा शब्दांनीं संस्कृत भाषेत तद्रसप्रधान काव्यांत जसा वर्णिला असतो तसा नमुना घेऊन वर्णिला आहे. परंतु त्यांत आणखी इतकी खुबी ठेविली आहे कीं जरी शब्दयोजनेनें तो नमुना घेतला आहे, तरी तो आपल्या कालाच्या लोकव्यवहारास अनुसरून घेतला आहे. आणखी रामजोशाच्या कवनांत दुसरी खुबी अशी आढळते कीं प्रौढ संस्कृत शब्द आणि शुद्ध लौकिक मराठी भाषणांतील केवळ ग्राम्य शब्द, यांची भेळ इतकी बेमालूम केली असते कीं त्यांच्या त्या मिश्रणचातुर्यानें तें सर्व एकरंगी दिसून त्यापासून एक जातीचा विशेष आनंद उत्पन्न होतो. कोणा एका स्त्रीचें सौंदर्य जोशीबोवानें कसें सरस निर्मलवाणीनें वर्णिलें आहे तें पहाः–

'कोण्या ग! सुभगाची मदनमंजरी सांग सखे सुंदरी ॥ ध्रु० ॥
इच्या सौंदर्याची सीमा । झाली गडे रतिहुनि अति उत्तमा ।
पाहुनिया मुखचंद्रमा । सखे ! गडे ! अमा गमति पौर्णिमा ।
काय अधराची रक्तिमा । लाजवी नवकुंकुम विद्रुमा ।
अंगीं वसन जिच्या भर्जरी । कोण्या ग! सुभगाची मदनमंजरी ॥ १ ॥
मज वाटली विद्युन्नटी । भली ग! रूपाची उतरली भटी !
उरिं कंचुकी घट तटतटी । टिळक ललाटीं सुधारसघटी ।

पाहुनी कृशा तव कटी । हरीचा कृशकटिमद लटपटी ।
अशि अनंतगुणगुर्जरी । कोण्या ग ! सुभगाची मदनमंजरी ॥ २ ॥

शिरिं सुंदर नवमल्लिका । झटति वर मधुकर रसकौतुका ।
नयनाननखंजनरंजिका । मधुर कंठांत लाजवी पिका ।
अशी वर्णिल कोण सद्लिका ? । इतर कवि **कविराया**हुनि फिका ।
मज वाटतसे निर्जरी । कोण्या ग ! सुभगाची मदनमंजरी ॥ ३ ॥'

कोठें कोठें त्यांच्या या शृंगाररसांत बीभत्सरसाचेंही मिश्रण आढळतें; तथापि तें लोकव्यवहारास आणि या देशांतील प्राकृत जनाच्या दांडग्या रुचीस अत्यंत अनुकूल असल्यानें तितकें विगर्ह्यतेस पात्र होत नाहीं···रामजोशानें आपल्या लावण्यांत शृंगाररसाशिवाय आणखी भर्तृहरीप्रमाणें वैराग्यविषयही फार सरस वर्णिला आहे. यावरून असें दिसतें कीं रामजोशाचें बाह्याचरण जरी विलासीजनांच्या आचरणासारखें होतें, तरी त्यांचें अंतःकरण केवळ विषयासक्त नव्हतें. आणखी असें दिसतें कीं हे कविराय ज्या ज्या प्रसिद्ध स्थानीं देवदर्शनास गेले त्या त्या स्थानांच्या देवतांचेंही त्यांनीं प्रार्थनापूर्वक गुणवर्णन केलें आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला असतां माझी अशी अटकळ होते कीं, हे फक्कड कविराय आपल्या पहिल्या भरांत त्या काळच्या लोकांची रुचि पाहून उपजीविकेकरितां जरी तमासगिरांच्या मंडळींत शिरले असले, तथापि पुढें आपले कवि मोरोपंत यांच्या प्रौढ, उद्दाम आणि सरस अशा कृतीचें जेव्हां यांस दर्शन झालें तेव्हां ते तीस मोहित होऊन त्यांनीं लोकरंजक डफ टाकून लोकोपदेशक वीणा उचलला असावा; अशी अटकळ करण्यास माझी मनदेवता लावते. पहा त्यांनीं लोकांच्या बाहेरील दांभिकाचरणावर आणि धर्माच्या नुसत्या सोंगावर कसे रेशमी कोरडे लाविले आहेत तेः—

'भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा ! ।
धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु० ॥···

धर्म घडेना वर्म कळेना या मनाला कदा ।
सदा हरि **कविराया**वर फिदा ॥ भला जन्म हा० ॥ ३ ॥'

मग अशा परम रसिक आणि वक्त्या हरिदासाच्या मुखापासून प्रथमतः समंजस लोकांस जेव्हां मोरोपंतांच्या प्रौढ आणि रसभरित आर्यांचें श्रवण होऊं लागलें असेल, तेव्हां त्यांच्या कीर्तिसह त्यांची कृति या देशांत व देशांतरीं प्रसृत होण्यास विलंब लागला नसेल असें सहज अनुमान होतें ( केकावलिप्रस्तावना–यशोदा-पांडुरंगी )." निबंधमालाकार विष्णुशास्त्री ह्मणतातः–"रामजोशीबोवाविषयींच्या लोक ज्या गोष्टी सांगतात त्यावरून ही स्वारी मोठी विलक्षण असावी असें दिसतें. हे पहिल्यानें मोठे फक्कड, रंगेल व फंदी होते; आणि ही वृत्ति यांच्या

शृंगारपर लावण्यांवरून स्पष्ट दिसते. पण पुढें मोरोपंतांच्या आर्यांनीं यांची मनोवृत्ति तन्मय करून टाकून परमार्थाकडे ओढली. ती इतकी कीं, जो वाग्विलासाचा भर प्रस्तुत कवीनें असभ्य काव्यरचना करून रंगेल लोकांस अधिकच व्यसननिमग्न करण्याच्या अनुचित कार्याकडे योजिला होता, तोच पुढें जनांचें मन विषयपराङ्मुख करून आपल्या खऱ्या हिताकडे वळविण्यास त्यानें योजला.'''असो, तर, वर सांगितल्याप्रमाणें रामजोशाच्या लावण्यांत शृंगारवर्णन जसें उत्तम आहे, त्याप्रमाणेंच वैराग्यहि हृदयावर टळटळीत ठसण्यासारखें आहे. वरील लावण्यांत त्यानें याज्ञिकांवर, धर्माचें दंभ माजविणारांवर, वगैरे जो खूप भडिमार करून दिला आहे त्यावरून कवीच्या अंगचा धीटपणा, उद्दामपणा व आवेश हे सर्व गुण व्यक्त होतात ( निबंधमाला–वक्तृत्व )" मोरोपंत ही रामजोश्यांची योग्यता ओळखून होते. ते त्यांस '**कविप्रवर**' म्हणत. पेशव्यांच्या दरबारीं जोशीबोवांस '**अभिनवकालिदास**' ही पदवी मिळाली होती. या सर्व गोष्टींवरून रामजोशीबोवांची कवि या दृष्टीनें योग्यता केवढी मोठी होती हें चांगलें कळून येतें.

## १२ पंतांचे कवितादूषक.

"अनध्वन्याः काव्येष्वलसगतयः शास्त्रगहने-
ष्वदुःखज्ञा वाचां परिणतिषु मूकाः परगुणे ।
विदग्धानां गोष्ठीष्वकृतपरिचर्याश्च खलु ये
भवेयुस्ते किंवा कविभणितिकण्डूतिनिकषाः ॥

( कविराजकृत 'राघवपांडवीय' १.४७ )"

(भावार्थ) काव्यरचनेविषयीं अज्ञ, साहित्यादि काव्योपयुक्त शास्त्राविषयीं अनभिज्ञ, काव्य निर्माण करितांना चित्तास होणाऱ्या क्लेशाविषयीं अपरिचित, अन्यगुणवर्णनाविषयीं मात्सर्यामुळें मूक, तसेंच काव्यनिपुणकवींची सेवा न केलेले असे लोक काव्यपरीक्षक कसे होऊं शकतील ? अर्थात् होणार नाहींत हें उत्तर.

प्रकाश म्हटला म्हणजे तेथें छाया असावयाचीच; त्याप्रमाणें पंतांचे वेळेस त्यांची कविता आवडीनें वाचणारी (बारामतीस) रघुनाथपंत कोशे, पांडुरंगभक्त नारायण भट्ट, अनंत नारायण बावा, (इतर ठिकाणीं) विठ्ठल गोसावी, सदाशिव गोसावी, काशिनाथबाबा पाध्ये, रामजोशी इत्यादि मंडळी होती, तद्वत् प्राकृत म्हणून त्यांच्या काव्याची निर्भर्त्सना करणारी सांप्रतच्या काळाप्रमाणें तेव्हांही कांहीं मंडळी होती. केवढाही मोठा श्रेष्ठ मनुष्य असला तरी त्याचे निंदक असावयाचेच. याविषयीं पुढील उक्ति पहाः–

"इंदुं निंदति चक्रवाकयुगलं, भास्वांनिधिं कौशिकः,
स्वादुक्षीरमरोचकी, सुकृतिनं पापी, जडः पंडितम् , ।

त्यक्तं सर्वजनैः खलः कटुवचा, ग्राम्यः पुमान् नागरं,
कः पैतामहगोलकेऽत्र निखिलैः संमानितो वर्तते ॥"

( अर्थ ) चक्रवाकांचा जोडा चंद्राची निंदा करितो, घुबड सूर्याचा तिरस्कार करितो, तोंडाला रुचि नसणारा रोगी मधुर दुग्धाला नांवें ठेवितो, पापी पुण्यवंताची व मूर्ख पंडिताची निंदा करितो, सर्वांनीं त्यागिलेल्या सत्पुरुषाला दुष्ट कटुभाषणानें दोष देतो व गांवढळ पुरुष शहरांत राहाणाऱ्या चतुर मनुष्यास वाईट ह्मणतो. सारांश, ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या या जगांत सर्वेच ज्याला सन्मान देतात असा कोण आहे ? अर्थात् कोणी नाहीं.

उत्तररामचरितांत राम सीतेविषयीं लोकापवाद ऐकून ह्मणतोः—

"त्वया जगंति पुण्यानि त्वय्यपुण्या जनोक्तयः ।
नाथवंतस्त्वया लोकास्त्वमनाथा विपत्स्यसे ॥ ( अंक १ श्लोक ४३ )"

(अर्थ) सर्व भुवनें तुझ्यामुळें पवित्र झालीं असतां तुजविषयीं लोकांच्या उक्ति मात्र अपवित्र आहेत. तसेंच तूं लोकांस आधारभूत असतां तुला निराश्रित होऊन कष्ट भोगावे लागतात.

सारांश, शेक्सपियर कवीनें ह्यामलेट नाटकांत ह्मटल्याप्रमाणें एखाद्या व्यक्तीचें वर्तन बर्फाप्रमाणें शुभ्र निर्दोष असलें तरी त्याचीही निंदेपासून सुटका होत नाहीं. ('Be thou as chaste as ice, as pure as snow thou shalt not escape calumny.' )

स्वकाव्याची निंदा करणाऱ्या अहंमन्य अरसिक निंदकांना पंतांनीं आपल्या काव्यांतून बऱ्याच ठिकाणीं फटकारे दिले असून आपल्या काव्याविषयीं योग्य अभिमानोक्तिही प्रकट केल्या आहेत ( परिशिष्ट–'उ' ). पंत लिहितातः—

"भक्तमयूरमनोनट नटतो सामान्य, कीं बरा नटतो, ।
श्रीरामचि हें जाणे, उरला व्यापूनि सर्वही घट तो. ॥ ( राजापूर. २६ )"
"बोलूनि डोलवूं हा, डोलवितो जेंवि रसिकशिर कीर; ।
मग चिंता काय ? जडा वाटो याची सदैव किरकीर. ॥ (सन्मनोरथ २७)"

पंतांच्या कवितेवर दूषकांनीं जे आक्षेप घेतले आहेत, त्यांचें खंडण कै० विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं आपल्या 'निबंधमालें'तून, व कै० मल्हार बाळकृष्ण हंस यांनीं आपल्या 'मोरोपंतावरील निबंधां'तून, उत्कृष्ट केलें आहे. शास्त्रीबावांच्या खंडनाचे कांहीं उतारे या चरित्रांतून आले आहेत. येथें हंसाच्या खण्डनाची दिशा कळण्याकरितां त्यांच्या निबंधांतून विस्ताराचा दोष पतकरून आह्मी पुढील उतारा देतों. हंसांचे मोरोपंत, तुकाराम, वामन इत्यादि कवींवरील एकवार मुद्रित पण हल्लीं अनुपलब्ध; तसेंच रामदास, मुक्तेश्वर इत्यादि कवींवरील आजवर मुळींच मुद्रित न झालेले निबंध फार उत्कृष्ट असून ते मुद्रित करणाऱ्यास महाराष्ट्रकवींची सेवा केल्याचें फळ येईल.

## १३ मोरोपंतावरील कांहीं आक्षेपांचें निरसन.

"मोरोपंताची कविता केवळ शब्दचमत्कारमय, नीरस आणि दुर्बोध आहे अशी अर्वाचीन शिकलेल्या लोकांतून कितीएकांची समजूत आहे. परंतु ती अगदीं भ्रांतिमूलक व 'गतानुगतिक'न्यायानें झाली आहे असें आह्मांस वाटतें. एकाद्या उत्तम रत्नास डोळे झांकून चांचपून पाहून तें रत्नच नाहीं ह्मणून ह्मणणें, किंवा अत्युत्तम पक्व आम्रफलास डोळयांनीं पाहूनच आंबट ह्मणून नाक मुरडणें जसें त्या त्या वस्तूचें खरें परीक्षण होत नाहीं, तसेंच पंतांच्या काव्यांत प्रवेश करून यत्किंचितही रसास्वाद ज्यांनीं घेतला नाहीं त्यांचा त्याविषयीं अभिप्राय किती योग्य होईल हें सांगावयासच नको. अहो मोरोपंताच्या कवितेवर भलभलते दोषारोप करणारे लोकहो! तुह्मी पंतांची लहानशी संशयरत्नमाला उगीच उघडून तरी पहा; ह्मणजे तिची प्रसन्न व गंभीर मुद्रा पाहूनच तुमची खातरी होईल कीं, ती रूपगुणयौवनसंपन्न असून अतिसरस आहे.

तशीच सन्मणिमाला, आर्याकेकावलि, नामरसायन, महद्विज्ञापना, सुदामचरित्र, पृथुकोपाख्यान, श्लोक केकावलि, हरिवंश, मंत्ररामायण आणि दुसरीं लहान लहान रचिलेलीं प्रकरणें यांतील कविताही फार सरस आणि प्रसाद, ओज, व माधुर्य या गुणांनीं पूर्ण आहेत.

बृहद्दशम, मंत्रमय रामायण, पूर्णमंत्र व आणखी किती एक रामायणें असे ग्रंथ वाचल्याबरोबर समजण्यासारखे नाहींत. बाकी महाभारताचीं पर्वें, मंत्ररामायण, ब्रह्मोत्तरखंड, मंत्रभागवत, ईश्वरस्तवन, अनेक देवतांचीं व साधूंचीं स्तोत्रें इत्यादि पंतांचे बहुतकरून सर्व ग्रंथ वाचल्याबरोबर समजण्यासारखे सुगम आहेत. त्यांतही ज्या ज्या ठिकाणीं त्यांनीं जगदीश्वराची प्रार्थना अनन्यभावानें लीन होऊन केली आहे, अथवा साधुजनांविषयीं पूज्यभाव धरून उद्गार काढिले आहेत. त्या त्या ठिकाणीं पंतांची कविता मोठी सरस, हृदयंगम, कौतुकप्रद आणि माधुर्यप्रसादगुणयुक्त झाली आहे. तिचा मासला संशयरत्नमाला, सन्मणिमाला, आर्याकेकावलि, श्लोक केकावलि, मंत्ररामायण, विराटपर्व, भीष्मपर्व, कर्णपर्व, इत्यादि प्रकरणें वाचतांना स्पष्ट दिसून येतो.

दुसरें, मोरोपंताचे ग्रंथ त्यांच्या स्वतंत्र कल्पनेचे नाहींत. ते भारत, भागवत, रामायण ह्यांचे भाषांतररूप आहेत, यामुळें स्वतंत्र कल्पनांनीं कविता रचणाऱ्या वर्गांतील मोरोपंत नाहींत, असाही कित्येकांचा समज आहे; पण तीही त्यांची भ्रांति आहे. भारत, भागवत, रामायण यांतील कथासूत्राप्रमाणें पंतांच्या ग्रंथांतील कथा प्रथमदर्शनीं दिसत असल्यामुळें, त्या ग्रंथांचें हें भाषांतर आहे असें वाटतें; परंतु मूळ ग्रंथांतील कल्पना पंतांच्या ग्रंथांत कितपत घेतल्या आहेत हें

जेव्हां प्रत्यक्ष पहावें तेव्हां समजतें कीं, जरी भारतादि ग्रंथांतील कथाच पंतांनीं घेतल्या आहेत, तरी मूळ ग्रंथांतील रचनेहून निराळीच रचना पंतांची झाली आहे; व कवितेस जीवनभूत अशा ज्या कल्पना त्यांत आहेत त्या सर्व पंतांच्याच स्वतंत्र आहेत. तेव्हां एकच कथा अनेक कवींनीं निरनिराळ्या रीतीनें वर्णिली असतां ती प्रत्येकाची स्वतंत्र कविता ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं. तसाच प्रकार मोरोपंतांच्या काव्याचा आहे.

तशांत मोरोपंतांच्या अगदीं स्वतंत्र कल्पनेचे ग्रंथ स्थूळ दृष्टीनें दिसावयाजोगे मुळींच नाहींत असाही प्रकार नाहीं. लहान लहानच पण शेंकडों स्वतंत्र कल्पनेचे ग्रंथही लोकांपुढे असतां ते स्वतंत्र कल्पक कवि नाहींत ह्मणून त्यांस दूषण देणें केवढें साहस आहे !

मोरोपंतांनीं आपल्या कवितेंतून अनेक अर्थ निघावे अशी रचना केली आहे. हेंही त्यांची अरसिकताच दाखवितें ह्मणून कितीएक ह्मणतात. आतां एका पद्या-पासून सरळ, सुंदर आणि निर्दोष असे अनेक अर्थ निघण्याजोगी रचना झाली तर ती रचना करणारा अरसिक होता असें ह्मणणें, अनेक रंगांचीं झांक मारणारी पैठणी विणणाऱ्यास विणण्याचें कौशल्यच माहीत नाहीं ह्मणण्यासारखेंच; किंबहुना अनेक स्वादयुक्त फळांस प्रसवणाऱ्यास विचित्र वृक्षांची सृष्टि करणाऱ्यास सृष्टि-ज्ञानच नाहीं असें ह्मटल्याप्रमाणें होय.

बालभाषेंतील शालिवाहन सप्तशती, संस्कृतांतील गोवर्धन सप्तशती, नैषध, वासवदत्ता, हिंदुस्थानी भाषेंतील सत्सही इत्यादि ग्रंथांत अनेकार्थचमत्कृति केली आहे ती पाहून कोणत्या रसिकास चमत्कारजन्य हर्ष होत नाहीं बरें !

कविता ह्मणजे शब्दापासून किंवा अर्थापासून, किंवा शब्दार्थापासून कांहीं तरी चमत्कृति उत्पन्न व्हावी व ती सहृदयानंदकारिणी असावी. याशिवाय कवितेचा दुसरा कांहीं उपयोग व रूपही नाहीं. त्या अनेक चमत्कारांपैकीं अनेकार्थ प्रसवण्याची खुबी ठेवणें हाही एक चमत्कार आहे. तो कवितेच्या गुणवृद्धीस कारण असल्यामुळें, ज्या कवितेंत तो असेल ती गुणाच्या संबंधानें अधिक वजनदार होईल हें उघड आहे.

मोरोपंतांच्या कवितेंत अनेकार्थ होण्याचा गुण फार क्वचित् ठिकाणीं आहे. यामुळें वरील गुणास कांहीं लोक जरी दोष समजत असतील तरी तो मोरोपंतावर मुळींच लागूं होत नाहीं. यास्तव त्यासंबंधानें विशेष व्याख्यान करण्याचें कारणच नाहीं.

मोरोपंतांच्या कवितेंत कोठें कोठें श्लेषालंकार आढळतो. परंतु तो सर्व पद्य भरून आहे असा फारच विरळ व एखाद्या पदावर ठेविलेला शेंपन्नास ठिकाणीं पराकाष्ठा आढळेल असें आह्मांस वाटतें. प्राकृतांत श्लेष प्रसवण्याची शक्ति मुळींच विरळ.

संस्कृताच्या साहाय्यानें एखाद्यानें प्राकृतांत आणण्याचा यत्न केला तर मात्र तो येण्याचा संभव असतो. मोरोपंतांची श्लेषावर अभिरुचि असती तर तसें एखादें काव्य करण्याचें त्यांना अशक्य होतें असें वाटत नाहीं. ज्यानें रामायणरंगभूमिकेवर आपल्या वाक्सरस्वतीचें नृत्यगायन अनेक कसरतींनीं अक्षरसंबद्ध केलें, तें पाहून मोठा बुद्धिमान् कविही तोंडांत बोट घालून स्तब्ध होईल, इतकी भाषा ज्यांची अंकित झाली होती, त्या पंतांना काव्य करितांना श्लेषपूरक पदें जोडतां आलीं नसतीं काय ? ( मोरोपंतावरील हंसकृत निबंध )"

## १४ पंतांचीं उत्कृष्ट काव्यें.

पंतांनीं नामरसायनांत स्वरचित काव्यांपैकीं आपणास जीं उत्तम वाटतात, त्यांची नामावली दिली आहे. महाराष्ट्र वाचकांपैकीं ज्यांना पंतांचे सबंध ग्रंथ किंवा त्यांचीं भारताचीं अठरा पर्वे वाचण्याची सवड नसेल त्यांनीं तेवढीं तरी काव्यें वाचावीं म्हणून त्यांचीं नांवें पुढें दिलीं आहेत:–'हनुमन्नाटकाची बरोबरी करणारें मंत्ररामायण,' कृष्णविजय, 'मणिगणीं खचित प्रन्हादविजय,' 'सुधानदीसदृश कुशलवचरित,' संशयरत्नावली, साधुसत्कार, ( आर्या व श्लोक ) केकावली, नामसुधाचषक, रामनामार्या, आर्यामुक्तामाला व नामरसायन. श्लोक केकावलि हें खंड स्तोत्रकाव्य पंतांनीं आपल्या वयाच्या अगदीं अखेरीस रचिलें. त्यानंतर त्यांना श्रीरामाचा सगुण साक्षात्कार झाला अशी जी वृद्धपरंपरागत समजूत प्रसिद्ध आहे, ती योग्यच दिसते. 'भववनीं त्रितापदवपावकें' ज्याची तनू होरपळून गेली म्हणून 'कारुण्यांभोदरामा'पाशीं अत्यंत 'करुणस्वरें' टाहोवर टाहो फोडणाऱ्या एकनिष्ठ मयूरभक्ताला जर रामांनीं दर्शन देऊं नये तर मग तें द्यावें तरी कोणाला ? परमहंस स्वामीरामकृष्ण, तच्छिष्य विवेकानंद, स्वामी रामतीर्थ या अर्वाचीन संतांनाही जर सगुण साक्षात्कार झाल्याचें आपण वाचतों व आपल्यापैकीं पुष्कळ चौकस आधुनिक विद्वानांचा त्यावर विश्वासही बसतो, तर मग मोरोपंत, वामनपंडित, मुक्तेश्वर, श्रीसमर्थ, एकनाथस्वामी इत्यादि भक्तीच्या सुधासागरांत खोल बुडी मारणाऱ्या प्रेमळांना सगुण साक्षात्कार झाला यांत आश्चर्य मानण्याजोगें काय आहे ?

पंतांचें चरित्र व काव्यविवेचन यांचें आतांपर्यंत विवरण झालें. पंतांनीं आपल्या वयाच्या चोवीस वर्षांपासून काव्यरचनेस आरंभ केला. तो उद्योग त्यांनीं अगदीं शेवटपर्यंत चालविला. त्यांची सुमारें छपन्न हजार कविता आजवर छापून प्रसिद्ध झाली असून शोधकांस आणखी कांहीं कविता उपलब्ध होण्याचा संभव आहे. त्यांच्या कवितेमुळें महाराष्ट्रांतील एक महाकवि अशी जी त्यांची प्रसिद्धि झाली ती यथार्थ असून तिच्याच योगानें त्यांचा प्रपंच व परमार्थ दोन्ही उत्तम रीतीनें पार पडला. त्यांची वाणी शुद्ध, जोरदार, प्रासादिक, मधुर, गुणगणसंपन्न, अलंकारमंडित, व नवरसपरिप्लुत असून अत्यंत विनयशील व भक्तिमती असल्यामुळें ती

महारसिकांच्या श्रवणरूपी अंगणांत पुनः पुनः आली तरी त्यांना तिचा वीट न येतां उलट तिला पाहून व तिचें परपुरुष जो परमेश्वर त्यापुढील नृत्ययुक्त संगीत ऐकून त्यांचीं अंतःकरणें भक्तिप्रेमानें गारीगार होतात. ज्यांना आमच्या या मयूराच्या सरस्वतीचा वीणानाद श्रवण करून आनंद होत नाहीं ते खरे हतभागी!

## १५ मोरोपंतांचें वैकुंठास प्रयाण.

"Life's race well run,
Life's work well done,
Life's crown well won,
Now comes rest."

शके १७१५ त केकावली, रामरीति इत्यादि लघुकाव्यांची रचना केल्यावर शेवटीं शेवटीं त्यांना फार थकल्या सारखें वाटून 'आपण आतां फार दिवस जगत नाहीं, श्रीरामरायाचा उत्सव करून लवकरच आपण परधामास जाणार' असें त्यांनीं आपल्या आप्तेष्टांस सांगितलें. याच सुमारास त्यांनीं 'प्रांतप्रार्थना' (=मरणसमयींची प्रार्थना) ह्मणून अठरा गीतींचें एक सुंदर लघुकाव्य रचिलें व आप्तेष्टांस मरणसमयीं करावयाचें कर्तव्य सांगून ठेविलें. हें लघुकाव्य फार गोड व हृदयद्रावक असून त्यांत पंतांच्या मरणसमयींच्या आकांक्षा उत्तमरीतीनें सांगितल्या आहेत. त्यांतील थोडेसे वेंचे येथें देतोः—

( गीति ) "दुग्धादिस्वरसें बहु पोषण केलें सदैव, गाई हो! ।
गोमयदानें अंतीं मज दीना उद्धराचि आई! हो! ॥ १ ॥
विश्वंभरे! क्षमे! तूं देउनि शयनार्थ दर्भ, कामांतें ।
या पुरवुनियां, अंतीं देवि! करीं धन्य अर्भका मातें. ॥ २ ॥
माते! तुळसि! असो तव दळ वदनीं; मूळ मृत्तिका भाळीं; ।
प्राणावसानसमयीं, इतुकीच दया करूनि सांभाळीं ॥ ३ ॥
जो शुचि, सगुण, सुवृत्त, प्रभु मन घालुनि सुखांत तो याची; ।
गंगे! न मगे अणिकां, कणिकाचि पडो मुखांत तोयाची. ॥ ४ ॥
सर्वेहि उपाय दुष्कर, करिती ज्यांतें जपोनि योगी ते.!
अंतीं सुश्लोक तुझा थोडासा तरि मुखांत यो गीते! ॥ ५ ॥
अंतीं हें आस्य वसिव, जेंवि दशरथास्य रामनामा! तें. ।
त्वत्कामनाचि वाढो; न स्पर्शो अन्य कामना मातें. ॥ ६ ॥
भगवज्जनहो! वंदुनि पदर पसरितों, असेंचि द्या स्मरण; ।
तरण तसें मज पाजा श्रीहरिहरनाम, पातल्या मरण ॥ ७ ॥
मोहाया न करावा प्रांजलि जो मी मयूर या तजर (=आक्रोश)
आप्त मुदित हो! सुखवा हरिनामाचा करूनियां गजर ॥ ८ ॥

त्रैलोक्यपावनत्वें भगवज्जनमंडळीच गंगा हो ! ।
यास्तव, अंगीं माझ्या प्राप्त इचें सन्निधान अंगा हो. ॥ ९ ॥
( प्रांतप्रार्थना )"

शके १७१६ च्या गुढीपाडव्यास गुढी उभारून रामनवमीच्या उत्सवास पंतगृहीं सुरवात झाली. आठ दिवस रोज भजन, कीर्तन व अध्यात्मरामायणाचें पारायण होऊन नवमीस पारायण संपून श्रीरामप्रभूच्या जन्माचें कीर्तन झालें. दुसऱ्या दिवशीं पारण्याचे दिवशीं यथाशक्ति ब्राह्मणभोजन होऊन उत्सव आटपला. उत्सवांत प्रारंभापासूनच पंतांना अस्वस्थता वाटूं लागली होती. परंतु त्यांच्या नित्य स्नानसंध्यादि व नैमित्तिक पारायणादि क्रियांत त्यांनीं अंतर पडूं दिलें नाहीं. उत्सव चालू होता तोंपर्यंत मनाच्या उत्साहामुळें त्यांनीं प्रकृतीस जुमानिलें नाहीं. परंतु त्यामुळें उत्सव संपल्यावर एकादशीस त्याना जोराचा ताप येऊन अंथरूण धरावें लागलें. एक दोन दिवसांत ताप कमी न होतां उलट जास्तीच वाढला. आप्त औषध घेण्यास सांगूं लागले. परंतु आतां 'अच्युतानंतगोविंदनामोच्चारणभेषजा'शिवाय दुसरें औषध घ्यावयाचें नाहीं, माझा काळ समीप आला, आतां तुह्मी माझ्या जवळ बसून गीता, विष्णुसहस्रनाम यांचे पाठ करा, मोठ्यानें भगवन्नामाचा गजर चालूं द्या, संतमंडळींना बोलावून भजन करवा, मीहि भगवच्चिंतन करितों, रडारड करून कोणी माझ्या चिंतनांत विघ्न आणूं नका असें परोपरीनें पदर पसरून पंतांनीं आप्तेष्टांस बजावून त्यांचें समाधान केलें. पंतांचे चिरंजीव, पत्नी, बंधु वगैरे आप्तेष्ट ही मंडळी तरी त्यांच्या सत्संगतींत तयार झालेलीच होती. त्यांनीं आपलें दुःख आवरून पंतांच्या सांगण्याप्रमाणें सर्व व्यवस्था केली. पंतांच्या भोंवती रात्रंदिवस गीतादि पवित्र ग्रंथांचीं पारायणें व नामगजर चालू झाला. बारामतींत लहानथोर सर्व भक्तमंडळीना पंत फार प्रिय असत. त्यांनीं आपसांत पाळया ठरवून पंतांच्या वाड्यांत त्यांच्या समोर अहोरात्र प्रेमळ करुणापर अभंग, पदें वगैरे ह्मणून भजनाचा गदारोळ सुरु केला. तो पाहून पंतांच्या समाचारास येणारी मंडळी खेद विसरून त्यांना रामनवमीनंतर मारुतिजन्मानिमित्त पंतगृहीं जणुं काय एक मोठा उत्सवच सुरु आहे असें वाटूं लागलें. चतुर्दशीस रात्रीं गोमयानें जागा सारवून, दर्भ आंथरून घोंगडी घातली व त्यावर पंतांना निजविलें. त्यांची वाचाशक्ति शेवटपर्यंत शाबूत होती. त्यांचें तोंडानें हळुहळु भगवन्नामोच्चारण सुरू होतें. मुद्रा प्रसन्न व सतेज दिसत होती. सर्वांनीं मारुतिजन्माची वेळ न चुकवितां बरोबर सूर्योदयीं गुलाल फेकावा असें सांगून सूर्योदयाच्या किंचित् पूर्वी ज्येष्ठपुत्रास मांडी देण्यास सांगितलें. त्यानें वडिलांच्या मुखांत तुळशीचें पान व कुपींतील गंगोदक घालून कपाळास तुळशींतील मूळमृत्तिका लाविली. चैत्रशुक्लपौर्णिमा मंगळवारचा दिवस उजाडला. पंतांचें हरिहर नामोच्चारण चालू होतें. पंतांच्या भोंवती त्यांना माहेरास नेण्याकरितां सुग्रीव हनुमंतादि रामभक्त

व श्रीज्ञानेश्वर तुकारामादि संतमंडळी जमली. पडल्या पडल्या नमस्कार करून पंतांनीं त्यांचें स्वागत केलें. बरोबर सूर्योदय होतांच 'रामदूत हनुमान्की जय' ह्मणून सर्वांनीं गुलाल उधळला. त्याच वेळेस मोठ्यानें त्रिवार 'राम' ह्मणून पंतांनीं आपल्या इष्टदेवतेस हात जोडून नमस्कार केला व आपल्या प्राणज्योतीचें विसर्जन केलें. आटपलें ! अशा रीतीनें आपुलें आयुष्य महाराष्ट्रकवितेची अभिवृद्धि करण्याकडे खर्च करून श्रीरामभक्त मोरोपंत आपल्या वयाच्या ६५ व्या वर्षी शके १७१६ (चैत्र शुद्ध १५) आनंदनाम संवत्सरीं मंगळवारीं म्हणजे सन १७९४ त श्रीमारुतिजन्मकाळीं श्रीरामस्मरणांत आपल्या स्थूल पांचभौतिकदेहाचा त्याग करून श्रीरामरूपी समरस झाले. त्यासमयीं सर्वत्र 'मारुति राया बलभीमा ! । हो ! बलभीमा ! । द्या मज रामभजनीं प्रेमा ॥' वगैरे प्रेमळ भजनांचे गजर सुरु झाले. कांहीं वेळानें भजन आटोपल्यावर पंतांचा जड देह पुष्पहारांनीं व सुगंधी द्रव्यांनी झांकून त्याला विमानांत ठेविला व दिंडीवाल्यांच्या भजनगजरांत मंडळी स्मशानांत गेली. तेथें यजमान पांडुरंगराय जोशी यांनीं जवळच्या मंडळीस आज्ञा करून व्यवस्था करण्यास आधींच सांगून ठेविलें असल्यामुळें चंदनकाष्ठांची सुगंधद्रव्ययुक्त चिता तयार होतीच. त्यावर पंतांचा जड देह ठेवून त्याला त्यांच्या चिरंजीवांनीं चितेस प्रदक्षिणा घालून अग्नि लाविला. चार घटकांत देह भस्मसात् होऊन मंडळी मोरोबाबांचे गुण वर्णन करीत करीत घरीं परतली. यजमान पांडुरंगरायाचा हेतु पंताच्या दहनभूमीवर राममंदिर बांधावें असा होता. परंतु पंतांनीं मरणापूर्वीच आपल्या अस्थि पंढरीस चंद्रभागेत टाकाव्या ह्मणून सांगून ठेविलें असल्यामुळें मंदिर वगैरे कांहीं न होतां पंतांच्या सांगण्याप्रमाणें त्यांच्या अस्थींचें मंडळीने पंढरीस जाऊन चंद्रभागेच्या डोहांत विसर्जन केलें. त्यानंतर थोड्याच दिवसांत पंतांचें घराणेंहि कायमचा वास करण्यास पंढरीस निघून गेलें. कवि मयूराचा जड देह गेला परंतु त्याचा कीर्तिरूप देह मागे राहिला असून त्याचा सुगंध उत्तरोत्तर वाढतच आहे. अभिज्ञांच्या मतें जोंपर्यंत महाराष्ट्रकवितासरस्वती आपल्या वीणेच्या झणत्काराच्या तालावर पायांतील पैंजणांचा रुणत्कार करीत नृत्य करीत राहील तोंपर्यंत तिचा मयूर तिच्या बरोबर राहून कारुण्यांभोद रामाचें स्मरण करीत आपला संपूर्ण पिसारा उभारून आपल्या सुस्वर केकारवानें तिची आनंदानें साथ करीत राहील. त्या सरस्वतीप्रियरामघनमयूरास आमचे शतशः प्रणाम असोत !

मोरोपंत कवीच्या मरणानंतर लवकरच ह्मणजे इ. स. १८१८ सालीं महाराष्ट्र साम्राज्य नष्ट झालें. मुकुंदराजापासून मोरोपंतापर्यंत सर्व कवि महाराष्ट्रांत स्वतंत्र राज्य असतांनाच उदय पावले. साम्राज्याच्या ऐन भरभराटीच्या अमदानींत ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, वामन, श्रीधर, रामदास, मोरोपंत इत्यादि कविवर्यांनीं आपल्या काव्यसौंदर्यानें महाराष्ट्रभाषेला जें विलक्षण ऐश्वर्य आणिलें तें महाराष्ट्रसाम्राज्य

नष्ट होतांच मावळलें. त्यानंतर आजपर्यंत ज्ञानेश्वर, तुकाराम, मोरोपंत इत्यादि महाकवींच्या तोडीचा एकही कवि झाला नसून 'पूर्वींचें काव्यतेज, तीं सहज स्फूर्ति, आणि ती अपूर्व दीप्ति यांचा सांप्रतकाळीं लेशमात्रही कोठें दिसत नाहीं. अर्थात् पारतंत्र्यानें तें सर्व कांहीं नष्टच झालें.' न्यायमूर्ति रानडे ह्मणताते:—

"By the side of the works of these ancient poets, we can hardly name any of those who have distinguished themselves in this department of Marathi literature, since the British conquest of the Deccan. Somehow the Poetic fire has become extinct with the loss of political power. (The Growth of Marathi Literature)."

इ. स. १८६६ पासून इ. स. १९२५ पर्यंतच्या कालांत ओक, कानिटकर, कीर्तिकर, कुंटे, कोल्हटकर, खरे, गडकरी, चिंतामणपेठकर, टिळक, टेकाडे, ठोमरे, पाळंदे, बेहरे, महाजनी, मोगरे, रानडे, लेंभे, लेले इत्यादि आधुनिक कवींनीं मराठींत साधारण बऱ्यापैकीं लहान मोठी काव्यरचना केली आहे. 'परंतु ह्यापैकीं कोणांतही मुकुंदराजाची सहजस्फूर्ति व सरलता, ज्ञानदेवाची व्यंजकता आणि मर्मज्ञता, नामदेवाचा काव्यौघ व प्रेमरस, एकनाथाची सतेजता आणि काव्यदीप्ति, मुक्तेश्वराचें नैसर्गिक माधुर्य व रसिकता, तुकारामाचें नैतिक स्फुरण आणि तादात्म्य, रामदासाचे अपूर्व वाग्बाण व अलौकिक अंतर्दृष्टि, वामनाचें विचारगांभीर्य आणि वाग्वैभव, श्रीधराची वर्णनशैली व प्रसाद, अमृतरायाचें पदलालित्य आणि रसज्ञता मयूराचें भाषावैदग्ध्य व सुरम्य वैचित्र्य, महिपतीची उत्कट भक्ति आणि चारुमुग्धता, रामजोशाचा तीव्राघात व सहजविलास, अनंतफंदीचें सौरभ्य आणि कोमलता इत्यादि गुण कोठें देखील दृग्गोचर होत नाहींत (भारतीय साम्राज्य नाना पावगीकृत, पुस्तक अकरावें)."

शेवटीं, पंतांनीं पंचवटींत श्रीरामापाशीं मागितलेला पुढील उत्कृष्ट वर त्यांना व आह्मां सर्वांस मिळावा म्हणून त्या सच्चिदानंद परमेश्वराची अनन्यभावें प्रार्थना करून आम्ही पंतांच्या ह्या चरित्राची येथेंच **इतिश्री** करितोंः—

"श्रीरामा! नाम तुझें माझ्या वदनांत सर्वदा राहो, ।
साहो मन भोगांतें, गृहचिंतेतें न हें कधीं वाहो ॥ १ ॥
तूं माय, बाप, बंधु, प्राणप्रिय मित्र, सोयरा, रामा! ।
जडजीवा नाम तुझें प्रतिपाळी बाळका जसा आमा ॥ २ ॥
तुज हात जोडितो जो त्याचे अपराध घालिसी पोटीं, ।
साधु कवी बहु गाती श्रीरघुवीरा! तुजीं यशें मोटीं ॥ ३ ॥
सीताकांता! वीरा! धीरा! मज पाव राघवा! देवा! ।
दे वास पदीं चित्ता नित्य प्रेमें घडो तुझी सेवा. ॥ ४ ॥

संतांचा संग घडो, कीर्ति तुझी सर्वदा पडो कानीं ।
आवडि फार धरावी श्रीरामा! तव गुणांचिया गानीं. ॥ ५ ॥
नमितां श्रीरामा! त्वां तत्काळ दिली बिभीषणा लंका, ।
यास्तव मी अपराधी आलों शरण त्यजूनियां शंका. ॥ ६ ॥
चरणरजेंचि अहल्या उद्धरिली त्वां असें मला कळलें, ।
ह्मणुनि विनवितों रामा! निर्मळ हें मन करीं अघें मळलें. ॥ ७ ॥
सुग्रीवाची चिंता हरिली मारूनियां बळी वाळी, ।
शरणागतासि जैसा पाळिसि तैसा न बापही पाळी. ॥ ८ ॥
तूं सागर करुणेचा रामा! तुजलाचि दुःख सांगावें ।
तुज सोडुनि इतरांला, दीनें पसरोनि तोंड कां गावें? ॥ ९ ॥
श्रीरघुनाथा! जपतो श्रीशंकरही सदा तुजें नाम, ।
बा! तूंचि लहानाचे थोराचे सर्व पुरविसी काम. ॥ १० ॥
मुक्त अजामिळ झाला नामें, तरली तसीच ते गणिका, ।
रामा! मज फार नको, नामसुधेची तुझ्या पुरे कणिका. ॥ ११ ॥
नाम मुखाला येतें परि निववीना मनासि अद्यापी! ।
विषयार्तें वांछितसे, अमृत प्राशूनि कोण मद्या पी? ॥ १२ ॥
कां गुण न करी? न कळे! नामें तों सर्व दुःख उडवावें, ।
प्रभु पाहतां पदांनीं दुष्टें दीनासि काय तुडवावें? ॥ १३ ॥
अपराधशतहि घडतां दीनीं न कधींहि नाम रागेलें ।
रामा! धन्य न करितां त्यजुनि न कोणाहि पामरा गेलें. ॥ १४ ॥
माझें सत्व पहातें श्रीरामा! नाम हें तुजें काय? ।
परम सदय तें दीना लावील कसें ह्मणावया 'हाय!' ॥ १५ ॥
रामा! तव नामाचें तें तेज क्षीण कलियुगीं जालें ।
हें तों न घडे, गातां यास सुखें दासवृंद बहु धाले! ॥ १६ ॥
करुनि प्रसाद कुतुकें न कळों दिधला सुदामदेवास ।
करिसि तसें बहुधा या भक्त**मयूरा** पदींच दे वास. ॥ १७ ॥
रामा! मेघश्यामा! कामारातिप्रिया! रमाधामा! ।
बा! माय जसी आमा, या माझ्या दे मुखीं सदा नामा. ॥ १८ ॥

( मोरोपंत 'पंचवटीस्थरामप्रार्थना' )"

*** श्रीराम जयराम जयजयराम ***

---



# मोरोपंताच्या चरित्राचीं परिशिष्टें.

## परिशिष्ट 'अ'-मयूरकविस्तुति.

'जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः । नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम् ॥
(भर्तृहरिः)'.

### १ सुप्रसिद्ध सुश्लोकलाघवकार विठोबा अण्णा दप्तरदारकृत.

**(श्लोक)** इह मुख्यकलोपेतो कोऽभवत्कविनायकः ।
इति मीमांस्यमाने तु **मयूरेशः** स्मरत्यलं ॥ ( सुश्लोकलाघव ४१३ )

ह्या जगांत ज्याची कविता उत्तम काव्यगुणांनीं मंडित आहे असा कोणता कवि श्रेष्ठ झाला असा प्रश्न निघाला असतां मला **मयूरेशाची** (मोरोपंताची) फार आठवण येते. ('कविनायक' शब्दांतून आरंभीचा 'क'कार काढिला असतां 'विनायक' म्हणजे मयूरेश किंवा गणपति उरतो, असा दुसरा अर्थ.)

**(श्लोक)** आर्यार्पितमहानंदः सर्वलोककृतादरः ।
विराजते **मयूरेशः** कलाधरशिरोमणिः ॥ ( ४१४ ).

आर्यावृत्तांत ग्रंथरचना करून ज्यानें मोठा आनंद दिला व ज्याचा सर्व लोक आदर करितात असा कविश्रेष्ठ **मयूरेश** (मोरोपंत) चांगल्या रीतीनें शोभा पावतो. पक्षीं, जो आर्यलोकांस अर्थात् भक्तिमान् लोकांस किंवा आर्या पार्वती हीस आनंद देतो, सर्व लोक ज्याची भक्ति करितात, ज्यानें मस्तकावर चंद्र धारण केला आहे असा **मयूरेश** गणपति उत्तम प्रकारें शोभतो.

**(श्लोक)** अतिचित्रकलापाढ्यः सदारामपरस्थितिः ।
कारिकाजनितानंदो **मयूरेशो** विराजते ॥ ( ४१५ )

ज्यानें अतिशय चमत्कृतियुक्त अशी ग्रंथरचना केली, ज्याचें श्रीरामाचे ठिकाणीं (रामोपासक असल्यामुळें) सर्वदा लक्ष्य आहे, भारतभागवतरामायणादि विस्तृत-ग्रंथांचें साररूपानें ज्यानें वर्णन केलें असा **मयूरेश** (मोरोपंत) शोभतो. ( **मोर-पक्षीं,** ज्याचा चित्रविचित्र पिसारा आहे, ज्याला सदोदित बगीचांत राहणें आवडतें, कालिका म्हणजे मेघमाला हिला पाहून ज्याला हर्ष होतो असा उत्तम मयूरपक्षी फार शोभतो; **गणपतिपक्षीं,** चित्राराशी अतिक्रांत झाल्यावर येणाऱ्या आश्विनपौर्णिमेच्या कलापानें म्हणजे चंद्रानें जो युक्त आहे, रामध्यानतत्पर शिवाच्या जवळ ज्याचें नेहमीं राहणें, कालिका (पार्वती) ही ज्याला आनंद देते असा मयूरेश्वर गणपति उत्कृष्टपणें शोभतो.

(गीति) आर्याछंदें जोडुनि रामायणभारतादि आयकवी ।
नायक वीरकवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ? ॥

## २ मोरोपंताचे व्याही धर्मसिंधुकार काशीनाथबाबापाध्येकृत

(गीति) ऐकुनि विश्व सुखावे ज्या **केकीचा** अपूर्व तो टाहो ।
त्याला ईशकृपेनें आयुष्याचा कधीं न तोटा हो. ॥

( अर्थ ) 'ज्या मयूराचा टाहो ह्मणजे करुणाविलाप वाचून किंवा ऐकून विश्वांतील रसिकलोक आनंदभरित होतात तो हा **केकी** ह्मणजे कवि मयूर चिरकाल नांदो व रसिकांस केकावलीकाव्यासारखीं पुष्कळ सुरस काव्यें वाचावयास किंवा ऐकावयास मिळोत' असा या गीतींत **बाबापाध्ये** पंतांस भगवंताचा आशिर्वाद मागतात.

## ३ मोरोपंताचे चिरंजीव रामकृष्णपंतकृत.

(गीति) श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवां कविता ।
असता जरि भूमिवरी सुरगुरु तरि तोहि मान वांकविता. ॥ १ ॥

## ४ मोरोपंताचे समकालीन प्रसिद्ध 'लावणी'कार रामजोशीबोवा सोलापुरकरकृत.

(गीति) वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी, ।
पक्ष श्रीहरि धरि जरि काय न करि जो अनंतमाया वी. ॥ १ ॥

## ५ बारामतिस्थ मयूरभक्तकृत.

(गीति) आर्या तरुचा पक्षा त्या गा वारामतींत मोराशीं, ।
आर्यात रुचा, पक्षा त्यागा बारा मती तमोराशी. ॥ १ ॥
आर्या कविता कीजे एका बारामतींत मोरानें, ।
अन्य कवी ते करिती, फिरती बारामती तमोरानें. ॥ २ ॥
बा ! राम तींत आहे ह्मणउनि बारामती असें नांव, ।
तींत वसे तो मोरोपंत भवाब्धींत जींत नव नाव. ॥ ३ ॥
केवळ तो शुकचि खरा, बारामतिला न मोर माना हो ! ।
स्मरतो बारामतिला, बा ! राम तिला नमो रमानाहो. ॥ ४ ॥

( काव्येतिहासांतील मोरोपंताचें चरित्र ).

## ६ रामचंद्र बडवेकृत.

(गीति) भगवत्तनू हरिकथा करि आर्यांनीं अलंकृतीयुक्त, ।
मोरेश्वरपंताची ह्मणती पंडित अलं कृती युक्त. ॥ १ ॥
मोरेश्वरपंताची ऐकुनि कविता मनीं सुकवि लाजे ।
पावे विवर्णता तें मी किति वर्णूं जनीं सुकविला जे. ॥ २ ॥

मोरेश्वर पंताची कविता रसनिपुण सत्सभागेया ।
अभिमानें सेर्ष्य कवन करितां सम सुरभिवास भागे या. ॥ ३ ॥
अक्षरसंगति, यमकें, सुशब्द, अर्थोन्चिया चमत्कृतिला ।
पाहुनि भुले कवि म्हणे बुडवूं या काय मीच मत्कृतिला. ॥ ४ ॥
आर्या केका करितच्चि शिरला वाटे मयूर यमकवनीं, ।
सुजनासि फार पीडिल ह्मणुनि भुलविला किरातयम कवनीं. ॥ ५ ॥
यत्स्थिति पहतां मूर्धा डोलविला निज असेल जनकानें, ।
यच्छांति यत्सदयता ऐकोनि किती शिके सुजन कानें. ॥ ६ ॥
आर्या अर्थविचारें गातां ही सुस्वर शिकतांना ही ।
अक्षरसंगति यमकें वेधी मन जेंवि रसिक तानांहीं. ॥ ७ ॥
कवितेंत भाषणांतहि भासे मृदुतेकरोनि शुकपिकसा, ।
विश्वफळ श्रीरामा घाली कव तेंचि हा शिशु कपि कसा ? ॥ ८ ॥
सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची, ।
ओवी ज्ञानेशाचीं, किंवा आर्या मयूरपंताची. ॥ ९ ॥
अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथग्रस तीं ।
भारतभागवतादि ग्रंथ करी मान्य जे समग्र सतीं. ॥ १० ॥
सर्वोत्कृष्ट कवन करि परि बाधे गर्व लेशही न जया ।
सत्कुलज नम्रता धरि गुणनिभृतत्वें न होय हीनज या. ॥ ११ ॥
कठिण ग्रंथ म्हणुनियां आर्यातें निंदिती, न सुकवी ते; ।
मोठ्या मोठ्या कविचे मान्या यद्गुणिति ओष्ठ सुकवीते. ॥ १२ ॥
सुजनोत्थ कवनसद्रस दुष्टास न घेववूं सके कानीं ।
संतोष मयूराच्या काय बिडालास होय केकांनीं ? ॥ १३ ॥
सुस्वर कंठें रसिकें आर्या गातां मयूरबाबाची ।
वेधी सुजनमनातें न तशी धुन ऐकतां रबाबाची. ॥ १४ ॥
खग शब्द ब्रह्मज्ञा, म्हणउनि शुक धरितसेचि अभिधान, ।
हा धरि मयूरपंतहि आणी गौणत्व यासि अभिधा न. ॥ १५ ॥
वानी पंढरि, न तसें साकेतातें गयाविमुक्तातें, ।
वर्णी भक्तां, न तसें विरक्तसंन्यासिभवविमुक्तातें. ॥ १६ ॥
कवन सुरेंद्राद्यमरां मिळतें तरि हें सदार सिकते ते, ।
साखर मिळतां सेविल नामाभासें उदार सिकतेतें ? ॥ १७ ॥
हें मिळतां अन्य न मनि, घृत मिळतां जेंवि सद्रसिक तेला; ।
वणिज न गंगेच्याही आणुनि पावेल भद्र सिकतेला. ॥ १८ ॥

रामायणभागवतीं मंत्रोद्धारेंचि रामहरिपूजा ।
संपादी, म्हणुनि भिउनि कामादिक देति हे मह रिपू जा. ॥ १९ ॥
कवनश्रवण करुनि खळ मानव न रमेल येथ न रमो; तें ।
परि सज्जन श्रुतीतें भूषविलचि तेंवि जेंवि नर मोत्यें. ॥ २० ॥
केकारवें मयूरें विठ्ठलघनकाय जाण नाचविला, ।
ऐशाही कवनाच्या पशु तो नर काय जाणना चविला. ॥ २१ ॥
या जन्मतांचि गेल्या काशीरामेश्वरा नमायाला, ।
प्रौढपणीं आर्यातें जगतीतलही पुरे न मायाला. ॥ २२ ॥
आर्याग्रंथ रचुनि बहु विठ्ठलचित्तासि तोषवी फार ।
त्या मोरेश्वरपंता माझा साष्टांग हा नमस्कार. ॥ २३ ॥
मोरेश्वरपदपद्मा चोविस आर्यामयें कुसुमदामें ।
पूजियलें नतिपूर्वक भावें **वडवोपनामकें रामें** ॥ २४ ॥
( काव्येतिहाससंग्रह–अनेककविकृतकविता भाग २ रा )

## ७ सुप्रसिद्ध महाराष्ट्रपंडित व मयूरभक्त परशुराम तात्या गोडबोलेकृत.

**(गीति)** घाली प्रभुच्या कंठीं **सन्मणिमाला** रचोनि जो भावें ।
तेणेंही त्या सत्तममाळेंतचि तत्समान शोभावें. ॥ १ ॥

## ८ कोल्हापुरस्थ लक्ष्मीपूजक दाजिमुनीश्वरकृत.

**(गीति)** कविता मयूरकविची, तीस मना ! सुरभि मान, वाचा वी ।
तीच सतत, निरसाया कविंहीं निजदुरभिमान वाचावी. ॥ १ ॥
म्यां श्रीमयूरकविपरि न परिसिला सकल कवि महीवरता; ।
साजेना कां तैशा त्या कविला सकलकविमहीवरता. ॥ २ ॥
श्रीमन्मयूरकविच्या होय जसें सुख रसिकजनां कवनीं ।
विबुधेश्वरासहि तसें ऐकुनि न निनद पिकज नाकवनीं. ॥ ३ ॥
( काव्यसंग्रह, उद्योगपर्व पृ० ३३३, टीप. )

## ९ स्तुत्यार्यादशक ( निवडक आर्या ) पुराणकविकृत.

**(गीति)** सकल महाराष्ट्रजना उपजे कवनें तुजा सदभिमान; ।
त्वत्काव्यामृतपानें विबुध वदुनि 'धन्य' हालविति मान. ॥ १ ॥
त्वत्काव्यदूषणीं जे भूषण जन मानितात ते अंध, ।
बधिरचि ते अथवा जे कस्तूरीचा न वानिती गंध. ॥ २ ॥
रोमांचिततनु होते पुनः पुन्हा मधुनि वाचितां कवन, ।
करिसि तयांचें वाटे, निर्दळुनी दुरित दुष्टमत अवन. ॥ ३ ॥

कीर्तनरम्योद्यानीं श्रुतिग मनोहर मयूररव नाहीं ।
तरि त्यांत काय शोभा ? नुपजे रस मधुर अन्यकवनांहीं. ॥ ४ ॥
जनपदभाषेला त्वां स्वकृतीनें चढविलेंस उच्चपदा, ।
नानालंकाररसीं सजवुनि नेलीस दूर तद्विपदा. ॥ ५ ॥

## १० चिंतामणि जोशीकृत.

**(गीति)** भावें ध्यातों प्राकृतकाव्याचार्या मयूरकविराया, ।
अप्रतिभा जेंवि घना निजतापतती मयूरक विराया. ॥ १ ॥
श्रुतिसम मत्कृतिभारत न कळे अज्ञानगर्त नव्यास, ।
यास्तव मयूरकपटें अवतरला भुवि सुकीर्तनव्यास ॥ २ ॥
**(गीति)** प्रत्यार्येस रस रवा आणी घटनाहि करुनि यमकाची, ।
मणिची तसि त्या कविची सरि इतरीं नाहिं करु नियम काचीं ॥ ३ ॥

## ११ ब्रह्मावर्तकर सप्तशतीलेखककृत.

**(गीति)** श्रीमन्मयूर सत्कवि याच्या जरि कवि नवीन समतेला ।
आणाल, तरि ह्मणा मग बुधहो ! हय्यंगवीनसम तेला ॥ १ ॥

## १२ रत्नागिरिस्थ परशुराम ढवळे दत्तोपासककृत.

**(गीति)** भारतभागवतादि श्रीरामायण अनेक आर्यानीं ।
मोरेश्वर कवि वदला, पहावया योग्य सर्व आर्यानीं. ॥ १ ॥
मच्चरितासि वदावें तों आयूर्दाय पूर्ण तो सरला, ।
आर्याकवितासरितापूर पुढें मग तसाचि वोसरला. ॥ २ ॥
तरि आर्याघन वर्षुनि भरिं तूं रे मच्चरित्रगंगाला, ।
देईल वहावुनियां श्रुतिमात्रें सर्व अघतरंगाला. ॥ ३ ॥

## १३ नासिककर सुप्रसिद्ध विद्वान कवि गणेशशास्त्री लेलेकृत.

**(श्लोक)** जे श्रीभारतपंचलक्षणमहाकाव्यग्रहीं चांगले, ।
व्यासानंतर सत्प्रमेयरचनाचातुर्य ज्यां लाभलें, ॥
ज्यांनीं देशगिरेंत ईश्वरकथा केल्या महत्संगमीं, ।
ते मुक्तेशमयूरवामनकवी त्यांच्या पदाब्जां नमीं. ॥ १ ॥

## १४ बुंदेलखंडस्थ श्रीरामदासचरित्रकार गंगाधर खानवलकरकृत.

**(गीति)** बारामतीनिवासी मोरोपंत प्रसिद्ध, आर्याला ।
निर्मुनि यश मेळविलें, नमितों भावें तयाहि आर्याला. ॥ १ ॥

## १५ बापुसाहेब कुरुंदवाडकरकृत.

(गीति) केविं नवा कवि आर्यापद्धति पंता न जे मयूराला।
दाविल, गायक कैसा ठावी नच तान जे मयूराला ? ॥ १ ॥
पंतोच्छिष्टचि सारें उपमा यमकें सुवेष सुरसत्व. ! ।
लिहिलें ग्रंथीं परि म्यां स्तविला श्रीमद्गुणेश सुरसत्व. ॥ २ ॥

## १६ भक्तमंजरीमालाकार राजारामप्रासादी रामदासीकृत.

(ओव्या) श्रीगणपतीचा जो कां अंश । आर्याछंद कवनविशेष । करूनि तारिलें दीनजनांस । बोधचंडांशु प्रकटला ॥ १ ॥ भारतभागवतरामायण । व्यासकूटें सकळ शोधून । आर्यासेतु बांधून । जीव तारणें भवाब्धिवरी ॥ २ ॥ मग तेथें काय उशीर । सरस्वती बैसली जिव्हेवर । आर्या केल्या अपार । ग्रंथ समग्र धुंडाळिले ॥ ३ ॥ सन्मणिमाळेच्या करितां आर्या । प्रेम दाटलें पंढरिराया । प्रसन्न झाले भक्तराया । कवळिती काया पंताची ॥ ४ ॥ आर्याछंद देखून । व्यासादिक तुकिती मान । मग इतराचा पाड कवण । वंद्य पूर्ण जगद्वंद्या ॥ ५ ॥ **केकावली,** पदें अभंग । श्रवण केलिया श्रीपांडुरंग । करुणारस तेथें चांग । पाहिला आंगे सनकादिकें ॥ ६ ॥ पंडित आणि भजनशीळ । काव्यकर्ता संत निर्मळ । विद्वज्जनांचे अर्थ सकळ । पूरवी प्रांजळ साधु तो ॥ ७ ॥

## १७ संमोहलहरिकार गोविंद वासुदेव कानिटकरकृत.

(श्लोक) भवाब्धितुनि पार जो परमभक्त झाला कवी ।
मनोज्ञकवितासुता तुज समर्पुनी तोषवी, ॥
मयूरसम माझिया गृहि न जन्मली बालिका ।
तुझें हृदय न द्रवे म्हणुनि कीं जगन्नायका ! ॥ १ ॥

## १८ नारायण चिंतामण केळकरकृत.

(गीति) श्रीमन्मयूरवाणी हीच उघडली सुवर्णमंजूषा ।
दिव्यरसायननिर्मित निजकंठीं रसिक हो ! धरा भूषा. ॥ १ ॥

## १९ आबाजी जनार्दन कुळकर्णी नेवासेकरकृत.

(श्लोक) एकद्वित्रिचतुःशरर्तुगिरिभिर्वर्णैः क्रमोद्भासितैः ।
कृत्वा विश्रुतराममंत्रघटनां सर्वेषु कांडेषु च ॥
यस्तत्प्राकृतभाषया ललितया रामायणं निर्ममे ।
तस्मै धीनिधये मयूरकवये तुभ्यं नमस्तां नमः ॥ १ ॥

## २० मुकुंद गणेश मिरजकरकृत.

(श्लोक) अगा! रसिककामनामरतरो मयूरेश्वरा!।
जणूं शिरिं सरस्वती तव दयाळ ठेवी करा; ॥
प्रसाद, समता, तशी मधुरता उभी राहते; ।
कसे गुण अनंत हे तदितरें तुला लाभते? ॥ १ ॥
म्हणोत कृतिला तुझ्या अपटु लोक भाषांतर, ।
दुजी न कविता असें भुलविते मदीयांतर. ॥
तुझे अमित साक्ष या असति भक्त लोकांतर, ।
न षड्रसरुची कधीं समजतो मनुष्येतर. ॥ २ ॥

## २१ बाळकृष्ण लक्ष्मण कुळकर्णी विंचूरकरकृत.

(गीति) आर्यारूप कलापचि उभवुनि आर्यास दे महाश्चर्य, ।
ह्या काव्यसंग्रहायस्थलिं विलसे तो मयूर कविवर्य. ॥ १ ॥

## २२ श्रीपाद नारायण मुझुमदारकृत.

(गीति) वाग्देवीकंठस्थितकविमालागतमहार्हमध्यमणी, ।
ज्याच्या काव्ययशानें भरुनी गेली समस्त हे धरणी, ॥ १ ॥
त्या श्रीमयूरकविच्या कैशी स्मृति मज न होय पायांची?
नव काव्यविरचनीं या सादर मी मूढ तत्कृपा याची. ॥ २ ॥
(छत्रपतिशिवाजीकाव्यार्या १४-१५)

## २३ सीताराम बाळकृष्ण गुर्जरकृत.

(गीति) जनपदभाषेला त्वां स्वकृतीनें चढविलेंस उच्चपदा, ।
नानालंकाररसीं सजवुनि नेलीस दूर तद्विपदा, ॥ १ ॥
रोमांचिततनु होते पुनः पुन्हा मधुनि वाचितां कवन, ।
करिसि तयांचें वाटे, निर्दळुनी दुरित दुष्टमत अवन. ॥ २ ॥

## २४ बाळकृष्ण अनंत भिडेकृत.

(श्लोक) मोरेशमानससमुद्भवमौक्तिकांचे। हे घोंस सुंदर लसद्द्युतिपुंज साचे; ॥
वेंचोत यास रुचिनें रसिकावतंस, । सारज्ञ, कल्पक, भले, बुध राजहंस.
श्रीमन्मयूर, रसवित्, प्रतिभानदीन, । जो वागलंकरणसद्घटनाप्रवीण, ॥
त्याची सुवर्णपदका कविता-सुमाला। ही अर्थरत्नखचिता दिधली बुधाला. ॥
(गीति) गुरुदेवभावभावित, गंभीर, प्रौढ, शुद्ध, वाग्वृत्ति ।
ज्याची मानस हरिते **धर्म**नृपतिची जणों मनोवृत्ति. ॥ १ ॥

आवेशी, प्रभुसेवक, सत्यादृत, वीर्यपूर्ण, निःसीम, ।
ज्याचा शब्दविलास प्रकट दिसे दोष काळ जणुं **भीम.** ॥ २ ॥
उचित प्रसंग बघुनी, मार्दव काठिन्य दावुनी नाचे ।
ज्याचें काव्य बुधगणीं, रणांगणीं जणुं धनुष्य **विजयाचें** ॥ ३ ॥
श्रवणामृतरसजननी, प्रणयखनी, शोभना, मधुरलीला, ।
ज्याची वाणी रुचली दिव्यसखी **वासुदेवमुरलीला.** ॥ ४ ॥
त्या श्रीमयूरकविच्या कृतिला सादर वरीन मी माथां; ।
तेजोहीन ग्रहही लखलखिती भजुनियां प्रभानाथा ॥ ५ ॥

## २५ मोरोपंतचरित्रकार लक्ष्मण रामचंद्र पांगारकरकृत.

**(श्लोक)** महाकवि **मयूर** मूर्त हरिधामसोपान हो ! ।
असा कलियुगीं रमाधवदयौघ सोपा न हो; ॥
प्रपंचपरमार्थ साधुनि कथासुधापान हो ! ।
करी, करवि त्या कधीं पितृवनास्ति बापा ! न हो. ॥ १ ॥

## २६ नारायणशर्मा ( कीर्तनमासिक १.११).

**(श्लोक)**

द्विजेषु महितः सदा जगति साधुपक्षाश्रितोऽवलंबितसदागमोऽनिशमनन्तमासेवते ।
विचित्रपदयोजनातिकुशलः **सुकेकान्वितो मयूर** इह राजते कविवरः कलोपाश्रितः ॥

(अर्थः–) काव्यकलेनें युक्त कविश्रेष्ठ मोरोपंत कसे आहेत तर–द्विजांत पूज्य, सन्मार्गास अनुसरणारे, उत्तम अशा शास्त्रपुराणादिकांचा ज्यांनीं आश्रय केला आहे व जे निरंतर अनंत ह्मणजे नाशरहित अशा परमात्म्याची सेवा करीत असत; तसेंच चित्रविचित्र शब्दयोजना करण्यांत कुशल, **सुकेकान्वित** ह्म. उत्कृष्ट असें केकावली नामक काव्य करणारे असे **मयूर** कवि भूमंडळावर विराजित आहेत. ( दुसरा अर्थ ) 'कविवर' या शब्दांतील 'क'काराचा लोप केला असतां विवर शब्द बाकी राहतो. विवर ह्म. पक्षिश्रेष्ठ जो मयूर तोहि द्विजेषु महितः–पक्ष्यांत श्रेष्ठ, साधुपक्षाश्रितः-उत्तमप्रकारच्या पंखांनीं युक्त आहे, अवलंबितसदागमः–नेहमीं वृक्षांचा आश्रय करणारा, अनंत ह्म. आकाशाचेंहि सेवन करणारा ह्म. आकाशांत उडणारा, चित्रविचित्र पदन्यास करण्यांत कुशल, व केका ह्म. मयूरवाणी तिनें युक्त असा विराजित आहे.

## २७ लक्ष्मण गणेश लेले नासिककरकृत.

**(श्लोक)** षड्जेतरस्वरविकारहि पूर्ण ठावा। **संरक्तरामघन** यदहृदयीं वसावा ॥
**संन्यस्तपक्ष** करि **विष्णुपदीं** विहार। तो अद्भुत **द्विज मयूर**हि वंद्य फार. ॥

'सामान्य मयूरपक्ष्याला षड्जाशिवाय इतर स्वरविकार ठाऊक नसतात; सजलनील घनाशिवाय इतर घन त्याच्या ध्यानाचे विषय नसतात; आणि पंखांशिवाय आकाशांत संचार करण्याचें सामर्थ्य त्याला नसतें; तेव्हां या सर्व गोष्टी करणारा **द्विज मयूर** ( मोरोपंत ब्राह्मण ) अद्भुतच समजला पाहिजे'.

(**पद्यमंजरी,** कविप्रशंसा १५)

## २८ कवि मयूरकृत स्वकाव्यस्तुति (निवडक पद्यें)

**( श्लोक )** जसे होती देव प्रमुदित शचीनायकवनीं, ।
तसे सारज्ञाते बुधजन मयूरेशकवनीं; ॥
महाराष्ट्रग्रंथी रसिक कवि जे तेच रमती, ।
परंतु ज्ञात्याची पळहि न असावी चर मती. ॥ १२ ॥

(प्राकृत **'मंत्ररामायण'** उपसंहार)

**( गीति )** तुमच्या पदप्रसादें फार चमत्कार अर्थयमकांचे ।
त्यांत प्रभुयश, तद्वशजगदुद्धाराधिनेंचि यम कांचे ॥ ६९ ॥

**( नामरसायन )**

संत मयूरेश्वरकृत कवनीं नवनीतकोमळीं गोडी ।
घेतील, कीं तयाची करणें परगुणविवृद्धि ही जोडी. ॥ ६ ॥

(**प्रश्नोत्तररत्नमाला,** उपसंहार )

**( श्लोक )** **शुक द्विज** सुबुद्धि तो पढविलें भलें बोलतो, ।
तदुक्तिरस सेवितां रसिक सर्वही डोलतो, ॥
नव्हे नवल तें जगीं, नवल हें **मयूरद्विजा** ।
दिली सुकविता पहा सदय साधुनी हे निजा. ॥ १०५ ॥

**( भक्तभूषण )**



# परिशिष्ट-आ.



'मृषागिरस्ता ह्यसतीरसत्कथा न कथ्यते यद्भगवानधोक्षजः ।
तदेव सत्यं तदु हैव मंगलं तदेव पुण्यं भगवद्गुणोदयम् ॥ १२-४८ ॥
तदेव रम्यं रुचिरं नवं नवं तदेव शश्वन्मनसो महोत्सवम् ।
तदेव शोकार्णवशोषणं नृणां यदुत्तमश्लोकयशोऽनुगीयते ॥ ४९ ॥
न तद्वचश्चित्रपदं हरेर्यशो जगत्पवित्रं प्रगृणीत कर्हिचित् ।
तद्ध्वांक्षतीर्थं नतु हंससेवितं यत्राच्युतस्तत्र हि साधवोऽमलाः ॥ ५० ॥
स वाग्विसर्गो जनताघसंप्लवो यस्मिन् प्रतिश्लोकमबद्धवत्यपि ।
नामान्यनन्तस्य यशोऽङ्कितानि यच्छृण्वन्ति गायन्ति गृणन्ति साधवः ॥ ५१ ॥'

(भागवत, स्कंध १२)

## (१) मोरोपंताची ग्रंथसंख्याः- ५५,८९८

| | |
|---|---|
| (अ) **इतिहास-** | ३७,७८० |
| (आ) **पुराणें-** | ८,६२१ |
| (इ) **स्फुटप्रकरणें-** | ५,५९० |
| (ई) **स्फुटकाव्यें-** | ३,९०७ |
| एकूण | ५५,८९८ |

(तपशील.)

| | | |
|---|---|---|
| (अ) **इतिहास** | | ३७,७८० |
| (१) रामायणें | (९६) | १५,१९९ |
| (२) महाभारत | | २२,५८१. |

**१ रामायणांचा तपशील**

(श्री) रामायणांची यादी

(रा) रामायणांची वर्गवारी

(म) रामायणांचीं नांवें ठेवण्याचीं कारणें

(श्री) **रामायणांची यादी—**

(१)—**प्रसिद्ध**-ग्रंथसंख्या १५,१९९

(१) अनुष्टुब् रामायण (अनुष्टुभ्) १५२

(२) अभंग रा० (सीतागीत) (अभंग) १७६.

×(३) अवतारमालांतर्गत रा० (गीति) ११०

(४) आद्यार्या रा० (आर्या) २३७+२=२३९

(५) आरती रामायण (पद) १

(६) आर्यागीति मुक्तामाला रा० (आर्यागीति) १०९

(७) उमा रा० (गीति) १२१+१=१२२

(८) ऋषिरा० (गीति) ८८+१=८९

×(९) एकपदीरा० (प्राकृत) (पद) १

(१०) एकश्लोकीरा० (जलोद्धत गति) १

(११) कल्याणरा० (पज्झटिका) ७९+१=८०

(१२) कविप्रियरा० (अश्वधाटी) १९

(१३) काशीरा० (गीति) ५५+१=५६

(१४) गंगारा० (गीति) ६३+१=६४

(१५) गदम्नरा० (रथोद्धता) १६९+२=१७१

(१६) गुरुरा० (श्रीगुरु रा०) (विविधवृत्तें) ८६

(१७) घनाक्षरीरा० (घनाक्षरवृत्त) १३३+३=१३६

(१८) तन्वीरा०(तन्वी) ८५+१=८६
(१९) तीर्थरामायण (गीति) ५९+१=६०
(२०) त्रिसप्तमंत्ररा०
(शार्दूलविक्रीडित) २१+१=२२
(२१) त्रुटितरा० (विविधवृत्ते) (अपूर्ण) ५७
(२२) दंडकरा० (दंडक) १५६ } १५७
(गीति) १ }
(२३) दामरा० (गीति) ९०+१=९१
(२४) दिव्य(दीर्घ)रा०(गी.)१२६+१=१२७
(२५) दोहा रा० (प्रथम) (दोहा) ८४
(२६) दोहा रा०(द्वितीय)(सोरठा)
१०९+१=११०
(२७) धन्यरा० (अपूर्ण) (गीति)
१–४४,८८–११७+१=७५
(२८) नामांकरा०(गीति) १२९+१=१३०
(२९) निरोष्ठरा०(गीति) ६५+१=६६
(३०) पंचचामररा० (पंचचामर) ९१
(३१) पंचशतीरा०( रामायण पंचशती )
(साकी) ५०४+१=५०५
(३२) परंतु रा० गीति २५०
(३३) पीयूषरा० (रामायणपीयूष)
(मालिनी) १०८+१=१०९
(३४) पुष्पिताग्रारा०(कल्पलता) ५४
(३५) पूतरा०(अपूर्ण) (शार्दूलविक्रीडित)
१३९–१६४+१=२७
(३६) पृथ्वीरा० (पृथ्वी) ८२+१=८३
(३७) प्रयागरा०(गीति) ११०+१=१११
(३८) प्रहर्षणरा० (प्रहर्षिणी) ८५+१=८६
(३९) प्रियरा०(श्रीप्रियरा०)(वैतालीय) १०९
(४०) बालमंत्ररा० (गीति) २७३
(४१) भागवतरा० (स्कंध ९) (गीति)
१४३–१६६=२४
(४२) भारतरामायण वनपर्व अ०१०–१२
गीति १०२+१३३+१६८=४०३
(४३) भावरा०(मंदाक्रांता) ११८+१=११९
(४४) मंचरा०(क्रौंचपदा) ६३+१=६४
(४५) मंजुरा० (रामायणछंद)
(शुद्धकामदा) ७०
(४६) मत्तमयूररा०(मत्तमयूरवृत्त) ४७
(४७) मंत्ररा० (प्राकृत)
(गीति) १८८०+३३=१९१३
(४८) मंत्ररा० (संस्कृत) (अनुष्टुभ्) ३९९२
(४९) मंत्रगर्भ साकीरा०(साकी)९१+१=९२
(५०) मंत्रमयरा० (गीति) २५
(५१) मंत्रिरा०( अनुष्टुभ् ) ९१+१=९२
(५२) मात्रारा०(गीति) ४६+१=४७
(५३) मुक्तामाला (संस्कृत)रा०गीति ११५
(५४) रम्यमंत्र(शार्दूलविक्रीडित,स्रग्धरा,
शिखरिणी ) ९१+९ उपसं०=१००
(५५) राजरा० (गीति) ८६+१=८७
(५६) रामनामाष्टोत्तरशतरा०
(संस्कृत) (अनुष्टुभ्) ३०
(५७) रामचरितभरितरा० (रामप्रार्थना) ४०
(५८) लघुरा०(सुख रा०)
(गीति) ४९+१=५०
(५९) वरदरा०(प्रमिताक्षरा) ६०
(६०) विचित्ररा.(जलोद्धतगति)२१+१=२२
(६१) विद्युन्माला (कथासुधा)रा०
(विद्युन्माला) ४३+१=४४
(६२) विबुधप्रियरा० (हरिनर्तनछंद) १०७
(६३) शिवरामायण (प्रथम)
गीति १०९+१=११०
(६४) शिवरा०(द्वितीय)गी०१०९+१=११०
(६५) श्रवणामृतरा० (नर्दटक) २५
(६६) श्रीरामायण (शिखरिणी) ५१
(६७) श्रीरमणीयरा०(रमणीय रा०)
(सारंग) ८०
(६८) श्रीहररमणीयरा०
( हररमणीय ) (तोटक) ४८

(६९) सच्छाव्यरा० (हरिणी) ८१+१=८२
(७०) सत्कीर्तिरा० (कन्यारत्न) (स्रग्धरा) २१+१=२२
(७१) सत्स्वरा० (शार्दूलविक्रीडित) १३+१=१४
(७२) सद्भरा० (गीति) १५२+१=१५३
(७३) सद्भक्तसर्वेस्वरा० (वसंततिलका) १५९+१=१६०
(७४) सद्रत्नरा० (अमृतध्वनि) ३९+१=४०
(७५) सद्वित्तरा० (इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, उपजाति) १२२+१=१२३
(७६) सन्नामगर्भरा० (गीति) ११०+१=१११
(७७) सप्तमंत्ररा० (अनुष्टुभ्) ९१+१=९२
(७८) सवाईरा० (सवाई) १४९
(७९) साररा० (छंदोरा०, वृत्तरत्नरा०) (विविधवृत्तें) बाल व अयोध्या ४६५
(८०) सीतारा० (विविधवृत्तें) १८७+१=१८८
(८१) सुरा० (भुजंगप्रयात) — १११
(८२) सूरारा० (सूरा) — ५१+१=५२
(८३) सौम्यरा० (सौम्या) ४२+१=४३
(८४) प्रथमस्तोत्ररा० (गीति) ५२+१=५३
(८५) द्वितीयस्तोत्ररा० ,, ९१+१=९२
(८६) तृतीयस्तोत्ररा० ,, ८९+१=९०
(८७) चतुर्थस्तोत्ररा० ,, ८९+१=९०
(८८) पंचमस्तोत्ररा० ,, ९२+१=९३
(८९) षष्ठस्तोत्ररा० ,, ९३+१=९४
(९०) सप्तमस्तोत्ररा० ,, ८८+१=८९
(९१) अष्टमस्तोत्ररा० ,, ७८+१=७९
(९२) नवमस्तोत्ररा० ,, ८२+१=८३
(९३) दशमस्तोत्ररा० ,, ८३+१=८४
(९४) स्रग्विणीरा० (स्रग्विणी) ९४+१=९५
(९५) हनुमद्रा० (गीति) १४०+१=१४१
(९६) हरिवंश रा० अ० ९ (गीति) १०–२०=११

## (२) तस्करोपद्रवांत गाहाळ झालेलीं (अप्रसिद्ध)

(१) धर्म रामायण
(२) धीर रा०
(३) पुण्य रा०
(४) मधु रा०
(५) मुद रा०
(६) रत्न रा०
(७) रम्य रा०
(८) रामप्रार्थना (पद्यें ५०)
(९) रामायणाष्टक
(१०) शुद्ध रामायण
(११) हृद्य रामायण
(१२) अद्भुत (?)

## (रा) ९६ रामायणांची वर्गवारीः—

(१) ९६ रामायणांपैकीं ४३ अक्षरगणवृत्तांत, ४५ मात्रागणवृत्तांत, ४ अनेकवृत्तांत व २ प्राकृतवृत्तांत रचलीं असून २ पदें आहेत. **अक्षरगणवृत्तांतील** ४३ पैकीं ४१ समवृत्तांत व २ अर्धसमवृत्तांत आहेत. **समवृत्तांतील** ४१ पैकीं ७ अष्टाक्षरी वृत्तांत ( विद्युन्माला छंदांत १ व अनुष्टुभ् छंदांत ६ ), ३ एकादशाक्षरी वृत्तांत ( रथोद्धता छंदांत १, शुद्धकामदा छंदांत १, व इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा व उपजाति हीं तिन्हीं मिळून १ ), ७ (तोटक, भुजंगप्रयात, प्रमिताक्षरा, यांत प्रत्येकीं १, जलोद्धत छंदांत २, स्रग्विणी छंदांत १ व सारंग छंदांत १) द्वादशाक्षरी वृत्तांत, २ मत्तमयूर व प्रहर्षिणी या त्रयोदशाक्षरी वृत्तांत, ३ वसंततिलका, मालिनी व पंचचामर या अनुक्रमें चतुर्दशाक्षरी, पंचादशाक्षरी व षोडशाक्षरी वृत्तांत, ६ पृथ्वी, हरिणी, लक्ष्मी, नर्दटक, मंदाक्रान्ता व शिखरिणी या सप्तदशाक्षरी वृत्तांत;

१ विबुधप्रिया नामक अष्टादशाक्षरी वृत्तांत; ४ शार्दूलविक्रीडित नामक एकोनविंशति अक्षरवृत्तांत, १ स्रग्धरा नामक एकवीस-अक्षरी वृत्तांत; ३ बावीस अक्षरी वृत्तांत (अश्वधाटीछंदांत २ व अमृतध्वनि छंदांत १); १ मदिरा नामक तेवीस अक्षरी वृत्तांत; १ तन्वी नामक चोवीस अक्षरी वृत्तांत; १ क्रौंचपदा नामक पंचवीस अक्षरी वृत्तांत व १ अर्ण दंडक नामक तीस अक्षरी वृत्तांत आहेत. अर्धसमवृत्तांत, वियोगिनी व पुष्पिताग्रा या दोन वृत्तांतील प्रकरणें आहेत. मात्रागणवृत्तांतल्या ४५ पैकीं ३७ गीतिवृत्तांत, २ साकीवृत्तांत, १ आर्यावृत्तांत, १ आर्यागीतिवृत्तांत, १ पज्झटिकावृत्तांत, १ दोहावृत्तांत, १ सोरठावृत्तांत व १ सौम्यावृत्तांत आहेत.

**(म) रामायणांचीं नांवें—**

हीं मुख्यत्वें चार कारणांमुळें ठेविलीं असावीं असें दिसतें. (१) **कांहीं रामायणांचीं नांवें वक्त्यांच्या किंवा श्रोत्यांच्या नांवावरून.** (अ) **वक्त्यांच्या नांवावरून**–जसें हनुमत्‌रामायण, सीतारामायण; (आ) **श्रोत्यांच्या नांवावरून**–जसें श्रीगुरुरामायण; (२) **कांहींचीं वृत्तांवरून**–जसें अश्वधाटीरामायण, ओवीरामायण, तन्वीरामायण, पृथ्वीरामायण, स्रग्विणीरामायण इत्यादि. (३) **कांहींचीं त्यांतील विशेष गुणांवरून**–जसें विचित्ररामायण, भावरामायण, रम्यरामायण, साररामायण, सद्गर्भरामायण, इत्यादि; व (४) **बाकी सर्वांचीं नांवें त्यांतील चित्रकाव्यगुणांवरून**–जसें स्तोत्ररामायण, मंत्ररामायण, निरोष्ठरामायण, धन्यरामायण, दामरामायण, परंतुरामायण, इत्यादि ठेविलेलीं दिसतात.

**(२) महाभारत तपशीलः– २२,५८१**

(१) भारत १८ पर्वें अ० २२५
(गीति) १७,१३५, (श्लो०) १, (आर्यागीति) १ } १७,१३७

(२) हरिवंश अ० ५४ गीति ५,४४४

**(आ) पुराणें-तपशीलः– ८,६२१**

(१) मंत्रभागवत
(स्कंध १२, गीति नमनासह) ३,६०४

(२) मंत्रमयभागवत (गीति) १०९

(३) कृष्णविजय ऊर्फ बृहद्दशम
पूर्वार्ध अ० ४९
(आर्यागीति) १,७११
(श्लोक) १
उत्तरार्ध अ० ४१
संकीर्ण १९५८ } ३,६७०

(४) दशमस्कंध मुख्यार्थ (पज्झटिकावृत्त) २६

(५) स्कंदपुराणांतर्गत ब्रह्मोत्तरखंड
अ० २२ (गीति) १,२१२

**(इ) स्फुटप्रकरणें ५,५९०**

**(इ) स्फुटप्रकरणाचा तपशीलः–**

**१ रामायणांतील ५१**

(१) अहिल्योद्धार प्रथम,
(गीति) ३४+ श्लोक ६=४०

(२) अहिल्योद्धार द्वितीय, (साक्या) ११

**२ भारतांतील १,८०५**

(१) सावित्रीगीत (अभंग) ३०७

(२) भगवद्गीता अ० १८ (गीति) ७५४

(३) ब्राह्मणमाहात्म्य (ओव्या) १२८

(४) दुर्वासभिक्षा (ओव्या) १०८

(५) जैमिन्यश्वमेधांतर्गत कुशलवाख्यान
अ० १३ संकीर्णवृत्तें ५०८

**३ भागवतांतील १,५९६**

(१) नारदाभ्युदय (गीति) ४७

(२) अंबरीषाख्यान (गीति) ४०

(३) अंबरीषचरित्र (भक्तभूषण) (श्लोक) १११

(१) गंगास्तुति (गीति) १०९
(२) गंगाप्रार्थना (गीति) १७
(३) गंगावकीली
( गीति १०४, दोहा १ श्लोक ४ ) १०९
(४) गंगास्तव (श्लोक) ३७
(५) गंगाविज्ञप्ति (गीति) २२
(६) काशीप्रार्थना (गीति) २६
(७) काशीस्तुति (गीति) ७
(८) विश्वेश्वरस्तुति (गीति) ११०
(९) काळभैरवस्तुति (गीति) १०
(१०) अन्नपूर्णास्तुति (गीति) ५
(११) मणिकर्णिकास्तुति (गीति) ५
(१२) द्विचत्वारिंशल्लिंगयात्रा (गीति) ४३
(१३) प्रयागस्तुति (गीति) ३
(१४) यमुनास्तुति (गीति) १
(१५) गदाधरस्तुति (गीति) १७
(१६) बिंदुमाधवस्तुति (गीति) १२
(१७) विष्णुपदवकीली (गीति) १००
(१८) राजापुरस्थगंगाकीर्तन (गीति) २६
(१९) गोदावरीस्तव (गीति) १०
(२०) कृष्णास्तव (गीति) ११
(२१) कृष्णाप्रार्थना (गीति) २६
(२२) पंढरीमाहात्म्य (गीति) ८०
(२३) पांडुरंगदंडक (गीति) ५६
(२४) विठ्ठलप्रणिधी (गीति) ४३
(२५) विठ्ठलस्तोत्र (श्लोक) १२
(२६) विठ्ठलस्तुति (दोहे) ९
(२७) विठ्ठलविज्ञापना (अनुष्टुभ्) ६७
(२८) पांडुरंगस्तोत्र (प्रथम) (अनुष्टुभ्) ३३
(२९) ,, (द्वितीय) (पज्झटिका) ५
(३०) ,, (तृतीय) (द्रुतविलंबित) २३
(३१) ,, (चतुर्थ) (स्रग्धरा) २४
(३२) विठ्ठलपदपद्मस्तुति (गीति) ६
(३३) इष्टकास्तुति (गीति) ११
(३४) पुंडरीकप्रार्थना (अनुष्टुभ्) ३८
(३५) खंडोबास्तव (गीति) १२
(३६) तुळजास्तव (गीति) ११
(३७) महालक्ष्मीस्तव (गीति) १२
(३८) व्यंकटेशप्रार्थना (गीति) ७२
(३९) रेणुकास्तव (गीति) १५
(४०) सिद्धेश्वरस्तव (गीति) १२

**स्फुटकाव्यें भाग ३ रा २,१६६॥**

(देवादिकांच्या प्रार्थना, स्तुति, वगैरे)

(१) गजाननस्तव (गीति) २२
(२) गणपतिप्रार्थना (गीति) २३
(३) शिवार्याशतक संस्कृत
(उपगीति) १०१+श्लोक २=१०३
(४) शंकरस्तव संस्कृत (श्लोक) २५
(५) दुर्गास्तव (गीति) ४१
(६) हरिहरस्तव (गीति) ११
(७) हरिहरप्रार्थना (गीति) १०
(८) दशावतारप्रार्थना (गीति) १०
(९) रामस्तव (अनुष्टुभ्) (गीति) १०
(१०) रामप्रार्थना आर्या (अनुष्टुभ्) १०
(११) रामप्रार्थना ओवी (अनुष्टुभ्)
(१२) रामस्तुति संस्कृत
(औपच्छंदसिक) ७२
(१३) रामनाममहिमा संस्कृत (श्लोक) ९
(१४) **आर्याकेकावलि** (गीति) १७४
(१५) अम्लानपंकजमालाबंध (स्रग्धरा) ५
(१६) रामरीति (गीति) १०३
(१७) मारुतिस्तुति (अनुष्टुभ्) ३५, (गीति) ५ } ४०
(१८) कृष्णस्तवराज संस्कृत (गीति) १११
(१९) हरिसंबोधनस्तोत्र
(शार्दूलविक्रीडित) ५०
(२०) मुरलीपंचक (गीति) ५

# परिशिष्ट—इ.



(आर्या)

'सरसा सालंकारा सुपदन्यासा सुवर्णमयमूर्तिः ।
**आर्या** तथैव भार्या न लभ्यते पुण्यहीनेन ॥'

(गीति) **आर्याछंदस्तुति.**

छंदःशास्त्रीं आद्या, सन्मान्या जसि सतीगणीं आर्या, ।
आर्या हे सद्रसिका जेंवि शिवा ती तसी प्रिया आर्या. ॥ १ ॥ (स्वर्गारोहणपर्व २.५२)
अष्टादशपर्व जयग्रंथकथा आपणांत आर्यानीं ।
आणिलि जसि आणावी आर्या बहुमान करुनि आर्यानीं. ॥ २ ॥ ( २.४३ )
शुद्धें अचंचळ मनें अवलोकाव्या बुधें जशा आर्या, ।
निःशेषपापतापव्यापत्प्रशमार्थ या तशा आर्या. ॥ ३ ॥ ( २. ५४ )
ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रुक्षपितचंदन मयूरें, ।
आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदन मयूरें. ॥ ४ ॥ ( २. ५५ )
वहु मानीलचि पूर्वप्रेमातें न त्यजूनि ओव्याही, ।
आर्यासि म्हणेल रसिक अभिनव विहिणींस जेंवि 'ओ' व्याही. ॥ ५ ॥ (२.५)
आर्या आर्यांसि रुचे, हीच्या ठायीं असे जशी गोडी, ।
आहे इतरां छंदीं गोडी, परि यापरीस ती थोडी. ॥६॥ ( भीष्मभक्तिभाग्य १० )
व्यासशुकशांतनव या आर्यांची उक्ति, नुतिहि आर्यांची, ।
आर्यांची आवडही; लिहितों टीकेसि साधु आर्यांची. ॥ ७ ॥

प्रकटी प्रथम भगीरथ नृप लोकीं सुरनदीस ती आर्या, ।
तसि हे मयूर नाहीं तरि सर्वांला न दीसती आर्या. ॥ ८ ॥ (नामसुधाचषक १११)
उचित प्रसार भासो रसिकांस प्राकृतांत आर्यांचा, ।
युष्मद्वरेंचि होतो सत्कार प्राकृतांत आर्यांचा. ॥ ९ ॥ (११२)
गद्यें, ओव्या, सवया, दोह्यातें सर्व जाणती लोक ।
श्लोक प्रिय ज्यांस जया प्रसन्न तूं पुण्यपूर्वकश्लोक. ॥ १० ॥ (११३)
आर्यानाथा ! आधीं छंदःशास्त्रांत पिंगलाचार्या ।
आर्याराध्या देवा ! त्यांचि पढविली मनोहरा आर्या. ॥ ११ ॥ (११४)
आर्यासुधा बुधांनीं आकंठ प्राशिलीच धन्यांनीं, ।
कानीं मात्र परिशिली होती हो ती सती तदन्यांनीं ॥ १२ ॥ (११५)
ते हे सुधा बुधांनीं मज लुब्धाला दिली सदा त्यांनीं ।
केलों पात्र दयेला आधीं, मग मी किलीस दात्यांनीं. ॥ १३ ॥ (११६)
सुखद प्रचार रसिकां वाटेल प्राकृतांत आर्यांचा, ।
तुमच्या वरेंचि जेंवि व्रजवासि प्राकृतांत आर्यांचा. ॥ १४ ॥ (११८)
आर्यावृत्तक्षीरीं युष्मन्नुतिशुद्धशर्करा प्राज्य, ।
वरि ओतिलें यथेच्छ स्वच्छ श्रीरामनाम भव्याज्य. ॥ १५ ॥ (११९)
पुरुषा आर्यावृत्तें जैसी, ग्रंथा **जया** तसी मोटी ।
शोभा आर्यावृत्तें आली, भुलतील यासि कविकोटी. ॥ १६ ॥ (भीष्मपर्व ११.७९)
आर्यकथाछंदानें आर्याछंदेंचि जन्मलीं सरलें; ।
यांहीं माझें तनुवाक्कर्ममनःपाप सर्वथा सरलें ॥ १७ ॥ (मंत्ररामायणउपोद्घात १७)
(आर्यागीति)
वृत्तीं आधीं आर्या श्राव्या, सेव्यांचि फार, साधी, आर्या ।
युक्ता सद्यमकांनीं; प्यावी रसिकीं करूनि उद्यम कांनीं. ॥ १८ ॥ (कृष्णविजय १.५)
ह्मणति भलीला आर्या तैशीच सरोजनाभलीला आर्या; ।
संगत हें दोघींतें जैसें **रविहरिपदोत्थसरिदोघीं** तें. ॥ १९ ॥ (१०६)
(श्लोक)
आद्या आर्या कवीच्या अतितरमधुरा प्राकृतीं हे न आली,
झाली देवी प्रसन्न प्रभुचरितसुधासिंधु सेवूनि धाली, ।
आली श्रीमत्सितेची निजशिशुवचनीं आदरें चित्त घाली;
व्याली दे पांडुपुत्रा मुनिशतसुहिता भानुची भक्ति थाली. ॥ (आद्यार्यारामायण २३८)



# परिशिष्ट ई.



(गीति)
सरसे! शुचि! प्रसन्ने! अलंकृते! सुकृतिकन्यके! लाहे।
जो तुज, मयूरजे! तो कोण न रसिकांत धन्य केला हे॥ (वा. अ. भिडे)
(श्लोक)
इतर तापशतानि यथेच्छया वितर तानि सहे चतुरानन!॥
अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख॥'
अर्थोऽस्ति चेन्न पदशुद्धिरथाऽस्ति साऽपि। नो रीतिरस्ति यदि सा घटना कुतस्त्या॥
साऽप्यस्तिचेन्न नववक्रगतिस्तदेतद्। व्यर्थं विना रसमहो गहनं कवित्वम्॥ (पंडित मंखक)

## रसिकत्वाविषयीं मोरोपंताचे उल्लेख.

(गीति)
स्त्रीरत्नीं बहु रमला नृप, सरसीं रसिक काय तो कवनीं.॥१॥ (आदिपर्व अ० १० गी० ८०)
सत्कृतिशीं रसिकाची तुजशीं माझी तशीच गांठ पडो.॥२॥ (१२.३७)
अवनीं तुमच्या मज जें रसिकांच्याहि रसिकां सुख न कवनीं.॥३॥ (अ०२८ गी०४९)
संधानशक्ति माझी कांपवि तद्धृदय, जेंवि शिर कविता.॥४॥ (उद्योगपर्व १३.७७)
रसिककवि परमसज्जन भगवद्भक्त प्रसन्न होतील,।
न गमेल यापरिस हित तो जो वदनांत अमृत ओतील.॥५॥ (भीष्मपर्व उपसंहार ४)
खंडन करी प्रतिपदीं कटकीं दोषज्ञ जेंवि दुष्कवनीं.॥६॥ (द्रोण ११.२८)
ती त्याचे कांपवि, जसि आणुनि नेत्रांसि तोय शिर कविता.॥७॥ (द्रोणपर्व १७.७)
ती कांपवी तयाचें, रसिकांचें जेंवि काय शिर कविता.॥८॥ (कर्ण ३७.४६)
सविता बिसिनीसि वरी, कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता.॥९॥ (कृष्णविजय ८६.२७)
रस न समजती, म्हणविति रसिक म्हणुनि चित्त बहुत हळहळतें,।
जें तन्निदक भाषण होतें कर्णांत तप्त हळहळ तें.॥१०॥ (रामरीति ६०)
थोरांहीं स्तविले कवि, तन्निंदा तिळहि सोसवत नाहीं,।
मज सुरसग्रंथांहीं, वृत्तिपरा जेंवि सोस वतनाहीं.॥११॥ (६१)
झालों जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत भर वसायाचा.॥१२॥ (६७)
साधुप्रसाद, आर्यामृतरस रसिकां सख्यांसि दाखवितो.॥१३॥ (नामसुधाचषक ११७)
भेटो रसिक, लवहि जो ग्रंथीं चषकांत नूरवि प्राशी,।
ऐसा वर दे वरदेश्वरचरणा! मज मयूरविप्राशी.॥१४॥ (१२०)

उघडा करितां होइल दूषकखळदृष्टिमक्षिकापात, ।
रसिकांसि शोधितों मी, तों चषकावरि असो तुझा हात. ॥ १५ ॥ ( १२१ )
कंठीं धरूनि व्हावें सत्कृतिला पात्र सज्जनीं रसिकीं. ॥ १६ ॥ (प्रश्नोत्तररत्नमालाउपसंहार ३)
ज्वरितासि शर्करा जसि, कटु होय खळासि सुरसही कविता. ॥ १७ ॥ ( ५ )
सेवावें रसिकवच याचें श्रीराघवें जसें बदर. ॥ १८ ॥ (सन्मनोरथराजि २५)
बोलून डोलवूं हा डोलवितो जेंवि रसिकशिर कीर, ।
मग चिंता काय जडा वाटो याची सदैव किरकीर. ॥ १९ ॥ ( २७ )
देतो सत्संग जना अमृतकराहून शुद्ध सद्यश तें, ।
जें गावें सत्कविनीं रसिकसभेमाजि गद्यपद्यशतें. ॥ २० ॥ (सत्संगस्तव १४)
भेटे दशार्णपति, बहु वर्षे प्रेमाश्रु, रसिक सत्कृतितें ।
तेंवि दृढ धरी हृदयीं महिषीतें करि यथार्थ सत्कृति तें. ॥ २१ ॥ (ब्रह्मोत्तरखंड)
भक्त मयूरकरें हें श्रीगुरुनें लिहिविलें सभापर्व, ।
कीं आर्यानंदांचें रसिकांची नित्य हो सभा पर्व. ॥ २२ ॥ (सभापर्व ७.९२)
रामसुत मयूर ह्मणे ज्ञाल्या रसिकांसि पसरुनी पदर. ॥ २३ ॥ (अनुशासनपर्व अ. ८.९९)
रसिक श्रीहरि, भक्त श्रीहरिच, करुनि तयांस मी नमन, ।
मागतसें, हें व्हावें श्रीरामयशोर्णवांत मीन मन. ॥ २४ ॥ (अनंतव्रतकथा १०२)
जो सुरसिक हरिजन, तो भगवच्चरितींच देखिला रमला, ।
ह्मणतों 'हरिकीर्तन जें, तें सुरभीचें न दे खिलार मला'. ॥ २५ ॥ ( १०३ )
वाणि नसावी लेशहि रसिकपणीं; अणु, महा असो शास्त्र; ।
सर्वांच्याहि, करावें साराला, हृदय आपुलें पात्र. ॥ २६ ॥ (मंत्रभागवत ११-१८३)
हरिहर भक्तरसिक जे, त्यांच्या ह्मणिजेल 'गोड' कानांहीं, ।
थोडा अंकें, अर्थे शिवकीर्तिग्रंथ थोडका नाहीं. ॥ २७ ॥ (ब्रह्मोत्तरखंड, उपसंहार ७९)
(आर्यागीति)
सांगुनि असें दिराला निरोप हा पाठवी क्षितिवराला, ।
दृढ करुनि हृदय, कानें तो ऐकावा समस्त रसिकानें. ॥ २८ ॥ (कुशलवोपाख्यान ४-५४)
(अभंग चरण)
रसिकास जैशी कविता ती सती, । पाहे योग्य पति जनीं वनीं. ॥ २९ ॥
(सावित्रिआख्यान अभंग २२)
(श्लोकार्ध) रामकृष्णचरणीं समर्पित ग्रंथ हो रसिकचित्त तर्पित. ॥ ३० ॥
(कृष्णविजयपूर्वार्ध अंतिमसज्जनप्रार्थना)
कर्णांहीं, भक्तिमान् जो परम **रसिक**, तो अद्भुता या कथा पी. ॥ ३१ ॥
(कन्यारत्नरामायण)
सेवुनि ज्याचें चरित **सुरसिक** प्रेक्षिति हीन अमृत कलशाला. ॥ ३२ ॥ (तन्वीरामायण १४)
(श्लोक) ऐसें ऐकूनि वाल्मीकि वदता जाहला मुखें ।
आकर्णावें रसज्ञांहीं स्वस्थ होउनियां सुखें. ॥ ३३ ॥ (५-५) (कुशलवोपाख्यान)

---

# परिशिष्ट-उ.



(श्लोक) मदुक्तिश्चेदन्तर्मदयति सुधीभूय सुधियः किमस्या नाम स्यादरसपुरुषानादरभरैः ।
यथा यूनस्तद्वत् परमरमणीयाऽपि रमणी कुमाराणामन्तःकरणहरणं नैव कुरुते ॥
(श्रीहर्षकृत नैषध, सर्ग २२, उपसंहार १)

मद्वाणि ! मा कुरु विषादमनादरेण मात्सर्यमग्नमनसां सहसा खलानाम् ।
काव्यारविन्दमकरन्दमधुव्रतानामास्येषु धास्यसितमां कियतो विलासान् ॥
(पंडित जगन्नाथकृत रसगंगाधर)

अकारणाविष्कृतवैरदारुणादसज्जनात्कस्य भयं न जायते ।
विषं महाहेरिव यस्य दुर्वचः सुदुःसहं संनिहितं सदा मुखे ॥ ५ ॥
कटु क्वणन्तो मलदायकाः खलास्तुदन्त्यलं बन्धनशृंखला इव ।
मनस्तु साधुध्वनिभिः पदे पदे हरन्ति सन्तो मणिनूपुरा इव ॥ ६ ॥
सुभाषितं हारि विशत्यधो गलान्न दुर्जनस्यार्करिपोरिवामृतम् ।
तदेव धत्ते हृदयेन सज्जनो हरिर्महारत्नमिवातिनिर्मलम् ॥ ७ ॥
(कविबाणभट्टकृत कादंबरी पूर्वभाग)

## मोरोपंताच्या स्वकाव्याविषयीं अभिमानोक्ति व निंदकास वाग्बाण.

(श्लोक) ऐका सज्जन हो ! भवद्वच खरें, आश्चर्य म्यां पाहिलें,
वाल्मीकिप्रभृति स्वबंदिनिकरीं दीना मला बाहिलें, ।
केलें प्राकृत काव्य ईश्वरपदीं धत्तूरसें वाहिलें,
सांगूं काय वरप्रसाद ? अजि तें व्यासेंहि कीं साहिलें. ॥ १ ॥ (आदिपर्व ३७-१०४)
(गीति)आर्येला मानियलें बहु पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला; ।
खळचि न मानिति, तैसे बहु दूषणसज्ज नीच मत्कृतिला ॥ २ ॥ (सभापर्व ५-११५)
रामघनमयूर म्हणे निववालचि सुरसिकांसि केका हो !
शंभुहि म्हणे न सेविति मंद म्हणुनि झुरसि काशिके कां हो ? ॥ ३ ॥ (वनपर्व १३-१०८)
रामघन सत्प्रसादामृत जों जों बहु वळोनि वर्षतसे ।
तों तों भक्त मयूर स्वार्याकेका करूनि हर्षतसे. ॥ ४ ॥ (विराटपर्व ७-३७)
श्रीनारद वाल्मीकि व्यास पराशर वसिष्ठ शुक सुकवि ।
प्रतिभारक्षक; नाशक खळ किति ? अमृताश्रिता दव न सुकवि. ॥५॥ (भीष्मपर्व उपसंहार ६)

श्रीरामगुरुपदाब्जीं सुकृतिरुचि मयूर स्वकृति हे वाहे, ।
श्रीतुलसीसीं पावुनि बहुमान न कां करील हेवा हे. ॥ ६ ॥ (शांतिपर्व ७-१२४)
वदले साधु मयूरा शुकसम गमसी बरा शिशो ! भावें ॥ ७ ॥ (अनु. ६-९४)
रामसुतमयूर म्हणे जाणेल निका मनीं चमत्कृतिला, ।
नुमजुनि कथे न मानिल तुज तेंवि, निकाम नीच मत्कृतिला. ॥ ८ ॥ (अनुशासन ७-१०७)
स्तवनीं समर्चनीं जरि जिव्हा हस्तें चुका, परि समोर ।
नाचा प्रभुच्या म्हणती गुरु, कीं बहुमत शुकापरिस मोर. ॥ ९ ॥ (अश्वमेधपर्व ६-८६)
धन्य श्रीराम पिता, धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली, ।
आली सत्यवतीची, कीं भारतकीर्ति सुतमुखीं आली. ॥ १० ॥ (स्वर्गारोहणपर्व २-४२)
ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रुक्षपितचंदन मयूरें, ।
आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदन मयूरें. ॥ ११ ॥ ( स्वर्गा० २-५५ )
ज्यांच्या वचनीं चित्तीं कर्मीं सर्वत्र भाव कुशल वसे, ।
या कृतिस तेचि गातिल, सुकृती वाल्मीकिकृतिस कुशलवसे. ॥ १२ ॥ ( स्वर्गा० २-५७ )
(श्लोक) सच्चेतःकैरवातें विकच करि, जगत्ताप संपूर्ण टाळी, ।
अज्ञानध्वांत सारें हरि, रसिकचकोरासि अत्यंत पाळी; ॥
नानावस्तु प्रकाशी, कविहृदयपयोराशिसंतोषहेतु, ।
काव्येन्दु स्वप्रभेनें खळविरहिजनीं होतसे धूमकेतु. ॥१३॥ (प्राकृतमंत्ररामायण उपसंहार ८)
विशुद्ध स्वांताला रुचति गुण पीयूषसम जे, ।
परी त्यातें दुष्ट स्वमनि विष ऐसेंचि समजे; ॥
घृतें क्षीरें होती प्रमुदित मखीं निर्जर खरे,
परी तेही तापप्रदरस जयाला ज्वर भरे. ॥ १४ ॥ ( ९ )
माजी सत्कृति दूषिली जरि खळें उच्छृंखळें आग्रहें, ।
सेवावीच परंतु नित्य रसिकें हे सद्गुणाच्या गृहें; ॥
चंडाळ त्रिदशापगेंत वमला कीं धेनुला स्पर्शला, ।
त्यांचें श्रोत्रियदेवसेव्य पयही, त्याही सदा निर्मला. ॥ १६ ॥ ( १३ )
(गीति) खल निंदिति म्हणुनि बुधें टाकावी काय हरिगुणासक्ति ? ।
दीरनणंदाजाचें साध्वी न त्यागिती सुपतिभक्ति. ॥ १६ ॥ (मंत्ररामायण उपसंहार ५)
काव्य करावें म्यां नच वचकावें दूषिती परि लघूस ।
कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस ? ॥ १७ ॥ (सन्मनोरथराजि ९)
हा कवि मयूर हर्षे सद्धन पाहोनि सरस नाचावा, ।
अति विस्मयें म्हणावें, खळ हो ! निंदूनि न रसना चावा. ॥ १८ ॥ (सन्मनोरथराजि ७०)
प्राकृत म्हणोनि निर्भर हांसोत अतज्ञ नीच मत्कृतिला ।
परि जाणशील बा ! तूं रसिक कविवरा ! मनीं चमत्कृतिला. ॥ १९ ॥ (नामरसायन ६७)
आर्यामुक्तामाला दावीन परंतु जरि न मागाल; ।
लागाल प्रभुकंठीं घालूं, फुगवील कीं रमा गाल. ॥ २० ॥ ( १०९ )

(श्लोक) पद्माकांतपदींच 'कृष्णविजय' ग्रंथांबुजन्मांजली ।
भावें वंदुनि अर्पिला हरिजनांमध्यें किती जे अली, ।
ते याचा रस सेवितीलचि, शिरीं वाहेल सन्मंडली ।
हा स्वस्वामिपदप्रसाद खल तो भीतील जैसा कली. ॥ २१ ॥ (कृष्णविजय ९० उपसंहार ४)

(कृष्णविजय पूर्वार्ध फार क्लिष्ट झाला म्हणून त्यावर बरीच प्रतिकूळ टीका झाली म्हणून कीं काय त्याच्या अखेरील पंतलिखित प्रतींत मागाहून पंतांनीं निंदकावर ताशेरा झाडलेले पांच सुंदर श्लोक स्वहस्तें लिहिले आहेत ते असेः—)

(१) (श्लोक) दानस्नानजपोपवासनियमें पापासि जें वारितें, ।
देतें पुण्य जनासि, 'तीर्थ' म्हणुनी सन्मानिसी वारि तें; ॥
जो एतन्निरपेक्ष निंदक गुणें तैसाचि पापापहा ।
त्याला साधु न कां मना ! म्हणसि रे ! सन्मार्ग बापा ! पहा. ॥ २२ ॥

(२) पापाचे बहु दाट काट चढले फारा दिसांचे लया ।
नेल्ये सर्व, मना पुन्हां मळवितां तैसें न सांचेल, या, ॥
दे आम्हां कुतुकें, परेष्टकरणोद्योगीं फुका जी भरे, ।
सन्मान्या चिरजीविनी, तुझि असो ती निंदका ! जीभ रे ॥ २३ ॥

(३) घेती माथां परांचा दुरितभर बळें, तुल्य थोरीं लहानीं, ।
देती पुण्यें सुकष्टेंकरुनि मिळविलीं, मानिती ही न हानी, ॥
एवं ज्यांची परार्थ स्थिति, सदुपकृती सज्जना सोयरी ती, ।
साजे निंदा तिला ही अजि ! कविजनहो ! हे बरी होय रीती ? ॥ २४ ॥

(४) आम्हां श्रीरामभक्तां अजितनुतिविणें स्वस्तुती तों न अर्हा; ।
पापघ्नी, पुण्यदात्री, करिशिल जरि तूं, निंदका ! होय गर्हा. ॥
मानूं तोषा न रोषा, परि म्हणति तुझां निंदकां वेद, 'वाटे ।
स्वर्गाच्या चूकले हे पडतिल नरकीं,' हा मना खेद वाटे. ॥ २५ ॥

(५) सुमार्गींही हेतु स्खलनपतना होय खळगा, ।
प्रमादी जे, त्यांला अचुकचि मना ! तेंवि खळ गा ! ॥
न कांटे, धोंडेही, करिति गतिचा रोध डबरे ।
तयांच्या, जे आंगे कुशळपदचालों धड बरे. ॥ २६ ॥

(६) देवा ! निरामय सुखी शतवत्सर सर्व खळ असावेच, ।
न प्रार्थितां न च करिल पंकाचा तीर्थजळ असा वेच. ॥ २७ ॥ (रामरीति ४७)

(७) निंदेनें मन माझें श्रीगिरिशाचें जसें न तापावें, ।
श्रीरामा ! कीं भलत्या लद्दासाचें तसें, नता पावें. ॥२८॥ (राम० ५५)

हरिदासातें निंदिति हरिदास, नव्हे नवीच हे रीती, ।
गोपी अंगुलि मोडिति कुब्जेवरि, शुक कवीच हेरी ती. ॥२९॥ (राम ५२)
हरिभक्ता कर्मठ कवि, निंदिति हरिदास कर्मठ कवीतें, ।
दोष कळोनिहि रुचतो, प्रबळ प्राचीन कर्म ठकवीतें. ॥३०॥ राम० ५३).

( तसेंच निंदकाविषयीं रामरीति ४८—५१,५४,५६—५७ इ० पहा. )

# परिशिष्ट—ऊ.





## वर्णनविस्तार व वर्णसंक्षेप.

पंतांच्या काव्यांत वर्णनविस्तार हा प्रकार फारसा आढळत नाहीं. त्यांना भारत, रामायण, भागवत वगैरे अनेक मोठ्या ग्रंथांतील कथावर्णन करावयाच्या असल्यामुळें वर्णनविस्तार करण्यास सवडच नव्हती. एक रामकथाच त्यांनी १०८ निराळ्या प्रकारांनी वर्णिली आहे. मंत्रभागवतांत भागवतांतील सर्व कथा आणिली असून दशमस्कंधाच्या आधारें त्यांनीं बृहद्दशम (कृष्णविजय)हि रचिला. या शिवाय १८ पर्वें भारत, हरिवंश, प्रल्हादचरित्र, सप्तशती, हरिश्चंद्राख्यान, मदालसा-चरित्र, इत्यादि कित्येक पौराणिक आख्यानें व अनेक स्फुट काव्यें त्यांनीं रचिलीं असल्या-मुळें जेथें जेथें त्यांना विस्तारपूर्वक वर्णन करण्याची आपली आवड कष्टानें एकीकडे ठेवून व हात आटोपून वर्णनसंक्षेपच करावा लागला असावा असें दिसून येतें. तरी कांहीं ठिकाणीं त्यांनीं वर्णविस्तार केल्याचें दिसून येतें. या दोन्ही प्रकारांची थोडींशीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

**(१) वर्णनविस्तार**—कृष्णविजयांत पंतांनीं थोडाबहुत वर्णनविस्तार पुष्कळ ठिकाणीं केलेला आढळतो. यांतील कित्येक वर्णनांस मूळांत मुळींच आधार नसून तीं वर्णनें पंतांच्या स्वतंत्र करामतीचीं व उज्वल प्रतिभेचीं दर्शक आहेत. कित्येक ठिकाणीं मूळांतील अत्यल्प वर्णनांत पंतांनीं आपल्या उज्ज्वल कल्पनेचा नवीन मालमसाला घालून सुरेख चिरेबंदी काम उठवून दिलें आहे. कृष्णविजयांतील टीपांत याविषयीं जागोजागीं उल्लेख केले आहेत. याचीं थोडीं उदाहरणें:—

(नारदाचें वर्णन) जो लोकत्रितयीं फिरे, स्थिर नसे, ताटीं जसा पारद, ।
स्वांत ध्येयपदींच निश्चळ भवांभोधींत जो पारद, ॥
जो वर्णे गगनोदरीं क्षण दिसे पूर्णेंदु कीं शारद, ।
श्रीशांतःपुरचत्वरींच उतरे तो सन्मुनी नारद. ॥ १ ॥ (कृष्ण. ५५-३८.)

वरील नारदाच्या वर्णनास मूळांत कांहीं एक आधार नाहीं. तसेंच पुढें नारदानेंच प्रद्यु-म्नाचें शंबरकृत हरणादि सर्व वृत्त कथन केलें एवढ्याशा पराला धरून कवीनें ३९—४६ या श्लोकांत वर्णन विस्तार केला आहे.

तसेंच अ० ५६ श्लो० ३५ त कृष्णाच्या सुहृद्वर्गांनीं महामाया दुर्गेची स्तुति केली एवढेंच वर्णन असून पंतांनीं **कृष्णविजयांत** अ० ५६ श्लो० ४०-४२ त देवीची विस्तारपूर्वक स्तुति वर्णिली आहे. त्याचा मासलाः-

ज्या लाभे या पदींचा शुभनियतिबळें सेवका एक रेणु, ।
त्यातें माथां वहाया सविनय सहसा जिष्णुचा ये करेणु; ॥
आदेश स्वर्द्रुचिंतामणिसुरकपिला कां न त्याचा करीती? ।
कीं मोटा भाग्यलाभ स्वसुकृत फळलें तें नव्हे चाकरी ती. ॥२॥ (कृष्णविजय५६.४१)

आह्मां वांचविलें तुवांचि जननी! त्या दुष्ट कंसारसा- ।
शल्यापासुनि दाविला सकरुणे! लोकांत संसारसा; ॥
वैदर्भी दुहितांचि भूषवु इला त्वत्पाणि कांसारसा, ।
अन्या दे परितुष्टि पुष्टि, न निजां दे पाणि कां सारसा? ॥ ३ ॥ (कृ. वि. ५६.४२)

अध्याय ६५ श्लो० १, ११, १३, १७, २७–२९, ३६, ३७ ह्या श्लोकांस मुळांत क्वचितच आधार असून ते पंतांच्या प्रतिभारूपी मुशींतून निघाले आहेत. त्यांतील थोडे श्लोक पहाः-

गोपी बळरामास कृष्णाविषयीं विचारितातः—

रामा! येइल एकदा तरि हरी मातेसि देखावया? ।
ऐसें काय ह्मणेल 'साय नलगे, लोणीच दे खावया'? ॥
आल्या नातसुनांहि, तें वय न हें साचें, परी मावली ।
तेचि, प्रीति दया इची न पहिली ती विक्रिया पावली. ॥ ४ ॥ (कृ. वि. ६५.१३)

३७ श्लोकांत यमुना बळरामाच्या पायां पडली तेव्हांचें वर्णनच घ्यानाः—

यमुना बळरामास ह्मणत्येः—

गोपस्त्रीमणिमंडली गुरुवरा! माझी प्रिया आलि, या ।
पायातें भजते, महा-हित खरें जन्मासि हें आलिया, ॥
सेवेला चुकल्यें जडप्रकृति मी दासी तुझी शिक्षिता, ।
झाल्यें सावध, मुक्तिदा! नतपरित्राणक्रियादीक्षिता! ॥ ५ ॥ (कृ. वि. ६५.३६)

रामाच्या पदपुंडरीकयुगुळीं सेवी रसा षट्पदी,
किंवा भक्तसमर्पिता सुतुलसीमालाचि कीं तोरदी, ।
लोळे तत्पदशृंखळाचि, अथवा तो देव हंसच्छदी
छाया, किंबहुना दिसे प्रभुपदीं रम्याचि कृष्णानदी. ॥ ६ ॥ (कृ. वि. ६५.३७)

तसेंच २७-२९ श्लोकांतील मदिरापानाचें व भगवत्कीर्तिपानाचें वर्णन कसें सुरस झालें आहे त्याचा थोडासा मासला पहाः—

लज्जा, गेहकुटुंब धर्मरुचि, भी, देहस्मृतीही गळे,
आधीं हांसति बाळ कर्मठ भले, होती तयां वेगळे; ।
तोंडीं शब्द विचित्र, अश्रु नयनीं, पुण्यर्धि सारी ढळे; ।
कां पीती मदिराचि मूर्ख भगवत्कीर्तिप्रिया नाढळे; ॥ ७ ॥ (कृ. वि. ६५.२७)

देहातें विसरे, न मृत्युस गणी, हांसेहि, नाचे, रडे,
लज्जा जाय, नुरेहि रीति पहिली, अन्यान्वि अंगीं जडे, ।
हें पानव्यसनीं असे सुख, तरी तें कीर्तिपानीं घडे,
पायीं विश्व पडे, न जाय नरकीं, कां मद्यप्या नावडे ? ॥ ८ ॥ (कृ. वि. ६५.२८)

अ० ६९ श्लो० २५; अ० ७१ श्लो० ९, १२, १४, १५ ह्यांवरून, पंतांचें रचनाचातुर्य व कल्पकता हे गुण चांगले दिसून येतात.

आज्ञा दे नारदातें, मग अजित ह्मणे भूपदूतास, 'जा गा ! ।
राजांला सांग ऐसें अभयवचन कीं जाहला सिंह जागा; ॥
बाळांच्या धर्षणातें करि, बहु न गणी जो मदानें निजांगा, ।
त्या होय त्राण कोठें यमवसतिविना प्राप्त विश्रांत जागा. ॥ ९ ॥ (कृ. वि. ७१.९)

कृष्णदर्शनसमयीं नेत्राचीं पातीं लवत तीं सुद्धां स्त्रियांस विघ्नरूप वाटत व स्त्रिया पातीं उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवास व पालकनिमीस तळतळून शाप देऊं लागल्या. तेव्हांचें वर्णनः—

जीं दुष्प्रापा पहातां लवति बहुदयापूर्णमेघा, तपा तीं ।
विघ्ने, तैसा वधूंचा करितिच सहसा तो गमे घात पातीं ॥
ऐशांच्या निर्मित्यातें अकरुण विधितें, पाळकाही निमीतें ।
देती शाप स्त्रिया जें तळतळुनि ह्मणें योग्य मध्यस्थ मी तें. ॥१०॥ (कृ.वि.७१.१४)

पौरस्त्रिया कृष्णस्त्रियांचें भाग्य वर्णितांना ह्मणतातः—

पौरस्त्री ह्मणती, 'अहो ! सुकृत या कृष्णांगनांचें गणी ।
कोण प्राज्ञहि ? याहुनी सुरवधूभाग्यें बहू ठेंगणीं. ॥
झाली श्रीच अनेकमूर्ति पतिला सेवावया काय कीं ।
रूपें आणि गुणें तशान्वि परम प्रेमाहि मानायकीं. ॥ ११ ॥(कृ. वि. ७१.१५ )

अ० ७२ श्लो० १९–२७ हे नऊ श्लोक पंतांनीं मुळांतील एका (२१ व्या) श्लोकाच्या आधारानें रचिले आहेत. त्यावरून त्यांची विस्तारप्रियता दिसून येते. यांत श्रीकृष्णानें मगधराज जरासंधापाशीं इष्टदान मागतांना हरिश्चंद्र, रंतिदेव, मुद्गल, शिबि, बली, यांचें औदार्य एक एका श्लोकांत वर्णून शेवटच्या चार श्लोकांत कपोत पक्ष्यानें अतिथिरूपानें स्वगृहीं प्राप्त झालेल्या क्षुधित व्याधास आपलें व आपल्या स्त्रीचें मांस अर्पण करण्याचें असामान्य औदार्य दाखविलें ह्या कथेचा विस्तृत उल्लेख केला आहे. थोडासा मासला पहाः—

विश्वामित्रास राज्य प्रथमन्वि दिधलें, जोडिती ज्यासि यत्नें, ।
दे वित्त स्वस्थचित्त प्रभुवर विकुनि स्वप्रियापुत्ररत्नें; ॥
झाला चांडाळदास क्षितिपतितिलक श्रीहरिश्चंद्र, सारे ।
गाती अद्यापि त्याचें यश कवि, धवळी विश्व जो चंद्रसा रे ! ॥१२॥(कृ.वि.७२.१९)
अठ्ठेचाळीस गेले दिवस, मग मिळे यत्कुटुंबा अवन्न, ।
प्राप्तातिथ्यर्थ तेंही सकळहि सरतां, जो नव्हे अप्रसन्न, ॥
कां येना आपणातें जगदसुख असीही करी खंति, देव- ।
स्तुत्य ब्रह्मालया तो सनिजजन सुखें पावला रंतिदेव. ॥ १३ ॥ (कृ. वि. ७२.२० )

भक्षूं संग्रह जाहल्यावरि अशा आशावशें वांचले, ।
धान्याचे कण यत्कुटुंब मिळवी षण्मास जों सांचले, ॥
कांहीं धान्य पुरेलसें शिजविलें तों भोजना उद्गल ।
प्राप्तार्थीप्रति देउनी विधिपुरीं नांदे सुखें मुद्गल. ॥ १४ ॥ (कृ. वि. ७२-२१)
पाठीस श्येन लागे, ह्मणुनि शरण ये, दावि बाधा कपोत, ।
त्राणार्थी अंक जैसा वरि निजगुरुचा पावला धाक पोत, ॥
त्या श्येनास स्वमांस क्षितिपतिपतितें दे न भीतां खगा, तो ।
स्वर्गा गेला महात्मा शिबि, अतुलयशा ज्याचिया शक्र गातो. ॥१५॥(कृ.वि. ७२-२२)

तसेंच कृष्णविजयांत पंतांनीं अनेक कल्पना अगदीं नव्या घातलेल्या आढळतात. त्यांचीं उदाहरणें शोधक वाचकांस त्यांत मुबलक सांपडतील. अ० ८१ गी० ८६–९० या पांच आर्यांतील प्रेमळ व रसाळ वर्णनास मूळांत आधार अगदींच अल्प आहे.

मूळांतील श्लोक २७ वा रूक्ष असून हें गीतिपंचक फार सरस आहे. तें मूळाशीं ताडून पाहिलें असतां पंतांनीं भागवतकारांवर येथें ताण केली असें आढळून येईल. तें गीतिपंचक व मूळ श्लोक रसिक व मार्मिक वाचकांच्या सोयीकरितां येथें उतरून घेतों. (सुदाम्यास गळ्यांत सुवर्णालंकार घातलेल्या दासींमध्यें स्वर्गस्थ देवीप्रमाणें आपल्या अलौकिक तेजानें प्रकाशणाऱ्या स्वस्त्रीस पाहून झालेला विस्मय)

(मूळ श्लोक) पत्नीं वीक्ष्य विस्फुरन्तीं देवीं वैमानिकीमिव ।
दासीनां निष्ककंठीनां मध्ये भान्तीं स विस्मितः ॥ १६ ॥ (८१.२७ भागवत)

(गीति) विप्रें विलोकिली ती अमरींमध्यें जसी शची देवी, ।
जे वीजिता सुचामरसुव्यजनीं, स्त्रीसहस्र जिस सेवी. ॥१७॥ (कृ.वि.८१.८६)
मूर्तिमती सकळकळा गानकळा यांत काय ती आर्या, ।
कीं मात्रावर्णगणच्छंदोजातींत काय ती आर्या. ॥१८॥ (कृ.वि.८१.८७)
कीं तारांच्या वृंदीं मूर्तिमती रोहिणीच ती, अथवा ।
ती हरिकीर्ति, तदनुचरजनकीर्तीचाचि तूर्त काय थवा?॥१९॥(कृ.वि.८१.८८)
कीं कविजनोक्तिनिकरीं कविनृपवाल्मीकिविप्रवरवाणी ।
त्या भक्तराजराजें ऐसी ती देखिली सतीराणी. ॥ २० ॥ (कृ. वि. ८१.८९)
काय पुन्हा तो वरिला हरि लालसमानसें वर श्रीनें ? ।
स्त्रीनें हस्तीं धरिला पति, लाजविलें तिला वरश्रीनें. ॥२१॥ (कृ.वि. ८१.९०)

योग्य प्रसंगीं वर्णनविस्तार कसा करावा हें या व पुढील उदाहरणांवरून पंतांस चांगलें कळत होतें असें म्हणावें लागतें.

पंत प्रसंगविशेषीं वर्णनविस्तार किती व कसा करित असत याचें मार्मिक व उत्कृष्ट उदाहरण पाहावयाचें असल्यास तें ८३ अध्यायांत कृष्णस्त्रियांनीं द्रौपदीला आपल्या विवाहकथा सांगितल्या आहेत तें होय. मूळांत कालिंदी, भद्रा, जांबवती, मित्रविंदा, भामा, सत्या व लक्ष्मणा यांच्या विवाहकथा एक एका श्लोकांत आटपल्या असून मोरोपंतांनीं त्यांच्या वर्ण-

नांत अनुक्रमें ७, ८, ९, १३, १६, व १९ इतक्या गीती खर्चिल्या आहेत. रुक्मिणीचें विवाहवृत्त मूळांत एकाच श्लोकांत वर्णिलें आहे. तें असें:—

चैद्याय माऽर्पयितुमुद्यतकार्मुकेषु राजस्वजेयभटशेखरितांघ्रिरेणुः ।
निन्ये मृगेंद्र इव भागमजावियूथात् तच्छ्रीनिकेतचरणोऽस्तु ममार्चनाय. ॥ २२ ॥
(भागवत ८३.८)

हें विवाहवृत्त पंतांनीं अत्यंत सुरस रीतिनें ९–१०० या ९२ गीतींत वर्णिलें आहे. वर्णनाची आरंभसमाप्ती अशी आहे:—

(गीति) प्रथम ह्मणे वैदर्भी, 'बाई ! होतें लहान मी कन्या, ।
धन्या कृष्णकथा मज तेव्हांचि रुचे, न आवडे अन्या. ॥ २३ ॥ (कृष्णविजय८३.९)
.......................................... .
द्रौपदि ! असी कथा हे लग्नाची, फार मी वदों काय ? ।
पाय प्रभुचे संतत पूजावे तरिच सफळ हा काय.' ॥२४॥ (कृष्णविजय ८३.१००)

पंतांनीं प्रसंगविशेषीं 'भारत', मंत्ररामायण' व 'हरिवंश' या ग्रंथांतूनही वर्णनविस्तार केलेला आढळतो. भीष्म. अ० १ गी० ९३–९५ यांतील कृपाचार्योक्तींत वर्णनविस्तार असून हरिवंश अ० ५४ तील त्रिपुरवधकथेंतही नीलकंठी टीकेच्या आधारानें विस्तारच आहे. के० ७२ पृ० २८६–२८७ टीप पहा.

(२) (अ) **वर्णनसंक्षेप किंवा विस्तारभीरुत्व**—याबद्दल तर पंतांची मोठी ख्याती आहे. महाभारतांतील कित्येक मोठालीं आख्यानें प्रसंगविशेषीं त्यांनीं थोडक्यांत आटपून टाकलेलीं आढळतात. उदाहरणार्थ, उद्योगपर्वांत गरुडगर्वपरिहारकथा व गालवाख्यान या कथा अनुक्रमें ९ व १७ अध्यायांत सविस्तर वर्णिल्या आहेत. त्यांचा संक्षेप पंतांनीं अनुक्रमें २८ व २२ गीतींत केला आहे, तसेंच विदुरनीति, कणिकनीति, श्रीभगवद्गीतादि अनेक गीता, विष्णुसहस्रनाम, सनत्सुजात, उत्तरगीता, शांतिपर्वांतील पुष्कळ ठिकाणचे उपदेश इत्यादि प्रकरणें त्यांनीं सोडून दिलीं आहेत, नुसता उल्लेख केला आहे किंवा त्यांचा अतिसंक्षेप केला आहे. एवढेंच नव्हे, तर कांहीं प्रसंगीं त्यांनीं एकाच गीतींत आख्यानाचें आख्यान आटपलें आहे. क्वचित् प्रसंगीं एका गीतींत दोनचार आख्यानांचा उल्लेख करून पंत पुढच्या मार्गास लागले आहेत. **विस्तारभीरुत्वाचे उल्लेख** पंतांच्या काव्यांत पुष्कळच आढळतात. त्यांपैकीं कांहीं निवडक उदाहरणें पुढें दिलीं आहेत—

व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी ।
आर्यावृत्तें रचितों, **स्वल्पांतचि आणितों कथा सारी.** ॥१॥ (आदि.१९)
अमृतार्थ युद्ध दारुण केलें ती **बहुकथा, असो**; यत्नें ।
सिंधूंतूनि चतुर्दशसंख्याक प्रकट जाहलीं रत्नें. ॥ २ ॥ (आदि. ४-६३)
जनमेजय नृपति पुसे, वैशंपायन कथी सविस्तर; तें ।
बहु; **मी लेशचि गातों**; जगलेशेंही महद्यशें तरतें. ॥ ३ ॥ (आदि.९.१)
**रणविस्तर काशाला** हेमाक्षरणीं महाकिरी टिकला, ।
कीं अर्जुन कर्णरणीं अरिस बहू तोषवी किरीटिकला. ॥४॥ (आदि.३३-६९)

**विस्तर असो** तयासीं भीमासीं बाहुयुद्ध आरंभे; ।
पूर्वागत म्हणति किती हा उर्वशि ! हा घृताचि ! हा रंभे ! ॥५॥ (सभा.१-१११)
ऐसें अजातरिपुमुख शशिमंडळ अमृत तेंवि वाचिक वी, ।
**तें बहु असोचि, विस्तरवद्ग्रंथ प्राकृतीं न वाचि कवी.** ॥ ६ ॥
(उद्योग. ३.७३)
स्वल्पचि रसिक मत वदति; बहुत लिहुनि काय कवि कथा विकिती ? ॥ ७ ॥
(द्रोण. ५-५४)
राजा ! त्या देवांच्या आचार्यांत प्रवेशला द्रोण; ।
मुनि वदला परि **विस्तरभीरु** कवि पुन्हां वदेल हें कोण ? ॥८॥(स्वर्गा.२-२३)
होउनि पुल्कसदास द्वादशमास क्षितीश तो राहे, ।
पाहे स्वप्न तयावरि तें, हें **संक्षिप्त वर्णिलें** आहे ॥९॥ (हरिश्चंद्राख्यान ३-४)
ते जरि पदार्थ इतरें वर्णावें, ग्रंथ बहु न कां वाढे ? ।
रसिकहि निरलस सादर साधु सदा स्वस्थ थोडके गाढे.॥१०॥(मंत्रभागवत९.६१)
वाखाणावें किति तें म्यां **विस्तरभीरुनें** ? जयां न मन ।
विसरे क्षणहि कवींचें केलें साष्टांग हें तयां नमन· ॥११॥ (मं. भा. ७-१७५)
**मोठें चरित परि** तसें तें देवें **थोडक्यांत आठविलें**; ।
कीं सुख तज्ञ जनाला काय श्रीवामनें न वाटविलें. ॥ १२ ॥ (मं. भा. ९.६८)
यदुपतिच्या चरणाब्जीं वाहियला स्कंध लेश अष्टम हा, ।
अल्पहि बहु फळ होतें कृष्णार्पित चुकवितेंचि कष्ट महा. ॥ १३ ॥
(मं. भा. ८-१५४)
वाचा शुद्ध कराया थोडेंही वर्णिलें पुरे यश तें, ।
वर्णन सरेल कल्पावधि करितां आननाचिया न शतें. ॥१४॥ (मं.भा.९-३७०)
सुकुमारबुद्धि वक्ते श्रोते जे त्यांसि कीर्तनश्रवण ।
व्हाया **स्वल्पाचि कथा लिहिन** रसिकसाधुरंजनप्रवण. ॥ १५ ॥
(हरिवंश १-७)

**(आ)** ग्रंथविस्तार फार होईल, अजून मजल पुष्कळ मारावयाची आहे म्हणून **मुद्दाम कथासंक्षेप** केला अशांचीं उदाहरणें:—

झाला नृपति वसिष्ठस्पर्धेनें विप्र तें असो आतां, ।
**विस्तरभय** दे नाहीं तरि काळाचेंहि भय नसे गातां. ॥१६॥ (आदि. ३२-४०)
भीमाच्या विजयातें विदुर सविस्तर नृपासि आयकवी ।
तें **ग्रंथविस्तराला भ्याला** जो तो वदेल काय कवी ? ॥१७॥(वन. १.९६)
सेवी पांडव सिद्धाश्रमतीर्थातें; तदीय महिम्यातें ।
**विस्तरभयें न लिहिलें** रसिकानुमतें मनोरमहि म्यां तें·॥१८॥(वन.५-१०)
गाया श्रवण कराया योग्य परी **ग्रंथविस्तराकरितां** ।
**इतिहास गाळिला हा,** झाला श्रम मजहि चित्त आवरितां. ॥ १९ ॥
(कर्ण. २१-४४)

नंद कुरुक्षेत्रांतुनि गेला यदुवीरही निजावासा, ।
या सार कथा गातां **आवरितों ग्रंथविस्तरचि दासा.** ॥ २० ॥
(कृष्णविजय ८४-४९)

**वाढेल ग्रंथ ह्मणुनि आवरितों मी बळेंचि रसनेला,** ।
परि म्यां भागवतानें भागवतांतील फार रस नेला. ॥ २१ ॥
(मंत्रभागवत १०-४२८)

**वाढेल ग्रंथ बहु** प्रणति करुनि सोडिलाचि म्यां गातां; ।
तत्वें पुरुषप्रकृती भक्त पुसे लिहिन किमपि तें आतां. ॥२२॥ (मंत्रभा. ११-४४७)

**(इ) मंत्ररचनेंत अडचण पडते ह्मणून वर्णनसंक्षेपः—**

वानावीं पाताळें सप्त बळि श्रीअनंत वानावे, ।
परि **मंत्रवर्ण अडविति;** आदरिले गुरु कसे न मानावे? ॥ २३ ॥
(मंत्रभा. ५-६२)

**(ई) खुबीदार वर्णनसंक्षेपः—**

ज्या पापें सुरवानरकृतघनजयरव मुहूर्त लोपविला, ।
खळदारविलापरवा कां वर्णिल कवि मयूर कोपविला? ॥२४॥ (वनपर्व १२-८०)
त्याच्या दक्षिणपार्श्वी अश्वत्थामा, पुढें कृप, द्रोण ।
दुःशासनादि बहु खळ होते, आर्यांत योजितो कोण? ॥२५॥ (विराट. ६-२२)
श्रोते हो! वर्णावें किति? मज गप्पी असें वदाना कीं? ।
स्वल्प उपप्लव्यपुरीं उत्सव, बहु होय हो तदा नाकीं. ॥२६॥ (विराट. ७-३५)
खळकृतगुरुनिंदेतें वर्णील कधीं न विस्तरें सुकवी; ।
कीं ती श्रीगुरुभक्ति प्रेमामरपादपांकुरा सुकवी. ॥ २७ ॥ (विराट. ४-१७)
रावणसा बहु विनवी प्रेम प्रत्यक्षरींहि नव दावी, ।
कीचक नीच कलुषनिधि त्याची आर्यांत गोष्ट न वदावी. ॥२८॥ (विराट. १-४८)
देवाच्या कीं गाती तद्भक्तांच्या यशास नर; कां तें ।
हर्षद सोडुनि, वर्णू तापद जे त्यां कशास नरकांतें? ॥२९॥ (मं. भा. ५.६४)

**(उ) अतिसंक्षेप.** आख्यानाचें आख्यान किंवा दोनचार आख्यानें एकाच गीतींत आटोपल्याचीं थोडीं उदाहरणें:—

एक कृषीवळ–पीडित दुर्बळ वृष पाहतांचि महिवरती, ।
ख्याता सुरभी देवी स्नेहें झाली उदंड गहिंवरती. ॥ ३० ॥ (वन. १-६०)
तो ब्राह्मणमाहात्म्य क्षत्रियमाहात्म्य त्यासि आयकवी; ।
वर्णी पतिव्रतेचें माहात्म्यहि सर्व योगिराय कवी. ॥ ३१ ॥ (वन. ६-५५)
धर्मव्याध स्कंदप्रभवादि कथा उदंड तो बोले; ।
श्रवणें धर्म ब्राह्मणगण नारद फार देवही डोले. ॥ ३२ ॥ (वन. ६-५६)
सांगुनि निजवृत्त, तिचें वृत्त पुसे तीस कोटिक विहितसें, ।
**स्वल्पांत तीहि सांगे** बोलों शकती न कोटि कविहि तसें. ॥३३॥ (वन. ९.५)

आणखीं उदाहरणें पहाः—

दुर्योधनानुजन्मे पौलस्त्य; तयां न साधु मानावें ।
**विस्तरभयें** तयांचीं मी सांगेनाचि सर्वेथा नांवें. ॥ ॥ (आदिपर्व ९.५६)
**विस्तरभयास्तव** कणिकनीत्यंतर्गत कथाचि असि कांहीं ।
लिहिली ईच्या श्रवणीं आदर करिजेल साधुरसिकांहीं. ॥ (आदि. २०.२६)
नित्य नवेचि महोत्सवकोटींचे त्या सभेंत भर भरती. ।
**विस्तर कशास?** परि हरिदासगृहींची उदंड भरभर ती. ॥ (सभा. १.११)
इतुक्याचि राजसूयक्रतुच्या या वर्णनें रसिक हर्षो; ।
काय डरडरां ढेंकर देवुनि चातक ह्मणेल? 'बहु वर्षो'. ॥ ॥ (सभा. २.२४)
क्षोभे बहु या वचनें, त्याला उपमान दुष्ट कुतरेंच; ।
**विस्तर असो**; तयाचा उतरी, शिर हरुनि शौरिसुत, रेंच. ॥…॥ सभा.२.३९)
धौम्यहि विचार पुसतां सांगे धर्मासि तीर्थयात्रा, त्या ।
**कविविस्तरभय** न हरिति, जरिहि हरिति भक्तभवभया त्राल्या. ॥
(वन. ५.३)
मुनि सर्व तीर्थयात्रा करउनि ने गंधमादननगातें, ।
मातें मन्मति ह्मणत्ये, 'मानवतिल साधुपाद न, न गा तें. ॥ ॥ (वन. ५.१२)
सांगुनि सौगंधिकवनपुष्करिणीच्या सुनीतिच्याहि पथा, ।
**आटोपी** मूर्तिप्रति मारुति, हा **कविहि तद्विशालकथा.** ॥ ॥ (वन.५.८२)
**विस्तरभय** नसतें तरि वर्णाया काय सुकविला परवा? ।
प्रभुच्याहि वर्णिति श्रीवाल्मीकिव्यासशुक विलापरवा. ॥ ॥ (वन. ५.७९)
**ते किति वर्णावें** म्यां? पाहत होते विचित्र-समरा जे, । ॥ (विराट. ४.९७)
पूजा करितां शल्य, स्तुति करितां धर्मेही, बसे उगला, ।
पूज्यत्वें स्तुत्यत्वें ते न, परि ग्रंथ मात्र हा फुगला. ॥ (उद्योग. २.१७)
ऐसें धर्मानुमतें कृष्णानुमतें उदंड वदला, हो!
**तें बहु काय वदावें?** शीघ्र अजातारि राज्यपद लाहो. ॥ ॥ (उद्योग. ४.१७)
भव्या भगवंताच्या कथिल्या लीला कथा अशा कांहीं, ।
या विस्तरें वदाया सामर्थ्य नृपा! अजासही नाहीं. ॥ ॥
(मंत्रभागवत १२.८०)

तसेंच मंत्रभागवत ४.१०७ (सुरमणि…), ५.६३ (सुज्ञसमाज…); ९.३६९ ('ते रामकृष्ण…'), कृष्णविजय अ० ८५,४९ ('इत्यादि…'), ८८.८२ ("ऐसे…") इत्यादि पहा.



# परिशिष्ट क.



'यमकप्रासादि चमत्कार जरी श्रमसाध्य असले तरी मोरोपंतांनीं ते जितक्या तऱ्हेचे केले आहेत तितके करणें व तितक्या सहज रीतीनें करणें हीं दोन्ही कृत्यें प्रायः दुर्घटच होत. सरस्वतीचा ज्यास प्रसाद असेल म्हणजे सारी भाषा ज्याच्यापुढें जशी काय हात जोडून उभी असेल, त्यासच वरील गोष्ट साध्य होय. संस्कृत भाषेचे अत्यंत उज्वल स्वरूप जसें श्रीहर्षकृत 'नैषधांत' दृष्टीस पडतें तसें मराठीचें मोरोपंताच्या काव्यांत आढळतें. नैषधांत जशी अनुप्रासाची गर्दी आढळते व रचनेची कृत्रिमता नजरेस येते त्याप्रमाणेंच आमच्या महाराष्ट्र-कवीच्या कवितेंतहि अनुप्रास व यमक हीं दोन्ही भरपूर असून पदरचनाही प्रायः केवळ सुगम नसते. (निबंधमाला—मोरोपंताची कविता)'

'यमकांकरितां किंवा प्रासानुप्रासांकरितां अर्थाची हानि न होईल अशी यमकरचना व प्रासरचना मोरोपंतानें मात्र आपल्या ग्रंथांत साधली आहे. पंतांनीं ह्या शब्दालंकारांनीं आपल्या आर्यारूप कवितासुतेस कोशागारांतील भरगच्ची लांबरुंद पाटावें नेसविलीं आहेत. इतर कवींच्या कवितेविषयीं सामान्यत्वें असें म्हणतां येईल कीं त्यांच्या कवितासुतांस हा महावस्त्राचा लाभ कपिलाषष्ठीचा योग आला असतां त्या महापर्वणीच्या दिवशीं मात्र व्हावयाचा. (विविधज्ञानविस्तार—रा. गुंजीकर)'

## (१) अनुप्रासचमत्कार.

( श्लोक ) श्रोत्राण्यनर्गलगलन्मधुबिंदुगर्भसंदर्भसुंदरपदोपचितैर्वचोभिः ।
धन्याः सतां सुकवयः सुखयन्ति तेऽपि तेषामकृत्रिमचमत्कृतिसाधुवादैः ॥
ते केचिदस्खलितबन्धनवप्रबन्धसंधानबंधुरगिरः कवयो जयन्ति ।
येषामचर्वितरसापि चमत्करोति कर्णे कृतैव भणितिर्मधुरा सुधेव ॥
( 'स्तुतिकुसुमांजलिः', श्रीजगद्धरभट्टविरचित काव्यमाला २३; स्तोत्र ५,४–५ )

सारख्या अक्षरांची आवृत्ति होणें याला अनुप्रास म्हणतात (वाग्भट). जेथें केवळ व्यंजनांचेंच सादृश्य असतें किंवा एका व्यंजनाची अनेकदां आवृत्ति होते तेथें वृत्त्यनुप्रास होतो (अलंकारसर्वस्व). जेथें अनेक व्यंजनांची स्वरसहित किंवा स्वररहित अशी वारंवार आवृत्ति होते तो छेकानुप्रास जाणावा. शब्दार्थांचें स्वरूप भिन्न नसून तात्पर्य मात्र भिन्न असतें, किंवा जेथें अर्थसहित शब्दाची आवृत्ति होते (अन्वयमात्र भिन्नपदाशीं असतो) तेथें लाटानुप्रास समजावा. मोरोपंताच्या काव्यक्षेत्रांत अनुप्रासांच्या पिकांची गर्दी अतिशय झालेली आढळते. त्यांतून कांहीं निवडक उदाहरणें पुढें दिलीं आहेतः—

श्रीकृष्णा**चें चिर्त्तीं चिंतावें सुचिर चारु** पदकमळ; ।
**प्रक्षाळी** हृदयींचें जें श्रीवक्षस्थळैकपदक मळ. ॥ १ ॥ (भीष्मभक्तिभाग्य १)

देवा दयासमुद्रा दत्ता! दासासि देसि अपवर्ग. ॥ २ ॥ (दत्तदयोदय १३)
हित इतर न धन शमसम, यावरि तुज हें न कार्य सत्रप हा; ।
कवि रविरुचि शुचिभव तव व्हावा येणें न आर्य सत्र पहा. ॥३॥ (आदि ३३-९४)
दावी प्रियेसि अगनगगगनगखग मृग नवे नद नद्या या ॥४॥ (वन. १२-१३४)
तो पाशपाणिपुरुषाप्रति पतिपार्श्वी पतिव्रता पाहे. ॥ ५ ॥ (वन. १३-५३)
धीर धरुनि धर्मज्ञे धीरें धर्में धनुष्य चढवीलें. ॥ ६ ॥ (द्रोण. २.२७)
पावे पराक्रमि पुरुष पति पाहुनि दृष्टिपारणा रंभा. ॥ ७ ॥ (द्रोण २०-७९)
विश्रुतविभव वरप्रद विभु विश्वावास विश्व जो रचितो. ॥८॥ (कर्ण. २१-४३)
स्पर्शे पिनाकपाणी परमेश्वर पूतपाणिपद्मानें ॥ ९ ॥ (कर्ण. २२-२३)
भक्षिति गरुड पळति अहि, महिसहितहि अहित कांपती धाकें ।
पक्षिपपक्षपवनरय भय दे, जय देव म्हणितलें नाकें. ॥१०॥ (कर्ण. ३३-४७)
पल्यंकावरि पडला पांडुपृथापुत्र पावला पीडा;
वैरिविजित विक्षतवपु विमुखत्वें वीरवर वरी व्रीडा. ॥११॥ (कर्ण. ३९-६)
करिल क्रूर कुमति कुरुकुळकीर्तिकलंककाळ कां हो तें? ॥ १२ ॥
(शल्य ३.६८)
प्रायः पामर पटुहि प्रभुतेजें प्रार्थनेंत चुकतात; ॥ १३ ॥ (नामरसायन ७६)
मुनिमान्य मुक्तिचा हा मार्ग महामहित मानला मजला. ॥ १४ ॥
(शांति २-२६)
सेवुनि सोमरसातें सकल सुरसमाजसहित शतमन्यु ।
स्वर्गासि जाय होउनि सत्कृत सानंद साश्रु गतमन्यु. ॥ १५ ॥ (अश्व. ३-७५)
तूं समर करुनि न मर भ्रमरसम रघूत्तमांघ्रिनवपद्मीं ।
रम, रस घे. अमरचि हो, भ्रमरहित स्वस्थ नांद निजसद्मीं. ॥ १६ ॥
(मंत्ररामा. युद्ध. ३०६)
शुंभातें जयमूलें शूलें हृदयांत चंडिका ताडी, ।
शत्रुशतशमनशीला लीलालेशेंचि भूतळीं पाडी ॥ १७ ॥ (सप्तशती. ६.३०)
गेला शरण वैकुंठीं हरितें, परि तें तया, ।
चक्र दे, वक्र देवाच्या भक्तीं म्हणुनियां, भया. ॥ १८ ॥ (भक्तभूषण. ५०)
विप्र तो क्षिप्र, तोयासि मीनसा, प्रभुच्या पदा, ।
कवळी, जवळी प्रेमें ज्याच्या श्री मधु पी सदा. ॥ १९ ॥ (भक्तभूषण ५१)
सुदासीं न उदासीन प्राकृत प्रभुही मनीं; ।
कसा दास प्रसादास माझा पात्र नव्हे जनीं? ॥ २० ॥ (भक्तभूषण ६५)
रायासि बायको मी सांपडलें जेंवि गाय गा! यवना ।
दीनावना मनामधि जाउनियां ध्याय, पाय गाय, वना. ॥२१॥ (ध्रुवचरित्र-स्फुटार्या)
गिरिदरिंत करिहरिहरिण फिरति, करिति रव वनांत त्या चिमण्या, ।
बाळा! लहान कीं तुज लागेल तहान भूकही चिमण्या! ॥ (ध्रु. च. स्फुटार्या)

वाटे अफाट वोढक वाटेंतचि फाटतील पाय तनें, ।
दाटेचि हुंदका मज कांटे रुततील घाल पायतनें ॥ २३ ॥ (ध्रु. च. स्फुटार्या)
✓कृष्णा कृपी कृशाकृति कृपणा झाली पहा महाशोकें. ॥ २४ ॥ (स्त्रीपर्व ५-४२)
देवि ! दयावति दवडिसि दासाची दुःखदुर्दशा दूर; ।
पापातें पळवितसे परमपवित्रे तुझा पयःपूर ॥ २५ ॥ (गंगास्तुति ५१)
त्रिभुवनरक्षादक्षा ! नमितों तुजला स्वभक्तसुरवृक्षा ! ।
तिमिरद्विपहर्यक्षा तेजःपक्षा क्षतामरविपक्षा ! ॥ २६ ॥ (कुशलवा० ९-३)
उरःक्षतक्षरत्प्रभूतरक्तसिक्तविग्रह । प्रमीलिताक्ष तो जगत्क्षयीं जसा रवि ग्रह ॥
सुराश्रुबिंदुसंततीसह क्षणें रथीं पडे । सखेद लेख देखतां प्रमोद त्यांसही घडे.॥२७
(कुश० १३-६१)

प्रचंडपंक्तितुंडदंडदक्ष बाहुदंड हा ।
किशोरकांड खंडितां स्वपिंड जाहला अहा; ॥
सतोक देवलोकही सशोक तो करी क्षमा- ।
तळीं निजाश्रुवृष्टिला तृणोद्भवास जे क्षमा. ॥ २८ ॥ (कुश. १३-६२)
क्षेत्रज्ञ ! क्षमिणांवर ! क्षितिभरक्षत्रापह ! क्षोभण !
क्षुत्तृष्णादिविकारषट्करहित ! क्ष्मानिर्जरैकप्रिय !
क्षत्तृप्रेमपद ! क्षताहितपद ! क्षेमालय ! क्षौद्रवाक् !
क्षेत्रेश क्षणदाचरेशदमन ! क्षोणीपते ! पाहि मां ॥ २९ ॥ (हरिसंबोधनस्तोत्र ४२)
पतिप्रतिनिधिप्रति प्रभुवरस्त्रिया पाहती. ॥ ३० ॥ (कृष्णविजय ५५-२७)
गणपति गुरु गुह गौरी गिरीश गंगागुणाढ्य गीर्देवी ॥३१॥ (कुलशवा०१-१)
भूषाभुजंग भक्ताभीतिद भव्यप्रभाव तुज भार ।
भावी भयें भवानीभर्ता भगवान् भुले भला फार. ॥३२॥ (कृष्णवि. ८८.३७)
सुटल्या सटा समस्ता सुरसरितासलिल सर्प सोमसुधा ।
सांडिति सरणींत म्हणे सूतशुकव्यास सर्व सत्य बुधा. ॥३३॥ (कृ.वि८८-३८)
कटु परि पटु हरि बटु वरि अमृताधिक मधुर बोलणें बोले, ।
पळभरि खळकरिबळहरि वदला, परि आज कविसभा डोले.॥३४॥(कृ.वि.८८-३९)
नयनागोचर देवर झाल्यावर ती पडे धरेवरती ।
तळमळ करि, पळभरि खळ न पडे, करपद तिला न आंवरती. ॥ ३५ ॥
(कुशलवा. ४-६७)

जनहीनवनस्थानीं दीना जनकनंदिनी ।
राजरामा रजोरिक्ता रुचिराक्षी रवें रडे. ॥ ३६ ॥ (कुशलवा. ४-६८)
विश्वांत विश्वपावन विस्तृत विध्युक्त होय तो यज्ञ. ॥३७॥ (अश्वमेध. ४-६८)
चळली मळली कळली बळिकन्या तेहि पूतना मातें. ॥३८॥ (हरिवंश. ११-४६)
राणी आणी पाणी नयनीं, करि घाबरें जगत्सदन. ॥ ३९ ॥ (हरि. २६-६६)
शमवी, वमवी कुवासनेला, । रमवी धी, गमवी स्वभक्ति भारी ॥
धरवी बरवीचरीति, नाम । स्मरवी हा करवी प्रणाम, तारी. ॥ ४० ॥
(प्रियरामायण १०६)

'शंकरेशान शशिचूड क्षितिकंठ शिव शर्व शाश्वत शरण्येश शंभो !
भाललोचन भुजगभसितभूषण भवानीश भवभीतिहर भद्रभजना !
गरलगल गुहगजाननतात गोवाह गीर्वाणगणगीतगुणभाजना ! ॥ ४१ ॥
निगमनुतनीरदाभ निधिनाथनत नगनंदिनीनयननलिननिम्ना ! ।
विष्णुविधिवंद्य विख्यातवैभव विश्ववरद वासवविहतविनतविघ्ना ! ॥२॥
दोषदरदैन्यदवदावदितदुष्टबलदृप्तसदुर्दशदयमानांतरा ! ।
मुनिमहित मोदमय मदनांतक मयूरेश्वरमनोमीनमत्स्याकरा ! ॥ ३ ॥'
'राम राजीवदलनयन रघुवीर रविवंशभूषणरत्न रावणारे ! ॥ ध्रु० ॥...'

या ही पदांत सुंदर अनुप्रास साधिले आहेत.

(मोरोपंतकृत, स्फुट काव्यें भाग १ पृ० ३७१ समग्र पद पहा.)

वाल्मीकिकृतिखकथा केवळ कल्याणराशि कुशलवती ॥ ४२ ॥
(दशमस्तोत्ररामा. ७७)

दामोदर दासा दे अनुमोदन ती हरावया नवरी; ।
दादास देव दावी दारकरीति स्वयें सदैव बरी. ॥ ४३ ॥ (कृष्ण. ८६-१७)
या तेजा भजतों तरि कुरुकुळक्क काक कंक कां खाते ? ॥४४॥ (स्त्री. ६-६०)
मधुनिलय मधुवनातें मर्दुनि मनुवंशमानवेशाला ।
मारुतिमुखमर्कटमणि नमिती मुनीच्या सुमानवेशाला. ॥ ४५ ॥
(मं. रा. सुं. ३४८)
रक्षोराज क्षोभे मारीचा राक्षसा पुढें प्रेषी. ॥ ४६ ॥ (दीर्घरामायण २६)
झाली सीता भीता, दीरा वीरा म्हणे पतिप्राण ।
रक्षी लक्ष्मी धर्मा, साधो ! बाधो न भी करि त्राण. ॥ ४७ ॥ (दीर्घरामा. २९)
अंभोदसंनिभ सुभग भाविकजनभव्यभाग्यभर भोळा ।
भासे उभा शुभाशय शयविधृतनितंबबिंब हरि डोळां. ॥४८॥ (आर्याके.१६१)
हा कल्पपादपाचा रोपा, लसलसित कोवळा, सोपा; ।
याच्या हृदयीं आहे खोपा, घेतात हंस सुखझोपा. ॥ ४९ ॥ (आर्याकेका १६८)
वरद करदः संसृत्यब्धौ त्वमेव निमज्जतां ।
सदसि यदसि ख्यातः सत्यं सतामिति सर्वथा, ॥
भवति भवतिग्मांशौ सत्या कथं न तमःक्षतिः ।
सदयपद यद्युक्तं तद्भो ! कुरुष्व नमोऽस्तु ते. ॥ ५० ॥ (शंकरस्तव २४)

**२ अर्थानुरूपध्वनि.** (अ) काव्यछंदांतील ध्वनि अर्थाचा प्रतिध्वनि असावा हें पाश्चात्य व पौर्वात्य काव्यशास्त्रज्ञांस संमत असलेलें तत्व मोरोपंतांसहि मान्य होतें असें दिसतें. अर्थाप्रमाणें शब्दरचना कोमल, कठोर, मृदु, मधुर, तीक्ष्ण असावी ही गोष्ट पंतांस चांगली अवगत होती. याचीं थोडींशीं उदाहरणें खालीं दिलीं आहेतः—

गोपशिशु म्हणति, 'पलिसा ललतां हलिनेंचि झालिला पाय, ।
गाला उलोनि पलला, सल्व खलें, नवल कलितसा काय ?' ॥ १ ॥ (हरिवंश. १३-९)

समजावुनि त्यांसि म्हणे, 'ऐसें लाल्लिचलासि मालीन; ।
कां ललतां, आललतां? पलतां मी सागलांत तालीन.' ॥ २ ॥ (आदि. ३०-३२)
कलचलनाला ललतां झालित असतां कुमाल बहु आललतां,
सकतास उघल घलला पदनखलस्पल्स तोंचि हा घलघलला. ॥ ३ ॥ (कृष्ण. ७-९)
प्रस्फुरदधरदल प्रभु बलभद्र म्हणे 'खरेंचि सांगारे !' ॥ ४ ॥ (कृष्ण. ८६-३९)
खरतर नरहरशर परजीवन एकक्षणींच संहरती. ॥५॥ (वन. ३-७)
होती शब्द खणखण व्योमीं उडती तुटोनि खंड सणसण. ॥ ६ ॥ (प्रऱ्हादविजय १)
तेव्हां दांत करारा चावी, फिरवी सुरारि नेत्र गरारां. ॥ ७ ॥ (प्रऱ्हादवि. ३-११)
जरि न वळते विशृंखळ खळखळ खळरक्तपूर वाहवितों. ॥ ८ ॥ (वन. २-३३)
तेव्हां स्तविति खळ खळां, गळति खळखळां सुसाधुनेत्रजळें. ॥ ९ ॥ (सभा. ६-८८)
चोळी खळांतकर कर, करकर रद खाय, हाय हाय करी. ॥ १० ॥ (आदि. २९-१४)
गाजत, वाजत, साजत, आज तया जतन करुनि आणा हो ! ॥११॥ (विराट. ६-७५)

म्हणती हा रजनीचर आचारभ्रष्ट दुष्ट पापिष्ट ।
विष्टपकंटक कष्टद शिष्टद्वेष्टा धरा करा पिष्ट ॥ १२ ॥ (मंत्र. रामा. ६.३२२)
ते गगनग मग अगनगधर खरतर वीर नीरदासारें ।
वर्षति अंबररक्षणदक्षासुरसंघ मस्तकीं सारे ॥ १३ ॥ (मंत्ररामायण ६.५७९)

ज्याचे पितीहि घटघट घटघट घडि घडि घरींहि अरि पाणी. ॥ १४ ॥ (उ.१०-७२)
क्षतजप्रतिमाक्ष क्षितिनाथ क्षण न क्षमावशीं राहे. ॥ १५ ॥ (कर्ण. ४०-४५)
चापगुणझणत्कारें दिग्वारण मस्तकेंहि झणझणवी. ॥ १६ ॥ (कर्ण. ४८-५१)
नरवर गरधरखरतरशर करकर दांत खाउनी सोडी. ॥ १७ ॥ (शल्य. २-८४)
ऐसें गर्जुन अर्जुन भरभर खरतर शरप्रकर सोडी. ॥ १८ ॥ (अश्व. ५-३६)
द्विज खरतरशरनिकरें निकरें करि अरिशरीर तक्षणही. ॥ १९ ॥ (कर्ण ३६-३५)
सूं सणणण सणणणणण वाजति शरनिकर कायहानिकर. ॥ २० ॥ (भीष्म. ३-५८)
शुक पिक सकल कलकलस्वरें करुनि भोंवतीच आरडती ।
विविधपतगनिकररवच्छलें करुनि भूमिभूलता रडती. ॥ २१ ॥ (कुशलवा. ४-७७)
यापरि अवार करि वरि खरतरशरवृष्टि, दृष्टि हरि त्यांची. ॥ २२ ॥ (कर्ण. ३०-६४)
सन्नद्ध युद्धबद्धश्रद्ध क्रुद्ध प्रसिद्ध विबुधारि. ॥ २३ ॥ (मंत्ररामा) ६.५८२)
ते दुंदुभि वाजविती धिमिधिमिधिमि देवलोक आनंदें, ।
गंधर्व करिति तननन तत्थैथैथय्य अप्सरोवृंदें. ॥ २४ ॥ (मंत्ररामा. ६-५९५)
अगड् धों अगड् धों धों धों वाजविती देव दुंदुभी शतशा. ॥२५॥ (भीष्मभक्ति १७८)

आनकदुंदुभिदर्दुरडिडिमभेरीसुशंखपणवांचे, ।
ध्वनि उठले यच्छ्रवणें न क्षणही त्या स्थळीं कृपण वांचे ॥२६॥ (कर्ण. ८.१३)
गजबृंहितासिंहध्वनिरथचक्रध्वानसहितवाजिरवा, ।
खाजिर वाटे टांचे; कोण म्हणेल श्रुतीस हा जिरवा ॥ २७ ॥ (कर्ण. ९.१४)

करिती रणांगणीं भट शत्रुशिरःकंजकंदुकक्रीडा, ।
अरिगिरिवरि शरवृष्टिहि, तें प्रेक्षुनि शत्रुही धरि व्रीडा. ॥२८॥ (कर्ण ८.१७)

**(आ) अनुकरणवाचक शब्दः**-हा ध्वनि साधण्यांत 'कचाकच' (द्रोण. १२.१६३). 'कडकडे' (भीष्म १०) 'करकरा' (कर्ण. १७.२५), 'खळखळा' (सभा. ६.८८), 'खदखद' (सभा.३.३५), 'घटघट' (कर्ण. ४६.५८), 'घुटुघुटु' (भस्मासुर.४१),'चरचर'(कर्ण.४५.१४) 'चुरुचुरु' (चोखणें)(मंत्रभाग. ९.८०), 'झटझट' (सभा. ५.८९), 'डगमगणें'(हरिवंश १७.४) 'डरडरा' (सभा. २.२५), (रथ) 'थडकले' 'भडकले' (हय),(शास्त्रजवन्हि) 'धडकले' वरते. (द्रोण.३.३२), 'परपर' (द्रोण. ११.११०), 'फरफरा' (सभा ५.७), 'भरभर'(अश्व.५.६६) 'मटमट' (कर्ण. ४५.), 'हुटुहुटणें' (द्रोण. १७-५४), इत्यादि पुष्कळ अनुकरणवाचक शब्दांचें पंतांना मोठें साह्य झालें असून त्यामुळें काव्यरसपाकही खमंग उतरला आहे.



# परिशिष्ट-ऋ.




(गीति)

उन्निगनि सरस्वतीला
ह्मणतात 'मयूरवाहिनी देवी'; ।
नातरि मयूर नेई जिकडे,
तिकडेच वाहती केवीं ? ॥ १ ॥

श्रीहरिकथाघनघटे
मयूर देखुनि करी थयथयाट, ।
स्वकलाकलाप पसरी,
त्याचा झाला न कोण कवि भाट? ॥२॥

'शब्दार्थालंकारीं प्रसादप्रतिभारसें नसावेंच', ।
सिद्धांत हा उडवुनी **मयूर** कितिकांस घालितो पेच ॥ ३ ॥

(बाळकृष्ण अनंत भिडे)

तुमच्या पदप्रसादें फार चमत्कार अर्थयमकांचे; ।
त्यांत प्रभु यश, तद्वशजगदुद्धाराधिनेंचि यम कांचे. ॥ (नामरसायन ६९)

'व्याकरण बिघडूं न देतां किंवा अर्थाची हानि न करितां लांब लांब यमकें साधण्याचीं व प्रासांची साखळीची साखळी जुळविण्याची जी या कवीची (मोरोपंताची) अपूर्व करामत दृष्टीस पडते ती समग्रविशेषीं अर्थ खुलविण्यास किंवा निदान नुसता मनास चमत्कार वाढविण्यास फार उपयोगी पडते.' ( निबन्धमाला )

## मोरोपंताचीं यमकें.

जीं अक्षरें ज्या क्रमानें एकापुढें एक अशीं एक वेळ आलीं असतात त्या क्रमानें फिरून त्यांची आवृत्ति झाली असतां तेथें यमकालंकार होतो. यमकें दोन प्रकारचीं:–१ संयुतावृत्ति व २ अयुतावृत्ति. पहिल्यांत मध्यें इतर पदें नसतात, दुसरींत तीं असतात. संयुतावृत्ति व अयुतावृत्ति यमकें हीं पादाचीं (चरणाचीं), पदाचीं किंवा वर्णाचीं असतात. म्हणजे संयुतावृत्ति पादयमक, संयुतावृत्ति पदयमक, संयुतावृत्ति वर्णयमक, अयुतावृत्ति पादयमक, अयुतावृत्ति पदयमक, व अयुतावृत्ति वर्णयमक असे सहा प्रकार होतात. तसेंच संयुतावृत्ति यमकाच्या तीन प्रकारांपैकीं प्रत्येकाचे आदि, मध्य व अंत्य असे तीन उपप्रकार असून अयुतावृत्ति यमकाचे आदिमध्य, मध्यांत, व आद्यन्त असे तीन उपप्रकार आहेत. असे एकंदर यमकाचे अठरा

भेद झाले. प्रथम पादाचें तृतीय पादाशीं यमक साधलें असल्यास त्यास **'संदंश,'** किंवा **'विषमपाद,'** द्वितीय पादाचें चतुर्थपादाशीं यमक असल्यास **'संदष्टक,'** किंवा **'समपाद,'** व प्रथमार्धाची द्वितीयार्धात आवृत्ति झाली तर **'समुद्र'** अथवा **'अर्धसम'** अशी नांवें 'काव्यप्रदीपां'त दिलीं आहेत. पंतांच्या काव्यांत विशेषतः त्यांच्या भारत, कृष्णविजय व कुशलवाख्यानांत यमकांची गर्दी झालेली आढळते. त्यांचीं थोडीं निवडक उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

### (१) संयुतावृत्ति यमकें.

### (अ) संयुतावृत्ति आदिपदयमकें:–

**जलजल**सद्रम्यमुखी, **नव नव**नीतापरीस मृदुला हे; ।
**शिव ! शिव !** भजविण भीरु **न वनव**सति दुःख भोगणें लाहे. ॥ १ ॥
(कुशलवा० २-२५)

**केशव ! के** शवतुल्या न त्वयि विमुखा खला मलाकाराः ? ।
भक्तास्तव **सक्ताः स्तवन**तिपूजासु प्रभो न के धन्याः ? ॥२॥ (कृष्णस्तवराज १)
**हा ! सति ! हासति**रस्कृतचंद्रे ! तुज विकुनिही न घामेलों; ।
**हा ! तनय ! हातनय** मी जोडुनिहि न या महा अघा, मेलों. ॥ ३ ॥
(हरिश्चंद्रा० २.६५)

अ**मळा** क**मळा**केलि**भवना** ! **भवना**शना ! ।
**पावना ! पाव, ना**शीं या व्य**सना**स **सना**तना. ॥ ४ ॥ (भक्तभूषण० ५३)
**अहित अहि, त**यां झाला **विवर विवर** सांपडों दिलें न रणीं; ।
**महित महित**ळीं झाले **नमुनि न मुनि**सुत हठी द्विषन्मरणी ॥ ५ ॥
(आदिपर्व १६-३१)

**हरि हरि** भय, **हरि हरि** नयजयपद **करि करि**पवरद पर दमुनि ।
**वदति सदति** सुखकर विभु भवजलनिधि**पतितपतित**करद मुनि. ॥ ६ ॥
(लघुरामा० ४९)

### (आ) संयुतावृत्ति मध्यपदयमकें:—

पुशी अव**निजा निजा**श्रुस**लिला**। **लिला;** सुवि**कळा कळा**निधिमुखी; ॥
उठूनि, न**मुनी मुनी**स मग **ती,** । **गती** करि **तदा तदा**श्रमपदा.॥७॥(कुश.५.११)
भवाब्धि सु**कवी कवि**प्रिय **करी** । **करी**शतम **हा महा**दय हरी ॥
सुकीर्ति प**रमा रमा**प मि**रवी** । **रवी**डित**महा महा**सद नवी. ॥ ८ ॥
(विचित्र रामायण १)

(वरच्या दोन उदाहरणांत कवीनें दामयमकही साधिलें आहे.
प्रत्येक श्लोकांत मध्यपदयमक व दामयमक हीं विचित्र रीतीनें साधिलेलीं आढळतात.)

**सुसव वासव वा**नि असा करी; । मु**निजना निजना**यक उद्धरी; ॥
य**श मला शमला**पह तें रुचे; । ठ**कवितें, कवितें** न दुजें सुचे. ॥ ९ ॥
(कृष्ण. ८०-४२)

निजजना अमृतें बहु अर्पिती, । स्व **अनवे अनवे**कर अर्पिती; ।
सतत पूर्ण मुकुंदयशोरसें । न **वदना वद ना** म्हणती असें. ॥१०॥(विठ्ठलभक्त० १)
करिति विठ्ठलभक्त कथा बरी, । सुदृढ बाळहि जीस मनीं धरी; ।
वश जयासि सदा भगवान् हरी । कु**तुक या तुकया**परि भूवरी. ॥ ११ ॥
(विठ्ठलभक्तस्तुति ५)

**व्रजपते ! जपते**ऽस्य भयप्रदः सु**रसदो रसदो** महिमा तव, ।
अ**घनगो घनगो**यरुचेऽशनिस्त्वमवमाऽमव मामकरोर्वैराम् ॥१२॥(पांडुरंगस्तोत्र १)
('विठ्ठलभक्तस्तुति' व संस्कृत पांडुरंगस्तोत्र या प्रकरणांत पंतांनीं रघुवंशाच्या नवव्या सर्गातील श्लोकांप्रमाणें प्रत्येक चतुर्थचरणांत संयुतावृत्ति मध्यपदयमक साधिलें आहे.)

**भव ! न तेऽवनते** कठिनं मनः । सु**रगुरोरगुरो**रिव भोगिनि ! ॥
कुरु **चिरं रुचिरं** शिरसीश मे । स्व**पदमापदमा**शु यदुद्धरेत् ॥ १३ ॥
(शंकरस्तव २३)

**(इ) संयुतावृत्ति अंत्यपदयमकें:—**

विषयीं **सज्ज न, सज्जन मज्जन मज्जन**कनुतयशीं करिती. ॥ १४ ॥
(रामरीति ७९)

फार तूं श्रमलीस हिंस्रगणांचिया भ**वनीं वनीं**; ।
दुःखभीतिसमयावरि क्षितिकन्यके न **मनीं मनीं**; ॥
प्रार्थिली असि पूजिली मग तापसीनि**करें करें**; ।
अर्पिलीं तिस कंदमूळफळें मुनिप्र**वरें वरें**. ॥ १५ ॥ (कुशलवा. ५-१४)
म्हणे सत्या अत्यादृतमति मला हा **वर वर**; ।
स्वताताच्या गोष्टी प्रियसखि ! बऱ्या या **वरवर**; ॥
पदीं कन्यारत्नार्पण न करि, मध्यें **करकर** ।
स्तुतीची; हा अंबे ! त्वरित धरु मोदा**कर ! कर**.॥१६॥(कृष्णविजय५८-२१)
पुढें येउनियां भीमा बोले वाग**शिवा शिवा**;
लवे लोचनही तीचें त्या काळीं उ**जवें जवें**. ॥ १७ ॥ (कुशलवा. ४.३)
शिशुच्या न रुचे **शमनास मना**; । जन शिक्षि, न तूं **वदना ! वद ना**;
वचके न निरा**शमना ! शमना**; । वनवृत्ति भजे **भवनाभ वना**. ॥१८॥
(हररमणीय रामायण. ४६)

**(२) अयुतावृत्ति यमकें:—**

**(अ) अयुतावृत्ति आदिपदयमकें:—**

**तरणि**वर बसुनि झडकर **तरणि**कुलवरक्षमाभृदनुकूला ।
**देवर**तिवर नदीच्या **देवर**सह शीघ्र जाय परकूला. ॥१९॥(कुशलवा.४-१६)
**ओक** आत्मधनस्त्रीतें **ओक** मानूनि मानसें ।
**तोक**वत् रोदन तदा **तो करी** ऐकतां असें. ॥ २० ॥ (कुशलवा. ४-६४)
**प्रभाव** ज्याचा निःसीम **प्रभा** शुभ्र हिमाहुनी, ।
**प्रभा**नुगुरु तो हर्षे **प्रभा**साप्रति पाहुनी. ॥ २१ ॥ (कृष्णविजय. ७९-२७)

तो **दासा**चा कल्पशाखी **मोदा**मृतपयोनिधि ।
**गोदा**वरीस जाऊनी, **गोदा**नें दे यथाविधि. ॥२२॥ (कृष्णविजय. ७९-१३)
**आळ**चि घेउनि मी शिशु **आळ**वितों निष्ठुर लवुर बाळीं; ।
**आळ** निवासनि, मातें, **आळ**स टाकूनि, धांव कुरवाळीं. ॥२३॥ (आर्याकेका. २२)
पा**ळक** तूं विश्वाचा, बा**ळक**सा तोंड पसरितों बा ! मी; ।
व्या**ळक**राळकठिणतर का**ळ** **क**सा वारिसी न हा स्वामी ! ॥२४॥ (आर्याकेका. ३)
**वासरा** धिपराजीवा ! **वासरा** जननीस्तन ।
बा ! **सरा** ! भक्तयादांच्या आ**सरा** तूं दयाघन. ॥ २५ ॥ (विठ्ठलविज्ञापना १७)
**कुशल व**चन ऐकतांचि ऐसें, **कुशलव** मुष्टिधर द्विजेंद्र गेला; ।
**रुचिरव**दनबालकद्वयाच्या **रुचिरव**संग्रहणें प्रहृष्ट झाला. ॥ २६ ॥
(कुशलवा. ५-२५)
**कृष्णा**ग्रजावरज बळ**कृष्णा**श्रित करुनि कीर्तिला जतन, ।
**कृष्णा**त्मजकुळनंदन **कृष्णा**पति वीर पावले वतन. ॥ २७ ॥ (आदि. ३६-६७)
**पर्व**रात्रिरमणामृतभासां **सर्व**गर्वहर निर्मलकांते ।
**पर्व**तेश्वरसुताधर शंभो ! **शर्व** मामवनतं जनमार्तम् ॥ २८ ॥ (शंकरस्तव १)
**राधा**पुत्र बहु करी **बाधा** पार्थासि; तेधवां त्याला ।
**राधा**हृच्चोर ह्मणे, **बा** ! **धा**क प्राप्त का तुला झाला, ॥ २९ ॥ (कर्ण· ४८.५२)
**तारा**रमणमुखी ते **तारा**रावें रडोनियां त्यातें, ।
**तारा** ह्मणे कपींद्रा ! **तारा**वें दुःखसागरीं मातें. ॥ ३० ॥ (मंत्ररामा. ४-७२)
क**र्मी** वसा नसो पर**मर्मी** लोचन असा दया**धर्मी**, ।
न**र्मी**हि मृषोक्ति नयो, श**र्मी** नांदा शिरा क्षमा व**र्मी**. ॥३१॥ (कृष्णविजय ८०-६९)

**(आ) अयुतावृत्ति मध्यपदयमकें:—**

वं**देऽहं** विठ्ठलं दातुं शं **देहं** धृतवान्प्रभुः ।
सं**देहं** हन्तुमुदितो मं**देहं** योंऽशुमानिव ॥ ३२ ॥ (विठ्ठलप्रणिधि १)
**स्तविति नमुनि** स**मुनि**सुर प्रभुच्या शस्त्रास मग **रुडनळास** ।
**स्तवितिल कवितिलक**हि कां परमदकलिच्या न **गरुड नळास.** ॥ ३३ ॥
(हरिवंश ९-१७१)

(शेवटच्या उदाहरणांत द्वितीयार्धांत संयुतावृत्ति मध्यपदयमक, असून दोन्ही अर्धांत अयुतावृत्ति आदिपदयमक व अंत्यपदयमक हीं साधलीं आहेत.)

से**वावा** सर्वतीर्थानीं, ठे**वावा** मनिं सज्जनीं, ।
दे**वा वा**टे त्याहि तोष, रे**वावा**रिनिमज्जनीं. ॥ ३४ ॥ (कृष्ण. ७९-२५)
(वरच्यांत संयुतावृत्ति मध्यवर्णयमकही साधिलें आहे.)

**(इ) अयुतावृत्ति अंत्यपदयमकें:—**

स्वजनभवांबुधि**तरणे** ! त्रिजगद्भूषणमहामणे **तरणे** ! ॥
दे मज चापा**स रणीं** दाविन दुष्टासि काळगृह**सरणी.** ॥ ३५ ॥(कुशलवा.१०-

मज दुःख पहावेना, आरडणें क्षणहि हें सहावेना ।
सदनांत रहावेना, उद्वेगें राज्यभर वहावेना. ॥ ३६ ॥ (ब्रह्मोत्तरखंड. १०-१४)
अस्मत्परिभव करितो आजि नभातें शरव्रजें भरितो ।
गोधन हरितो, वरितो कीर्ति, अशनिमृदरिकरिघटाहरि तो. ॥३७॥ (विरा. ३-८६)
शक्रचिकीर्षित कळलें, जें होतें हृदय पळ तमें मळलें, ।
तें विधिवचनें वळलें, रतिचें तपही दयाफळें फळलें ॥ ३८ ॥ (हरिवंश ५०-५२)

(पंताच्या काव्यांत दोन अर्धाच्या शेवटीं जीं यमकें आढळतात तीं याचीच उदाहरणें होत. त्यांतील लांब यमकें पुढें दिलीं आहेत.)

(३) **पुष्पयमकः**—वृत्तांत यति येणारीं अक्षरें सारखीं असल्यास **पुष्पयमक** होतें, त्याची उदाहरणें केका ११८, ११९ ह्या होत. त्याचीं आणखी थोडीं उदाहरणें:—

कितेक रथ मोडिले, ध्वज कितेकही तोडिले, ।
कितेक शर सोडिले, गज कितेकही झोडिले, ॥
असंख्य भट ताडिले, यमपुराकडे धाडिले, ।
शिर प्रकर पाडिले, बहुत यापरी नाडिले. ॥ ३९ ॥ (कुशलवा. १०-९)
शिळेसि दिधली गती, जिस महामुनी मागती, ।
द्विपत्सहज रान्नती करि, तयासि अत्युन्नती, ॥
करूनि नत पावती, वरुनि सिद्धि दे पाव ती, ।
जयास खळ कांपती, अजित आमुचा तूं पती. ॥ ४० ॥ (कृष्णवि. ५६-३०)
युद्ध भारी करी, । फार मारी अरी ॥
लक्ष्मणाच्या उरीं, । शक्ति हाणी अरी. ॥४१॥ (स्रग्विणी रा.)
समस्त कपि गौरवी, यश सुधांशसें गौ रवी; ।
दुरापपण हारवी, हरिभजत्तमा हा रवी. ॥
प्रभु खरग लाजवी, सदयता भली गाजवी; ।
नमी निपट जो भवीं जन तया पदी शोभवी. ॥ ४२ ॥ (पृथ्वीरामायण. ८२)
होतां गर्भवती तिघी हि युवती राया सुखे फावती, ।
पीडा मालवती, सुरेंद्र लवती हर्षे स्तवूं धांवती. ॥
जाल्या तुष्टमती प्रजा प्रशमती संताप विश्रामती ।
स्वस्थांतीं सुकृती मुनीश्वरकृती स्फारप्रसन्नाकृती.॥४३॥(साररामायण, बाल ४-२५)
पृथ्वीची दुहिता त्रिलोकमहिता श्रीरामचेतोहिता ।
नेसी धीररहिता, न वृत्ति विहिता हे कामसंमोहिता ॥
श्री, प्राणासहि तार, जा; न अहि ताडावा पदें दाहिता, ।
कीं काळप्रहिता तु ज्याचि महिता नेली असे लोहिता. ॥ ४४ ॥
(त्रुटितरामायण अरण्यकांड १२)
अहो ! अतुललक्षणीं अमृत वर्षसी ईक्षणीं, ।
भुज स्वजनरक्षणीं सुपटु हे असच्छिक्षणीं; ॥

प्रचंडमहि**मा रणीं** दशमुखाच्चिया **मारणीं,**
इनान्वयशिरोम**णी,** प्रकट आमुचा तूं **धणी** ॥ ४५ ॥ ( कृष्णविजय ५६-२९ )
महर्धिकुळ**भाजन** स्वपितृराज्यशो**भा जन** ।
त्यजूनि, सकृ**पा ! वन**व्रजन दाविलें पावन, ॥
तपस्विपरिपा**लन**प्रणतबाळसल्ला**लन-**
प्रवीण सुखसा**धन,** प्रकट आमुचें तूं **धन.** ॥ ४६ ॥ ( कृ. वि. ५६-३१ )
(कृष्णविजय अध्याय ५६ श्लोक ३२ ह्यांतहि पुष्पयमक साधिलें आहे.)

(४) **अश्वधाटी यमकः**—'यमकाच्या पाठीं व पुढें निराळें व्यंजन असल्यामुळें, प्रत्येक व्यंजनावर जशी काय उडी मारीत यमक चाललें आहे, असा भास झाला म्हणजे **अश्वधाटीयमक** झालें. हें जसें चरणाच्या आरंभापासून तसें एकदम मधून व आद्यंतींही गुंफलेलें आढळतें' (अलंका). याचीं थोडीं उदाहरणेंः—

वदला या**परि,** वा **परि** खा**परि**ला **परि**स तेंवि त्या बोध. ॥४७॥ (उद्योग.७-७६)
अ**र्जुन** व**र्जुन** ग**र्जुन** अ**र्जुन** घे क्षण उगेंचि थोरपण. ॥ ४८ ॥ (द्रोण १९-३९)
श्र**मला,** श्र**मला,** श**म ला**ज **मला** न **मला**धिला म्हणे हांसे.॥४९॥(कर्ण.४१-५३)
मतिम**ति !** स**ति !** प**ति** अ**ति** विश्वासें माझ्या हातीं दे हा;॥५०॥(दत्त. साकी ३३)
देउनि अ**ति** य**ति**प**ति**म**ति**र**ति**कर निजपादपद्मभक्तिधन॥५१(चतुर्थस्तोत्र रा.७२)
वा**जत,** गा**जत,** ला**जत** सा**जत** रा**जत**रणीं पुरा गेला. ॥ ५२ ॥ (शांति. ३५-)
ह**रिजन** अ**रिजन** प**रिजन** क**रि, ज**ननि ! प्राज्ञ**जन**सभे ! काय ।
हा दा**स** या**स** हा**स** त्रा**स** नसो; शिशुसि निदिना माय.॥५३॥(स्वर्गारोहण.२-४८)
दा**टुनि** वा**टुनि** घा**टुनि** चा**टुनि** पीतोसि विष मरायातें. ॥ ५४ ॥ (गदा.१-९०)
न धरीं बा ! **दर,** दा **दर,** सा**दर** दे वाजवूं पुन्हां नीट. ॥ ५५ ॥(विराट. ४-८)
तो वधिला पांडुसुतें कांति जितस्व**र्णव**र्ण क**र्ण रणीं.** ॥ ५६ ॥ (कर्ण. ६-१४)
'हा**य !** म्हणे मा**य,** 'सुता ! का**य** तुझा सा**य**सा **मुला यम हा** ।
का**य** करूं ? जा**य** वना, रा**य** नव्हे तात हा, **मुला यम हा !** ॥५७॥ (ध्रुव.-स्फुट)

(५) **आद्यंत यमकः**—चरणाच्या किंवा अर्धाच्या आरंभीं व अखेर यमक साधिलें असलें तर त्याला **'आद्यंत यमक'** ह्मणतात. याचीं थोडीं उदाहरणेंः—

**गळती**समान नयनें **गळती;** । **लपनें** न येति धड आ**लपनें;** ॥
**निजवि**ग्रहासि उठवी **निजवी;** । **जनका**त्मजा स्मरतसे **जनका.** ॥ ५८ ॥
(कुशलवा. ४-७०)

**शोक लास्य** करी हृदंगणिं कंठ केवळ **शोकला;** ।
**कोमला**नन पूर्णचंद्र तिचा तदा बहु **कोमला;** ॥
**कां पती** रुसला ह्मणे सकळेंद्रियें बहु **कांपती;** ।
**भार तीस** निजांग होय, वदे अशी मग **भारती.** ॥ ५९ ॥ (कुशलवा. ४-७१)
**कां नवलास** नव्हे, घटकर्णगळीं जरि बसेल **कानवला ?** ॥६०॥ (द्रोण.१०-२१)

नलनृप म्हणे 'शिवा! ती **नवरी हो** मन दुजीस **नवरी हो**!।
भैमी ह्मणे शिवे तो **नवरा हो** प्रेम नित्य **नव राहो.** ॥६१॥ (वनपर्व. ४-२२)
**क्षमासमा**ना क्षांत्यर्थी, रूपीं प्रत्यक्ष **मासमा,**।
**न दीसती** कां अजुनी पुण्यनीर**नदी सती**? ॥ ६२ ॥ (कुशलवो० ४-२३)
**परवा**द नसे वसुची **परवा,**। **नर वा** सुर घे विरसा **न, रवा.** ॥
**बरवा** प्रभु तो स्वगुणा **वरवा,**। **भर वा**रुनि राम ह्मणे **भरवा.** ॥ ६३ ॥
(हररमणीय रामा. ४५)
**जा, गा** महानगुणा, दिधलें तुज जीवदान जा **जा गा,**।
**जागा** दाटुनि केल्या हरि, वांचाया नसे गजा **जागा.** ॥ ६४ ॥ (कर्ण. ३१-४१)
**गळतो** सर्व हरियशःश्रवणें, अघराशि सर्वेही ज**ळतो,**।
**पळतो** भ्रम, किंबहुना भगवान् येणेंचि सर्वथा **वळतो.** ॥६५॥ (मंत्रभाग, २-१५)
(वरच्या ३८ व्या गीतींत आद्ययमकही साधिलें आहे.)

(६) **दाम किंवा शृंखलायमकः**–वृत्ताच्या दोन चरणांस जोडणाऱ्या यमकास **दाम-यमक, किंवा शृंखलायमक,** म्हणतात. याचें उत्कृष्ट उदाहरण मोरोपंतांचें दामरामायण होय. असाच प्रकार पंतांच्या श्रीरामायणांत केलेला आढळतो. या यमकप्रकाराचीं थोडींशीं उदाहरणेंः—

तेथ ज्ञानवि**शारद शारद**शशि**गौर गौर**वार्ह कवी ॥ ६६ ॥ (सभा. १.१२)
तूज यमक्षयवांच्छा झाली, म्हणवूनि धांवला**स रणा,**।
**सरणा**वर **निज निज**जनसह **जा सहजा**नयें शिवा शरणा. ॥ ६७ ॥
(मंत्र. ६-६८१)

त्वामहमनिशं **कलये कलये** यद्दत्तसाध्वसोऽसि त्वम्।
प्रणते र्यत्ना **अवमा अव मा**मित्यानतं दयालुमणे! ॥६८॥ (कृष्णस्तवराज) ३१)
सेवुनि **संतत पाला, संत तपाला** यदर्थ करितात,।
तो प्रिय या **स्तवना कीं यास्तव नाकीं**हि हेंचि वरितात. ॥६९॥ (भीष्मभ.११७)
झाला **हा निबरवया हानि बरवया** न जाणतां होय ॥७०॥ (अश्व. १-१२५)
भीम वधी **पर-वारण परवा रणपं**डिता तया नाहीं. ॥ ७१ ॥ (कर्ण. ३८-२१)
पुसोनियां शोक**पाणी, पाणी** जोडूनियां नयें,।
रामापुढें दीन**वाणी, वाणी** भरत हे स्वयें. ॥ ७२ ॥ (कुशलवा. ३-५)
करूनियां मज्जन विश्वपा**वनीं, वनीं** प्रवेशे मग जानकी वनीं; ॥
सचित पाहे मग देवरा**स तीं;**। **सती** म्हणे आश्रम कां न दीसती. ॥ ७३ ॥
(कुशलवा. ४-१७)

म्हणे श्रीराम**रमणी रमणी**यवपुर्धरा।
**धरा**कन्या जगत्**पद्मा पद्मा**क्षी कंबुकंधरा. ॥ ७४ ॥ (कुशवा. २-२०)
त्याचें करुनि नि**वारण वारण**शत्रुप्रताप कुश बोले।
धरुनि वृथा **काम रणीं कां मरणीं** सिद्ध मूढ हे झाले.॥७५॥(कुशलवा. १३.१२)

गुणग्रहणदक्ष ते म्हणति साधु साधु **क्षमा** ।
**क्षमा**दुहितृनंदना ! धरु तुझा सदा प**क्ष मा** ॥
**क्षमा**बळपराक्रमद्युतियशोनिधी स**र्वदा** ।
**वदा**न्यपति हो सुखी चिर वसें सुहृत्सर्वदा. ॥ ७६ ॥ (कुशलवा. १३.५१)

'गुणग्रहण...' हें व 'म्हणे श्रीराम...' हें अशीं दोन '**दाम** किंवा **शृंखला** यमकाचीं उत्कृष्ट उदाहरणें होत. यांत कोणतेहि जवळचे दोन चरण परस्पराशीं यमकानें संबद्ध आहेत.

नित्यत्वें निगमहि दत्ताच्या दासासचि **मानवले** ।
**मानवले**ख इतर सारेही काळाचे कानवले. ॥ ७७ ॥ (दत्तचरित्र ५४)

'**दाम**' किंवा '**शृंखला**' यमकाचीं उत्कृष्ट उदाहरणें पंताच्या 'श्रीरामायणांत' पुष्कळच आहेत. वृत्तांत कोणतेही जवळचे दोन चरण यमकानें जोडलेले असले म्हणजे उत्कृष्ट 'दाम-यमक' होतें. इतर उदाहरणांत प्रथमार्ध द्वितीयार्धाशीं किंवा प्रथमचरण द्वितीयचरणाशीं, तृतीयचरणचतुर्थचरणाशीं जोडलेले असतात. दामरामायणांत प्रथमार्ध द्वितीयार्धाशीं जोडलेला असून पूर्वींच्या गीतीचीं शेवटचीं अक्षरें पुढच्या गीतीच्या प्रारंभीं आणलेलीं आहेत. परिशिष्ट 'अ' यांतील दामरामायणाचीं उदाहरणें पहा. दामयमकाचीं श्रीरामायणांतील दोन उत्कृष्ट उदाहरणें पहाः—

'यशा कौसल्येच्या प्रथम सुतता राम प**रमा** ।
**रमा**या साधूंचें हृदय करि भव्या अच**रमा**. ॥
**रमा**नाथांश श्रीभरत दुसरा केकय**भवा** ।
**भवा**चा संहर्ता सुपटु षडरींच्या परिभवा. ॥ ७८ ॥
पयोधीतें लंघी, नळकपिकरें सेतु क**रवी**, ।
**रवी** वंशाब्जाचा अरिस हितपीयूष भ**रवी**. ॥
**रवी** जो अद्रीतें करि, मथि समुद्रा, किति **अरी** ।
**अरी**तिह्ना त्या गा ? प्रभुसि, धरि ज्याचा कर अरी ॥ ७९ ॥

(७) '**समुद्र**' अथवा '**अर्धसम**' **यमकां**चीं उदाहरणें:—

बहुमान सदा सांवरि साधु निका महित सज्जन वनौका ।
बहु मानस दासावरि साधुनि कामहिन सज्ज नवनौका ॥ ८० ॥ (नामरसायन ३२)
अनलस मीहि साधी राया ! वारा महीवरा ! कामा ।
अनलस मीहि तसा धीरा ! यावा रामही वरा का मा ? ॥ ८१ ॥ (वनपर्व ८-५०)

(८) **संदंश** किंवा **विषमपाद यमका**चीं उदाहरणें:—

**हार विलासवतीनें** केला हा लक्ष्मणप्रसूनें कीं; ।
**हारविला सवतीनें** क्षितिनें पुजिला सुरप्रसूनें कीं. ॥ ८२ ॥ (स्त्रीपर्व ४-१६)
**अश्वत्था मागावा** वर पूजुनि परि भला नव्हे मुंजा; ।
**अश्वत्थामा गावा** कीं तो गुरु खंडिजेचि शरपुंजा. ॥ ८३ ॥ (कर्ण. ११-३१)
**तोया याद वराया** ज्या प्रेम्या धरितसे, भला भजनीं, ।
**तो या यादवराया** प्राप्त असो, कीं दुजा न लाभ जनीं. ॥८४॥ (विष्णुपदवकिली २८)

**पुंडरीका ! क्षमा केली** त्वां वैकुंठाधिका सदा. ।
**पुंडरीकाक्ष माकेली**स्थाना त्या नाठवी कदा. ॥ ८५ ॥ (पुंडरीकप्रार्थना १५)
**परम नीच मूढां सळी, नया** । न गणि पावती आपुल्या लया. ।
**परमनीं 'चमू ढासळीन या'** । अरि म्हणे, रणीं तापल्या लया ॥८६॥
(मंजुरामायण८३)

(९) **संदष्टक** किंवा **समपाद यमकां**चीं उदहरणें:—
पावे, प्रसन्न होतां **देव, सुदामा जिला, असी मातें** ।
श्री, कीर्तिहि, जरि अल्पचि **दे वसु दामाजिला असी मातें.** ॥ ८७ ॥
(सन्मणिमाला १८)

साधु ह्मणावे ह्मणती **नरमाधवदास साधु याला जे** ।
अतिसारीं पट ज्याचे **न रमाधव दाससा धुया लाजे.** ॥८८॥(सन्मणि. ६३)
गावा, नच मानावा **चोखामेळा महार सामान्य;** ।
ज्याच्या करि साधूंचा **चोखा मेळा महारसा मान्य.** ॥ ८९ ॥ (सन्मणि. ७९)
श्री विष्णुसा न तारी **जन काय ज्ञानदेव वेगानें ?** ।
हा दे तें स्वर्गाच्या **जनका यज्ञा न देववे गानें.** ॥ ९० ॥ (ज्ञानदेवस्तव १)
श्री राम ह्मणे, 'मदधिक **गुरुचरण, त्यजुनि काय निघसी ते** ।'
लक्ष्मण ह्मणे, 'भजावे **गुरुचरण त्यजुनि काय निघ सीते !'** ॥ ९१ ॥
(वनप. १०-६८)

तुजविण न दीपिके ! सति ! **कृष्णे ! तरतो नयज्ञहि तमातें** ।
करितो जरि तरि गमता **कृष्णेतर तो न यज्ञ हित मातें.** ॥९२॥ (वन.८-५४)
कुरुसैन्यांत गमे ज्या **परि रंभाकाननांत वारा हो** ।
त्या विजयश्री देउनि **परिरंभा कां न नातवा राहो** ? ॥९३॥ (द्रोण. ३-८८)
तुरवि, करुनि परकवचा **अंगप तितउ पलसमय मनिं भानें.** ।
भीमानें शर गणिले **अंगपतित उपलसम यमनिभानें.** ॥९४॥(द्रोण १२-१३)
हरहर ! जाणों चुरिला **तो बाळ करेणुनीं चरणपातें** ।
शिवशिव ! भरितिल कीं हो **तो बाळक रेणुनींच रणपातें.**॥९५॥(द्रोण७-२३)
जोडुनि गुण पार्थ करी **कुरुसेनापाल-विप्र-कटकांता** ।
कीं गुरुपराभवेंही **कुरुसेना पालवी प्रकट कांता.** ॥ ९६ ॥ (द्रोण, ९-३३)
न रणा तूं योग्य; ह्मणुनि **'हा ! केशवसारथे ! रडायास.** ।
काय भिवविशिल, देउनि **हाके शवसार थेरडा, यास.'** ॥९७॥(द्रोण.१७-५७)
गमला हित ओगरितां **कांजी मधु सूद नाकपाळाला** ।
अर्थ तसा आला हे **कां जी मधुसूदना कपाळाला.** ॥ ९८ ॥ (द्रोणपर्व)
जी वेश्या बुध वरिल **त्यजुनि अमर्यादरा जनीं तीतें ?** ।
भजतो अनीतितें हा **त्यजुनि अमर्याद राजनीतीतें** ॥ ९९ ॥ (उद्योग ८-८)

न शिके त्याचा बोल न **बाला, मंदार सावरिल काय ।**
पतनेच्छुचा न, न वरिल **बाला मंदा, रसा वरिल काय?** ॥१००॥(शल्य१-११)
कृष्णा ! त्वत्सम तव कृत**वर्णन भाचा परा सुकविता कीं;** ।
झाला घालाया भृत**वर्ण नभाचा परासु कवि ताकीं.** ॥१०१॥ (स्त्री. ४-३९)
भवदवन करित होता **बहुभास्वर थावरूनि हात रणीं;** ।
वाटे जणों उतरला **बहुभा स्वरथावरूनि हा तरणी.** ॥१०२॥ (स्त्री. ६-५१)
झाला हरिसहि पढवुनि **नयशोभाजनक विप्रसा दानें ।**
केला कोण शिवाच्या **न यशोभाजन कवि प्रसादानें.** ॥१०३॥ (अनु.३.४२)
यादव म्हणति, 'दवानळ **दुर्वासा; हे लता पहा, काय ।**
या उग्र ग्रीष्मीं हे **दूर्वा साहेल ताप हा काय ?** ॥१०४॥ (अनु. ७–५२)
स्वाचेंहि अतिथिला दे **सक्तु सुबहुमान सत्व राखाया;** ।
तो त्या क्षुधिताचे करि **सक्तु सुबहु मानस त्वरा खाया.** ॥१०५॥(अश्व.७–१३)
संतीं श्री सुरतरुचें **नवि नवि लक्षि प्रसून हित याची ।**
मग सक्तु या म्हणुनि का **न विनविल क्षिप्र सूनहि तयाची.**॥१०६॥(अश्व.७-१६)
आलि म्हणे गे ! कुमुदिनि ! **वैराटि ? कलाप हा, सुखेंव दया ।**
करुनि ग्राया येतो, **वैरा टिकला पहा, सुखें वद या.** ॥१०७॥ (आश्रम.६-२०)
पाहे प्रणता तोका **न व्यास महाकवि प्रसादास ।**
विप्राच्या दे न करी **नव्यासम हाक विप्र सादास.** ॥१०८॥ (स्वर्ग. २-४१)
करीत होती तेथेंच **नवसा गरती रती ।**
पावे त्यापासुनी चिता**नवसागरतीर ती.** ॥ १०९ ॥ (कृष्ण. ५५-४३)
दयाघनें जरी केला **परिहास त्यजावया,** ।
गर्वास हेतु तापाही **परि हा सत्य जावया.** ॥ ११० ॥ (कृष्ण. ६०-६)
दीनावनें होय साधु**वाद, या लोक लागती.** ।
मातेशीं बाळ करितो **बा ! दयालो ! कलागती.** ॥१११॥ (विठ्ठलविज्ञापना ६४)
म्हणे जना भव सुखें **तर वारकरी तसे;** ।
जे शत्रु तच्छिरी उग्र **तरवार करीतसे.** ॥ ११२ ॥ (पुंडरीकप्रार्थना २९)
कपींस स्वर्ग रुचला **न पुष्पकविमानसा;** ।
त्वद्यश प्रिय नाकींचें **न पुष्प कविमानसा.** ॥ ११३ ॥ (रामप्रार्थना ३४)
(दोहा)लाविति षडरिमुखासि हे **संत मस, तप नसेच ।**
ऐसे इतरीं, नाशिति **संतमस तपनसेच.** ॥ ११४ ॥ (सद्वर्णन ७)
जो पापनगीं तृणसमीं **अनळसमान, सदार ।**
प्रभु संतांचें सेवितो **अनळस-मानसदार.** ॥११५॥ (सद्वर्णन १७)
तापते ऐकतां आर्ते **'हा' केला कान रक्षण ।**
करिता टाकिता साधु **हाकेला कां नर' क्षण ?** ॥ ११६ ॥
(सीतारामायण ५७)

'सन्मनीं त्याग तोषाचा **भरता हेतु लाजसी ।**
ताता शक्रा वसे कोणा **भरता हे तुला जसी** ॥ ११७ ॥
गोदेतें प्रभु सेवी, जी **सर्वदा सांवरी नया ।**
प्रेमें मुक्ति ह्मणे जीच्या **सर्वदासां वरीन या** ॥ ११८ ॥
(अनुष्टुब् रामायण)

सुतपोवनांत लावी **हरिहरितोकांस दामनीला जो ।**
**तेणें न कण्व हरमह हरि, हरि, तो कां सदा मनीं लाजो?** ॥११९॥ (द्रोण.६.२१)
मज न मत अरिवधें यश; **अश्वत्थामा न साधु निकरानें. ।**
हित ह्मणुनि, जडाहि दिला **अश्वत्था स्नान साधुनिकरानें.** ॥१२०॥(द्रोण.१५.११०)
सुकरोन्मूलन होइल **पहिल्यापरि काय नग, जरा ज्याला ? ।**
किंबहुना, सांवरवे **पहिल्यापरि काय न गजराजाला.** ॥ १२१ ॥ (द्रोण. १६.१२)
तुज वदले, पाहुनि तव **साधुसभा, 'जनक' विप्र शांतनवा ! ।**
कोठें पाहूं करिता **साधुसभाजन कवि प्रशांत नवा ?** ॥१२२॥ (अनुशासन. ८.८२)
काळा जेंवि तुला मम **भी मानस तेंवि; रे चढें कुळ कीं ।**
वैराच्या, तोयाच्या **भीमा ! नसतें विरेच ढेंकुळ कीं.** ॥ १२३ ॥ ( स्त्रीपर्व ३.४७ )
(श्लोक) कथि हा गुण, भव्य साद देती **सुर, सादास सदा निका महर्षी ।**
करि पाजुनि रामकीर्तरूपा **सुरसा, दास सदा निकाम हर्षी** ॥ १२४ ॥
(प्रियरामायण १०४)

प्रभुकीर्तन या करी कवीचें **सद्यागायन लावि ना शयाला ।**
ह्मणतें यश हें नसे सदा जो **सद्या गाय मला विनाश याला** ॥ १२५ ॥
( प्रियरामायण १०९ )

प्रभुगुणसे उडविति रजहि **संत तमहि मानाच. ।**
यांचा निववि म्हणे जना **संतत महिमा 'नाच'** ॥ १२६ ॥ (सद्वर्णन १३)
गुरुसत्कीर्ति प्रभु गृहीं **रावला, जसा दास. ।**
इच्या धरी ऐकुनि सुधा **राब लाज सादास.** ॥ १२७ ॥ ( सद्वर्णन १६ )
श्रित दीन न होऊं दिला **संतांनीं परतोन. ।**
मिरवी उदापण सुगुण **संतांनीं पर तो न.** ॥ १२८ ॥ ( सद्वर्णन २० )
कवि ह्मणति, सदाश्रित सुखें **आतपत्र पावे च ।**
नृपतिपुढें न करुनि वृथा **आतप त्रपा वेच.** ॥ १२९ ॥ ( सद्वर्णन )
देसी जडाहि तूं जैसा **सत्वराशि शुका मना ।**
पुरवाया सदा तैसा **सत्वरा शिशुकामना.** ॥ १३० ॥ (विठ्ठलविज्ञापना १०)
हृष्ट केला तो यशें जो **दे वदे वानर क्षण ।**
सत्प्रेमाचें करिसि कां **देवदेवा ! न रक्षण ?** ॥ १३१ ॥ (विठ्ठलविज्ञापना ६३)
यश केलें तप तुवां **अगाधबळ साधुन; ।**
या तसें ह्मणती बा ! त्या **अगा धवळ साधु न.** ॥ १३२ ॥ (पुंडरीकप्रार्थना २)

येतीं क्षेत्रें तुझ्या तीर्थे **देव संतत सेवना**; ।
गुण देसी जना बा ! न **दे वसंत तसे वना.** ॥ १३३ ॥ (पुंडरीक० ३०)
तत्काळ निष्पंक करी **हरिनामनदी नता** ।
त्वत्क्षेत्रीं संसृति जशी **हरिना मन दीनता.** ॥ १३४ ॥ (पुंडरीक० ३३)
त्वत्क्षेत्रांत न कोणीही **असानंद नर क्षण.** ।
हा जसा पावला, घोषीं **असा नंद न रक्षण.** ॥ १३५ ॥ (पुंडरीक० ३५)
येती जातीहि जी यात्रा **नमो कळि करी तितें.** ।
हा आटोपी, आपुल्या दे **न मोकळिक रीतितें.** ॥ १३६ ॥ (पुंडरीक० ३६)
पावले शोक साकेतीं **रामा ! जीव नवा सदा.** ।
मान्या तुला त्वत्ताताची **रामा जी वनवासदा.** ॥ १३७ ॥ (रामप्रार्थना १२)
घनसे देववीर श्री**पद रावण वातसा**; ।
न शमे जो पसरितां **पदरा वणवा तसा.** ॥ १३८ ॥ (रामप्रार्थना ३०)
तुझ्या मनीं न तम कीं **रज नीच, रमा वळे** ।
शुद्धसत्वा; दुर्गुण तो **रजनीचर मावळे.** ॥ १३९ ॥ (रामप्रार्थना ३२)
विमानीं वाहिले नेले **पुरस्थ विरहासहें** ।
त्वां न केलें, होय जेणें **पुरस्थविरहास हें.** ॥ १४० ॥ (रामप्रार्थना ३८)
त्वां सेविलें अमृतसें **सार साकेत; काकवी** ।
पुरी अन्या; न तुळिती **सारसा केतका कवी.** ॥ १४१ ॥ (रामप्रार्थना ३९)
(गीति) हा हा अशा करि धरुनि **बहुधा करवीरवासि निजनमना,** ।
चुकतां जपतां सुखविसि **बहुधा करवीरवासिनि जनमना.** ॥ १४२ ॥

(महालक्ष्मीस्तव ६)

विषय विषचि बा ! हो हरि**जन कांपायांस भाळला जीव,** ।
विधिविभुचा लावुनि हित**जनकां पायांस भाळ लाजीव.** ॥ १४३ ॥ (साधुरीति ४६).

**(१०) लांब (अंत्य) यमकांचीं उदाहरणें:—**

गेला मजही सो**डुनि हाता पसरून कोप सारा या** ।
तव गुरुचि अगद जो**डुनि हा ताप सरू, नको पसा राया.**॥१॥(अश्व.१-११८)
समुपेक्षिले, ठकविले, **पूतना महिमा नको पित्या; सहसा** ।
म्यां मारावे खळ ते **कृतनामहि, मान कापित्यासह सा.** ॥२॥(द्रोण.२२-६)
गमले दोघे हरिसे, मग **भुलले पळ ससे समर-सिकते** ।
रक्तें न्हाले झाले बहु **फुलले पळससे समरसिक ते.** ॥ ३ ॥ (शल्य. २-७८)
जो काय सुरसदूषक अघ **परिहरिता तसा चिकुर वाळी** ।
निर्गर्व करुनि चुकला बहु **परि हरि तातसाचि कुरवाळी.** ॥४॥ (उद्योग.८-७६)
नरहरिनामा पावे **संत न सोनार दास मान कसा ?** ।
तरला करुनि भवाचा **अंत नसो नारदासमान कसा ?** ॥५॥ (सन्मणिमाला ७६)

काय उणें त्या, करि **सश्रीकृष्णा जा निवास विप्राशी?।**
कर्णाहीं स्वस्तुतिस **श्रीकृष्णाजानि वासवि प्राशी.** ॥ ६ ॥ (द्रोण. ४-५)
कथिलें कसें असें मज **धर्मा ! करवाल काढ कलहातें;।**
मृत्युमुखीं कुलकरगुणश**र्माकरबालका ढकल हातें.** ॥ ७ ॥ (द्रोण. ४-५)
वळवावया करावें काय प**तितपावना तप शुभ जनें ?।**
द्रवला स्वयेंचि पशुपति देव अ**तितपा वनांत पशुभजनें.** ॥८॥ (अनु. ६-३९)
राम म्हणे 'धर्म वदसि गुरुचि **महाजनक विप्र तारक हा ।**
तरि तूं न म्हणसिल कसा जरिहि **महाजन कवि प्रतारक हा !**॥९॥(शांति. २-४८)
हे राजश्री व्हाया म**म तोकांचा विनाश शिकलें तें ।**
तपनालाहि गिळी जो त**म तो कां चाविना शशिकलेतें !**॥१०॥(स्त्रीपर्व५-५८)
वृत्त कथुनि कविसि, म्हणे ती **निष्ठुरता पहा निरोपाची;।**
छाया कराचि; न करो अति **निष्ठुर ताप हानि रोपाची.**॥११॥(आदि.१०-२८)
स्पर्श न मोहाचा हो तुज, **अंतर्हित परा शराचा हो;।**
ऐसें बोलुनि झाला सुत **अंतर्हित पराशराचा हो.** ॥ १२ ॥ (द्रोण. ६-८५)
जेंवि क्षम लीलेनें, सर्व**परमदा पिनाक, साराया;।**
नरचाप तसाचि परा, उग्र **परम, दापिना कसा राया?**॥१३॥ द्रोण.(१४-२१)
देतां तुलाचि भजतिल, पळही **पर, मानदा ! न वसुधेतें ।**
बा ! पावेल, करुनिही कष्टा **परमा न दानव सुधेतें** ॥ १४ ॥ (द्रोण. १७-३०)
गोपीजन ठकवाया खाया **नवनीत साय, कनकपटा ।**
चालो देइल माझा, शिरतां अ**वनींत सायक न कपटा.** ॥१५॥ (द्रोण.२२-२)
वत्सा ! मी केवळ रवि मम **सर्व स्वच्छवि प्रवर दास;।**
स्वात्म्यापरीस बहुमत मज **सर्व स्वच्छ विप्र वरदास.** ॥१६॥ (द्रोण. ४-३६)
पाहे हाहि पसरुनि प्रभुसि **तपःपदर विप्र भव्यास ।**
झाला सुत सुज्ञ अजर अमर **तपःपद रविप्रभ व्यास.** ॥ १७ ॥ (अनु. ६.५६)
इंद्र म्हणे तव गुरुतें जाणे **बहुधा कवि प्रयास महा ।**
करिती पवितीव्रतें, याचा **बहु धाक, विप्र यासम हा.** ॥१८॥ (अश्व.१.११७)
आभीर म्लेंच्छ करिति विपदु**दया लूट जींत नय नाहीं ।**
येतें कथूं पृथेचा क्षम सु**दयालूटजीं तनय नाहीं.** ॥ १९ ॥ (मौसल. २.७१)
जो देणारा विष्टपबाह्य **विषयवास विप्रतापातें ।**
होय स्वयेंचि तो तव तात **विषय वासविप्रतापातें.** ॥२०॥ (महाभारत,पर्व...)
प्रभुभाव असा गमला देय **इला शाप हा तप सराया.।**
हें न बुडवितां येते सर्व **इलाशाप हात पसराया.** ॥ २१ ॥ (स्त्रीपर्व. ६-१२)
शोभा सोडुनि होता शुद्ध **वसंतीं करीरसा पार्थ ।**
मग मंत्रातें व्हाया उ**द्धव संतीं करी रसापार्थ.** ॥ २२ ॥ (विराट. ६-१२३)

ताप हरिल तव दर्शन सुखवुनि **बहु मानसा धुनीजाचा**; ।
कीं तो तूं सर्वस्वें कीजे बहुमान **साधुनीं जाचा.** ॥ २३ ॥ (शांति. ६-४८)
काय इतर गज देता जं**भारातीभ वाट वीरा या**; ।
त्या सुज्ञा सेना बहु सं**भारा ती भवाटवी राया.** ॥ २४ ॥ (द्रोण. ११-४८)
कार्ष्णि ह्मणे पळ इकडे पाहुत स**ज्जन न पत्रिकेतुकडे.** ।
चर्मोपरि लिहिलें कीं वपुचें म**ज्जननपत्रिके तुकडे.** ॥ २५ ॥ (द्रोण. ३-१३१)
पडतां रथीं गदा तो खसुसा **पळ वीर विप्र भासेना.** ।
कौरव वेष्टिति भीमा; तो त्या **पळवी रविप्रभा सेना.** ॥ २६ ॥ (द्रोण.११-७३)
ह्मणशिल यशोर्थ वेंचिन सर्व**स्वा मी, सदा समरशील**; ।
तरि तूं, पावोनि मला खगुरु**स्वामीस, दास मरशील.** ॥२७॥ (द्रोण.११-३३)
देवव्रतेंचि केली सत्य **असाधारणा प्रतिज्ञा ती**; ।
आहे क्षम भाराच्या कोण **असा धारणाप्रति ज्ञाती**? ॥ २८ ॥ (द्रोण. १-६)
अरि यत्समरीं, हरिच्या जेंवि शिरः**पुंडरीकद शश तरे**; ।
दशशत 'अतिरात्र' करी जो विधिनें '**पुंडरीक दशशत रे**' ! ॥२९॥ (द्रोण.५-५३)
केला पुन्हा, मथुनि धनु-हय-सारथि, **तो रणस्थ विरथ कवी**; ।
वाटे घनरवसमरीं, कपि, रोधुनि **तोरण, स्थविर थकवी.** ॥३०॥ (द्रोण १२-४४)
करि साश्रु दुर्मुखाच्या, तो **कर्ण कवि प्रदक्षिणा, देहा.** ।
समरीं भीम गमे श्रुतिगोत**र्णकविप्र दक्षिणा दे हा.** ॥ ३१ ॥ (द्रोण १२-७६)
गांठी सुरुचि वृषविशिखतति भीमा **परमदारुणास्तनगा** ।
ध्याया श्रीकृष्णाला जेंवि बकी **परम दारुणा स्तन गा** ! ॥३२॥ (द्रोण १२-११४)
सात्यकिरथीं वृकोदर चढला, **राधासुतापसरणीं हो** ! ।
ह्मणति, 'यशस्वी' या, कीं, मथितवि**राधा, सुतापस, 'रणीं हो'** ? ॥ ३३ ॥
(द्रोण. १२-१८४)

येणें तो, तेणें हा, बोलुनि बहु **तीक्ष्ण वचन, कोपविला.** ।
साहेल कोण हो ? अतिकठिणाही, **तीक्ष्णवच नको, पविला.**॥३४॥ (द्रोण.१३-१६)
तूं ज्यांचा नाथ, तयां जरि जय तरि **काय नवल ? वणव्याला** ।
प्याला, त्या अरिजीवन किति ? सागर **काय नव लवण व्याला** ? ॥ ३५ ॥
(द्रोण. १५-५८)

जे त्वच्चरणाश्रित, ते गरुडचि, श**मनकरवाल–कालाही.** ।
शिर दूर, बळें त्याच्या लाविल य**म न कर वालकालाही.** ॥३६॥ (द्रोण. १५-५९)
प्रभु हास्य करुनि, हरुनि श्रितता**पा, परतवी रथा, राया** ! ।
न शकति जयापुढें खलसंगति **पापरत वीर थाराया.** ॥३७॥ (द्रोण. १५-६३)
वदले सुर देवासुरसम त्या आ**योधना, शपथ करुनी**, ।
न तुह्मीं किमपि मिळविलें, ऐसा हा **योधनाश पथकरुनी.** ॥३८॥ (द्रोण.२१-९१)

सदनीं करी ययाती जे कांहीं **सुखविलास तीसहित,** ।
रायें स्वात्मा तैसा, जेंवि हरें **सुखविला सतीसहित.** ॥ ३९ ॥ (आदि. १०-८१)
कर्णादिकांसि देता समरीं **वैराटिकेसरी करिता;** ।
जिष्णुपुढें असुरजनीं कोणी **वैरा टिके सरी करिता?** ॥ ४० ॥ (विराट. ३-९)
पांच न मेले, मेले त्यांहुनि बहु **सुकरवाळ वीसपट,** ।
या चितेस मदात्मा सांपडला **सुकर वाळवीस पट.** ॥ ४१ ॥ (शल्य. १-१६)
परतोनि आणितो श्री मारुनि त्या **परम नीच कितवातें,** ।
मदिषूंच्या केले सुरवर, उडवुनि **पर मनीं चकित वातें.** ॥ ४२ ॥(शल्य.४-२१)
उदकीं लवण, तसें हे करिलचि शो**कांत उर विलीन सती;** ।
असती मृदु तरि पळ या तापे लो**कांत उरविली नसती.** ॥४३॥ (स्त्री. ४-५५)
बाळाहि दिला साधुनि उपदेशें **परम लाभ जननीचा.** ।
घडलें, बहु उच्चासहि अतिदुर्घट, **पर मला भजन नीचा.** ॥ ४४ ॥ (अनु.३-२)
ताप न हरी, दिसे परि केवळ न**वलक्षसा, लयाला जो** ।
पावे, त्या चंद्रासम ह्मणतां **नवलक्ष सालया, लाजो.** ॥४५॥ (सन्मणिमाला ९९)
आतां गतमद मत्पर झाला **हा सविनया विधे! यातें,** ।
देइन जे बहु दुर्लभ हर्षे **हासविन यां विधेयातें.** ॥४६॥ (वामन चरित्र १४९)
सज्ञाति सपात्र सुखे वत्सा! **सुतलालयास जा, यजन** ।
माझे करिशील सुचिर; वा! न, न **उतला लयास जाय जन.** ॥ ४७ ॥
(वामनचरित्र १७३)



*

# परिशिष्ट-ऌ.



मोरोपंताची वाणीच ओजोगुणविशिष्ट आहे. मोरोपंताची कविता अथवा प्रबंध वाचीत असतां संस्कृतसमासघटितशब्दसमुदायश्रवणापासून चित्तास अवर्णनीय आनंद होतो. आणि त्यायोगें मनाची विस्तीर्णता, उदात्तता व उदारता वाढत जाऊन क्षणभर संसारदुःखाचाही विसर पडतो. असा पंताच्या कवितेचा पाक उतरला आहे असें आम्हास वाटतें (हंसकृत मोरोपंतावरील निबंध पृ० ८५-८६, तसेंच केकावलि पृ० ९३-९६ पहा).



## लांब समासाचीं उदाहरणें.

(श्लोकचरण) 'मद्वंशोत्पन्नतेजस्विवरदशरथापत्यरामप्रतापे' ॥१॥ (रम्यरामायण, उत्तरकांड४)
'विद्याश्रीमदमग्नमूढहृदयस्वर्द्विण्मरुद्वासुकी' ॥ २ ॥ (कुशलवोपाख्यान ४,८)
'दासीदासाश्वरत्नक्षितिकनकरथेभेंद्रधेन्वशकांहीं' ॥ ३ ॥ (कुश० १३, ९०)
'स्थानस्रस्तोत्तरीयालकमुकुटपटस्रक्ककारुण्यसिंधु' ॥ ४ ॥ (पृथुको० भगवद्दर्शन)
'दिव्यस्त्रीप्रतिमद्युतिप्रविलसद्दासीसहस्रस्तुता' ॥ ५ ॥ (पृथुको० स्वालयप्रवेश)
'विध्युक्तस्नानसंध्याजपशिवचरणब्रह्मगोपूजनातें' ॥ ६ ॥ ( कृष्ण० ७०,२ )
'भूवस्त्रान्नेभशय्यातिलरजतगृहस्वर्णरत्नादिदानें' ॥ ७ ॥ ( कृष्ण० ६४,९ )
'मुनिहृदयविशालावाससंतोषशाळा' ! ॥ ८ ॥ (साररामायण,बाल.सर्ग४.३)
'विधिमुखसुरसंघोच्चारितात्मस्तुतीतें' ॥ ९ ॥ ( साररामा. ४-५)
'श्रीकंठेंद्राद्यमरपरिषत्सेव्यगंगाप्रवाहीं.' ॥ १० ॥ (मं रा. उपसंहार)

( श्लोकार्ध ) 'होमधूमारुणाकर्णशोणाब्जच्छदलोचना' ॥ ११ ॥ (कुश० ४, २४)
तदा 'स्मितलसन्मुखद्विजसमूहशुभ्रद्युति-
च्छटाधवलितांबरक्षिति' कथी कुश स्वस्थिति. ॥ १२ ॥ (कुश० १३, ३७)
'हृत्तमक्षयकरेश्वरहस्तस्पर्शकामहतचित्त' समस्त. ॥ १३ ॥ (कृष्ण० ५८,५९)
'सिद्धर्षिविद्याधरयक्षचारणगंधर्वताक्ष्योरगदेवतागण' ॥१४॥ (साररामा. ५-५)

( गीति ) 'रविवंशजदशरथनृपसंतानक्षीरसिंधुचंद्राचा; ।
गाधिजमुनिमखनाशकराक्षसमथनक्रियावितंद्राचा; ॥ १५ ॥
(प्राकृतमंत्ररामायण, सुंदर. ११२ ).

श्रीकंठसायकासनभंगकुपितभार्गवस्मयहराचा; ।
गौतमभार्याशापक्लेशसुमहदंधकारमिहिराचा ॥१६॥ (प्राकृतमं. रा. सुंदर. ११३)
सत्यव्रतजनकाज्ञात्राणार्थत्यक्तराज्यकामाचा; ।
त्वद्भगिनीवैरूप्यक्रुद्धखराद्यसुरबळविरामाचा: ॥ १७ ॥ (सुंदर० ११४)
कांचनकायमृगच्छलहृतकांताविरहतप्तदेहाचा; ।
निजभार्याचोरासुक्षयप्रतिज्ञाविलासगेहाचा; ॥ १८ ॥ (सुंदर० ११५)
तावकपराक्रमार्यमराहुप्रभवासिवीरकाळाचा; ।
अभिमतवितरणहर्षितसुग्रीवादिप्लवंगपाळाचा; ॥ १९ ॥ (सुंदर० ११६)
वरविक्रममंडितभुजदंडनिहितचंडचापदंडाचा;' ।
मी दूत राघवाचा, त्वद्विधदुष्टैककालदंडाचा. ॥ २० ॥ (सुंदर० ११७)
( गील्यर्ध ) 'हयभालबद्धकांचनदललिखितार्थग्रहप्रदीप्तमदें' ॥ २१ ॥ (कुश० ६, १५)
'सुततनुगतरिपुशस्त्रव्रणावलोकप्रहर्षिताभीता' ॥ २२ ॥ (कुश. १३, ७१)
'भगवत्प्रसादकल्पद्रुमशिखरसमाश्रितापगेयपिकें'॥२३॥ (भीष्मभक्तिभाग्य ९४)
'वरपद्मरागमरकतहीरकहरिनीलमणिमयागारा' ॥२४॥ (कृष्णविजय ८१,९९)
'सन्मणिकिरीटकुंडलरुचिपुंजसुरंजितालकस्तोम' ॥ २५ ॥ ( कृष्ण० ८९,८८ )
'गजदंतगर्भवर्णप्रजवसबलकालबालहययुक्ती' ॥ २६ ॥ (कर्ण ३१,२७)
'मत्स्यध्वजकूर्मांबुजवज्रच्छत्रांकुशादिलक्ष्मधरें' ॥ २७ ॥ ( कर्ण ३१,२९ )
'मंदाकिनीसरोरुहमकरंदनिषेकशीतळें' पदरें ॥ २८ ॥ ( कर्ण ३५,५४ )
'दुःसहवृषरविशरकरतप्ताखिलभूपवीरवरपक्षी' ॥ २९ ॥ ( कर्ण ३८,४६ )
'भुजलीलासंपादितदुर्घटजंभारिमुखनिर्लिपार्थे' ॥ ३० ॥ ( कर्ण ४४,३७ )
'स्वपदाश्रितजनकामप्रमुखाहितषट्कनाशका देवा'! ॥३१॥ ( कर्ण ५०, ३१)
'नागमयांगदकुंडलहारकटकमध्ययज्ञसूत्रधर' ॥ ३२ ॥ (सौप्तिक १,२३)
'स्वपरौदार्यक्रौर्यसुगुणजितजलमुग्धराशिशु' भ्राते ॥ ३३ ॥ (शांति ४,२)
कृष्णा ! 'सजलजलदहरिनीलनिभानंदकंदनवदेहा' ॥३४॥ ( अनुशा० ४,४७ )
जो 'विविधवर्णशतमखचापशतद्युतिविलासिनीकुंज' ॥३५॥ (अनुशा० ५,२१)
'वनदायुतकोटितडित्पद्मार्बुदगर्जनादिगुरुनादें' ॥३६॥ (मंत्रभाग. सप्तम ११५)
'जगदीश्वरनिजनाभीसरोवरोद्भूतपद्मजनितातें' ॥ ३७ ॥ (मंत्ररामा. बाल.३४)
'शरणागतजनसंसृतिभीतिध्वांतप्रभंजनैकरवी.' ॥ ३८ ॥ (मं. रा. बा. ३७)
मग 'यमदंडाशनिसमनिजचंचूपक्षपादनखरांहीं' ॥ ३९ ॥ (मं. रा. अ. ६३)
'हरिवरुणश्रीदयमज्वलनश्वसनग्रहेशसोमातें' ॥ ४० ॥ (मं. रा. यु. ६६)
'दृढतरशरासनासिप्रखरेषुधरप्रचंडदोर्दंड' ॥ ४१ ॥ (मं. रा. यु. १९४)
'सौमित्रिसर्पराजत्रातदयानंदबलनिधानातें' ॥ ४२ ॥ (मं. रा. यु. २३३)
अथवा 'प्रलयज्वलनज्वालाकवलीकृतेंदुभास्करसे' ॥४३॥ (मं. रा. यु. ३४९)
'खदिरकुटजधवसरलस्यंदनतरुबिल्वतालसालवट' ॥४४॥ (मं. रा. यु. ४७६)
'पौलस्त्यकुमाराध्वररक्षकरक्षःक्षयस्पृहावंत' ॥ ४५ ॥ (मं. रा. यु. ५७८)

'श्रीमद्रामानुजनिजभुजभुजगशिलीमुखैकरदविद्ध' ॥४६॥ (मं. रा. यु. ५८९)
'शरनाराचांजलिकप्रासगदाखड्गशूलपरिघांतें' ॥ ४७ ॥ (मं. रा. यु. ६३२)
'कालभुजंगमवज्रज्वनलज्वालांतकोपमा' शक्ती ॥ ४८ ॥ (मं. रा. यु. ६५०)
'रामपराक्रमपावकदग्धाखिलराक्षसाटवीमाजी'. ॥ ४९ ॥ (मं. रा. यु. ६९६)
'राक्षसतिमिरापहरघुरामयशश्चंद्रचंद्रिकाजालें' ॥ ५० ॥ (मं. रा. यु. ७०८)
'मिश्रितमुक्तामरकतमणिमयहारद्वयप्रभाचोर' ॥ ५१ ॥ (मं. रा. यु. ७९८)
'आबालप्रवयस्कप्रजाप्रमोदाश्रुसिक्तभूवरता' ॥ ५२ ॥ (मं. रा. यु. ८२४)
'सुग्रीववालिवानरजन्मकथाकर्णनस्पृहाधामें' ॥ ५३ ॥ (मं. रा. उ. २०५)
'बालग्रहोपशांतिप्रज्ञाबलकीर्तिशांतिशातकरें' ॥ ५४ ॥ (मं. रा. उ. २९६)
'धनधान्यगृहक्षेत्रग्रामरथद्विरदधेनुहयदानें. ॥ ५५ ॥ (द्रोण. ६, ३०)
'श्रीसूरदासतुलसीदासकबीरादिसुकविकवनातें' ॥ ५६ ॥ (रामरीति ८)
'विजयरथतुरगरश्मिग्रहणव्यग्राग्रपाणिपद्मातें.' ॥ ५७ ॥
(भगवद्गीताभाषांतर प्रास्ताविक १)
(सवाई) 'स्वर्गणिकाशतनृत्यसुगायकगीतसुवाद्यरवें' नभ गाजे॥५८॥ (सवाईरामा. ६३)
'तक्षककोट्यधिकोग्रदशाननरक्षउपद्रुतविश्वभयापह' ॥५९॥ (सवाई रा. १५४)



# परिशिष्ट-ऌ.



संस्कृतप्राकृताचें मिश्रण सांप्रत कालास उपयोगी आहे. प्राकृत भाषेत मूळचे शब्द फार थोडे आहेत· त्यांत संस्कृत शब्दांचें मिश्रण न करितां मूळच्याच शब्दांवर काम चालवावें असा हट्ट केला, आणि संस्कृतांतील शब्द प्राकृतांत घेतलेच नाहींत तर, अपूर्णभाषेमुळें प्रौढ ग्रंथांचा या भाषेंत संग्रह होणार नाहीं. अर्थात् या भाषेंतील लोकांस प्रादेशमात्र जागेत बसवून ठेविल्यासारखे फल होईल. तेव्हां मोरोपंतानें प्राकृत ग्रंथांत संस्कृताचें अतिशय मिश्रण केलें हा प्राकृत लोकांवर मोठाच उपकार केला असें म्हटलें पाहिजे. (मोरोपंतावरील हंसाचा निबंध पृ० ८५-८६)



## १ मोरोपंती काव्यांतील संस्कृत वाक्यें.

( गीति ) 'श्रीमद्गुणेशगुरुपदनखशशिकांतिच्छटा जयंतुतरां ।
प्रतिभारत्नं लब्धं यासु मयेदं मनस्तमोघ्नीषु' ॥१॥ (प्राकृतमंत्र रामायण उपक्रम १)
ऐसें म्हणतां स्त्रीच्या कंठीं घालुनि मिठी ह्मणे 'अयि ! ते ।
कथमेवमुक्तमदयं तदयं **किमनुष्ठितुं** क्षमो दयिते !' ॥ २ ॥ (आदि.अ.२७)
हे नाथ ! रमानाथ ! व्रजनाथ ! हरे ! मुकुंद ! कंसारे !
गोविंद ! कृष्ण ! केशव ! दीनार्तिहरस्त्वमेव संसारे' ॥ ३ ॥ (सभापर्व ५,६९)
या नेत्रांनीं कीं ती श्रीमूर्ति विलोकिली, 'अहो भाग्यम् !
स्पष्टः स बत नियुद्धे ब्रुवते श्रुतयो महन्महोभाग्यम्.' ॥४॥ (वनपर्व ५,१२३)
'पार्थ न हन्मि यावत् पादौ तावन्न धावयेऽहमिति ।
घोरं यस्य व्रतमिदमहह ! कथं सोऽप्यगाल्लयं समिति'. ॥५॥ (कर्णपर्व६,५७)
'कर्णेन गीर्णचक्रा सप्तद्वीपाधरा सशैलवना ।
चतुरंगुलमुत्क्षिप्तेत्यूचे भगवान् मुनिर्विशुद्धमनाः' ॥ ६ ॥ (कर्ण ४८,५८)

( गीत्यर्ध ) 'त्वयि तनुवितरणसमये' गंगे हरिता नकोचि दे हरता. ॥७॥ (गंगास्तुति ६४)
'प्रभुसम पूज्य मला तो म्हणतां 'तुभ्यं नमो रमाजाने !' ॥८॥ (हरिवंश५,९०)
'जयतितरां श्रीरामो सुग्रीवो जयति लक्ष्मणो जयति.' ॥९॥ (प्रा०मं.युद्ध. २६१)
'शत्रुं जहि राम !' असें वदोनि दे हर्षे सूर्य विश्वास. ॥१०॥ (मंत्ररामा.यु. ६९३)
ज्यासि 'अहो रूपमहो महिमाऽयं सुकृतुर्वयं धन्याः' ॥११॥ (भीष्मभक्ति. १६६)
आलों मृगानुसारें; 'आपृच्छे त्वां तदहमितो यामि.' ॥१२॥ (आदि. १०,६६)
'किं जितमिह किं जितमिह' ऐसें असकृत् पुसे अचक्षु रसें. ॥१३॥ (सभा. ४,८०)
'भो भगवन् ! भो वत्सल ! भो हतचाणूरमल्ल !' भागावें ॥१४॥ (सभा. ५,७८)
मुनि ह्मणति 'वानराणामपि न नराणां सुमंगलं जननं.' ॥१५॥ (वन. १२,१६२)
भरत ह्मणे 'शिव!शिव!इह केयमपूर्वेदृशी कुशीला'हो ॥ १६ ॥ (वन. १०-७३)
भीष्मा! मजला म्हणसी जरि'जयमाशास्व मे विभो राम!'॥१७॥ (उद्योग१३,६७)
'भगवति गदे नमस्ते' त्वां कितिकां करुनि संगरा सावें ॥१८॥ (भीष्म.३,४)
मुनि वदले, 'मा मैवं पीडय पापाय बालकौ शल्य !' ॥ १९ ॥ (भीष्म.८,३१)
'भक्तः प्रणश्यति न मे' हें कीं वदलासि तूंचि भविकवच.॥२०॥(द्रोणपर्व२,७१)
शरतिमिरीं कृष्ण म्हणे 'मच्चेतोंबुजनवातप क्वासि' ॥ २१ ॥ (द्रोणपर्व२, १४)
नित्य म्हणे 'सिहोऽस्मि श्वस्त्वं गतासि कृष्णकरिप क्व'.॥२२॥ (द्रोणपर्व२०,४७)
भीम 'सुषेण हतोऽसि स्थैर्य कुरु' हें वदोनि शर सोडी. ॥२३॥ (कर्ण ३०,५२)
वदला दास 'करिष्ये वचनं तव'तो करी न पार्थ कसें? ॥२४॥(कर्ण ३५,४०)
'पादौ न धावयिष्ये पार्थे जीवत्यहं कदापीति'. ॥ २५ ॥ (कर्ण. ४०,२३)
मातुलपुत्रा 'मा भैर्वत्स' असें मागतों तुला सदया. ॥ २६ ॥ (कर्ण.४३,१७)
'मा भैर्वत्स' जयश्री एवं वाक्यें हरी पितामह ती ॥ २७ ॥ (कर्ण. ४७,६९)
तेही नरनारायण ह्मणतिल 'वीरोऽयमेव कौ' शल्य ॥ २८ ॥ (कर्ण ४४,३२)
दे, 'पार्थ हतोसि' ह्मणे निश्चय तेव्हां जनेंहि हा केला. ॥२९॥ (कर्ण ४७,७२)
'नश्यति न मे जनो' या बोल न लागों दिला तुवां स्ववचा. ॥३०॥ (कर्ण५०,५४)
संहर्त्यांतें व्हाया सुख भजसि 'नमोऽस्तु ते विवेकाय' ॥३१॥ (अनुशासन३,३४)
संजय धरुनि तयातें 'मैवं मैवं' ह्मणोनियां शमवी. ॥ ३२ ॥ (स्त्रीपर्व २,२५)
तूं नित्य 'यतो धर्मस्ततो जय' असेंच ह्मणत होतीस. ॥ ३३ ॥ (स्त्रीपर्व ३,३)
ऐसें वदोनि देवी ती 'क्व स राजा' असें पुसे धर्मा. ॥ ३४ ॥ (स्त्रीपर्व ३,४८)
'देवीं प्रत्यर्पय रे ! नोचेदंतं प्रमत्त ! गंतासि.' ॥ ३५ ॥ (गंगारामायण ३१)
गाजवि 'जयत्यतिबलो राम' असें ह्मणुनि कांड कपिराय. ॥ ३६ ॥
(गंगारा. ३३)
करवि 'ममाप्येष यथा तव' हें बोलोनि हा क्रिया अरिची. ॥ ३७ ॥
(तीर्थरा. ५५)
'यद्वो मतमस्तु' असें बोलुनि देउनि निरोप, दानमती ॥ ३८ ॥
(मंत्रभागवत १०.६६०)

तरिच ह्मणति 'मित्र ! जगद्बांधव ! तुभ्यं नमोऽस्तु' कवि त्यातें. ॥ ३९ ॥
(भक्तभूषण १०७)

(श्लोकचरण) 'अयि क्वासि क्वासि प्रियतम' असें गद्गद वदे. ॥४०॥ (कृष्णविजय ६२-११५)
'श्रीविघ्नेश्वर ते नमः कुरु कृपां निर्विघ्नमस्त्वद्य मे.'॥४१॥(कुशलवोपाख्यान १०,५)

( श्लोकार्ध ) 'मातर्नमस्ते क्षमस्वापराधी न'। मानिं मला सर्वथा पराधीन. ॥ ४२ ॥
(कुशलवो.४,३२)

( श्लोक ) 'या प्रासूत स्वयं गौरीं कीर्तिं मेनेव सन्नुताम् ।
या सद्गुनवसंतश्रीः कल्पवल्लीव याऽर्थिनाम्' ॥ ४३ ॥
'यस्याः स्नुषा रत्नगर्भा सपत्नी चामरावती ।
तस्याः श्रीगोपिकादेव्याः किमपीदं कृते कृतम्' ॥४४॥ (भीष्मभक्ति. उपसंहार)
त्र्यक्ष मनोहर ! दीनजनावनदक्ष ! पुमर्थद ! साधुसभाधन !
लक्ष कविस्तुत ! दारुणपातककक्षदवानल ! सत्करुणाघन !
तक्षककोट्यधिकोग्रदशाननरक्षउपद्रुतविश्वभयापह !
रक्ष रघूत्तम ! मामबलं वृतपक्षमनाथमहर्षिमहामह!॥४५॥(सवयारामायण १४५)

याशिवाय पृ० १६२ के० ४२ च्या टीपेत आठ उदाहरणें दिलीं आहेत तीं इष्ट तर पहावीं.

## (२) संस्कृताच्या तऱ्हेवर रचना.

(अ) **संस्कृत लिंगें**:—(पुल्लिंगी शब्दः–आकाश, दार, नाक, प्रेमा, भूत, विघ्न, शपथ, समर, स्वप्न इ. नपुसकलिंगी शब्दः–छंद, जन्म, देह, मित्र, वपु, क्षत्र इ. स्त्रीलिंगी शब्दः– उपनिषद् इ.)

(१) संपन्न **मित्र असतें**, तरि **येतें** संकटांत कामातें. ॥ (हरिश्चंद्राख्यान
अ० २ गी० ८)

**पावें** सुखें सुखहि **तें मित्र** असें ह्मणति सर्वेही ज्ञानी ॥ (भारत,कर्ण २९.१८)
**मित्र** सधन **सधनाचें**, साजे गोदुग्ध मित्र गोदुग्धा ॥ (आदि. २३.२)

'मित्र' शब्द पुल्लिंगीही घातलेला आढळतो. जसें–

तो **मित्र** होय बापा ! पापाचारांत जो बुडों नेदी ॥ (प्रश्नोत्तरमाला ४१)

याशिवाय छंद(=वृत्त) (नपुंसकलिंगी), क्षत्र (=क्षत्रिय) (नपुंसकलिंगी), नाक (स्वर्ग) (पुल्लिंगी) अशींही रूपें आढळतात.

(२) भीमाच्या तुझियाही **पायांचा शपथ** सत्य हें कथितों.॥ (कर्ण ४३.४१)
**माझा शपथ** तुज असें जें सत्ये ! सत्य तेंचि सांग मला. ॥ (हरिवंश २६-६७)
(३) **ऐसा स्वप्न** विलोकुनि तो श्रीमान् कर्ण जाहला जागा. ॥ (वनपर्व १४.१५)
(४) **हा विघ्न** योगिहृदया सहसा सावधपणांतही मळवी. ॥ (हरिवंश ५४.३८)
(५) तों ये तेथ पहावयासि उदरीं **ज्याचें** तिच्या **जन्म** ती. ॥
(कृष्णविजय ५५.५८)

केलें सुमुनिकृत सदुपदेशें हित सत्य सफल **जन्म** तिहीं.॥ (मंत्रभाग.४-१७५)

(६) भावंड बुद्बुदाचें **वपु** अति निःसार **मित्र** फेंसाचें ॥
(७) जो तोंचि आपणांतहि **आकाश जसा** घटांत तेवि असे.॥ (मंत्रभा.११)
(८) दुर्योधन पंचाक्षरिमंत्रें परमोग्र **भूत**सा खवळे. ॥ (सभापर्व)
(९) **ग्रथिली उपनिषद्** प्राकृता कशी पशो ! कवनांत॥ (दोहारामा. द्वितीय,४६)
(१०) **प्रेमा कैसा** किति **हा** पटु अपटु असे कीं नसे दंभ गर्व. ॥
(कृष्ण. उत्तरार्ध उपसं. ३)
(११) **'दार'** शब्दाविषयीं विवेचन पृ० २८ पाहावें.
(१२) राज्यच्युतसंगें श्रमपात्र करिसि दिव्य **देह** कां गे **हें** ? ॥ (वन. ९-८)
(१३) श्रीरामरावणसमर होय श्रीरामरावण**समरसा.** ॥ (वन. १२-६६)

(आ) **संस्कृत विभक्तिः—**

(१४) परिभवखिन्न युधिष्ठिर **रात्रौ** प्रभुला ह्मणे अगा अजिता ! ॥ (भीष्म.३,१)
(१५) अंगीकृतगहनाटन **दाशरथी** त्यक्तधैर्य 'हा !' **करिती.** ॥
(निरोष्ठरामा. २३)
(१६) झालें त्वन्नाथवरें यापासुनि देवि ! **कालि !** याही तें. ॥ (द्रोण. १३-२५)
तसेंच (१७) **'अष्टौप्रहर'** असें रूप आढळतें.

**विशेषणाला विशेष्याची विभक्तिः—**

(१८) जो **तापशमनें, स्वच्छें, यशें** लाजवि कापुरा ॥ (मंत्रिरामायण १२)
(१९) **त्वन्मतिला** जीवनासि **विटलीला**'. ॥
(२०) **'गुरुला दंडा'** (=मोठा दंड) (अहिल्योद्धार, प्रथम गी० २४)
(२१) ते नंदयशोदोद्भव **रात्रीला** नेणतीच **सरलिला.** ॥
(मंत्रभाग. १०-५८९)

(इ) **संस्कृत क्रियापदः—**

(२२) निद्राभंग करिल जो त्या माझे **भस्मसात् करो** नयन ॥ (हरिवंश २३)
(२३) थोडें याहुनि, पाहुनि **नटती** कादंबिनीस केकी तें. ॥ (वन. ६,५८)

(ई) **संस्कृताप्रमाणेंअवग्रहलोपः—**

(२४) विप्रसती ह्मणति 'शिवे ! ऐसेंचि सदा कथोक्त दे**ऽगाई**' ॥ (द्रोण.५.१९)

(उ) **संस्कृताप्रमाणें सामासिक रूपः—**

(२५) **पुण्ययशा** प्रभु भार्गवराममनःक्षोभ शमवि दे शांती.॥(तीर्थरामायण ७)

(ऊ) **संस्कृताप्रमाणें संधिः—**

(२६) ज्ञान टिकावें व्हावें ऐसें **श्रीकांतसंघशो गान.**॥ मंत्रभागवत ४.१७४
(२७) मातेचा अस्नेहहि होय **यशोहेतु** साधु रामाला ॥(वन.३.७५)
(२८) **'सद्यशोर्थ'** (सभा १-१६)
(२९) न अज्ञहृदयें तशीं तव **यशोरसीं** रंगती । (केका)
(३०) गेलों गृहासि मी जों स्मरत **स्मर-तम-इना** शरण्यातें. (अनु. ६.७५)

(ऋ) **संस्कृताप्रमाणें प्रयोगः**–

(३१) प्रेमें रक्षितिल सदा ह्मणुनि **दिलें मी** जयासि **मत्तातें** ॥ (विराट अ० १)

(३२) पार्थ ह्मणे 'तूं मुनिनीं चित्तीं षडरिक्षयार्थ **धरिलास**' ॥ उद्योग. १

(३३) **वरिलासि मत्सखीनें** ग्यांही **वरिलासि** तूं मनें मातें॥(आदि.११)

(३४) जाउनि तो सूत वदे 'कृष्णे ! द्यूतांत **तूं** स्वयें **धर्में** ।
**हारविलीस** सुयोधन सदनाप्रति ये करावया कर्में. ॥ (सभा. ४)

(३५) प्रद्युम्न ह्मणे **केलों** पूर्वीं ऐसाच **मी हरें** काय ? ॥ ( हरिवंश ८.१००)

(ऋ) **संस्कृताप्रमाणें शब्दरचनाः**—

✓(३६) **हा जन** सखीसमाजीं तुमचा सोडूनि काय पद रमला ? (स्त्रीपर्व ४.४३)
**हा जन**='**अयं** जनः' प्रमाणें योजना. तसेंच 'यशस्' (नपुंसक) शब्द संस्कृताप्रमाणें सकारांत योजिला असून 'यश' असाही योजिलेला आढळतो. 'स्व**यश**तोय' (कर्ण २१-७) '**यश** हरिचें ज्यांसि रुचे' (भागवतारंभ)

(ऌ) **संस्कृत-छंदःशास्त्रानुसरणः**–संस्कृत छंदःशास्त्राप्रमाणें 'पादांतगो वर्णो लघुर्गुरुर्भवेद्वा (छंदोमंजरीटीका)' ह्मणजे पादांतांतील अक्षर दीर्घ असलें तरी लघु, व लघु असलें तरी दीर्घ मानावें हा नियम पंतांनीं पाळलेला आढळतो. थोडीं उदाहरणेंः–

(३७) प्रभुसि भरत चरण धरुनि विनवि, परमकरुण तरिहि न परत**ला**, ।
धृतमुनिपथ समजुनि महिसमवनगुरुकथित विहिततप रत**ला**. ॥ ६ ॥
(लघुरामायण)

(३८) सुरसरिदुपपदपितृसख मुनिस नमुनि पुसुनि निववि गुहमति**तें** ।
भरतअनुजसहित जिववि निववि विरहविकळ सकळ पुर अति **तें**. ॥४६॥
(लघुरामायण)

(३९) आधींच श्रीराम क्रव्यादांच्या चमूसि जाळू**न**, ।
विश्वामित्रातें दे आनंद प्राज्य याग पाळू**न**. ॥ (दिव्य अथवा दीर्घ रामायण ६)

('दिव्य' रामायणांतील प्रत्येक गीतींत शक्य तितके 'म'गण योजिले असून फक्त षष्ठस्थानीं 'ज' गण किंवा 'य' गण घातलाच पाहिजे ह्मणून तेथें मात्र 'म' गणाची योजना न करितां 'ज' गण घातला आहे. प्रत्येक गीत्यर्धात २ अक्षरें लघु असून १४ अक्षरें गुरु आहेत.)

(४०) चित्तांत ह्मणे, 'कैसा केला अरिमीन ह्रद अगाध रिता' ?॥(उद्योग. १.५०)

(४१) गज जेंवि यूथपतिला पंक**ह्र**दातूनि उद्धरायासी. ॥ (कर्ण ३७.१३)

**(वरील दोन उदाहरणांत 'ह्र' या अक्षरानें मागील अक्षरास गुरुत्व येऊन एकमात्रा अधिक वाढते व छंदोभंग होतो असें प्रथमदर्शनीं वाटतें परंतु 'प्रन्हेवेति पुनः पिंगलमुनेर्विकल्पविधायकं सूत्रम्' असें छंदोमंजरींत सांगितलें आहे. त्याचा अर्थः–'प्र' व 'न्ह' या संयुक्ताक्षरांच्या पूर्वाक्षरांस विकल्पानें गुरुत्व येतें. छंदःशास्त्रांतील हा विकल्पाचा नियम पंतास परिचित असल्यामुळें त्यांनीं वरील प्रमाणें प्रयोग केला आहे. 'न्ह' मुळें मागील अक्षरास द्वित्व आणण्याचें उदाहरण ही पंतकाव्यांत आढळतें. तें खालीं दिलें आहे.)**

**गंगेत गतीच्छु तसे ते रक्तनदह्रदांत रिपु न्हाती. ॥ (कर्ण. ३७-१३)**

**या ठिकाणीं 'न्ह'च्या मागच्या 'द' कारास गुरुत्व आणिलें आहे. मोरोपंताच्या छंदःशास्त्राच्या सूक्ष्म परिचयाचें हें एक ठळक प्रमाण आहे.**

# परिशिष्ट-ए.



## कवीचें निरंकुशत्व. (Poetic License.)

(श्लोकार्ध) 'अपि माषं मषं कुर्याच्छंदोभंगं त्यजेद्गिराम्' ॥

(गीति) 'कोठें दूरान्वितपद, कोठें चुकली असेल यति मात्र; ।

अतिमात्र दोष ऐसें न वदोत कवी समस्तगुणपात्र'. ॥ (मंत्ररामा. उपक्रम. १९)

(१) **अग्राह्य समास** (संस्कृतप्राकृतसमास):-(१) तोडूनियां **गृहवेड्या**, आलां झालां न देखतां मज वेड्या. ॥ (कृष्णविजय ३२-२९), **क्रियावेड्या** ( कर्ण. ४१-१९ ), (२) तव दर्शन बा पांचा प्राणां सुख; लाभ हा **जननिबापांचा** ॥ ( कृष्ण० ३९-६ ) (३) पाहे हाहि पसरुनि प्रभुसि **तपःपदर** विप्र भव्यास ॥ ( अनुशासनपर्व ६-५६ ) (४) नवल रविपुढें कीट स्वकृत **तमोनाशकाज** वाखाणी ॥ ( वनपर्व ) ( ५ ) एक ब्राह्मण-सत्तम, एक क्षत्रावतंस **धीटपती** ॥ (कर्ण. १०-१५) (६) झाला हा **निबरवया** हानि बरवया न जाणतां होय ॥ (अश्व०३-७) (७) दूत त्रासासि घेती म्हणुनि सुमति ते जोडिती **पायमाचे** ॥ (कृष्णविजय उत्तरार्ध ७२.५३) (८) कुंकुम **माथानीचे** ज्या कर तो पाविजेल माथानीचें (कृष्णवि० १६-३८) (९) हा **विधिनेम** उगे हा म्हणतां तो जाय होउनी मऊ, गेहा (कृष्ण०४.१८) (१०) मृदुरक्त सहज चरण **व्याळशिरोमणिखड्यावरी** संचरण ॥ (कृष्ण१६.३५) (११) किति जेवति वरद गडी कुसुमफळीं **सिक्थपल्लवांकुरदगडी** ॥ (कृष्णविजय अ० १२.७) (१२) हा **साहावाध्याय** श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥

(कुशलवोपाख्यान अ० ६) (१३) त्या सुगुणसागराचा पावेल न अंत **सुकविधीटिटवी** ॥ ( द्रोणपर्व ) (१४) **सुरतश्रांतगोपिकाननधामा** (कृष्णविजय पूर्वार्ध ३३.२१) (१५) **स्नेहरिण** ( कृष्णविजय ३२-२९ ) ( १६ ) **स्वजनभरवसा** ( कृष्णविजय उत्तरार्ध ) ( १७ ) **स्वपापशिदोरी**–'मग कुजकी जशि दोरी आयुष्याची तुटे स्वपापशिदोरी ॥' ( कृष्णविजय-पूर्वार्ध४९.३६ ) ( १८ ) **स्वात्मघरसें** ( कुशलवोपाख्यान ).

**(२) अनुस्वारव्यत्ययदोषः**—'काननीं चेष्टा–कां न नीचेष्टा' ( हरि.२३-७ ) (२) 'तज्जननी-तज्जननीं' (आदि. १७-७१) (३) 'नन्द नवनीतें–नन्दनवनीं तें' (उद्योग. ८-१५) ( ४ ) 'नयनींच्या–नय नीच्या' (आदि. १९-३५) ( ५ ) 'नवनवी रजनी–भवन वीरजनीं' (मंत्रभाग.११-५१३) (६) 'राजमणी–नाथ रणीं' (कर्ण.४७-२९) (७) 'सदार जनीं–सदा रजनी (मंत्ररामा-अरण्य) ( ८ ) 'स्थानीं–ज्ञानी ( ब्रह्मो.११-५ ) ( ९ ) हा हानी–हाहांनीं ( उद्योग.४-८२ ) परंतु 'ण', 'न', 'म' ह्या अनुनासिक वर्णावरील अनुस्वारव्यत्यय सदोष मानणें योग्य होणार नाहीं असें मानल्यास तशीं उदाहरणें सोडून आतां पुढें इतर वर्णावरील अनुस्वारव्यत्ययदोषांचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेतः—( १ ) देवा व्हावे चक्षुस्तेजःसंपन्न **आश्रमांमाजी** । मामाजी ऐसें द्या मति साहेनाचि त्या **श्रमा माजी.** ॥ (वन. १३-६६) (२) असुरांचें **उर गाजे** यत्स्मरणें वर्ण्य करिकरां **उरगां जे** ॥ ( कृष्णविजय ३८-३२ ) (३) पौरव रौरव गौरव कर्ता भर्ता भला **मला गमसी** । समशील बुद्धि होउनि नीतीनें आजि बोलुं **लाग मसीं.** ॥ (आदि. ११-७६) (८) संजय म्हणे कृतैकश्रितसर्वस्वर्द्रुशौरि **संगति ही** । कां जी करिजेल इतर मणिमंत्रौषधिरसज्ञ **संग तिहीं.** ॥ (भीष्म.६-५)

**(३) आकारांत शब्दास तृतीया विभक्तीचा स्वरप्रत्यय लाविल्याचें उदाहरणः**—(१) करितों तच्छिक्षित मी, बैस उगा, तूं न होसि कवि **तोरें.** ॥ (सभापर्व अ० ४ गी० ३७)

**(४)'छ' अक्षराचा कधीं कधीं 'च्छ' जोडाक्षराप्रमाणें उपयोगः**—(१) बहु तेज प्रकट करी शुचि सत्वगुण **छळीं**, हिरा ऊनीं. (वन. ४-७४) (२) कीं यांत **छळ** पुष्कळ जो सावध तोचि शुद्ध यश लाहे ॥ (हरिश्चंद्रा. ५-२५) (३) चारीही हय वेधिले ध्वज मग **छेदूनियां** पाडिला. ॥ (कुश.) (४) रागे वदतां झाली प्रकट **छंदोमयी** अशी वाणी. ॥ (मंत्ररामायण प्राकृत, बालकांड); (५) ह्मणउनि याचि **छंदें** नवमींची वर्णितों कथा सुरसा ॥ ( भीष्मभक्ति. गी० ११ )

**(५) पुढें जोडाक्षर असून मागचें अक्षर दीर्घ होत नाहींः**—(१) मथिले त्वदनुज**हि म्ह**णत होते आम्हां रणांत न तरा जे. ॥ (गदा० २-७) (२) साधुनि देईन **सख्या** राया दुर्योधना जशी महिला. ॥ (कर्ण. ६-७.)

**(६) यतिभंगः**-(१) मागे सुधेविणें **अज–रामरता** केतुवास वरदा त्या ॥ (आदि. अ० ४) (२) शोधूं बरें करूं **कर—णें** तें न विचारितां नव्हे नीट. ॥ (आदि० ३४-८०) (३) नानाभूपशिरः **किरीटमणिदी**-पा ह्या रिपुघ्नाप्रती ॥ (कुशलवो० ६-७) (४) आश्रय देइल कशि **मृग—पागस्कर** मत्त सिंधुरा जगती ॥ (स्त्रीपर्व अ०५-१८) (५) असा

करुनियां बरा दृढ विचार **लंकापति**—। **कुळांतक** असें वदे कठिण कीं श्रुती कांपती ॥ (कुशलवो० ३-२०) (६) झाला तसा, जसा **सुनृ-पा** पाहुनि दस्यु वचकला होतो. ॥ (ऐषिक. २-६) याचीं शोधक वाचकांस आणखी पुष्कळ उदाहरणें सांपडतील. विस्तारभयास्तव येथें जास्ती दिलीं नाहींत.

**(७) यमकासाठीं शब्दाची ओढाताणः—'अ' काराचा अशुद्ध लोपः—** (१) गृध्रद्विज अनुजातें करुनियांऽ**पांजलि**प्रदान, मनीं. ॥ (मंत्ररामा. किष्किधा.१२१) (२) 'असतो' स्तव **'अस्तो'.** रथहयचतुष्टय, जसें प्रेरित **अस्तो** कवि प्रतोदानें; ॥ (द्रोण. ४-९७) (३) 'असला' स्तव **'असिला'.**—खवळेचि पीडकावरि पन्नग भोगार्धशेष जरि **असिला** ॥ (कर्ण. ३६-३१) (४) 'उरवी' स्तव **'उर्वी'**—तरि कुरुपांडवयुद्धारंभसमय यश तिचें न तें **उर्वी** ॥ (कर्ण.८-३१-१५) (५) 'एकटका' स्तव **'येकटका'.** अतुलबल श्रीमारुति घेउनि औषध्यगासि **येकटका**; ॥ (मंत्ररामायण ६-५४७) (६) 'जुन्या' स्तव **'जुनिया'.** जो भावी अपकारा हृदयांत सदा नव्याचि राम **जुनिया** ॥ (आश्रम.२-९२) (७) 'जो' स्तव **'जा'.** मामाजीस म्हणसि, तें न म्हण, म्हण तयांसि आर्य **आजाबा** ॥ (आदि.३३-७२) (८) 'ज्या' स्तव **'जा'.** कीं त्या अयश नरावें, म्हणती उचितज्ञ देव वीरा **जा** ॥ (बालमंत्ररामा० बाल. २२) (९) 'ज्याला' स्तव **'जाला'.** शक्रहि रक्षूं न शके संहाराया सजे न मी **जाला** ॥ (कर्ण. १४-४०) (१०) **'झ' स्तव 'ज'.** 'तुझी' स्तव **'तुजी'** (केका १०७), (११) आजा धर्म गमेलचि जो त्यासि पहा प्रताप हा **माजा** ॥ [ऐषिक. ३-१४] (१२) न करावा शोक तुम्हीं अवलोकुनि हे असी दशा **माजी** (गदा. १९-२३) (१३) 'झाली' स्तव **'जाहली.'** 'कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य **जाहली** आहे ॥ (कृष्णवि० ८६ २) (१४) 'झाले' स्तव **'जाहले'** केका ८२ (कर्ण. २८-५८) (१५) **'ठ' स्तव 'ट'.** केली हे मर्यादा, जे आतां चालती जगीं **मोटी.** (आदि. १८-४८) (१६) **'ड' स्तव 'ढ'.** गांधारी त्यासि म्हणे हूं म्हण वा वासवप्रभा **वढिला.** ॥ (आश्रम. ६-४८) (१७) 'ती' स्तव **'ते'.** पाहे शिळा बिळाच्या वदनीं, फोडी भुजाबळें पर **ते** ॥ (मंत्ररामा० किष्किधा ३७) (१८) 'तीनदा' स्तव **'तिंदा'**—प्रिय पार्थ मी न देतां परिभव **तिंदा** कशास हा याला. ॥ (द्रोण. १५;९१) (१९) तुझ्यास्तव **'तुझिया'**—केका ४१. (२०) 'तुमच्या' स्तव **'तुमचिया'**-केका १८. (२१) 'त्वां' स्तव **'तां'**—केका ९१ पृ० २२५. (२२) 'त्वां' स्तव **'तुवां'**—केका ९०. (२३) 'दा' स्तव **'धा'**—ते केले दुर्विधिहतमतिशशकांनीं हरी **परागंधा** (आदि. २९-१८) (२४ 'दूर गे' स्तव **'दुर्गे'**—त्वत्पदभजनीं बहुसुख, म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला **दुर्गे** ॥ (भीष्म. १.४४) तसेंच 'दुर्गास्तव' १४ पहा. (२५) 'न्हाला' स्तव **'नहाला'**—शरणागतासि सांग, श्रेय क्षीरें सदा **नहाला** जो ॥ (मौसल २-७९) (२६) 'दोघे' स्तव **दोघ**—भिन्ना मूर्तीच त्यांच्या नमन निवसती यापरी **दोघ** बंधू ॥ (कुश. अ० ५-३५) (२७) 'परतावें' स्तव **'पर्तावें'**—पडतां गिरिशिखरच्युतबृहदुपलें कीं खलें न **पर्तावें** ॥ (कर्ण. २८-६) (२८) **'पादुका'** स्तव **'पादु'.** स्वामीच्या श्रीपादू पीठीं स्थापूनि चालवी कार्य (दिव्य-रामा. १५) (२९) 'प्याला' स्तव **'पियाला-'** प्या स्वजनार्थ क्रोधा जेंवि विषा विश्वनायक **पियाला.** ॥ (उद्योग. १२.७८) (३०) 'बहिरी' स्तव **'भेरी**—वाजति, तेव्हां

झाली केवळ ते राक्षसीचमू **भेरी** ॥ (मंत्ररामा. युद्ध. ६२१) (३१) 'बहिरी' स्तव **'भैरी'**– भेरीप्रभृत्यखिलवाद्यरवनें करुनि **भैरी**च होय जगती ॥ (कुश० १३-८८) (३२) 'भ्याले' स्तव **'भेले'** विभ्रम झाला रावण, पाहुनि रक्षःक्षया सचिव **भेले.** ॥ (प्रयागरामायण ९३) (३३) 'मर्दीन' स्तव **'मरदीन'**—कीं तो पामर दीन स्वबळेंचि म्हणे, त्रिलोकपा **मरदीन** ॥ (कृष्णवि. ३९-२७) (३४) 'मातें' स्तव **'मतें'**—हा मकरालय दुस्तर याहुनिही जानकी-वियोग **मतें** ॥ (मंत्ररामा. युद्ध. १८) (कुश. ४-४२ पहा.) (३५) 'मानी' स्तव 'मनी'.– शोकाकुळ होउनि, तो स्वदशा तेंव्हां सुखप्रदा न **मनी** ॥ (मंत्ररामा. किष्किंधा. १२१) वरील दोन रूपें 'अपि माषं मषं कुर्यात् छंदोभंगं न कारयेत् ।' या नियमाप्रमाणें योग्य आहेत. (३६) 'मामातें' स्तव **'माम्यातें'**—कथुनि तसें व्हावें कां नृप पळवी मूर्छिता **स्वमाम्यातें** (कर्ण. ४४-८) **'मामातें'** हें शुद्ध रूप (गदा. ३-५) यांत दिलें आहे. अनुसरलासि, अव्हेरुनि त्याला, तूं परम मत्त **मामातें.** ॥ (३७) 'वणव्यांत' स्तव **'वणवयांत'**–स्वापस्मरणांत मला ताप जसा कुंजरा **वणवयांत** (आश्रम. १-४४) (३८) 'शकून' स्तव **'सकून'**—त्या नंदीश्वर शापी, प्रभुसामर्थ्यें वधासहि**सकून** (बालमंत्ररामा. उत्तर. ५) (३९) 'ष' स्तव **'ख'**– सखिया हंसति हंसविती ह्मणती वांछितवरा **उखा** लाहो ( हरिवंश ४१.४७ ) (४०) कोणी न क्षत्रिय या स्वमतें कल्पूनि **दोख** टाकु सवा ॥ (स्त्रीपर्व ३-११) (४१) हीरक वीरकरगनवटंकेंहि चिरे न, जेंवि **पाखाण** (विराट. ४-३२) (४२) ज्याहुनि अन्य प्रियतर नरलोकीं नच मना **पुरुख** गमला ॥ (ऐषिक. १-६१) (४३) 'सविल्यास' स्तव **'सवितयास'** (आश्रम. १-३१) (४४) 'स्कंद' स्तव **'स्कंध'** गरुडस्कंधीं मधुरिपु जेंवि मयूरद्विजावरी **स्कंध** ॥ (मंत्ररामा. युद्ध. २९) (४४) 'हिंवसा' स्तव **'हिंसा'**—कीं व्हावा बहु दुःसह जठरानलताप भलतसा **हिंसा** ॥ (कर्ण० ४१-४९) (४६) ही' स्तव **'हे'—हे** मानसचारांची वाङ्मुक्तांची सदैव रसिका कीं ॥ (मंत्ररामा. युद्ध. ७. ५३) (४७) 'होउनि' स्तव **'होनि'** आर्यसुता ! स्वर्गातें गेलाशि, कसा न **होनि** कृतकार्य. ॥ (मंत्ररामा. ६-३५२) (४८) 'नातवातें' स्तव **'नातुवातें'** त्यजितां ह्मणविल बाई ! विरह तुझा कां न **नातुवातें** 'हा' ! ॥ (महाप्र० १-५) (९) 'चिखल' स्तव **'चिखोल'** हा शोणितमांसाचा झाला सर्वत्र दुर्गम चिखोल ॥ (कर्ण. १२-२५) ५० 'किती' स्तव **'कित्ती'** (त्रुटित रामायण, बाल. ९) (५१) 'हेका' स्तव **'हिका'** (मंजुरामायण ५८)

**(८) ऱ्हस्वास्तव दीर्घ**—(१) 'उचलायाला' स्तव **'ऊचलायाला'** हें रूप मंत्र-रामायण उत्तरकांड ११८ यांत आढळतें. **ऊचलणार** (साररामायण, बालकांडसर्ग ५,६) **'उचलिला'** (केका ४३ पहा.) (२) 'उदंड' स्तव **'ऊदंड'**—आखंडलविष्णूसे, गमती देतां प्रहर्ष **ऊदंड** (मंत्ररामा. ४-१६) (३) 'उठुनि' स्तव **'ऊठुनि**—धर्म प्रसन्नचित्तें **ऊठुनि** भेटे प्रभूसि कर जोडी ॥ (कर्ण. ४३ २२) 'उपडावया' स्तव **'ऊपडावया'** (साररामा. बाल-सर्ग ५-१) (४) 'कवि' स्तव **'कवी'**—अतिमात्र दोष ऐसें न वदोत **कवी** समस्तगुण-पात्र (मंत्ररामा. उपक्रम) (५) **तीच्या**—मंत्ररामा. (६-६०९) (६) **तूझी**—(कुशलवो. १३-४०) (७) **तूझे**—(कर्ण. ४३-७९.) (८) **तूजवरि**—केका ९२ (९) **दीसती, दीसतां**—केका ७७, ९१. (१०) **दूसरा**—मंत्ररामा. ६.२४९. (११) **पूरवूं**—केका

४८ (१२) घेउनि, देउनि अधरामृत, भोगी रत्न वासर**मणी** तें. ॥ (आदि. १६, १४). (१३) जें पाप ताप वारी **वारी** विश्वेश्वरासही तपीं ॥ (भीष्मभक्ति) २. (१४) नागपुरीं भगिनीचें **शकुनी** पूजूनि भूरिदान करी ( आदि. १४, ९२) (१५) **हानी**—आदि २४, ३२. (१६) **तूकडे** (कुशलवो. १३, ५६) (१७) जननी जनकपदातें नित्य नमस्कारिती **प्रभू**तनय. ॥ (कृष्णवि. अ. १८) (१८) **'प्रायशः'स्तव-'प्रायशा'** (केका २६) (१९-२१) **देवर्षी ब्रह्मर्षी, राजर्षी,** तेथ तेधवां आले. ॥ (भीष्मभक्ति. ३६) (२२) **'सवती'** स्तव **'सौती'**. श्रुतिगंगासुरभींच्या त्या त्या सुगुणें-करूनि ज्या **सौती.** ॥ ( आदि. १.२२) (२३ ) 'हरि'स्तव **हरी.** तोंवरि मदग्रभागीं हा गीतामृतनिधी **हरी** राहो. ॥ (भीष्मभक्ति. ८४)

(९) **दीर्घास्तव ऱ्हस्वः**-(१) धर्ममतिला प्रजा तसि आवडते जेंवि **आइला** दुहिता ॥ (आश्रम. २-८३) (२) तो धृतराष्ट्र प्रमुख स्वगुरूंतें नमुनि जाय **आजि**कडे ॥ (अश्वमेध. ६-३३) (३) यज्ञजननीच्या होउनि दुग्धधिनें लोल वानिलें **कुशिला** (द्रोणपर्व) ('कुशीला' हें शुद्ध रूप कृष्णविजय प्रद्युम्नाख्यानांत आढळतें.) (४) ऐसें पुसतां मारुति सांगे **तिस** वृत्त सर्वेही याचें. ॥ (मंत्ररामायण—सुंदरकांड ६५) (५) 'तीराला' बद्दल **'तिराला'** हें रूप मंत्ररामायण प्राकृत ७।१७५ यांत आढळतें. (६) 'तूं' बद्दल **'तुं'** हें ऱ्हस्व रूप त्रुटित रामायण अरण्य १२, व मंत्ररामायण प्राकृत ६।७३८ यांत आढळतें. (७) 'भाऊ' बद्दल 'भाउ'–धर्माच्या समरमखीं चोरातें करुनि न हुत **भाउ** निघे. ॥ ( मौसल. ५५. ) (८) गंगेमाजि उलूपी तापोनि उडी, जसी **मगरि** घाली ॥ (महाप्रस्थानिक १-२०) (९) दाखविती तोक **रिती,** पूजुनि गुरुसा कृतार्थ बहु तो करिती ॥ (कृष्णविजय) 'रीति' हें शुद्ध रूप भीष्मभक्तिभाग्य व उद्योगपर्व यांत आढळतें-**रीति** दहांची हे कीं पहिले समजाविती ल्हानातें— (उद्योग) कैंची इतर जनीं ती जी दावी ज्ञानराशि शुक **रीति** ? ( भीष्मभक्ति ) (१०) भ्रमतम रजकण वेची, **वाणि** न करि सत्प्रियतम रजकणवेची ( कृष्णविजय पूर्वार्ध ) (**'वाणी'** हें शुद्ध रूप मदालसाख्यानांत आढळतें).

(१०) **वर्तमानकाळवाचक धातुसाधितानेंच पूर्णवर्तमानाचा अर्थ साधिला आहेः**—

(१) अत्यभ्यासें जातों, तिळहि न चळतो मुखांत पाणि तमीं, । होईन शब्दवेधी तिमिरांतहि हें मनांत **आणित** मी. ॥ (आदि. २४, १४).

(११) **समास असून संधि न केल्याचीं उदाहरणें**—(१) तीणें दासी मोहा कुळविरही अध**रअ**मृत पाजी शमोहा ॥ (कृष्णविजय पूर्वार्ध). बहु मानावें तोकें **केलें आंगउपायन** तातें. ॥ (ध्रुवचरित्र ३२) (३) ओक**आ**त्मधनस्त्रीतें । ओक मानूनि मानसें ॥ (कुशलवो० ४) (४) अंध**जअं**धकहर हो तूं पुण्यश्लोक नीच कलि हा वा ॥ (गदा १,१०६) (५) नकुलशरगण गमे घन झांकाया **कर्णअर्य**मा वळला. ॥ (कर्ण. १४, ५७) (६) **कृपाअरुणा**—आर्याकेका (७) गुल्मद्रुमवल्ली**गणअं**तर्हित (मंत्ररामा. ४, ५५) (८) कंठीं मौक्तिकहार **चंदनउटी** अंगीं घनश्यामला ॥ (कुश. ४, ४१) (९) दुरितक-

रअसुरभर (१०) धनुष्यअब्द ( विराट. ६.१० ) (११) अस्मद्वधार्थ धृतअसि या करवीं काळही न टाकविता ॥ (विराट. ६,४२) (१२) ब्रह्म स्वपरमआत्मा ऐसें म्हणती सदा परतरा ज्या ॥ (अनुशा. ३, ३८) (१३) हर्षकरचि होती जरि पडती बहु पशुइलाप परि सव ते (स्त्री. ५, ४९) (१४) भटआमलक विखुरले होय तयांची मुखप्रभा मळकी, ॥ (कर्ण. ३९, ३०) (१५) मातृदृगाब्जअर्क (कुश. १०) (१६) दुःशासना तसा तूं पुनरपि गौर्गौः स्वआननें ह्मण गा. ॥ ( कर्ण. ४५, २३ ) (१७) लव लवकरिच स्वआश्रमातें । तव सुत आणिल; तूं त्यज श्रमातें. ॥ (कुश. ८, २२) (१८) तो येउनि राह्वावें, स्वउरीं प्रभुपादपंकजें कवळी. ॥ (कर्ण. २२, १३) (१९) स्वआयु (आश्रम. २, ६०) (२०) 'तेजओका' (कर्ण. ३२,९) (२१) निजओक (मंत्रभाग. १०-४०७) ( २२ ) विरहीखिन्नअनादिप्रभुदयितेतें ( दशमस्तोत्ररामायण ३६ ) ( २३ ) सत्व-उडुप (द्रोण. २२ २०)

**(१२) समास नसून संधि केल्याचीं उदाहरणें:—**(१) **कुरवाळी** (कुरव अळी) [द्रोणपर्व १५, ८०] (२) रण जनविस्मयकारक दारकयुग्मासवें असें रामें । केलें खरतर शरवरधरकरपद्मे **गुणांचियारामें** (=गुणांचिया आरामे) [कुशलवोपाख्यान] (३) असाधु अथवा साधु **परंत्वत्याज्य** (=परंतु अत्याज्य) लेंकरूं ॥ [कुशल० ४; ५२] (४) मातर्नमस्ने **क्षमस्वापराधी** (=क्षमस्व अपराधी) न [कुशलवो० ४, ३२] (५) होतां **वृथाग्निनें** तुज मृत्यु नृपा हा अनिष्ट मज वाटे. ॥ (आश्रमवासी ७, १५) (=वृथा अग्निनें). (६) **ग्रंथकृदजरामर** (=ग्रंथकृत्+अजरामर) (अनुशा. १,५५).

**(१३) षष्ठी विभक्ति व तिचा संबंधवाचक शब्द (दूरान्वय):—**मयूरकवीच्या काव्यांत षष्ठी विभक्ति एकीकडे व तिचा संबंधवाचक शब्द भलतीकडे असा प्रकार पुष्कळदां आढळतो. परंतु तो संबंधवाचक शब्द कवितेंत अशा खुबीनें ठेविलेला असतो कीं षष्ठी विभक्तीचा संबंध इतर शब्दांशी न लागतां त्याच दूरस्थ शब्दांशी लागावा. याचीं कांहीं उदाहरणें:—(१) ज्यांत **शुकाच्या** केलें प्रकट कथुनि धर्मराजयश **तातें** ॥ (स्वर्गारोहण २, ३०) (२) दिधलें **सत्यवतीच्या** पुण्य, यश, अनंतशर्म **दायादें** ॥ (स्वर्गारोहण २, ३१) (३) **प्रभुचा** मर्मी हाणी सर्वांसहि तीन तीन शर **भाचा.** ॥ (द्रोणपर्व) (४) **ज्याचा** शास्त्रीं शस्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् **समज** ॥ (द्रोणपर्व) (५) **चैत्राचिया** प्रतीक्षा करि दीक्षा द्यावयासि **पुनिवेची** (अश्वमेध. ४, ९९) (६) रे उत्तरा ! **शकुनिचा** या व्यूहांत न दिसे मला **भाचा.** ॥ (विराटपर्व) (७) **आर्ताच्या** कां देइल धर्मज्ञ न हाक विप्र **सादास ?** (अश्वमेध. ७,३६).

**(१४) दूरान्वय (इतर):—**(१) गतगौरव दशरथनृप 'हाय !' ह्मणे, तळमळे, रथीं **तनया** । बसवी कथुनि सुमंत्रा **सस्त्रीका,** दोष लाविती जन या. ॥ (ऋषिरामायण १९)

**(१५) चमत्कारिक अन्वयः-** मोल नव्हे चिंतामणिकोटि रजांचेंहि ज्याचिया पाय (मंत्रभागवत १०-५७) । (अन्वयः-) चिंतामणिकोटि ज्याचिया पायरजांचेंहि मोल नव्हे).

**(१६) अशुद्ध संस्कृतरूपें**:—(१) **'अनुष्ठातुं'** बद्दल **'अनुष्ठितुं'** (आदि. ३१-२७) (२) **'पूते'** बद्दल **'पुनीते'**–तीस ह्मणे द्रुहिण 'अये देवि ! त्रैलोक्यसुंदरि ! **पुनीते** ! ॥ (आदि. ३८. १३)

**(१७) समानार्थक एकाक्षरी अंत्य यमकें**:—वनपर्व अ० ४ गी० १०४,११९, १२१ यांत 'हा' व २८६ यांत 'ग' हे एकाक्षरी यमक समानार्थक आहे; बाकी या अक्षरांपूर्वी आणखी यमक साधिलेलें आहेच. जसें 'नळाला हो, गळाला हो; 'खरखरा गे', खरखरागे'; इत्यादि. (१७) पुढील श्लोकार्धात द्वितीय पुरुषाचें बहुवचन व एकवचन एकाच प्रसंगीं योजिलें आहे, तें प्रशस्त नाहीं:—ऐसें ऐकोनि बोले वरदगुरु, **अहो ! हे** महाराज धर्मा ! । **आरंभा** राजसूय क्रतु, उचित **तुला**, सत्य **तूं** पुण्यकर्मा; ॥ (कृष्णविजय७२.५)



# परिशिष्ट-ऐ.




## मोरोपंती काव्यांतील श्लेषांचा स्थलनिर्देश.

'The seeds of punning are in the minds of all men and though they may be subdued by reason, reflection and good sense they will be very apt to shoot up in the greatest genius that is not broken and cultivated by the rules of art. Imitation is natural to us and when it does not raise the mind to poetry, painting and music and other noble arts it often breaks out in puns and quibbles.' (*Addison—'Six papers on wit'*)

(भावार्थ) शब्दश्लेषाचें बीज हें सर्व मनुष्यांच्या मनांत असतें. विचार, तर्कपरिचय व समंजसपणा यांनीं जरी त्याची वाढ कमी करितां येते, तरी ललितकलानियमांचा संस्कार नसणाऱ्या व अत्यंत थोर बुद्धिमान पुरुषांच्या मनांतही शब्दावर श्लेष (कोट्या) करण्याची हौस साहजिकपणें उत्पन्न होते. अनुकरण करणें हें मनुष्यास साहजिक आहे. ह्मणून काव्य, चित्रकला, गायन व इतर दुसऱ्या श्रेष्ठ कलांचा अभ्यास नसणारीं मनुष्यें शब्दावर श्लेष अथवा कोट्या करण्यास वारंवार प्रवृत्त होतात. नाट्यकविकुलगुरु शेक्सपीयर, ॲरिस्टाटल यांसारख्या जगद्वंद्य माणसांच्या ग्रंथांतूनही शब्दावर कोट्या करण्याची चटक आढळून येते. ग्रॅहाम नांवाच्या प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकाराचा श्लेषासंबंधीं पुढील अभिप्राय फार वाचनीय आहे. तो ह्मणतोः—"Language has been like most other things subject to many and various abuses. Anagrams, chronograms, acrostics, &c. have each and all 'fretted their hour upon the stage and now are heard no more'. But the Pun seems likely to maintain its place both in conversation and in written composition. Let us not be misunderstood. It is not the practice, but the abuse of it that is to be condemned. We are strongly of opinion that there can be no greater pest to society than the inveterate and professional punster....But as we have endeavoured to show, the Pun when telling and well applied is as legitimate a form of wit as any other and quite as conducive to good feeling and good fellowship. (*Graham—A book about words*)." (भावार्थ) इतर बहुतेक वस्तूंप्रमाणें भाषेचाही पुष्कळ तऱ्हांनीं दुरुपयोग

केलेला आढळतो. शब्द साधून केलेली अनेकप्रकारची चित्रविचित्र बंधरचना ही पूर्वी कांहीं थोडा काळपर्यंत फार लोकप्रिय होती परंतु आतां तिचें नांवही ऐकूं येत नाहीं. परंतु शब्दावरील कोटी अथवा श्लेष हा प्रकार संभाषणांत अथवा लेखांत अजूनही आढळून येतो व पुढेंही तो आढळून येईल. श्लेषांचा बेताबेतानें उपयोग करणें हें निंद्य नसून त्यांचा दुरुपयोग करणें हें निंद्य आहे. उठल्या सुटल्या शब्दावर कोट्या करणारा मनुष्य समाजास अत्यंत त्रासदायक होतो. परंतु योग्य समयीं श्लेषाचा नेमका उपयोग करणें हें इतर विनोदी प्रकारांप्रमाणेंच योग्य असून त्यामुळें समाजांत परस्पर प्रेमभाव वाढण्यास साहाय्य होतें.

१ अंक ( १ चिन्ह, २ लांछन ) आदि. १७.२१
२ अचल ( १ पर्वत, २ निश्चळ ) मुक्ता. १०५ अनुशासन. ८.३१
३ अज ( १ दशरथपिता, २ ईश्वर ) मुक्तामाला.
४ अजभवप्रहित ( १ अजन्म्या शंकरानें पाठविलेला, २ अजकुलोत्पन्न रामानें पाठविलेला) मुक्तामाला ७९.
५ अतिरुक्ष (निर्दय, २ निर्जल) विनायकमाहात्म्य ९३.
६ अंधकारातें ( भंगश्लेष) (१ अंधकशत्रोशिवा !२अंधकाराला) हरिहरस्तव४
७ अधोगति (१ नरकवास, २ पातालगमन, ३ खालीं जाणें) कर्णपर्व,केका७५
८ अधःपतन (१ नरकपतन, २ खालीं जाणें,) अमृतमथन १-१०.
९ अनंग ( १ काम, २ अंगहीन) हरिवंश ३५-६६.
१० अनंत (१ शेष,२अंतनाहीं) मुक्ता.७९
११ अनल (१ अग्नि, २नलराजा नव्हे तो) वन.४-३३.
१२ अनामया(१नामदेव जवळ नाहीं अशाला २ निरामय देवाला) ज्ञानदेवस्तव.
१३ अपार्थ ( १ व्यर्थ, २ अर्जुन नव्हे तो) विराट. ६-४१.
१४ अंबर (१ वस्त्र, २ आकाश) कृष्णविजय २९-१.
१५ अमृत (१ मोक्ष, २ सुधा, ३ पाणी) केका ४१, अश्वमेध २-६६.
१६ अर्क ( १ रुईचा वृक्ष, २ सूर्य) कृष्णविजय ८९-५७.
१७ अर्जुन ( १ पार्थ, २ सहस्रार्जुन, ३ तृण) कृष्ण० ८९-५७.
१८ अर्थ (१ शब्दार्थ, २ द्रव्य) सन्मनोरथराजि १४.
१९ असती ( १ असभ्य, २ जारिणी ) कर्ण. २५-१७.
२० अस्तंगत (१ मृत २ मावळलेला) मुक्ता. ६४.
२१ आशुग(१ वेगवान्, २ बाण)मुक्ता.७९
२२ आत्मजाग्रह (१ कन्यारूप ग्रह, २ कन्येविषयीं आग्रह) केका ३३.
२३ आडवें येणें ( १ सत्कारार्थ सामोरें जाणें,२प्रतिरोध करणें) विराट. ५-६१
२४ आर्या (१ सती, २ कुलीन पुरुषाला, ३ आर्यावृत्त, ४ पार्वती)सभा.५-११५ भीष्मभक्तिभाग्य, स्वर्गा. २-५२.
२५ इला (१ पृथ्वी, हिला) गदा. १. ३५ द्रोण. ५, ३५.
इलाप हा–इला पहा (अश्व. ५.८३)
२६ उडुप(१चंद्र, २ लघु नौका)कर्ण.७.२२

२७ उत्तर ( १ अधिक चांगला, २ विराट-पुत्र) विराट. ६. ३३.

२८ उल्लसति (१ प्रकाशतोस २ उल्लास पावतोस) मुक्ता. ६४

२९ उलूक ( १ राजनाम, २ घुबड ) कर्ण. ३८-१२.

३० ओक (१ गृह. २ वांति) मंत्रभागवत १०. ४०७.

३१ कच (१ केश, २ बृहस्पतिपुत्र) आदि. ९-६३.

३२ कंठ भूषविणें (१ मालेनें व २ कीर्तिगानानें) कुश. २-३९.

३३ कनक ( १ धोत्रा, २ सुवर्ण) कृष्ण. ८३.८१; मंत्रभाग. १०.४१४.

३४ कर (हस्त, २किरण) आदि. १०-१३.

३५ करग्रहण ( १ विवाह, २ हस्तग्रहण) परंतुरामा. १४.

३६ करद ( १ हस्तदेणारा २ जकात देणारा ) आश्रम. ४-२५.

३७ कर्ण(१कान,२भारती वीर)कर्ण.६-२७

३८ कलंक (१ डाग, २पाप) गोपीगोडवा.

३९ कवि (१ कवनकर्ता.२ज्ञानी. ३ शुक्राचार्य) केका १२२, वामनचरित्र १९५ ('सुकवि').

४० कांत ( १ पति, २ सुंदर ) मंत्रभाग. १०. ४०६.

४१ काढणें (वेलपत्ती व पत्रावळी) केका७.

४२ कालि ( १ देवी, २ अग्निजिव्हा ) द्रोण. ११-९८.

४३ कीलाल (१ जल, २रक्त) मुक्ता. ९६.

४४ कु ( १ पृथ्वी, २वाईट ) स्त्री. ५-१४; विराट. ५-५५.

४५ कुटिल (१ वांकडा, २ कुरळे, ३ कपटी) सत्संगस्तव ५० आदि. ९-६३.

४६ कुपति (१ दुष्टपति २राजा) मुक्ता. १४.

४७ कुमुदाक्षी(१ कमलनेत्राक्षी;२कमलरूपी नेत्र जिचे अशी रात्र) कृष्णविजय २९.

४८ कुलज (१ पर्वतोत्पन्न, २ सत्कुलोत्पन्न) नाममाहा. २५.

४९ कुशलं स्वस्त्यस्तु (१ कल्याण असो, २ मरून मोक्षास जा) सभा. १-९५.

५० कृष्ण (१ काळा, २ वसुदेवसुत, ३ पार्थ, ४ व्यास) कृष्णवि० ६५-१०; कर्ण. ४४.३६; अश्वमेध० ६-८५; मंत्रभाग १०.३९८.

५१ कृष्णा ( १ द्रौपदी, २काळी ) विराट १,१२४. कृष्णाश्रिता ( १ द्रौपदीची आश्रिता, २ कृष्णदेवाची आश्रिता) विराट. १.११.

५२ कृष्णागुरुला (१ चंदनाला, २ कृष्णप्रभुला) भीष्मभक्ति. १९५

५३ कोटि ( १ धनुष्कोटि, २ शतलक्ष ) आदिपर्व.

५४ खरी (१ खरासुरभगिनी, २ गाढवी) केका ५५.

५५ खोली (१ गांभीर्य, २ दालन) अश्वमेध ४.५७.

५६ चक्रपाणि (१ हातांत चाक घेतलेला, २ कृष्ण) द्रोण. ३.१३२.

५७ चंद्रमुखी (१ चंद्ररूपमुखाची रात्र, २ सुहास्यवदनी) कृष्ण. २९. आ.गी.२

५८ खद्योत (१ काजवा, २सूर्य) वन.३,११.

५९ गणपति, गणेश ( १ श्रीगणेश, २ मोरोपंतांचे गुरु गणेशपंत) मंत्र रा० १. कुशलवो. १,१.

६० गति ( १ सुगति, मोक्ष, २ चालणें ) ('सुगतिप्रद') ज्ञानदेवस्तव ५; ('सुगति')वामनचरित्र १९४,हरिवंश २९.७

६१ गदांसवें (१ रोगांबरोबर, २ गदाशस्त्रांनीं) केका ४६ 'सगद,' 'अगद'

(१ रोगासहित, निरोगी, २ गदेसहित, गदेवांचून) उद्योग. ४,७३.

६२ गभीराशय ( १ खोल, २ गंभीर मनाचा ) नाममाहात्म्य २५.

६३ गुण ( १ दोरी, २ सद्गुण ) सभा. ५, १७, सन्मणिमाला ४.

६४ गुरु (१ बाप, २ उपदेष्टा सद्गुरु, ३ यजमान, ४ जड ५ बृहस्पति) केका १२२; कृष्णवि. ८८,५४; द्रोण. २२, १६. मुक्तामाला ८.

६५ गोत्रज (१ पर्वतोत्पन्न, २ कुलीन) नामма. २५.

६६ गौरी (१ गौरवर्ण, २ पार्वती) भीष्मभक्ति उपसंहार.

६७ घन (१ गंभीर, २ मेघ) वन. १२,८०.

६८ चमत्कृति (१ काव्यचमत्कार, २ वस्त्रे पुरविण्याचा चमत्कार) सभा.५.११५.

६९ छळ (१ कपट, २ दुःख) केका ७५.

७० जटिल (१ ज्वालायुक्त, २ जटायुक्त) कृष्णवि. ६६,३१.

७१ जड ( १ भारी, २ मूर्ख, ३ जल ) केका ४३; दत्तदयोदय ८४.

७२ जडधी (१ जडबुद्धि सागर २ जलाशय, सागर.) मुक्ता. ८७. कृष्ण. ५७.३८.

७३ जनक (१ पिता २ जनक राजा) कुश.

७४ जपे (१ जप करी २ रक्षी) मंत्ररामा. २१

७५ जय २ विजय (१ अर्जुन २ यश)

७६ जलधी ( जडधी ह्म. मूर्ख, २ सागर ) कृ. वि. ५७.३८.

७७ जीवन (१ प्राण, २ जल) साधुस्तव ६

७८ तप्त (१ तापलेलें, २ संतापलेलें (आदि. ३६,२५.

७९ तपला ( १ तापला, २ दुःख दिलें) कर्ण. १.१.

८० तम (१ अंधार, २ अज्ञान, ३ दुःख) विराटपर्व, कर्ण ४२,८.

८१ तरणी (१ नौका, २ सूर्य) कर्ण ७,२२

८२ ताप (१ उष्णता, २ दुःख) आदि. १७,२१.

प्रताप—(१ उष्णता, २ शौर्य) कर्ण. १.१.

८३ तीक्ष्णप्रकृति (१ तापट स्वभावाचा, २ तिखट धारेचा) कर्ण. ३.१३;

८४ तेजस्वी (१ पराक्रमी, २ तेजयुक्त कृष्ण ८१.९३.

८५ थोर ( १ उंच, २ थोर मनाचा ) नाममा. २५.

८६ दण्ड ( १ शासनदंड, २ काठी ) शांति. ३,८६.

८७ दक्षिणा (१ दक्षिण दिशा, २ दानद्रव्य) वन. ११,११८.

८८ दान (१ दानद्रव्य, २ गंडस्रावी मद) स्त्रीपर्व ५,९.

८९ द्विज (१ पक्षी, २ ब्राह्मण, ३ वैश्य, ४ दांत) कृष्णवि. ९०,२८; हनुमद्रामा. १२६.

९० द्विजराज ( १ चंद्र, २ ब्राह्मणश्रेष्ठ ) संशयरत्नमाला ३७.

९१ दुरुदित (१ दुष्टभाषण, २ अशुभ उदय) कर्ण. ४५.४३.

९२ दुर्दिन (१ वाईट दिवस, २ मेघाच्छादित दिवस) कृष्णस्तव. ६४.

९३ देवी ( १ राज्ञी, १ देवस्त्री ). भीष्मभक्ति उप०, कुशलवोपाख्यान.

९४ दोषाकर (१ चंद्र, २ दोषाची खाण) मुक्ता.

९५ धनंजय (१ अग्नि, २ अर्जुन) कर्ण ८, ३; कृष्णवि. ५८,३४.

९६ धर्म (१ युधिष्ठिर, २ धर्म, ३ यम-

धर्म) कर्णपर्व ४९,१६ कर्ण ४९,११.
९७ धर्मार्थ (१ धर्मराजाकरितां, २ दान-धर्मार्थ) द्रोण.
९८ धाम ( १ तेज, २ गृह )नामसुधा-चषक९१.
९९ ध्रुव ( १ उत्तानपादपुत्र, २ खरोखर ) केका ६५.
१०० नकुळ (१ माद्रीसुत, २ मुंगुस) कर्ण-पर्व १४,३६.
१०१ नंदन (१ पुत्र, २ स्वर्गवन, ३ आनंद देणारा) साधुरीति ५०, आदि. ३६, ५७; ('नंदनवनं व्रज'-मुक्तामाला)-
१०२ नर (१ अर्जुन, २मनुष्य) मुक्तामाला १ वन. १४,२९.
१०३ नरक (१ असुर, २ नरकस्थान) हरि-वंश २५.३८
१०४ नाग (१ सर्प, २ हत्ती) उद्योग. ४,६१; गदा. ३,२१.
१०५ नाम (१ अभिधान, २ अव्यय) मुक्ता. १९
१०६ निर्गुण (१ मूर्ख, २ ईश्वर) भीष्मपर्व १,६४.
१०७ नीरस (१ रसविहीन, रुक्ष, २ दयाहीन) आदि. ९,६३.
१०८ नृसिंह (१ नरश्रेष्ठ, २ अवतारी कृष्ण) कर्ण. ४०,१.
१०९ पंक (१ चिखल, २ पाप) आदि. १५,५४.
११० पडूनि गळां (१ आग्रहानें, २ गळ्यांत पडून) अनु. ५.३४.
१११ पतंग (१ सूर्य, २ किडा) कृष्णविजय ८१,९२.
११२ पत्री (१ पक्षी, २बाण) हरि.२९.१२.
११३ पतित (१ पडलेला, २ पापी) कृष्णवि. ६२,२३, केका ५, सौप्तिक १,४१.
११४ पद (पाऊल,२वाक्यांश) द्रोण.११.२८
११५ पय (१ दुग्ध, २ पाणी) स्फुटकाव्यें भागी.
११६ परपुरुष (१ अन्य पुरुष, २ ईश्वर) सन्मनोरथराजि. ४५.
११७ परस्व (१ दुसऱ्याचें द्रव्य, २ ईश्वराचें द्रव्य) केका ५७.
११८ पराभूति (१ पराभव, २ उत्कृष्ट ऐश्वर्य) गदा. ४,२१.
११९ पर्व ( १ पर्वणी, २ खंड ) अनुशासन-पर्व ७,१.
१२० पाणि (१ जल, २ तेज, ३ हस्त) मंत्रभाग. १०.४००; हरिवंश २५-३१
१२१ पादाधस्थ (१ पायाखालीं राहणारा, २ किरणाखालीं राहणारा) भक्तभूषण १०७.
१२२ पाय धरुनि (१ विनंतिपूर्वक, २ पाया-पर्यंत लोंबणारी) अनु. ५.३४.
१२३ पीतांबर (१ विष्णु, २ प्यालें आकाश ज्यानें) मुक्ता. ८०.
१२४ पुनर्भव (१ पुन्हा जन्मणारा, २ पुन्हा उगवणारे केस) (आदि. ९.६३)
१२५ पुराणपुरुष (१ ईश्वर, २ वृद्ध) संशय-रत्नमाला २३.
१२६ पुरारे (सभंग श्लेष) (१ त्रिपुरशत्रो शंकरा!, ३ पुरा-रे—पुरून टाका) हरिहरस्तव. ९.
१२७ पुरुष (१ जीव, २ मनुष्य) सावित्री-आख्यान अभंग.
१२८ पुष्पवती (१ पुष्पयुक्तलता, २ ऋतु-मती स्त्री) मंत्ररामा. यु. ७९१.
१२९ प्रजा (१ संतति २ लोक) सद्वृत्तरामा० १२०

१३० प्रत्यर्थी ( १ प्रत्येक याचक, २ शत्रु ) कुश. ४,७.

१३१ प्राकृत (१ साधारण मनुष्य, २ प्राकृत म्ह० मराठी भाषा) ज्ञानदेवस्तव ९.

१३२ बळी (१ शक्तिमान्, २ राजनाम) केका ७६.

१३३ भव्यप्रताप (१ प्रखर ऊन आहे ज्याचें, २ स्तोत्राई आहे शौर्य ज्याचें) कर्ण १,१.

१३४ भागवत (१ भाग करणारा, २ भगवद्भक्त) मंत्रभाग. १०, ४२८.

१३५ भीम (१ शिव, २ पृथापुत्र, ३ भयंकर) विराट. २,४९. वनपर्व ९,४५. ('भीमाकृति').

१३६ भुजग (१ भुजस्थ अलंकार, २ सर्प) वनपर्व ११,९८.

१३७ भुजंग (१ सर्प, २ जार) वनपर्व १२, ८८.

१३८ भूभृत (१ राजा, २ पर्वत) मुक्ता.

१३९ मंगल (१ शुभ, २ ग्रहविशेष) कृष्णविजय अ० २९.

१४० मत्स्य (१ मासा, २ मत्स्यदेशस्थ) विराट. २,३२. स्त्रीपर्व ४,६२.

१४१ मधुप (१ भ्रमर, २ दारूबाज) वनपर्व १२,८८.

१४२ मयूर (१ मोर, २ मोरोपंत) केका १२१,१२२, भीष्मभक्तिभाग्य.

१४३ मर्यादा (१ सद्वर्तन, २ सीमा) [अवलंघितमर्यादम्] मुक्ता. ९१.

१४४ मल (१ पाप, २ विष्ठा) केका ५८.

१४५ मलिन (१ मळकट, काळे; २ पापी) कृष्णवि. ६५,३४ ('मलिनवदन'=१ दुष्कर्मांनीं कृष्णवदन, २ काजळानें कृष्णवदन-कृष्णवि. ८१,९३).

१४६ मानस (१ मन, २ सरोवर) उद्योग. ११,१७; शल्य. १,६२.

१४७ मार्गण (१ बाण, २ भिक्षुक) कर्णपर्व ३०,५३; शल्य. २,१०८.

१४८ मित्र (१ सूर्य, २ स्नेही) अश्वमेध ३, ५९.

१४९ मुक्ता (१ मोतें, २ सोडलेली) तुलसीस्तव २२. मुक्ता. ४५.

१५० मुरारे (सभंग श्लेष)(१ मुरशत्रो विष्णो! २ मुरून जा) हरिहरस्तव गी० ९.

१५१ मूर्ति (१ प्रतिमा, २ देह) कर्ण. १,१४.

१५२ यादवा (सभंग श्लेष) (१ कृष्णा, २ या दवाग्निला). (हरिहरस्तव) गी० ५.

१५३ रस (१ जलरस, २ दुग्धरस, ३ शृंगारादि रस, ४ प्रेमरस) कृष्णवि. ६१,१. केका ५८, १०१; अनुशा. ५,७१.

१५४ रसिक (१ सारज्ञ, २ रसज्ञ) अश्व. १. ९२.

१५५ रंभा (१ केळ, २ अप्सरा) कुशलवोपाख्यान अ० ७.

१५६ राग (१ क्रोध, २ प्रेम) विराट ५,११; ५,२८.

१५७ रानट (१ अडाणी, २ रानांत राहणारा) केका १२२.

१५८ राम (१ मनोरम, २ श्रीराम, ३ रामाजीपंत पराडकर) केका १२२ विराट. ७,३७.

१५९ लघु (१ लहान, २ क्षुद्र) गोपीगोडवा.

१६० लागती (१ लागतात, २ झोंबतात) कर्ण. १९,२८.

१६१ वत्स (१ अर्भक, २ वांसरूं) केका ५८.

१६२ वन (१अरण्य, २ जल) वनपर्व ५,४१. केका ४८.

१६३ वर्ण (१ जाति, २ अक्षर) आदि १,२.

१६४ वर (१पति, २ श्रेष्ठ) मंत्रभाग. ११,६०.

१६५ वरासवें (१ वर द्यावयास लागल्या-बरोबर २ वररूपी मद्यानें) केका ६८.

१६६ वंश (१ वेळु, २ कुल) मुरलीपंचक ४; वनपर्व ९,२९.

१६७ वाहिनी ( १ नदी, २ सेना ) मुक्ता. ९४; कर्ण. २१,९.

१६८ विनत (१ नम्र, २ सखल) विराट. ६,११९.

१६९ विमद (१ गतगर्व, २ मदस्राव झालेले हत्ती) स्त्रीपर्व ५,९.

१७० विराट (१ नृपनाम, २ विराट्पुरुष ईश्वर) विराट. १,१४०.

१७१ वृष (१ कर्ण, २ इंद्र) कर्णपर्व ६,११.

१७२ शमलं (१ पाप,२ शम् अलं-सुख पुरे) मुक्ता. ३०.

१७३ शर (१ जल, २ बाण) विराट. ४, १२, कर्ण. २४, १६. मुक्ता. ९४.

१७४ शल्य (१ बाणाग्र, २ राजनाम) कर्ण-२१,३१.

१७५ शिखंडी (१ मोर, २ पांचाळ भीष्म-शत्रु) भारत.

१७६ शिव (१ कल्याण, २ शंकर) वन. १३,४६.

१७७ शिलीमुख (१ भ्रमर, २ बाण) कुशल-वो० ६,३४.

१७८ शुक (१ पोपट, २ शुकाचार्य) कृष्ण-स्तवराज १७, तुकारामस्तुति २७.

१७९ शुचि ( १ शुभ्र, २ पवित्र ) आदिपर्व १७,२१.('शुचिमूर्ति'सन्मणिमाला४).

१८० शुद्ध (१ पवित्र, २ श्वेत) हरिवंश ३३, ५५.

१८१ शुद्धोभयपक्ष (१ उभय पंख पांढरे, २ उभय कुळें पवित्र) कृष्णविजय९०,२८.

१८२ श्रवणोचित (१ ऐकण्यास योग्य, २कानांत घालण्यास योग्य) सन्मणिमाला४.

१८३ श्री (१ तेज, २ संपत्ति) मुक्ता. ६४.

१८४ श्रुतिमत (१ वेदमान्य, २ ऐकावयास योग्य) आदिपर्व १,२.

१८५ संचित (१ संचित कर्में; २ सांचवलेलें द्रव्य) केका १०५.

१८६ सत्याश्रित (१ सतीचा आश्रित, २ सत्याचा आश्रित) वनपर्व ४,१२२.

१८७ सदय ( साधूंचें भाग्य, २ सकृप ) मुक्ता. ३०.

१८८ सदाचरणप्रभवा ( १ सदाचारोत्पन्न, २ सत्–परमेश्वर, त्याच्या चरणापासून झालेली) विराट ६,३७.

१८९ सदंड (१ काठी हातांत घेतलेला, २ संन्यासी) केका ५४.

१९० समर्याद (१ मर्यादशील, २ मर्यादयुक्त सागर) नाममाहात्म्य २५.

१९१ सरंध्र (१ उणेपणा असलेला, २ छिद्र असलेला) सभापर्व ६,७९.

१९२ सरला (१ वांकडी नव्हे ती, सरल. २ निष्कपट) मुरलीपंचक ४.

१९३ सरस (१ नवरसयुक्त, २ जलपूर्ण) नाममाहात्म्य २५.

१९४ सरसः (१ जलयुक्त, २ सरोवराहून) मुक्ता. ३०.

१९५ सर्वमत (१शर्व ह्म. शंकरास मान्य, २ सर्वांस मान्य) मुक्ता. ८.

१९६ सर्वांगोपभोग (१ सकल अंगदेशाचा उपभोग, २ सकलां अवयवांचा उपभोग) स्त्रीपर्व ५,११.

१९७ सहस्रकर (१ सूर्य, २ हजार हातांचा) कर्ण. १,१. मुक्ता ९.

१९८ सक्षय (१ क्षय झालेला, २ कृष्णपक्षांत उणा होणारा) दत्तदयोदय ८४.

१९९ सीतार्त (१ सीतावियोगार्त, २ शीतपीडित) वनपर्व ११,१२०.

२०० सीताराम (सभंगश्लेष) (१ थंड बगीचा, २सीतायुक्त रामचंद्र) हरिहरस्तव गी.४.

२०१ सीमंतिनी (१ स्त्री, २ तन्नामक प्रसिद्ध पतिव्रता) गदा ८,२५.

२०२ सुदक्षिणपण (१ सुदक्षिणराजत्व, २ उत्तम चातुर्य) कृष्णविजय ६६,२४.

२०३ सुदर्शन (१ विष्णुचक्र, २ शुभदर्शन, ३ नामविशेष.) आदि. ११,८५; मंत्रभाग. १०,४१४.

२०४ सुधा (१ चुका, २ अमृत) केका ५१.

२०५ सुभग (१ भाग्यवान्, २ तेजस्वी) मुक्ता. ६४.

२०६ सुवर्ण (१ सोनें, २ उत्तम अक्षरें) नामसुधाचषक ४६,४७.

२०७ सुवास (१ सुगंध, २ उत्तमस्थान) हरि. २३,८९.

२०८ सुवृत्त (१ सदाचरणी, २ वाटोळें) सन्मणिमाला ४.

२०९ सूक्त (१ उत्तम वचन, २ केळीचें सोप) सन्मनोरथ. १८.

२१० सौवर्ण (१ उत्तम अक्षरांचा, २ उत्तम रंगाचा) वनपर्व ४,५६.

२११ संजीवनी (१ संजीवनी विद्या, २ चित्तास आल्हाद देणारी) मुक्ता. ८.

२१२ स्तनग (१ स्तनांवरील हार, २ स्तनावर लोळणारा) वनपर्व ११,९८.

२१३ स्नेह (१ तेल, २ लोभ) कृष्णविजय ८१,९३.

२१४ हरि (१ अश्व, २ इंद्र, ३ विष्णु, ४ सिह, ५ वानर, ६ हरण करी) के० ३६, १२१, कृष्णवि. ६६,११; कुशलवो. ७,३; कर्ण ११,५९; मुक्ता. ७९.

२१५ हरिरंभासंबंध ( १ इंद्ररंभासंबध, २ केळीचा व घोड्याचा संबंध ) कुशलवो. ७,३.

२१६ हि मठद्वारांतुनि (सभंगश्लेष) (१ देखिल मठद्वारांतून, २ हिमठ–पक्के, द्वारांतून) कृष्णविजय–सुभद्राख्यान.

२१७ हे वामना (सभंगश्लेष) (१ हे वामनरूपधारी विष्णो, २ हेवा मना) हरिहरस्तव गी० ७.

२१८ हंस (१ पक्षी, २ संन्यासी) आर्याकेका ५४.

२१९ क्षण (१ पळ, २ आनंद) ब्रह्मो. ४, ८.

२२० क्षमा (१ क्षमागुण, २ पृथ्वी) वनपर्व २,५६; स्त्रीपर्व ३, ६.

याशिवाय इतरही थोडे श्लेष कर्णपर्वात व पंताच्या भारतादि काव्यांत शोधकांस आढळतील. सभंगश्लेषाचीं उदाहरणें 'हरिहरप्रार्थना' या दशगीत्यात्मक संस्कृत प्रकरणांत सर्वत्र पसरलेलीं आहेत. नैषधीयचरितासारख्या संस्कृतकाव्यांत श्लेषांची कशी रेलचेल असते तें पाहिलें व चित्रकाव्यालाच उत्कृष्ट काव्य समजणाऱ्या काळांत पंतांनीं श्लेषयोजना अगदीं बेताबाताची व बहुतकरून अक्लिष्ट अशी केली आहे हें लक्ष्यांत आणलें ह्मणजे पंतांच्या सदभिरुचीचें फार अभिनंदन करावेंसें वाटतें. याला एकच उदाहरण ह्मणून श्रीहर्षकृत **नैषध**काव्यांतील पुढील श्लोक देतों. हा पंचनलवरणप्रसंगीं दमयंतीच्या सखीनें ह्मटलेला आहेः–'देवः पतिर्विदुषि नैषधराजगत्या निर्णीयते न किमु न व्रियते भवत्या। नायं नलः खलु तवातिमहानलाभो यद्येनमुज्झसि वरः कतरः परस्ते ॥ सर्ग (१३.३४).'

---

# परिशिष्ट–ओ.



## शब्दावर कोट्याः—

(१) तो '**क्षेम**'पूर्व'**धन्वा**' ज्याच्या सुयशें समस्त बुध धाला. ॥ (हरिवंश १,८८)
(२) **स्वैर** क्रीडावयाचा रतिनिजमतिचा '**दीर्घ**' पूर्व '**प्रसाद.**' ॥ (कृष्णविजय ५५,१३)
(३) गृहीं भेटला सर्वलोक प्रभू ती । सुसंपत्ति नोहे '**परा**' पूर्व'**भूती.**' ॥(कृष्ण.५६,२८)
(४) आह्मां द्यायासि केली असतचि, दिधली तेचि '**गो**'पूर्व '**विंदा.**' ॥ (कृष्ण. ५७, ५)
(५) न्यायें पावेल कैसा परिभव समरीं तो '**जरा**' पूर्व'**संध ?**' ॥ (कृष्ण. ७१, ३)
(६) '**सु**' दुजा '**व**' वर्ण आधीं, मग '**देव**' सुता जयाचिया नामीं. ॥(मंत्रभागवत२,७४)
(७) '**य**' विरामासि म्हणे प्रभु 'जा शर्म असो तुम्हांसि भी सोडा.' ॥ (मंत्रभाग.३,७७)
(८) '**यव**' '**अव**'पूर्व अपूर्व प्रेक्षीं पतिचेहि देवहूति सती. ॥ (मंत्रभाग. ३, ११०)
(९) '**भद्र**'पदपूर्व'**काळी**' देवी तीकारणें वृषलपतिनें ॥ (मंत्रभाग. ५, ४७)
(१०) **वामाद्यदेव** जाणे त्या अपरिज्ञेयवीर्यजलधीतें. ॥ (मंत्रभाग. ८, ९८)
(११) '**गर्त**' पुढें प्रथम '**अजी,**' ज्याच्या नामीं तयाकडे गेला. ॥ (मंत्रभा. ९,१०३)
(१२) **वामादिदेव** वेगा धरिल भगीरथ म्हणे अघहि गंगे. ॥ (मंत्रभाग. ९, १२८)
(१३) '**मोदन**' '**अनु**' पूर्वक त्या शापातें देवदेव दे वसुनी. ॥ (मंत्रभाग. ११, १३)
(१४) '**देवन**' '**परि**'पूर्व करुनि घातलिच उडी तयावरि कपोतें. ॥ (मंत्रभाग. ११,१७४)
(१५) अठरा सहस्र कथिले अतिसुखद '**ब्रह्म**' पूर्व '**वैवर्त**' ॥ (मंत्रभाग. १२, २१५)
(१६) गगनीं अगणित भरले द्याया '**उत्**' पूर्व '**सव**' सुरविमान. ॥ (हरिश्चंद्राख्यान)
(१७) '**सु**' प्रथम '**दर्शन**' तया मागें लागे मुनी पळे त्रासें. ॥ (अंबरीषाख्यान)
(१८) श्लोक प्रिय त्यास जया प्रसन्न तूं '**पुण्य**' पूर्वक '**श्लोक.**' ॥ (नामसुधाचषक ११३)

(१९) संतप्ता निववी घन, वन शृंगारी '**व**' कारवान् '**संत.**' ॥ (नामरसायन ६४)
(२०) कुळजविरोधें संतत **ताप**गुण मनीं **अपूर्वता** पावे. ॥ (आदि. ३६, ७८)
(२१) ऐसें ऐकुनि सोडी अहिपतिसा **भीमसेन** सुसकारा ।
बहुधा गुरुसंकोच त्रासी तन्नाभवर्ति सु '**स**' कारा. ॥ (सभा. ६, २३)
(२२) ते वृष्टि जसे न करिति तसि सुचि स '**श**'कार'**रावण**' समरसा.॥ (वन.१२.६६)
(२३) माता तात परततां बहु रडती परि रडे न '**सावित्री;**' ।
सुमृदु सुमंत्रीहि म्हणुनि त्यासि म्हणे नामगा नसावि '**त्री.**' ॥ (वन. १३, २९)
(२४) द्याया त्या दुष्टांच्या जणुं '**अंतः**' पूर्व '**पुर**'विलापाला ॥ (विराट १, १६२)
(२५) वाटे **सु** '**भटें**' पुत्र मेळविला विप्रसेवनी नव '**ट.**' ॥ (उद्योग. १०, ३२)
(२६) ब्रह्मा नामीं **दुसरा** योग्य, क्षत्रा न, जलजनाभा ! '**ट.**' ॥ (उद्योग. १०, ३३)
(२७) कुंती कर्णासि म्हणे वत्सा कौंतेय तूं न '**राधेय**' ।
राधे यथेष्ट म्हण परि कर्णा ! कर्णासि फार बाधे '**य.**' ॥ (उद्योग. ११, ९)
(२८) हे मात्र न ऐकवती सुखद मला '**मनुदु**' मिलित '**राधेय.**' ॥ (उद्योग. ११, १०)
(२९) लिहिति '**रतिस्तुति**' पूर्वी मात्रा देऊनि बा '**य**'**कारा** जा. ॥ (द्रोण. ५, ६९)
(३०) पुसतां कसे श्रुत असे आपणचि '**कृपा**'पुढें तरि म्हणा '**ण.**' ॥ (द्रोण. १५, २७)
(३१) जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत '**दंपती**'च **अ**'**प**'**कार.** ॥ (कर्ण. ४५, २)
(३२) '**शूर**' '**स**'**कार** '**श**'**कारीं** व्हाया दे द्विपदुरांत फटकारा ।
'**भट**' भीमेतर असता तरि तेव्हां रक्षिता न च '**ट**'**कारा.** ॥ (गदा. ३, १८)
(३३) होतें अंगीं '**भट**' पण त्याचा आला उमाप तिटकारा ।
त्यांतचि मला दुसरिया देता झाला उमापति '**ट**'कारा. ॥ (अनु. ६, ३२)
(३४) प्रथमचि सुगळ मथी त्या ज्याच्या नामांत '**या**'पुढें ये'**तूं**' ॥ (द्वितीयस्तोत्ररामायण५६)
(३५) '**श्री**'पूर्व'**वत्सवक्षा**' दशरथसुत होय दे जगा तोष. ॥ (सप्तमस्तोत्र रा. १)
(३६) **उत्पूर्वसव** जगा दे ब्रह्मसुख म्हणुनि जया म्हणति कवि 'क'. ॥ (अष्टमस्तोत्र रा.१३)
(३७) '**ण**' पुढें मागे '**रा**' ज्या तो राय कपीस भेटला वानी. ॥ (मात्रा रामा. २६)
(३८) '**राग**''**अनु**'पूर्व भगवद्दास्यीं बहु ज्यासि तो महासुकृती. ॥ (नामांक रामा. ९९)
(३९) '**रा**' मग '**ता**' आधीं, हें नाम जिचें, तीस घे, जग नयानें. ॥ (नामांक रामा. ११४)
(४०) '**भ**'व्या **रत्ना** '**त**'त्वा आधींचे तीन वर्ण तन्नाम. ॥ (दिव्य रामा. ४)
(४१) यन्नामीं आधि'**त्रि**' प्रांतीं '**टा**' ह्या '**ज**'कार त्यामध्यें. ॥ (दिव्य रामा. ८३)
(४२) **स्वाद्या मित्रा** तिचे दोघे । तज्जन्में धन्यत्वा तो घे. ॥ (सौम्य रामा. ४)
(४३) यन्नामीं '**लक्ष्मा**'चा अंतीं । '**ण**' प्रेमानें घ्यावा संतीं. ॥ (सौम्य रामा. ५)
(४४) आधीं **भ** या वर्णापुढें **रत** स्थापी असें. ॥ (सूरा रामा.)
(४५) यदीय नाम युग्मवर्ण '**पं**' अणीक '**पा**' असे. ॥ (पंचचामर रामा. २३)
(४६) सुत ज्येष्ठ जो तो घनश्याम राम; द्वितीया '**भरा**'न्ती'**त**' हें रम्य नाम.॥२(सुरामायण)
(४७) तदनुजनि '**बिभी**' हे ज्याचिया वर्ण नामीं ।
**मग** '**षण,**' **न** कराया सुज्ञ तद्वर्णना मी; ॥ (रामायणपीयूष. ५५)

(४८) भली **'त्रि'**युक् **'जटा'**भिधा निशाचरी परोपरी । (पंचचामर रामा. ३९)
(४९) 'व्या**ळ**,' 'दान**व**,' **'बाण'** या पदत्रयांत अक्षरें, ।
तीन शेवटील तेंचि नाम सेविलें खरें. ॥ (पंचचामर रामा. ८५)
(५०) **'चित्र'** पदोत्तर **'कूट'** नगा प्रभु जाय; नरोत्तमही विलयातें. (सवाई रा. १०)
(५१) **'मां'** पहिला मग **'धा'** मग **'ता'** तिन वर्ण असे गुरु ज्या नृपनामीं. ॥
(सवाई रामायण ११७)
(५२) **'राज'** पदोत्तम **'सूय'** असें अभिधान जयास, तयास कराया (सवाई रा. १२२)
(५३) **'पं'** असा प्रथम वर्ण **'पा'** मग (गदघ्नरामायण ५८).
(५४) ती **'त्रि'** वर्णसहिता **'जटा'** बरी, तो सुपार्श्व, वर दे तयां हरी. ॥ (गदघ्न० १४४)
(५५) ज्या **'भ'** आधीं **'र'** मध्यें **'त'** अंतीं असे. ॥ (स्रग्विणी रामायण २)
(५६) **'नंदि'** संज्ञा धुर **'ग्राम'** तेथें वसे ॥ (स्रग्विणी रामायण २१)

तसेंच **'जटा'** जी **'त्रि'** पूर्वा (१३) **'भादि'** ते **'कैट'**, (कन्यारत्नरामायण), **'म'** नामा ज्याच्या ये मग**'श'**पहिला (श्रीरामायण २५), **'भुला'** आधीं **'शं'** ज्या (श्रीरामायण ३२), **'पर्ण'** पूर्वा **'कुटी'** (स्रग्विणी रा॰ २२), **'त्रि'** पूर्वा **'जटा'** (स्रग्विणी. ६४), वर्ण वाहे **'बिभी'** यापुढें जों **'षण'** (स्रग्विणी रा. ६९), **'चित्र'** असें जो पद धरिशि वरी **'कूट'** दुजे सुजन महित नामीं (तन्वी रामा. ८) **'असूया'** नसे जीस ती (अनसूया)(दण्डक रामायण, अयोध्या. १३), **'कवच'** मग **'निवात'** आधीं असें नाम ज्यांचें (दण्डक रा. उत्तर.१४) **'त्रि'** पूर्वा **'जटा'** (मंजु रामायण ४१)



# परिशिष्ट–औ.



## चित्रकाव्य.

### (अ) रामायणेंः—

'Moropant's Ramayans with their fantastic principles of arrangement are a curiosity in literature.' (Report on native publications 1867 by Rao Bahadur M. G. Ranade.)

'मोरोपंतांनीं रचिलेलीं तऱ्हेतऱ्हेचीं रामायणें हीं महाराष्ट्र ग्रंथसंग्रहांतील एक चमत्कारिक व अपूर्व चीज होय.' (१८६७ पर्यंत छापलेल्या मराठी ग्रंथावरील रावबहादुर रानड्यांचा रिपोर्ट). 'मोरोपंतानें एकशेंआठ रामायणें रचिलीं ह्याबद्दल मोरोपंताची वाटेल तितकी टवाळी करा; तथापि प्रचंड रामकथेंत निरनिराळे व्यूह रचून त्या व्यूहांतून एकशेंआठ वेळां वाट काढण्याची हिंमत त्यांचे अंगीं होती ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे.' (प्रभात जुलै १९१५–'मराठी काव्याची प्रभात', अ. ब. कोल्हटकरांचा लेख) 'पंतांनीं चित्रकाव्यें खरडण्यांत व्यर्थ वेळ दवडिला असा फलशून्य वाद आतां माजविण्यापेक्षां पंतांनीं चित्रकाव्यें किती सफाईनें रचिलीं आहेत, चित्रकाव्यांतूनहि रसालंकार साधण्याकडे कसें लक्ष पुरविलें आहे, व एकंदरीनें आपली सन्नामोच्चारणलालसा पुरविण्याकरितां आदरिलेल्या चित्रकाव्यांतूनहि मूळ वर्ण्य विषयाचा धागा कसा तुटूं दिलेला नाहीं याच दृष्टीनें वाचकांनीं अष्टोत्तरशत रामायणांकडे पहावें असें आह्मी पुनः पुनः ह्मणतों.…एकशेंआठ रामायणांचा दीर्घ प्रवास संपवून आलेला

प्रवासी साधारणपणें दमलाभागलेला न दिसतां चांगला तरतरीत व हुशारच दिसेल, आणि मार्गांत बरेच दूरान्वयादि खांचखळगे लागले असले तरी वरचेवर लागणाऱ्या रसादि मनोरम जलाशयांच्या, उपमालंकारादि पुष्पवाटिकांच्या व उपवनांच्या सुखानुभवापुढें त्याला त्या खांचखळग्यांचें व ठेंचांचें विस्मरण होईल अशी आह्मांस आशा वाटते.' …'मराठी भाषेच्या अभिमानी कवींनें रचिलेल्या एकशें आठ रामायणांचा कांहींच उपयोग होणार नाहीं काय ? संस्कृत वाङ्मय हा अगाध महोदधि असून त्यामध्यें हजारों वर्षांपासून हजारों पंडितांनी मनसोक्त क्रीडा केली आहे. संस्कृत वाङ्मयांत भाषेची जितकी कसरत केलेली दिसून येते, तितकी अन्यत्र दिसून येणार नाहीं, व आमच्या मतें हीच उणीव भरून काढण्याचें धोरण अष्टोत्तरशत रामायणें रचतांना पंतानीं ठेविलें होतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. चित्र काव्यें हीं बहुधा कृत्रिम व म्हणूनच रसालंकारहीन असल्यामुळें अधमकाव्यांत गणतात. साहित्यशास्त्रकारांचें हें मत गैरवाजवी आहे असें तर केव्हांही म्हणतां येणार नाहीं; तथापि साहित्यशास्त्रकारांच्या ह्या नियमाला अपवादक अशींहि चित्रकाव्यें असूं शकतात असें आढळण्यांत येतें. शिवाय अशा काव्यांचाहि एका दृष्टीनें काहीं उपयोग असतो. कोणतेंही कथानक एक अथवा अनेक विशिष्ट बंधनांखाली व्यवस्थित रीतीनें कथन करून दाखविण्यानें भाषेची कमावणी होते, शब्दसंग्रह व कल्पनासंग्रह यांची वाढ होते, व एकंदरीनें कवीच्या काव्यविरचनाशक्तीचीहि बरीच कसोटी लागते. अशा कसोटीस पंतांचीं अष्टोत्तर शत रामायणें कितपत उतरतात याच दृष्टीनें आम्ही त्यांच्याकडे पाहतों'…चित्रकाव्य अधमकाव्यांत लेखावें हें टीकाकारांनाच कळतें, आणि स्वतः कवीला कळत नाहीं असें म्हणावयाचें काय ? विशेषतः साहित्यशास्त्रनिष्णात असलेल्या पंतासारख्या महाकवीला चित्रकाव्यांसंबंधींचें हें मत अपरिचित होतें असें तर मुळींच ह्मणतां येणार नाहीं. पंतांनीं मराठींत जशीं चित्रकाव्यें रचिलीं तशीं संस्कृतांत रचणारे महाकवीहि आहेत. मग प्रश्न असा उद्भवतो कीं, उत्तम रचना करितां येत असूनहि जाणून बुजून अधम रचना करण्याचा खटाटोप या संस्कृत वा प्राकृत कवींनीं कां करावा ? याचें उत्तर असें कीं, निसर्गतः निरोगी प्रकृति असलेल्या मनुष्यालाच तालमींत जाऊन आपलें शरीर अधिक घटविण्याची लहर येणें जसें स्वाभाविक, तसेंच उत्तम काव्यरचना करितां येत असतांहि चित्रकाव्यांसारखीं अधम काव्यें रचून आपल्या बुद्धिला चार वळसे देण्याची कोणाहि कवीस लहर येणें स्वाभाविक आहे. सुप्रसिद्ध लक्ष्मीसहस्राच्या कर्त्यालाहि अशी लहर येऊन त्यानें चित्र काव्याचा ह्मणून एक स्वतंत्र स्तबक रचिला आहे. पंताच्या बाबतींत तर त्यांना कांहीं तरी चित्रकाव्यें रचण्याची लहर आली होती असेंहि म्हणतां येत नाहीं. नाहीं म्हणावयाला केवळ चित्रकाव्य रचण्याचा हेतु त्यांच्या 'अम्लानपंकजमाला' या संस्कृत स्तोत्रांत प्राधान्येंकरून व्यक्त होतो. तसा, लक्षणानें चित्रकाव्यांच्या सदरांत पडणाऱ्या त्यांच्या मंत्रबद्ध व नामबद्ध रामायणांत दिसून येत नाहीं. हीं रामायणें लक्षणानें चित्रकाव्यें असलीं तरी तीं चित्रकाव्यें ह्मणून पंतानीं रचिलीं नाहींत. हीं रामायणें रचतांना चित्रकाव्यांच्या बाबतींत येणाऱ्या लौकिकदोषापेक्षां पंतांनीं आपल्या भक्तिप्रधान अंतःकरणाला रुचणाऱ्या देवदेवता, तीर्थक्षेत्रें, संतमहंत यांच्या नामोच्चारण-

लालसेलाच अधिक महत्व दिलेलें दिसून येतें. याशिवाय या प्रश्नाला आणखी एक बाजू संभवते. ती अशी कीं, पंताच्या वेळीं सार्वत्रिक अभिरुचिच अशा काव्यांना अधिक प्रोत्साहक असावी. शब्दचमत्काराकडेच तत्कालीन जाणत्या लोकांचा विशेष ओढा असावा······पंतांनीं केली आहे तशी चित्रकाव्यरचना आवडणाराच पक्ष त्या वेळीं प्रबळ होता. तसा तो प्रबळ नसता व उलट पंतांच्या या चित्रकाव्याला नाकें मुरडणारा वर्ग जर निकट असता तर पंतांनीं आपलाच हेका चालविला असता असें आम्हांस वाटत नाहीं ? '( रा. नरसिंह चिं. केळकरकृत 'मोरोपंती रामायणांचा उपोद्घात )'

"Notwithstanding the wilderness of exaggeration and hyperbole through which the reader of the Indian Epics ( the Ramayana and the Mahabharata ) has occasionally to wander, there are in the whole range of the world's literature few more charming poems than the Ramayana. The classical purity, clearness and simplicity of its style, the exquisite touches of true poetic feeling, with which it abounds, its graphic descriptions of heroic incidents and nature's grandest scenes, the deep acquaintance it displays with the conflicting workings and most refined emotions of the human heart, all entitle it to rank among the most beautiful compositions that have appeared at any period or any country. It is like a spacious and delicious garden; here and there allowed to run wild, but teeming with fruits and flowers, watered by perennial streams, and even its most tangled thickets intersected with delightful pathways. The character of Rama is nobly portrayed. It is only too consistently unselfish to be human; a heroic, noble-minded, pious, and virtuous man, a model son, husband, brother,- whose bravery, unselfish generosity, filial obedience, tender attachment to his wife, fraternal affection, and freedom from all resentful feeling, we cannot help admiring...As to Sita, she is a paragon of wife-like virtues." ( '*Indian Wisdom*' *by Monier Williams* ).

१ **मात्रारामायण.** यांत 'अ'पासून 'ज्ञ'पर्यंत बहुतेक वर्ण गीतींच्या आरंभीं योजून रचना केली आहे. त्यांत 'अ':, 'ट', 'ण' व 'ज्ञ' हे वर्ण कसे खुबीनें योजिले आहेत ते पहाः—

अस्त्रे शस्त्रे प्रार्थिति, परि धैर्य धरी चरित्र वाढाया. ॥ १३ ॥
टपकरि मार्गे घेउनि गेली स्त्री त्या दशानना क्षुद्रा. ॥ २२ ॥
'ण' पुढें, मागें 'रा'ज्या, तो राय कपीस भेटला, वानी; ॥ २६ ॥
ज्ञहि अज्ञहि जन तारी नामें कामादि शत्रुही मारी ।
स्वयशें भवभय वारी, करि भक्तमयूरघन दया भारी. ॥ ४६ ॥

यांतील छापलेली 'औ' स्थानची गीति प्रक्षिप्त असून मूळ पंतरचित गीति वेगळी आहे.
प्रक्षिप्त गीतिः–औषध भवरोगाचें ज्याचें यश तो पुसे खगमृगांतें ।
कोठें प्राणसखी हे लीला तारावया करि जगातें. ॥ ११ ॥

या ठिकाणची मूळ पंतरचित गीति अशी आहेः–

औद्धत्यें लंकेंत श्रीतें रोधी कुधी अशोकवनीं. ।
स्त्रैणल प्रभु दावी बहु हाय म्हणे जरि प्रसन्न मनीं. ॥ १२ ॥

'या दोनच आर्यांची तुलना केली तरी पंतास त्यांचे व्याही बाबापाध्ये यांनीं स्वरचित **'रुक्मिणीपत्रिका'** या 'आर्यैकविंशती'च्या समाप्तिलेखांत मयूरकवीचा ज्या **'आर्याचार्य'** उपपदानें उल्लेख केला आहे त्याची सार्थकता प्रत्ययास येते.' ( रा. द. पराडकर–'मोरोपंत व त्यांची कविता,' लेखांक ५, केसरी )

**२ नामांक रामायण**–यांत पूर्वार्धाच्या आरंभीं 'रा' व उत्तरार्धाच्या आरंभीं 'म' याप्रमाणें प्रत्येक गीतींत रामनाम साधिलें आहे. यांतील पहिली गीति अशी आहे:–

**रा**जीवोद्भव विनवी विश्वाहितदशमुखासि माराया; ।
**म**धुकैटभारि दशरथसुत होय, त्रिभुवनासि ताराया. ॥ १ ॥

**३ मंत्रमय रामायण**–यांत प्रत्येक गीतींत पंताचा अत्यंत आवडता असा **श्रीराम-जयराम जयजयराम** हा मंत्र साधिला आहे. याचीं दोन उदाहरणें:–(सीतास्वयंवर-प्रसंगाचें वर्णन)

**श्री**गलशरासन **म**थुनि, **जय** करुनि, ध**राम**नोव्यथा हरिली; ।
**ज**नक**यज**ना**य**तनजा, **रा**जसभा**म**द हरूनियां, वरिली. ॥ ५ ॥

( रामराज्याचें वर्णन )

**श्री**दचि पु**राम**धिल **ज**न, सुज्ञान सन**य** ख**रा** पर **म**हर्षी ।
**ज**लदोद**य** वन**ज**न**य**न, सर्व मयू**रा**परी पर**म** हर्षी. ॥ २४ ॥

४,५,३३,४०,४१,४२, या रामायणांत म्हणजे **बालमंत्ररामायण, प्राकृत मंत्ररामायण, मंत्रगर्भ साकीरामायण, मंत्रिरामायण** (अनुष्टुप्छंद), **सप्तमंत्ररामायण,** (अनुष्टुप्छंद), **संस्कृतमंत्ररामायण** यांत, तसेंच **७२ व्या रम्यरामायणां**त **श्रीराम जयराम जयजयराम** हा त्रयोदशाक्षरी मंत्र साधिला असून तो बालकांडांत प्रत्येक वृत्ताच्या पहिल्या चरणाच्या पहिल्या अक्षरांत, अयोध्याकांडांत दुसऱ्या अक्षरांत, अरण्यकांडांत तिसऱ्या अक्षरांत, याप्रमाणें क्रमानें शेवटच्या उत्तरकांडांत सातव्या अक्षरांत आला आहे. **६४,६५, त्रिःसप्तमंत्ररामायण,** व **सत्वरामायण** यांत प्रत्येक श्लोकांत सबंध त्रयोदशाक्षरी मंत्र आलेला आहे. याचीं उदाहरणें:—

( त्रिःसप्तमंत्ररामायणांतील )

**श्री**कंठादिसुरर्षिसंस्तुत ध**रा**देवा**म**राच्या हिता ।
**ज**न्मे **य**क्षव**रा**नुजप्र**म**थना सूर्यान्वयीं, रक्षिता ।
धर्माचा मनु**ज**, स्वयें **य**श **ज**गीं व्हाया, **भ**य ध्वंसिता,
झाला **रा**घव दिग्रथात्मज **म**हातेजा विधीचा पिता. ॥ १ ॥

( सत्वरामायणांतील )

**श्री**मान् गाधिज**रा**ज या दशरथा मागे **म**हात्मा सखा
ओ**ज**स्वी तन**य,** क्षपाचरहता **रा**खावयाला **म**खा; ।

दे व्हाया **जय** रामलक्ष्मण **जग**च्छ्रेयस्कर क्षमापती, ।
ते **रा**त्रिंचर **म**र्दुनी, विनविती त्या कौशिकाची मती. ॥ ३ ॥

एकंदरींत श्रीरामत्रयोदशाक्षरी मंत्र साधलेलीं दहा रामायणें आहेत.

**६–१५ स्तोत्ररामायणें.** या दहा स्तोत्ररामायणांत सुप्रसिद्ध '**विष्णुसहस्रनाम**' या स्तोत्रांतील हजार नांवें प्रत्येक रामायणांत शंभर प्रमाणें गुंफिलीं आहेत. "कोणतींही अक्षरें कवितेंत साधून दाखविण्यास जी बुद्धिमत्ता लागते त्याहीपेक्षां अधिक बुद्धिमत्ता 'परंतु,' 'धन्य' असे शब्द यथार्थत्वानें साधण्यास लागेल हें कोणीही कबूल करील; व जो कोणी हीं रामायणें वाचील त्यास तीं चित्रकाव्यें नसून ध्वनिकाव्यें आहेत असेंच आढळून येईल. 'परंतु,' 'धन्य' या रामायणांचें एक असो; परंतु विष्णुसहस्रनामावलींतील सर्व नामें क्रमानें व कथासंदर्भ विस्कळित न होऊं देतां साधणें हें कांहीं लहानसहान काम नव्हे. सबंध विष्णुसहस्रनामावलि साधण्यासाठीं पंताना दहा रामायणें खर्ची घालावीं लागलीं आहेत. प्रत्येक नामाचा वाच्यार्थ वर्णनाच्या ओघांत सहज मिसळून देण्यासाठीं कोठें कसें वर्णन केलें असतां क्रमानें व यथार्थत्वानें हीं नांवें गोवितां येतील हें ठरविण्याकरितां पंताना समग्र रामकथेचें स्वस्थचित्तानें कितीवेळां चिंतन करावें लागलें असेल बरें !" ( मोरोपंताचे समग्र ग्रंथ, खंड ७ अष्टोत्तरशत रामायणें. रा. न. चिं. केळकर केसरीकर्ते यांचा उपोद्घात )

याचा मासलाः—( प्रथमस्तोत्ररामायण )

(गीति) **विश्व**स्रष्टा **विष्णु**प्रति विनवी दशमुखक्षयार्थ, तया ।
**वर** वेदशास्त्र**षट्का र**क्षाया दे जगीं करूनि दया. ॥ १ ॥
**भूप**स्तुत**भव्य**यशा रविकुल**भव** सत्**प्रभु** प्रथित भारी ।
जो दशरथ प्र**भूत**द्विजहित अस**कृत्** सुरव्यसन वारी. ॥ २ ॥

(नवमस्तोत्ररामायण) किति बुध **सनात् सनातनतम कपिल** असें रघूद्वहा म्हणती, ।
**कपि** पापांचा **अव्यय** यापरि संस्तविति, करिति या प्रणती. ॥८२॥

(दशमस्तोत्ररामायण) वदला प्रणतां सर्वां, 'संरक्षीनच्चि बुधाबुध स्वा मी'; ।
भक्तमयूरदयाघन हा **सर्वप्रहरणायुध** स्वामी. ॥ ८३ ॥

याचप्रमाणें ६ व्या प्राकृतमंत्ररामायणाच्या उत्तरकांडांत 'केवळ उत्तरकांड श्रीरघुपतिमंत्ररत्नमंजूषा' या पंताच्या उपोद्घातांतील (१०) उक्तीवरून रामरक्षास्तोत्राचे श्लोक व इतर मंत्र पंतांनी गुंफिले असावेत असें कळून येतें. शोधकांनीं त्यांतून पुढील मंत्र ओळखून काढिले आहेतः–

(गी.१-१०) 'रामो दाशरथिः शूरो लक्ष्मणानुचरो बली ।
काकुत्स्थः पुरुषः पूर्णः कौसल्येयो रघूत्तमः ॥ १ ॥'

(गी०११-१७) 'वेदांतवेद्यो यज्ञेशः पुराणपुरुषोत्तमः ।
जानकीवल्लभः श्रीमानप्रमेयपराक्रमः ॥ १ ॥'

(गी०१८-२३) 'रावणांतकरः कृष्णो ध्रुवीकृतबिभीषणः ।
सुग्रीवानन्दकर्ता यो वालीहर्ताऽतिपुण्यमान् ॥ १ ॥'

(गी०२४-३०) 'सर्वात्मा सर्वसाक्षी वै सृष्टिस्थित्यंतकृत् विभुः ।
सर्वाश्चर्यमयो वीरः सच्चिदानंदविग्रहः ॥ १ ॥'
(गी०३१-३३) 'ॐ नमो भगवते वासुदेवाय'।
(गी०३४-५०) 'राम राम हरे राम हरे राम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥.

१६,१८,१९,२०,२१ यांत म्हणजे (प्रथम) **शिवरामायण, उमारामायण, काशीरामायण, प्रयागरामायण, गंगारामायण** व यांतील प्रत्येक गीतींत अनुक्रमें शिव, उमा, काशी, प्रयाग व गंगा अशीं नांवें साधिलीं आहेत. १७ व्या म्हणजे द्वितीय **शिवरामायणां**त शिवाच्या

'श्रीकंठो वरदः शर्व आशुतोष उमापतिः ।
दयानिधिर्महादेवो भवो भवहरो हरः ॥ १ ॥
................................ ।
निरमित्रो निरवधिर्निरविद्यो निरामयः ॥ ११ ॥'

या अष्टोत्तरशत नांवांचा संग्रह केला आहे.

२२,२३,२४,२५ त म्हणजे **तीर्थरामायण, ऋषिरामायण, राजरामायण, व सन्नामगर्भरामायण** यांतील प्रत्येक गीतींत अनुक्रमें एका तीर्थाचें, राजाचें व देवमुनिसंतसाधुभक्ताचें नांव गोविलें आहे. मासल्याकरितां पुढील उदाहरणें पहाः—

तीर्थरामायणांतील ५८ गीतींत पुष्कर, सरयू, गंडकी, गोमती, शोणभद्र, फल्गु...... शिवगंगा, महान्हद, कावेरी, ताम्रपर्णी, सेतुवाहिनी ह्या तीर्थांचीं नांवें गोवून शेवटच्या गीतींत **सर्वतीर्थ** हें नांव पंतांनीं साधिलें आहे. तें असेंः—

श्रीराम **स**कळहितकर निर्जरत**र्वे**धिकचरणकंजरजा ।
जग**ती**श पुम**र्थ**प्रद यश करि कवि म्हणति वज्रपंजर जा (=ज्या). ॥ ५९ ॥

तसेंच ऋषिरामायणांत यवक्रीत, रैभ्य, कक्षीवान् औशिज, भृगु......निशाकर, शंख, लिखित, पराशर, वालखिल्य, अशीं नांवें गोंवून शेवटीं सर्वर्षि हें नांव साधिलें आहे. उदाहरणः—

केला भूप बिभीषण अभिषेक **अणीक मांडवुनि भव्य**, ।
दिव्योत्तीर्णा देवी प्रभुचा उत्संग शोभवी सव्य. ॥ ६७ ॥

राजरामायणांत नृग, ययाति, नहुष, यदु, पुरु, धुंधुमार......शल्य, द्रुपद, विराट, ककुत्स्थ, प्रियव्रत, उत्तानपाद अशीं नांवें गोविलीं आहेत. उदाहरणः—

**उत्त**म आनंद दिला, **हृत्ताप न** उरविला जनीं कांहीं, ।
**पा**पषडरि **द्**मिले प्रभुनामेंचि, अजेय जे अनीकांहीं. ॥ ८६ ॥

सन्नामगर्भरामायणांत श्रीगणपति, सरस्वती, कुलदेव, गुरु, शिव, विधि, नारद, प्रल्हाद, पराशर, पुंडरीक, सनक, बळी, व्यास, अंबरीष, शुक, शौनक, परीक्षिति, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपानदेव, मुक्ताबाई, चांगदेव, भानुदास, जनार्दन, एकोपंत, वामनस्वामी, श्रीधर, केशव, गणेश, अनंत, कृष्णदास, जयराम, आनंदमूर्ति, रंगनाथ, रामदास, कल्याण, उद्धव-

चिद्धन, केशवस्वामी, शिवराम, पुरंदर, दासोपंत, दामाजीपंत, रामानंद, कबीर, रोहिदास, मलूकदास, पीपाजी, धनाजाट, नानक, मिराबाई, कर्माबाई, सेना न्हावी, माधवदास, तुळसीदास, मनसुखदास, रामप्रसाद, त्रिनयनवाणी, नरसिंहमेहता, केवळकुबाजी, श्रुतिदेव, सुदामदेव, नामदेव, लाखाभक्त, जनी, गोरा कुंभार, सांवता माळी, खेचरविसोबा, चिंचवडकर देव, दामोदर देव, तुकावाणी, बोधला, मालोपंत, मुद्गल, बहिरापिसा, परिसा भागवत, हरिनारायण, मुकुंदराज, मुक्तेश्वर, कृष्णदयार्णव, जगमित्रनागा, आनंदतनय, निपटनिरंजन, मानपुरी, सूरदास, केशवदास, भक्तमालाकार, बिहारी, भक्तविजयकार, हरिविजयकार, वृंदावनवासी, अयोध्यावासी, काशीवासी, द्वारकावासी, सर्वक्षेत्रवासी, चोखामेळा, शंकराजीबावा, नारायणबावा, शिवदीन, प्रल्हाद बडवे, अमृतराय, पांडोबा आपा, गोविंद गोसावी, बाळकृष्णबावा, विठोबादादा, सकळहरिजन, बाबूराय सदाशिव, कालिदास, वैकुंठाश्रय, हीं नांवें गोंवून शेवटीं **'पंढरपुरवासी हरिकथायज्ञश्रवणरसिकसेवक मयूर'** असें स्वतःचें नांवही घातलें आहे. यावरून पंतांची समदृष्टी व सत्संगलालसा हीं सुव्यक्त होतात. या रामायणाचें एक उदाहरणः—

> **भ**व्यार्थ व्य**क्त** कथी अंगद, परि साम न करि अ**वि**चार; ।
> तो नि**ज**लयरुचि दावी रामहरिपुढें नि**का**म अविचा**र**. ॥ ८७ ॥

नूतनोपलब्ध 'सद्गर्भ' रामायणांत १५२ गीतींच्या प्रथमाक्षरांनीं पुढील देवांचीं व संतांचीं नांवें साधलीं आहेतः–'श्रीगजवदन, सरस्वती, कुलदेव, मातापिता, विद्याप्रदगुरु, सांब, विधि, नारद, प्राचेतस, सदाशिवनंदन, जयदेव, साग्रजानुज ज्ञानदेव, एकोपंत, रामदास, दासोपंत, वामनस्वामी, केशव, जयराम, विठोबा, दामाजी, तुलसीदास, रामानंद, कबीर, पीपाजी, नरसिंह मेहता, माधवदास, नामदेव, तुकोबा, अनंतोपाध्याय, मिराबाई, रोहिदास, विसोबा खेचर, चांगदेव, भानुदास, (व) अमृतराय'. हें रामायण सुलभ व मधुर झालें आहे. पुढील दोनच गीति पाहाः—

> 'सोमें चकोर, मेघें चातक, जन तेंवि निववले रामें; ।
> नामें प्रभुच्या केलीं कल्पतरूचीं हतप्रभें दामें.' ॥ १३५ ॥
> 'रघुपति राज्य प्रेमें करि एकादशसहस्र वत्सर हा; ।
> वदले तयांत कामक्रोधांसह दंभलोभमत्सर 'हा'!. ॥ १३९ ॥

**धन्यरामायणः**—'मैराळबोवा चातुर्मास्ये यांच्या हातून गहाळ झालेल्या रामायणांपैकीं हें एक असून' याचा उपलब्ध झालेला त्रुटित भाग पराडकर संपादित **'मोरोपंताचे समग्र ग्रंथ'** खण्ड ८ वा याचे शेवटीं छापलेला आहे. याच्या एकूण ११७ गीति व उपसंहाराचा १ श्लोक असून त्यांतील ४४ व्या गीतीच्या चतुर्थचरणापासून ८८ व्या गीतीच्या प्रथमचरणापर्यंतच्या गीति गहाळ झाल्या आहेत. यांतील प्रत्येक गीतींत **धन्य** हा शब्द निदान एकदां तरी मोठ्या खुबीनें योजिला आहे. हें रामायण फार सरळ व रसाल असेंच उतरलें आहे. त्यांतील थोडा मासलाः—

ऐशीं नित्य सुखाकरें, सुचरितें, एनस्तमोहस्करें
जीं केलीं करुणाकरें, रघुवरें, भक्तापदातस्करें, ।
त्यांमध्यें लव वर्णिला प्रमुदितस्वांतें मयूरेश्वरें
लोकीं नाहींच आर्य कार्य दुसरें या विग्रहें नश्वरें. ॥ ३२ ॥

(कुशलवोपाख्यान. १३.९२)

श्रीरामायण वाहिले प्रभुपदीं 'सद्भक्तसर्वस्व हें;
प्रेमें गातिल **साधु तारितिल या दीना मयूरा महें**; ।
त्याचा मी उपकार फेडुनि कसा उत्तीर्ण होऊं बरें ?
श्रीरामें परि दीन हीन हित जे, ते धन्य केलें वरें. ॥ ३३ ॥

**न याहूनि हा अन्य कांहींच जाणें, । दुजा अर्थ चित्तांत याच्या न बाणे** ॥
**मयूर स्वसेवा बरी यांत पाहे, । 'सुरामायण' श्रीशरामासि वाहे.** ॥ ३४ ॥
प्रभुच्या चरणीं मयूर भावें । 'प्रिय रामायण' हें नमूनि वाहे, ॥
**यश हेंचि सुखें सदैव गावें, । स्थिरता याचि रसीं मनास आहे.** ॥ ३५ ॥

रामचिंतनार्थ वर्णिलें मयूरसेवकें; ।
मुक्ति सुंदरी वधू वरावि याचि देवकें ॥ ३६ ॥ ( पंचचामर रामायण ९१. )
सर्व भक्त मयूर हर्षदराममेघ महोदया;
**हेतु या प्रभुचीच हो, दुसरी कदापि न हो दया.** ।
**पुष्पसें** 'विबुध पिया'ख्य **चरित्र हें शुचि** पाहिलें;
**वंदुनि प्रभुच्या पदांवरि मस्तकासह वाहिलें.** ॥ ३७ ॥

( विबुधप्रिय रामायण )

**सत्कीर्ति स्रग्धरा कन्या हे रामायणसत्कथा;**
**मयूरें अर्पिली रामा बरा जाया मनोव्यथा.** ॥ ३८ ॥

( सत्कीर्ति रामायण )

**व्हावें कृतार्थजनु जावें लयासि अघ,** यावें महागतिमना,
**व्यावें विशुद्ध यश,** मावें जगीं न तरि, भावें दशास्यदमना ।
**ध्यावें, स्वतत्व उमगावें,** असेंचि शुचि, ठावें असें गुरुमुखें,
**'पावें प्रभो ! ह्मणुनि नांवें सदा जपत गावें चरित्रचि सुखें.** ॥ ३९ ॥

( कविप्रियरामायण १८ )

**पसरूनि तुला पदर, प्रणती करितों शत बा ! भगवच्चरिता. !**
**तव चिंतन नित्य घडो सदया ! क्षण एकहि जाउ कधीं न रिता.** ।
**वर हा मज दे,** तरला जन कोण न कास भवांत तुझी धरिता ?
सकळासहि तर्पिसि, अर्पिसि तूं; शुचि गांग तसें हरता हरिता. ॥ ४० ॥

( सवाईरामायण १४६ )

नामातें प्रभुच्या मयूर विनवी, चित्ता भरीं या भरीं,
श्रीरामायण गाईलें तरि पुन्हा गावेंचि ऐसें करीं, ।
पापाचा परिहार फार बरवा व्यापार हा साधुनी,
गावायासि सदैव या मम मुखीं बापा! रहा साधुनी. ॥ ४१ ॥
( रम्यमंत्र रामा. उपसंहार ९ )

सख्या रामनामा! अशी एक आहे । मयूरेश्वराची तुला प्रार्थना है, ।
पिता माय तूं, सत्य मी बाळ साचा, । नव्हे काळ साचार हा आळसाचा. ॥ ४२ ॥
( वाङ्मनःप्रार्थना ५१ )

**स्वल्पचि रसिकमत वदति,** बहुत लिहुनि काय कवि कथा विकती ? ॥ ४३ ॥
( द्रोण. ५.५४ )

(गीति) भक्तमयूरकरें हें श्रीगुरुनें लिहविलें सभापर्व, ।
**कीं आर्यामंदांचें रसिकांची नित्य हो सभा पर्व.** ॥ ४४ ॥
( सभापर्व. ७.९२ )

ऐसें हरिहरचरित प्रेमें विस्तरभयें यथाशक्ती ।
**गाउनि हरिहरचरणीं अर्पुनि मी मागतों सती भक्ती.** ॥ ४५ ॥
( कृष्ण. ८८.८५ )

प्रभुचीं अमितें चरितें जरि तें यश वर्णितां नसे अंत, ।
गातां दुर्गति चुकवी सुकविप्रिय हेंचि वर्णिती संत. ॥ ४६ ॥
( कृष्णविजय अ० ८९ गी० १०० )



# परिशिष्ट–ज.




## यजमान, यजमानपुत्रादि, गुरु, गुरुपुत्र, आप्त, स्नेही, राजकीय पुरुष इत्यादिकांविषयींचे मोरोपंतांचे निवडक उल्लेख.

### (यजमान)

(गीति) श्रीमत्सदाशिवात्मज **बाबूजीनायक** प्रभु ज्ञानी, ।
'धन्य' म्हणावें ज्याला शुद्धगुणश्रवणतृप्तसुज्ञांनीं. ॥
दाता वक्ता योद्धा तेजस्वी मानधन असामान्य ।
अतुळें पितृप्रसादें मंडित देवव्रता असा मान्य. ॥
या साधुसंगमुदिरें मुदितश्रीरामसुतमयूर कृती, ।
नरनारायणविजयग्रंथ करी व्हावया सुखी सुकृती. ॥१-३॥ (कर्ण.५०.७३-७५)
जो धीरवीरहीर, श्रीसिद्धेश्वरमहादयापात्र, ।
श्रीमान् बाबूराय प्रभु, ज्याचें शोभलें यशें गात्र. ॥
भीष्मद्रोणसम गुणें, शांडिल्यासुगोत्रपद्मरवि, दे हा ।
आश्रय, शंकर जैसा उपमन्युमना, मयुरकविदेहा. ॥४-५॥ (स्वर्गा.२.३५-३६)
गंगे ! बाबूरायप्रभु भक्त तुझा; तदीय जन सर्व ।
तारावे; बहुत भली तूं, म्हणुनचि, तुज शिरीं धरी शर्व. ॥ ६ ॥
(गंगावकिली १३)

श्रीबाबूराय प्रभु माझा अत्यंत सदय अन्नद, हा ।
अर्थिजनां न म्हणों दे तैसा, तत्पास जेंवि सन्नद हा ! ॥
श्रीगायत्रीगीतागंगासिद्धेश्वरैकभक्तातें ।
या विष्णुपदा ! मुक्ति न वरिल कशी गुरुपदाब्जसक्तातें ? ॥ ७-८ ॥
( विष्णुपदवकिली ८-९ )

### (यजमानपुत्र)

शीलजितामरचंदन तन्नंदन **पांडुरंगराय**हि तें ।
यश मिरवितो, प्रजांचीं करि दशरथसा न राम काय हितें ? ॥ ९ ॥
(स्वर्गा. २.३७)

श्रीबाबूरायाचा पुत्र पहा पांडुरंगराय कवी. ।
देवि! भगिरथनंदिनि! तात तसा स्वयश द्याहि आयकवी. ॥ १० ॥
(गंगावकिली ८)

श्रीपांडुरंगराय, प्रेक्षुनि तुज, या जगांत हो धन्य. ।
श्रीविष्णुपदा! व्हावें यासि यश असें, तसें नको अन्य. ॥११॥ (विष्णुपद.१५)
श्रीपांडुरंगरायें मज तुज वंदावयास पाठविलें. ।
तारिति साधु, असें म्यां, त्या प्रभुनेंही मनांत आठविलें. ॥१२॥ (विष्णुपद.२)
जी पांडुरंगरायें दिधली, या सुयश दे वकीलीला. ।
ऐकोत तुझ्या हि सुखें श्रीगौरी अदिति देवकी लीला. ॥१३॥ (गंगा.१०२)
श्रीबाबूरायाचा ज्येष्ठ तनय सनय **कृष्णराय** शतें ।
सुकवींच्या वर्णावा. गंगे! दे जें विशुद्ध या यश तें. ॥ १४ ॥ (गंगा. ७)
ऋण कृष्णराय नेवू, तुजला वाहोनि पिंड विलयातें. ।
विष्णुपदा! नमन तुझें संसारवनीं न हिंडविल यातें. ॥ १५ ॥ (विष्णु. १४)
श्रीआबूरायाचा जो नंदन **नीलकंठराय,** सदा ।
गंगे! मुदित असो; या वर्णूत द्विज यथेष्ट पायसदा. ॥ १६ ॥ (गंगा. ९)
दे नीलकंठराया दर्शन, देवूनि पुण्ययश गाया. ।
विष्णुपदा! म्हणसि जना, 'करितों सर्वाहि सिद्धि वशगा या.' ॥ १७ ॥
(विष्णु. १३)

ज्या बाबूरायाची, तत्पुत्रांचीही साधली सेवा, ।
विष्णुपदा! 'तारावे ते सर्वहि' विनिव तूं असें देवा. ॥१८॥ (विष्णु.६३)
बाबूराय तव सुतचि न शके तत्प्रेमवर्णना तुंड, ।
कुरवाळीं तदपत्यें भरुत यशें साधुकर्ण नातुंड. ॥ १९ ॥ (गंगा. ९८)

## (यजमानपत्नी)

यांच्या मातासि पहा, ज्यां ताई, आबई असें म्हणती. ।
प्रणती करितों गंगे! न करीं साधारणांत तूं गणती. ॥ २० ॥ (गंगा. १०)
स्मरती **ताईबाई,** पुण्ययशीं धरुनि लोभ, विष्णुपदा. ।
सुखवीं, जो तुज भजतो, होतोचि सुपात्र तो भविष्णुपदा ॥२१॥ (गंगा.११)
**कमळाबाई** सदया जननीजननीति आश्रितीं दावी. ।
बा! विष्णुपदा! तीतें, करुनी कृपा भेटि सर्वथा द्यावी. ॥२२॥ (विष्णु.१२)

## (कारभारी)

श्रवणीं प्रेमाश्रु जया येती, तो फार आठवे **दाजी.** ।
या गति दे विष्णुपदा! पावावी करुनि पाठ वेदा जी. ॥२३॥ (विष्णु. १६)
तारीं, यांच्या वाहति जे दाजीप्रमुख कार्यभारा, हे ।
आर्य तव भजक गंगे! सर्वत्र तशीच आर्यभा राहे. ॥ २४ ॥ (गंगा. १४)

यांचे आश्रित, सेवक, गुरु जे, तत्कामना पुरो, हित हो. ।
गंगे! म्हणतीस सुखी व्हाया यजमान हो पुरोहित हो! ॥२५॥ (गंगा. ११)

(गुरु)

माझ्या सद्गुरुवंशीं झाले आहेत पुरुष, होतील. ।
विष्णुपदा! म्हणु 'यांच्या श्रीगुरु कर्णांत अमृत ओतील.' ॥२६॥ (विष्णु.४९)
गुरु माझे **श्रीराम**, श्रीमत्**केशव**, **गणे**श, **हरि**, चवघे, ।
यांचा प्रसाद वदला, 'गंगामृत पी यथेष्ट वरि चवघे.' ॥२७॥ (गंगा. १०९)
जो **मोरोबा** सद्गुरु, **मैराळ**प्रमुख जे तया भ्राते ।
रामोपासक सर्वहि तारावे हरिपदा! दयाभ्रा ते. ॥ २८ ॥ (विष्णु. ५५)

(गुरुपुत्र)

सद्गुरुपुत्र **सदाशिव**, **यज्ञेश्वर**, यांसि भेट दे. यश तें, ।
जें शुचि निवविसि गंगे! तूंचि स्वजना अदेयदेयशतें. ॥ २९ ॥ (गंगा.७८)
वरशील सहाध्यायी साधु सदाशिव तयासि तूं गंगे! ।
दर्शन दे द्रवशिल तरि, विघ्न न करितील सर्वथा दंगे. ॥ ३० ॥ (गंगा. ७९)
श्रीगीतेच्या एकादशसंख्याचा जसा उपाध्याय, ।
केवळ भक्तिरसमय श्रीम**दनंताख्य** जो उपाध्याय. ॥३१॥ (स्वर्गा. २-३८)
तो होय शोभवुनि या कवनातें साधु विप्र भासविता, ।
निजतेजें श्री देउनि पंकरुहा जेवि विप्रभा सविता. ॥ ३२ ॥

(स्नेही)

श्रीविठ्ठलभजनाचा बहु **काशीनाथ** साधु या लाहो. ।
श्रीगंगे! प्राप्त तुला इतरां तव पाथसा धुयाला, हो. ॥ ३३ ॥ (गंगा. ८०)
गंगे! देवि! **विठोबादादा** श्रीविष्णुभक्त शिवशील; ।
एतद्गीतहरियशःश्रवणें काशीसमेत निवशील ॥ ३४ ॥ (गंगा. ८१)
बहु शोभाप्रद झाला श्रीविठ्ठल भक्तराय कवनातें, ।
जेवीं ऋतूंचा करितां प्रकट गुण वसंत नायक वनातें. ॥३५॥ (स्वर्गा. २.४०)
याचा परमप्रेमळ नंदन **मैराळ** तो तथापि कसा ।
येतो? जो पंढरपुरचूतवनीं करितसे कथा पिकसा. ॥ ३६ ॥ (गंगा. ८२)
मम बाळमित्र सर्वहि गंगे! तूं अच्युतप्रमुख तारीं. ।
वारीं संसारश्रम, सारीं प्राचीन पातकें सारीं. ॥ ३७ ॥ (गंगा. ९७)

(आप्त)

मातेहूनि बहु दया केली, आदर करूनि **आकानें**. ।
विष्णुपदा! तारीं गुण घ्यावेच इचे, करूनि आ कानें. ॥३८॥ (विष्णु. ६७)
द्यावी सद्गति गंगे! या माझ्या अग्रजासि(=**सोनोपंत**), जो भावें ।
तुज भेटे स्त्रीपुत्र त्यागुनि, जेथें अवश्य लोभावें ॥ ३९ ॥ (गंगा. ९३)

वदला प्रसन्न चित्तें, साहित्य करूनि, बंधु **आबा** 'जा'।
विष्णुपदा! तारावा, याची **सगुणा** तशीच बा! भाजा. ॥४०॥ (विष्णु. ६८)
मी जरि अशक्त निर्धन, कोपी, तरि बहु भली **रमा** भार्या.।
ईतें सद्गति दे तूं; हेचि करीं प्रथम बोध या कार्या. ॥ ४१ ॥ (विष्णु. ६९)
धन्य **श्रीराम** पिता, धन्या **लक्ष्मी** प्रसू जगीं झाली,।
आली सत्यवतीची, कीं, भारतकीर्ति सुतमुखें आली. ॥४२॥ (स्वर्गा. २.४२)
जो सज्जनरंजन सुत **दादा** मार्गांत पावला मरण,।
स्मरण करूनि करावें गंगे! त्वां तद्भवव्यथाहरण. ॥४३॥ ( गंगा. १०७ )

( राजकीय व्यक्ती )

जो **अमरसिंह जाधव**, या धवल प्राज्य यश जसें मातें!।
तोकहि लोकहितावह दे, जें शिवभक्तिच्या रसें माते. ॥ ४४ ॥ (गंगा. ८५)
गंगे! संदर्शन दे श्रीविष्णुस्वामिभक्त **नानातें**.।
जग तोक, माय तूं, हें पूर्ण करु मनोरथासि या नातें ॥ ४५ ॥ (गंगा. ८६)
यावें प्रभुप्रतापा करुनि पुढें, तुज नमावया **फडके**.।
गंगे! तव तेजें तों विघ्नांचें उर कठोरही तडके. ॥ ४६ ॥ (गंगा. ८७)
व्हावे कृतार्थ गंगे! यावे पूजावया तुला **रास्ते**।
हा स्तेनासि म्हणविते पाठिव निजदूत परचमूशास्ते. ॥ ४७ ॥ (गंगा. ८८)
यावें द्युनदि! खळांतें **श्रीमाधवराय पेशवे** दमुनी.।
व्हावें श्रीरामजयें हृष्ट जसे सर्व देश, वेद, मुनी. ॥ ४८ ॥ (गंगा. ८९)
देवि! **अहल्याबाई** यावी भेटावयासि सत्वर ती.।
तूं पुण्यकीर्ति, हे ही; गंगे! दोघीजणीहि सत्वरती. ॥ ४९ ॥ ( गंगा. ९० )

या शिवाय गंगावकिलींत भिकंभट्ट, सदाशिवभट्ट, वासुदेवभट्ट, विठ्ठलभट्ट, श्रीधर उपाध्याय, भाऊभट्ट, पांडुरंगशास्त्री, बाजि जोशी, राघोपत भिडा, नाना परचुरा, विठ्ठल दिवाकर, विष्णुस्मरणीं नित्यनिरत निळोबा, मुद्गलभट्ट, शिवराम भाऊ, राघोबा जोशी, गोविंदराय, एकबोटे, विसोबा बापू, भिकाजी रामचंद्र, गोपाळभट्ट साधु, राघोपंत शेंबेकर, सदाशिव रहाळकर, गाडगिळ, कृष्णभट्ट वैष्णव, विश्वनाथसुत तात्या, हरिभक्त सदावर्ती मारडकर, मैनासुत बाळ, दुणाखे, [illegible] रामदासी, महादेवपुत्र साधु राघोबा रामदास, जनदास, गोपाळ नायक, भुजंगनायक, सदाशिवभक्त कृष्णद्विज करंदीकर, देवबा, बाबूराय कृष्ण, राघोपंत कोतवाल, आचार्य आवजी, चिमणाजीपाठक, वेंकटराय देशमुख, मायाजी देशमुख, बापू देशपांड्या, चिमाजी मैराळ, ढबू शिंपी, हेंदरा सुभाना, भिदरामादि वाणी, हैबतरायादि बाबर, गोविंद गोसावी, भगवद्भक्त श्रीधर, मातुळपुत्र गंगाधर व नारायण, सज्जनरंजन दादा; यांचीं तसेंच विष्णुपदवकिलींत वरील नांवांपैकीं कित्येक नांवें येऊन शिवाय विष्णुभक्त रुद्राजी, आबाजी व्यंकटेश, छोटेलाल, आपा आठवला, दामोदर, प्रभाकर, भक्तारखुमाबाई, दत्तात्रेय, यादवराय, त्र्यंबकराय, विसोबा, वासुदेव कृष्ण, बापुभट्ट जामदार, प्रभुसेवासादर

आबाजी, गंगाजी, गुणरत्नांचा डबा कमळाकर, तत्पुत्र बापू, बाबा, बाळ राघव, सदाशिव हरिदास, श्रीपति नीराजी, गंगाधर पराडकर, जगन्नाथपंत कुंटे, सन्मित्रपुत्र विठ्ठल, जगन्नाथपुत्र राम, अनंतभट्ट, हरिदास वैरागी, नारोपंत, त्र्यंबकपंत महादेवपंत, कृपाराम, बाळ हेंदरा, मिवजी खोत, कोंड दीक्षित, राजाराम, उदाराम, महादेव हरिदास, संभाजी नालवंद, हरिहरि ह्मणणारा कृष्णा गौंड, रामजी, उदाजी, नरसो साबाजी, संभाजी व शंभु केदारी, खेमा, केशवपंत, मोरो मल्हार, केशव दांडेकर, गोकुळजी गयावळ इत्यादिकांचीं नांवें आलीं आहेत.



# परिशिष्ट–म.



## मोरोपंतांच्या काव्यांतील निवडक म्हणीः–

'Short sayings, sententious and true, and long since accepted as such by common consent. (Cipriano de Valera)'.

'The distinctive characteristic of the proverb is that it is a popular current saying adopted as a convenience by the community. All the qualities said to be essential to it, shortness, sense, salt, and the rest, are subsidiary to this....But there is another quality no less essential than these, and that is general applicability. Unless a saying is capable of being applied to a variety of cases it can never become a proverb.' (*Chamber's Encyclopædia* Vol. viii, '*Proverbs*').

'**म्हण** म्हणजे ज्यांत कांहीं अनुभव किंवा ज्ञान गोविलेलें आहे, जें अल्पशब्दात्मक आहे, ज्यांत कांहीं चटकदारपणा आहे, आणि जें लोक संभाषणांत वगैरे वारंवार योजतात, असें वचन किंवा वाक्य अशी म्हणीची शास्त्रीय व्याख्या आहे. (मराठी भाषेचे वाक्प्रचार, म्हणी, इत्यादि–विद्याधरवामन भिडेकृत)'

पृथ्वींतील सुधारलेल्या भाषांतून म्हणींचें (Proverbs, Sayings) महत्त्व फार मानिलें आहे. मोठे मोठे ग्रंथकार, निबंधकार, पंडित व वक्ते आपल्या लेखांतून व भाषणांतून म्हणींचा उपयोग करून आपल्या म्हणण्यास बळकटी आणतात व त्यामुळें त्यांचीं भाषणें व लेख ऐकून व वाचून श्रोत्यांच्या व वाचकांच्या मनांवर चांगला परिणाम होतो. भाषेतील म्हणींची विचिकित्सा केली असतां राष्ट्रांतील राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक इ० विविध स्थितींचें ज्ञान होण्यास चांगलें साहाय्य होतें. मराठींतही शेंकडों म्हणी प्रचारांत आहेत व प्रत्येक महाकवींच्या काव्यांतून त्यांचा उपयोग केलेला आढळतो. एवढेंच नव्हे तर त्यांच्याही चटकदार भाषेंत वर्णिलेले अभंग, ओव्या, आर्या, श्लोक, दोहे इत्यादिकांचे कित्येक चरण म्हणीवजा होऊन बसलेले आढळतात. पंतांच्या काव्यांतूनही

प्रचलीत ह्मणींचा उपयोग आढळून येतो व त्यांच्या आर्या व श्लोक यांतील कित्येक चरण लोकांस पसंत पडून ते त्यांचा ह्मणीप्रमाणें उपयोग करितात. त्यांच्या काव्यांतून कांहीं ह्मणी जशाच तशा, तर कांहीं थोड्या रूपांतरानें घातलेल्या आहेत. यांचीं थोडीं निवडक उदाहरणें तेवढीं येथें देतों.

**(अ) ह्मणीः—**

(१) **'आयुरन्नं प्रयच्छति'.**

ह्मणताति 'आयुरन्नं प्रयच्छति' प्राज्ञ, तेथ विश्वास. । ( आर्याकेकावलि ५७ )

(२) **आशा वेडी** राया ! जरि भीष्म द्रोण कर्णही खपला । ( शल्य. २.३ )

(३) **कडू कारलें, तुपांत तळलें, साखरेंत घोळलें, तरी तें कडूच.**

लकुच कटुचि अमृतकराकरवींही शर्करेंत घोळविला. ।

(४) **कांट्यानें कांटा काढावा.**

बापा ! कांट्यानेंचि प्राज्ञ सुखें काढिताति कांटा कीं. । ( आदि. ३१.३० )

(५) **कुत्र्याचें शेंपूट नळींत सहा महिने घातलें तरी वांकडेंच.**

नीतिंत तसें खळमन, जेंवि नळींत श्वपुच्छ सा मास. । ( उद्योग. ३.३२ )

(६) **कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ.**

( गीति ) नष्टनय कसा झाला दितिसुतचंदनवनांत हा बाळ ? ।

कंटकतरु, व्हायाला तच्छेदक विष्णुपरशुला नाळ. ॥ ( मंत्रभागवत ७.४५ )

(७) **कुसंतानापेक्षां निसंतान बरें.**

वंध्यत्व लिहो भाळीं विधिचें कदपत्य न करकंज लिहो. । ( आश्रम. २.५३ )

(८) **'कोळसा उगाळला तितका काळाच, कोळसा किती जरी उगाळला तरी तो काळाच, कोळशाची दलाली हात काळे.**

हा कोळसा कराया शुद्ध, धुतां व्यर्थ पाणितळ मळलें. । ( द्रोण. १.२१ )

तरि, वरि तसाचि आंतहि उगाळितां कोळसा; प्रयास करा. । (संशयरत्न. २४)

(९) **गरज सरो वैद्य मरो.**

गरज सरतांचि वैद्या त्यजिती; होती गळां प्रथम हार ।

आपण होउनि तृप्त, त्यजिती अतृप्त स्त्रियांसही जार. ॥

( मंत्रभागवत. १०.५९८ )

(१०) **चोराच्या मनांत चांदणें.**

वाढति सद्गुण तों तों प्रेम करिति लोक पांडवांवरि, तें ।

चोरासि चांदणेंसें, तापचि देतें सुयोधना अरितें. ॥ ( मं. भा. १०.६३७ )

(११) **ज्याचा त्याचा स्वजातीकडे ओढा.**

हंसी हंस बकीं बक मिसळे, जन ओढतो स्वजातिकडे. ।

(१२) **'तेजसां हि न वयः समीक्ष्यते'** ( कालिदास )

न वय प्रमाण तेजस्विजनीं ह्मणती कवी न तें लटिकें. । ( विराट. ६.७१ )

तेजःप्रमाण आत्मा तत्त्वज्ञांस प्रमाण, न वय जनीं । ( आदि. ३३.८९ )

**(१३) दर्यामें खसखस.**

मुनि ह्मणति, 'अर्जुनीं तव शक्ती, जसि सागरांत खसखस रे.' । (द्रोण.२.६३)

**(१४) धर्मस्य सूक्ष्मा गतिः.**

धर्माची गति सूक्ष्मा, केवळ तूं स्थूलदृष्टि मुग्धा ! तें । ( कर्ण. ४१.३१ )

**(१५) नखानें काम होतें तेथें कुऱ्हाड कशाला ?**

नखहि नको ज्या कार्या त्या काढावा कशास करवाल ? । ( भीष्म. ४.४८ )

**(१६) नदीचें मूळ व ऋषीचें कुळ पाहूं नये.**

शूराच्या तटिनीच्या ठेविति सुगुणीं, न मन कवि प्रभवीं. ( आदि. २५.६३ )

**(१७) निश्चयापुढें कांहीं असाध्य नाहीं.**

ह्मणति 'असाध्य न कांहीं कृतनिश्चय जो तया' असें आर्य ।

( 'निश्चयाचें बळ । तुका ह्मणे तेंचि फळ.' )

**(१८) पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनम्.**

अहि सोडिला जसा पय पाजुनि, मनि मणि हरूनि पोळविला ।

( आदि. २७.३३ )

**(१९) प्राज्ञस्तोषं जनयेत् तदेव शिवपूजनं** अशा उक्ति । ( कर्ण. ४१.८२ )

**(२०) बापास बाप ह्मणत नाहीं तर चुलत्याला काका कोण ह्मणतो ?**

बापासि बाप न ह्मणे ऐशाला काय होय आजोबा ? । ( वन. १.६५ )

**(२१) 'बालादपि सुभाषितं ग्राह्यं'.**

···शिशुचें ह्मणुनि न घे सूक्त जाणता कोण ? । ( आदि. २७.९ )

**(२२) मऊ लागलें ह्मणून कोंपरानें खणूं नये. ( किंवा भात दडपावा. )**

जों मृदु लागे तों तों दडपी शिशु फार ऊन भातातें. । ( सभा. ४.३७ )

( केलें काय ) स्वयेंही मृदु ह्मणुनि नये भू खणों कोपरानें. ।

( कृष्णविजय ७९.३० )

**(२३) महाजनो येन गतः स पंथाः ।**

ज्या वाटेनें गेले गुरु, धरिति छात्र त्याचि वाटेतें. । ( द्रोण. ११.३४ )

**(२४) मुद्दाम झोपेचें सोंग घेणारास जागें कोण करणार ?**

जागे काय करावें निपट कपट निद्रितां जनां अन्यें ? ।

**(२५) मोठ्याचें दुःखही मोठेंच.**

बलवत्तर विधि देतो थोराला थोरल्याचि तापातें. । ( भारत. )

**(२६) 'यतो धर्मस्ततो जयः'.**

जिकडे सुधर्म तिकडे जय युद्धीं; न भ्रमें महाभागा ! ॥ ( स्त्रीपर्व ४.१८ )

**(२७) व्याप तितका संताप.**

हें सत्य अल्पबाधित, तेथें संताप जे स्थळीं व्याप. । ( आर्याकेकावली ९४ )

**(२८) शितावरून भाताची परीक्षा.**

येणेंचि सिद्धि कळली, जाणति एकेंचि बायका शीतें. । ( द्रोण. १५.७१ )

**(२९) शिष्यादिच्छेत्पराजयम् । पुत्रादिच्छेत्पराभवम् ॥**

प्रार्थुनि मागति पुत्रच्छात्रांपासुनि भले परिभवातें. । ( उद्योग. १३.१७२ )

**(३०) समुद्रांत पाषाण कोरडा.**

पाषाण आंत शुष्कचि वाहो वरि थोर सिंधुचा ओघ. ।

( मंत्रभागवत १०.९७९ )

**(३१) सांपळयामध्यें वाघ सांपडे बायकामुळें मारिती खडे.**

पंजररुद्धव्याघ्राप्रति लोक विशंक मारितात खडे ।

**(३२) सोय जाणेल तो सोयरा.**

तूं सोय जाणसी बहु, दीनाचा सोयरा खरा सुभगा! ॥ ( आर्याकेका. १७१ )

तो आप्तोत्तम, कामा ये जो धांवोनि अवसरीं विषमीं. ( अमृत. १.६२ )

*A friend in need is a friend indeed'*

**(३३) 'हसद्भिर्यत्कृतं कर्म क्रोशद्भिरनुभूयते'** । ( अश्वघोषकृत बुद्धचरित्र )

**( 'करावें तसें भरावें' )**

हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं. । ( वन. ११.८० )

**(३४) हिरा तो हिरा, गार ती गार.**

जरि उकिरड्यांत पडला, मळला, न हिरा तथापि सामान्य. । (सन्मणिमाला २७)

आंतहि अधचि. गारा वेंचुनि टाकील कां कवि हिऱ्यातें? । (आदि. २९.४२)

जरि केंडिला तरि हिरा, स्तविलाचि शिरी चढे न शिरगोळा. ।

( आदि. २८.४४ )

यांशिवाय **'अतिपरिचयादवज्ञा,' 'खऱ्याला मरण नाहीं,' 'खाण तशी माती,' 'गर्वाचें घर खालीं,' 'जनीं जनार्दन,' 'टाकीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाहीं,' 'धर्मस्य त्वरिता गतिः,' 'परदुःख शीतल,' 'बधिरापुढें गायन,' 'बुद्धिः कर्मानुसारिणी,' 'मूर्ति तितक्या प्रकृति'** या किंवा या अर्थाच्या, तसेंच आणखी बऱ्याच संस्कृत मराठी ह्मणी पंतांच्या काव्यांत शोधकांस आढळतील. त्यामुळें पंतांच्या काव्यांत जोम व चटकदारपणा हे गुण आले आहेत.

**(आ) ह्मणीवजा झालेले किंवा होण्याच्या योग्यतेचे पंतकाव्यांतील निवडक पद्यांश ( किंवा पद्यें ):–**

(१) अरिच्याहि सद्गुणांतें प्रेमें वाखाणिताति सुज्ञानी. ।

(२) जातां परार्थ ही बहु तापातें पावली सुरामा ती ।
न करील कां पित्याची दुर्गतिची माउली सुरा माती ? ॥

(३) हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं ।

(४) सत्पुरुषकथा अद्भुत रसदा ह्मणतों इलाच सुरभी मी. ।

(५) मरणाऱ्या रोग्याला काय करिल जाणता भला वैद्य ? ।

(६) प्रकृतिमनोहर तेथें वद न धरी कोण आदरा जीव ? ।

(७) तो आप्तोत्तम कामा ये जो धांवोनि अवसरीं विषमीं. ।
(८) खळ न वळेल झिजविला जरि करितां बोध काय सा मास. ।
(९) जें नयविरुद्ध केलें तें हृदयीं कर्म सर्वदा सलतें. ।
(१०) फारचि बरी निरयगति, परवशता शतगुणें करी जाच. ।
(११) धर्मन्यायविरोधें कोणाचेंही न इष्ट साधेल ।
(१२) चित्त प्रसन्न नसतां उपचाराग्रह नव्हेत जाचकसे ? ।
(१३) सत्कुलजांचेंचि सदा स्वकुलाचाराकडेचि मन वाहे ।
(१४) मधुतेंचि मूढ पाहे पाहत नाहीं परि प्रपातातें. ।
(१५) संत ह्मणति सप्तपदें सहवासें सख्य साधुसी घडतें. ।
(१६) पुरुषें आरंभावें कर्म न पौरुष कदापि सोडावें. ।
(१७) छेदावा गतिहेतुहि जो विषरुग्दुष्ट निजहि तो पाय ।
(१८) दुर्गत बंधु पहातां दुःख जसें इतरथा न मातें तें ।
(१९) बहुतांचे संकल्पित जें तें होतेंचि निश्चयें कार्य. ।
(२०) संसर्गींही भोगिति, दोषीच न दोष आपुले भोगी. ।
(२१) जो शुचि तो स्वप्नींही परदारांच्या विलोकनें विटतो. ।
(२२) संसारीं पुरुषार्थप्रासादा साधुसंग हा पाया. ।
(२३) बहु जनवाद अनावर, वेग निरोधील कोण तोयाचा ?
(२४) व्यसनीं प्रवृत्ति आवरि थोर, जसा सिंधु आवरी लहरी. ।
(२५) सकळा मर्त्यजनातें सुख द्यावें नित्य नव पुरोगानें ।

वरील ह्मणीवजा वचनांपैकीं बहुतेक पंतांचीं निवडक सुभाषितें यांत विषयक्रमवार आलीं असल्यामुळें त्यांच्या स्थळांचा येथें पुनः उल्लेख केला नाहीं.

### (इ) केकावलींतील ह्मणीवजा चरण किंवा चरणांश.

(१) उरे न तृण भेटतां इंगळा. (केका २)
(२) विषाद धरिला ह्मणों, न सुरभी विषक्षीर वी. । (के० ४)
(३) अलंकृतिमती सती मनिं झुरे न जों संगती. । (के० १३)
(४) व्रणार्त पशुच्या शिरावरि वनीं उमे काकसे. (के० २१)
(४) परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती; ।
गुणा न ह्मणतां उणा, अधिक, आदरें सेविती. ॥ (के० २३)
(५) प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा ! खरें, ।
घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें. ॥ (के० ४०)
'God helps those who help themselves.'
(६) …ज्यां मिळे अमृत ते न मद्या पिती. । (के० ४१)
(७) कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली. । (के० ४६)
(८) प्रसाद करितां उणें अधिक नाठवा, हो हरि ! ॥ (के० ६५)

(९) प्रभुत्व तरि हेंच कीं कृपा दान तें, ।
खसाम्य यदुपार्जनें मिरविजे खपादानतें. ॥ (के० ६६)
(१०) प्रसाद मग काय तो, जरि निवारिना लाघवा? । (के० ६६)
(११) उदारपण तें बरें सुखवि जें सुपात्रा सदा; ।
दिलें अमृत पन्नगा, तरि खळीं कृपा त्रासदा. ॥ (के० ६९)
(१२) ·····················चामरें, ।
नृपासि उचितें; वृथा, मिरविलीं जरी पामरें. । (के० ७८)
(१३) सुधा त्यजुनि कामुक प्रकट अंगनाह्वा पिती. । (के० ८३)
(१४) असे मृदु ह्मणोनि बा! मज न धोपटा कापुसा. (के० ८४)
(१५) खतोक पितरां रुचे, जरिहि कर्दमीं रांगलें. । (के० ८५)
(१६) सकोप दिसती गुरु क्षणभरीच. । (के० ८८)
(१७) अमृत नेदिजे घातुकें (के० ९०)
(१८) कधीं न करिसी प्रभो! भजक बाळकोपेक्षण । (के० ९२)
(१९) ·········न रिण जन्मदेचें फिटे. । (के० ९५)



# परिशिष्ट–अ.



## मोरोपंताचीं निवडक सुभाषितें.

'मोरोपंतांनीं उपमा, रूपक, उत्प्रेक्षादि अर्थालंकारांची योजना आपल्या काव्यांत विपुलपणें केल्यामुळें मनोरंजनादि अनेक प्रकारचे लाभ जे अनुभवास येतात, त्यांतील सुभाषितश्रवण हा एक होय. पंतांची कविता वाचित असतां अनेक प्रकारचीं सुभाषितें अवलोकनांत येतात. संस्कृतांत ज्याप्रमाणें अनेक अभियुक्त कवींच्या ग्रंथांतून निवडक कविता घेऊन सुभाषितरत्नाकरादि ग्रंथ बनविले आहेत, त्याप्रमाणेंच मोरोपंत, वामनपंडित मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास इत्यादि महाराष्ट्र कवींच्या ग्रंथांतून सुभाषितें काढल्यास महाराष्ट्रसुभाषितरत्नाकर जरी बनला नाहीं तथापि त्याची रसतरंगिणी तरी बनेल असें आह्मांस वाटतें.' ( कै० म. बा. हंस )

श्रीमन्मयूरभक्तशिरोमणि कै० हंसांच्या ह्या सूचनेस अनुसरून या परिशिष्टांत मोरोपंतांच्या ग्रंथांतून कांहीं निवडक सुभाषितें दिलीं आहेत. तीं वाचकांस आवडल्यास हंसांच्या मार्मिक सूचनेप्रमाणें महाराष्ट्र रसतरंगिणीचा शोध लावून तिच्या पुण्यजलांनीं रसिकांस अभिषेक करण्यास महाराष्ट्रांत कोणी तरी पंतभक्त तयार होईल असा भरंवसा वाटतो. पुढें दिलेलीं सुभाषितें विषयानुरोधानें क्रमवार देण्याचा प्रयत्न केला आहे.

(१) व्हावें **शिवपदरतमति** न शिवाया कलियुगींहि तापानें ।
होय न भय संसारीं हरभक्तिरसायनाचिया पानें. ॥ (अनु. ३.२३)

(२) हरिदास्य यल्ललाटीं धन्यचि तें जरि असेल तोक पिसें. ॥ (वन. १०.४०)

(३) **भगवत्प्रसाद** सुकवच त्याला जो साधु, काय तो मरतो ? ॥ (द्रोण. २.६४)

(४) प्रभु काय ? तद्धृत तृणहि हें जग नाशील, वांचविल यातें. ॥ (मौसल. २.८१)

(५) ईशक्षोभ करी तृणास अशनी हें बोलती जाणते. ॥ (कृष्णवि. ७८.२०)

(६) ईश्वरवरलाभ जया, तो कालावरि करील सत्तेतें. ॥ (द्रोण. १३.२४)

(७) **प्रभुयश** किति वर्णिल कवि? करुं आर्या लक्ष कोटि, ओव्याही. ॥ (द्रोण. १४.६८)
(८) जगदीशार्ते वंदुनि, गावें तद्विश्वतारका चरिता; ।
इतरा कर्मा घेता, जैसा मानूनि तार काच रिता. ॥ (मौसल. ५.१०९)
(९) **प्रभुसि स्मरुनि** निजावें स्वस्थ स्थापूनि शीर्ष अर्यकीं. । (उद्योग. १.३०)
(१०) अमरेश मरे ईशा न विनत जो, विनत मर्त्यही न मरे. । (उद्योग. ५.८८)
(११) गुळ खोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा; ।
सत्य प्रेमचि दावुनि सुज्ञें तो विश्वपाळ कवळावा; ॥ (उद्योग. ७.९)
(१२) कपटादरें वळो पर, पर परमेश्वर कसा वळेल हरी ? ।
कृष्णकृपामृतनिधिची अकपटविनताकडे वळे लहरी. ॥ (उद्योग. ७.१०)
(१३) **भक्त्यर्पित** बहु, नाहीं तरि काय असे दुराप गांग भवा ? ॥ (उद्योग. १३.२२)
(१४) तारिल दशाब्धिविषपा ईश्वर मारिल दशार्णवसुधापा. ॥ (उद्योग. १३.२०७)
(१५) **प्रभुचा प्रसाद** होतां सिंहीं घालील शशहि पल्याण. ॥ (भीष्म. ६.२०)
(१६) सद्गति कसी घडेना भावें केल्या प्रभूपदीं यजन ? ॥ (दत्तदयोदय १६)
(१७) तातासि अपत्याची, प्रभुसि नताची तयापरिस गोडी. । (हरिवंश २२.५६)
(१८) भक्ताचा नग मानी, तिळ तो श्रितकल्पनग निजायास. । (शल्य. १.८२)
(१९) **भगवन्महिमा** गातां होताहे कायवाङ्मनःशुद्धि. ॥ (अनंत. २)
(२०) जें **सुख** भक्तगृहीं या हरिस, तया हरिस तें नसे नाकीं. ॥ (आदि. ३७.८३)
(२१) बा ! काय अशक्य तया, जो नम्र महाविभूतिधवचरणीं. ॥ (शल्य. २.१०३)
(२२) **गुरुभक्ता** बाधों दे स्वप्नींहि न अंतराय एकरद. ॥ (आश्रम. ४.२५)
(२३) गुरुभक्तांचा महिमा पापांत महागजांत हरिसा हो. ।(आदि. १.३५)
(२४) श्रीकर माथां असतां, बहु काय च्छत्र ? काय बा ! चमर ? । (द्रोण. ६.७४)
(२५) ताप सरे, पाप हरे, ऐक अरे ? **सदुपदेश** सर्व खरे, ।
ह्मण रामकृष्ण शंकर गोविंद मुकुंद देवदेव हरे. ॥ (अवतार. ३०३)
(२६) ह्मणवील काय लोहाकरवींही कधिं तरी परिस हाय ? ॥ (सभा. १.६९)
(२७) जरि पापदेशवासी तरि न करी पाप सर्वजन कांहीं; ।
नित्य खळांतचि असतां साधु खळांच्या गुणा शिकत नाहीं ॥ (कर्ण २९.४७)
(२८) पंकांत पद्म न मळे, काकांच्या दुर्गुणा शिके न पिक, ।
चंदन परगंध न घे, होय तृणामाजि तृणचि काय पिक ? (कर्ण. २९.४८)
(२९) कीं मृत्तिकेंत मृगमदसंयोगें रसिकसेव्य वास वसे. (हरिवंश २२.१२२)
(३०) करिजे घनीं स्वमाथां पडतां भंगार्थेही कृपा परिसें. ॥ (कर्ण. ४६.४६)
(३१) स्पर्शमणि सुवर्णचि करि, जरि भंगायासि लोह आदळतें. । (हरिवंश २२.५०)
(३२) न जळेचि पद्मराग ज्वलनीं, तत्तेज मूल्य बहु वाढे. ॥ (ऐषिक. ३.९)
(३३) वारिदपंक्ति जसें जळ,**सज्जनसंगति** तसेंचि सुख विखरी; ।
मातेपरिस शतगुणें सच्छरणागति जनासि सुखवि खरी. । (अश्व. १.११०)

(३४) विसरति अपकारातें, उपकारातेंचि **साधु** आठविती. ।
बा ! सोसितां न सा विति होय वपु, न सोसितां न आठ विती. ॥ (आश्रम.२.१०८)
(३५) आत्माहि उपेक्षावा, परि रक्षावाचि बोल संतांनीं; ।
झाला भक्तमनोरथ न गुरुजनीं, कीं न फोल संतांनीं. ॥ (द्रोण. ३.३)
(३६) बव्हर्थ, जनमनोहर, स्वल्पाक्षर, मधुर, सत्य बोलावें; ।
ज्या **सद्वाक्य**श्रवणें बुध श्रोत्यांचेंचि शिरहि डोलावें. ॥ (ब्रह्मो. ११.४६)
(३७) स्वल्पचि रसिकमत वदति; बहुत लिहुनि काय कवि कथा पिकती ? । (द्रोण. ५.५४)
(३८) सद्वृत्तीस खळाच्या धाकें न कदापि साधु सोडील; ।
चोरभयास्तव लोभी जन कोण बरें धनें न जोडील ? ॥ (दत्तदयो. ६५)
(३९) न मथितिल खळा, तरी हे भुज केले व्यर्थ काय हो पीन ? (द्रोण. १२.६७)
(४०) अद्भुत कर्म करुनिही बा ! न वदति एकही वच **नयज्ञ** ॥ (विराट. ४.२६)
(४१) कर्पूर **कुशल** वाहे नेत्रीं, जड लोक कांकरा वाहो. । (द्रोण. ६.८३).
(४२) बाहेर गमे नीरस परि अंतर मधुर पूत पणसाचें. (उद्योग. ७.२४)
(४३) शिरतां चित्त अधर्मीं, वारावें आपणासि साधूंनीं. ॥ (हरिवंश. ७.९)
(४४) जे **साधु** सत्पदीं स्थित, ते वाङ्मात्रे न दूषिले जाती;
माती कोठें न मदें, खळ घेती करुनि आपुली माती. ॥ (हरि. ११.२९)
(४५) संत विवेकी करिती पाहुनि अधिकार जी दया साजे. ॥ (दत्त. ७०)
(४६) वेंचिति परोपकारीं सर्वस्व, अनित्य जीवितहि संत; ।
वचनाची काय कथा ? जोडिति सयश अनंत मतिमंत. (दत्त. ९०)
(४७) सत्पदरजीं जसा जन, गांगींहि न होय पट तसा धुवट, (दत्त. ९५)
(४८) सत्पुरुषचरणदर्शन होतें बुडतां भवार्णवीं बेट. (ब्रह्मो. २.२७)
(४९) हरिभक्तच्छल करितां तत्काळ उलेल कां न नीचोर ? ।
निश्चय सद्धन हरितां निजमार्ग भुलेल काननीं चोर. ॥ (विराट. १.११४)
(५०) **सत्पुरुषकथा** अद्भुतरसदा, म्हणतों हिलाच सुरभी मी. ॥ (द्रोण. १२.१६०)
(५१) सच्चरित अप्रगल्भहि हृदयहर, जसें स्वधीन तोकवच. ॥ ( विराट. ३.३० )
(५२) हरिजनकथेंत शिरतां न विशंकावे शुकादि संन्यासी. ॥ ( विराट. ७.२३ )
(५३) स्वल्पाहि हरिकथा करि तृप्त हरिजना बुधा समग्रास; ।
ताता होय भरविला बाळें एकहि सुधासम ग्रास. ॥ ( हरिवंश. १.८ )
(५४) **रीति दहांची हे** कीं पहिले समजाविती लहानातें. ॥ ( उद्योग. १.३८ )
(५५) करुनि **विचार** करावें, जें काय मनास मानलें करणें. । (हरिवंश. २२.२४)
(५६) सुहृदुक्ता हितकामें, धनकामें जड म्हणों नये परिसा. ॥ ( उद्योग. ३.३ )
(५७) मृत्युपरीस **परिभवा**पासुनि बहुतचि मिती, परि भवातें ।
प्रार्थुनि मागति पुत्रच्छात्रापासुनि भले परिभवातें. ॥ ( उद्योग. १३-१७२ )
(५८) प्रेमभरचि विकळ करी **धीरा,** न तसा पडोनि नगहि वर. ॥ (भीष्म. १२.७५)

(५९) **ज्ञानेंचि** जना हो, न प्राप्त वयें केवळ स्थविरता हो ! ॥ ( उद्योग. १०.२२ )
(६०) वर्षोष्णसह जटिल वर, तरि काय बहुत तसें वनीं न वट ? ॥ ( उद्योग. १०.३२ )
(६१) **तेजःप्रमाण आत्मा,** तत्वज्ञांस प्रमाण न वय जनीं. ॥ ( आदि. ३३.८९ )
(६२) जेथें बळगुण तो **गुरु,** शूर बळा मानिति न कुलशीला; ।
गुणहीन शाल्मलि वृथा, लघु न म्हणति भजति साधु तुळशीला. ॥ (आदि.२५.६२)
(६३) शूराच्या तटिनीच्या ठेविति सुगुणीं, न मन कवि प्रभवीं; ।
भजति स्वगुरुत्वेंचि, न पाहति कुलशील कनकविप्रभवीं. ॥ ( आदि. २५.६३ )
(६४) **सत्यें** हा रवि तपतो, सत्यें भूमि प्रतिष्ठिता जाण, ।
सत्यांत पुमर्थ सकळ, सत्यचि जीवासि पवितनुत्राण. ॥ ( हरिश्चंद्र. २.३२ )
(६५) सत्यबहिष्कृत नर जो पितृवनसम वर्जनीयता पावे, ।
पूर्वज सर्व निवावे सत्यें, अनृतें करुनि तापावे. ॥ ( हरिश्चंद्र. २.१५ )
(६६) तोचि **ब्राह्मण** जेथें क्षांति, दया, दान, सत्य, तप, शील. ॥ ( वन. ६.२६ )
(६७) हृदय नवनीत तुमचें (=ब्राह्मणाचें), वचन क्षुर, आमुचें वचन लोणी, ।
चित्त क्षुरचि; सहज गुण लोकीं केला न अन्यथा कोणी. ॥ (आदि. २.९७)
(६८) क्षत्रियहृदय क्षुरसम, जाणतसे द्यावयाचि हे शापा. । (आदि. २.९६)
(६९) **शुचिनिश्चयाहुनि** अधिक अमृतरस नसे परासु ताराया. ॥ ( वन. १३.८९ )
(७०) धनदाचीहि नसे मग अन्याची काय **निस्पृहा** परवा ? ॥ ( कर्ण. २९.३१ )
(७१) अप्रिय परि पथ्य असें **वक्ता श्रोता**हि दुर्लभ स्पष्ट, ।
बहु सुलभ प्रियंवद जे वाढविती चुकविती न ते कष्ट. ॥ ( सभा. ४.४२ )
(७२) मरण रुचे **वीराला,** न रुचे क्षणमात्र अपयशें मळणें. ॥ ( कर्ण. ४०.७० )
(७३) मागें वरुण, पुढें हरि, उजवा यम, आणि यो धनद डावा, ।
किंबहुना क्षोभो जग, मानधन **कुलीन योध** न दडावा. ॥ ( गदा. १.२५ )
(७४) केलें स्वयें **सुपात्रीं** स्वधनाचें **दान** होय तें शिवद. ॥ ( अश्व. ३.३४ )
(७५) कष्टें जोडुनि, देउनि कोण अकार्यास **धन** वृथा दवडी ? ( आश्रम. २.९८ )
(७६) व्हावें कशास तें बा ! आप्तांचीं जें न करिल **धन** काजें ? ॥ ( आश्रम. २.११० )
(७७) जाळी ज्वलन, न बोले, न वदेचि जरि प्रकाश करि तरणी; ।
न वदोनि **कुलज** पुरुषहि आले स्वयशःप्रकाश करित रणीं. ॥ ( विराट. ४.३९ )
(७८) कुलजाचें आयकिलें सत्यचि, मिथ्या न, चरित कानांहीं. । (हरिवंश २२.९९)
(७९) बहु कर्म करी **पंडित,** कथनावसरींहि थोडकेंच वदे. ॥ ( विराट. ५.४७ )
(८०) टपतो **सुकीर्ति**ला बहुतर तेंवि न सुप्रभाव रमणीला. ( विराट. २.५३ )
(८१) शोभा यशेंचि, न असी लोकीं धृतदिव्यकुंडलें कानें; ।
जोडुनि अयश न व्हावें पितृहृदयीं अग्निकुंड लेकानें. ॥ ( वन. १४.११ )
(८२) मरतीच, न दाखविती पाउलहि पळोनि तोंड लेक विल्या; ।
म्हणती सद्यःकीर्तिप्रज्ञाग्नस्पर्शी तोंडलें कवि ह्या. ॥ ( विराट. ३.५१ )

(८३) वरितां अकीर्ति न रुचे रंमेसी हरिसही पळ विलास. ॥ ( विराट. ३.५८. )

(८४) जसि कीर्ति सदा हरिस, न तसि आवडली नवी रमा नवरी; ।
स्वांतःपुरांतही जो गतकीर्ति करी न वीर मान वरी. ॥ ( विराट. ६.१८ )

(८५) कुलजा यशचि, न विधिसहि बहुमत हरिनाभकंज यापरिस. ॥ ( उद्योग. ३.५१ )

(८६) **राज्यश्री**मदिरेच्या निवृत्ति कवणासि हो दिली पानें ? ।
त्यजिली कां भरतानें ? त्यजिली तैसीच कां दिलीपानें ? ॥ ( उद्योग. ३.४५ )

(८७) **कन्यादानीं** करि जो विघ्न, असुनि आयु, तो चचे नर कीं. ।
वदले मन्वादिस्मृतिकार, 'महापातकी पचे नरकीं.' ॥ (हरिवंश २२.१०४).

(८८) हे कन्याकृतिचितान्हदिनीशत; तरति सर्व तात न या. (द्रोण. ४.४७).

(८९) विदुर म्हणे 'जो आस्तिक, गुरुवेदोक्तीं जयास विश्वास, ।
मीपण ज्यासि न शिवलें तो **पंडित**, मान्य होय विश्वास; ॥ ( उद्योग. ३.९० )

(९०) दुर्लभवस्तु न वांछी, न करी जो नष्ट वस्तुचा शोक, ।
आपत्तींत न मोहे, त्या पंडित म्हणति जाणते लोक; ॥ ( उद्योग. ३.९१ )

(९१) गलिताहंकृति जाणे बंधा मोक्षासि, अनुभवीं चढला, ।
तो पंडित, इतर नव्हे जरि पुष्कळ सर्व शास्त्रही पढला. ॥ ( मंत्रभाग. ११.४०० )

(९२) विद्या नसोनि उद्धत, धन नसतां जो उदारपण वाहे, ।
अर्थासि नीचकर्मे जो संपादावयासि जन पाहे ॥ ( उद्योग. ३.९२ )

(९३) नसतां लाभ यशाचा, दाटूनि करी परार्थ जो यत्न, ।
मित्रार्थी कपट करी, तो साक्षात् **मूढजनशिरोरत्न.** ॥ ( उद्योग. ३.९३ )

(९४) मित्रत्व दे अमित्रा, जो मित्रद्वेष दुष्टकर्म करी, ।
तो **मूर्ख** असें म्हणती पुरुषपरीक्षा कळे जयांसि बरी. ॥ ( उद्योग. ३.९४ )

(९५) जो हरिपुढें करिल गज, होऊनि **मदांध** काननीं चेष्टा, ।
प्राप्ता दशा तयाला होइल तत्काळ कां न नीचेष्टा ? ॥ (हरिवंश. २३.७).

(९६) **निर्वीर्यत्व चिकित्सासमर्थी** आलें चिरार्जितीं अगदीं. ॥ ( उद्योग. ६.१९ )

(९७) **कर्म** कसें टाकावें ? जी अमृत मुखांत मायसी ओती, ।
ती सद्विद्या कर्मत्याग न करितांचि फळवती होती. ॥ ( उद्योग. ३.५४ )

(९८) रविशशिलोकपतिधराप्रमुख सकल कर्मसिद्ध हें समज; ।
कर्मजल तृप्तिदायक वाटे नैष्कर्म्य जेंवि पळस मज. ॥ ( उद्योग. ३.५५ )

(९९) **क्षत्रिय**शरीर जें जें पात्र सुशस्त्रा न आमयातें हो. ।
हा पक्कविचार, तुह्मी ह्मणतां कां व्यर्थ आम यातें हो ! ॥ ( भीष्म. ११.६२ )

(१००) व्हावें शस्त्रेंचि रणीं वीरांचें गलित न वपु रोगानें. ॥ ( भीष्म. ११.६१ )

(१०१) साधूंसि बाहुजांचा मत विजय जसा, तसाचि वध मत रे; ।
निजधर्माश्रित न बुडे, निजधर्मच्युत कधीं न अधम तरे. ॥ ( उद्योग. १०.४० )

(१०२) सोडावें कुलजांहीं जीवित समरीं, न शस्त्र सोडावें, ।
मोडावें आप्तवचन, अयश शरीरार्थ केंवि जोडावें ? ॥ ( द्रोण. २३.२३ )

(१०३) जा, आहेसि क्षत्रिय, भांड, न अभिमान सांड, गा! साच।
स्वर्ग असे, काळमुखीं व्हायाचा काय सांडगासाच. ॥ ( उद्योग. ९.४६ )
(१०४) समरीं जरि न मरावें, तरि रोगक्षीणकाय गेहगत ?।
सुक्षत्रियासुत मरति शयनावरि पडुनि काय गे! हगत ? ॥ ( स्त्री. ६.१९ )
(१०५) शय्येवरि न पडाया योग्य, रणक्षितिवरीच हा काय. ॥ ( विराट. ३.४४ )
(१०६) न क्षत्रियें त्यजावी चापलता, जेवि यष्टि अंधानें. । (हरिवंश. २२.३८)
(१०७) शरशयनींच निजावें हा क्षत्रियधर्म मुख्य बहु शुद्ध,।
बहु जन्मार्जित पुष्कळ निर्मळ पुण्यद्रुमैकफळ युद्ध. ॥ (कर्ण. २७.४५)
(१०८) आह्मां वीरांसि नसे सुगतिप्रद अन्य युद्धसम यज्ञ. ॥ (कर्ण. २७.५०)
(१०९) नसतां **धुरंधर** वृषभ बाळवृष भरें करूनि आ वांके. ॥ ( द्रोण. १.४ )
(११०) **मृत्यु** असो, परवंचन करुनि सुधेच्या जिणें नको पानें. ॥ ( वन. ४.६३ )
(१११) मृत्यु हरितसे समर्या अमरांसहि कवण मृत्युला चुकवी ? ( द्रोण. ४.९ )
(११२) न रडति **अनित्य** जाणुनि जातां सुत दार वपुहि सवसु कृती. ॥ ( द्रोण. ६.१७ )
(११३) भावंड बुद्बुदांचें **वपु** अतिनिःसार मित्र फेसाचें. ॥ ( द्रोण. २०.६५ )
(११४) **संसृतिनदींत** कालावर्ती पावोनि कोण जन्म तरे ?। (द्रोण. ६.६६)
(११५) हांसत **कर्म** करावें **भोगावें** रडत तेंचि परिणामीं. ॥ ( वन. ११.८० )
(११६) **दुःखावरि सुख**; शोभा मग, मुक्ता प्रथम वेध सुत नाकीं. ॥ ( स्त्री. १.१९ )
(११७) जातां परार्थही बहु तापातें पावली सुरामा ती,।
न करील कां पित्याची दुर्गतिची माउली **सुरा** माती ? ॥ ( विराट. १.५९ )
(११८) ती श्रीची, कीर्तीची, पुण्यधींची करी सुरा माती. ॥ ( हरि. ४१.३५ )
(११९) वंध्येतें भजतां जरि फळ, तरि येईल यश **कुनीतीतें**. ॥ ( शल्य. ३.५४ )
(१२०) कोणाचें आचरतां लोकांत उरेल उर कुनीतीतें ? ॥ ( उद्योग. ४.१०७ )
(१२१) **नीतींत** तसें खळमन, जेंवि नळींत श्वपुच्छ सा मास. ॥ ( उद्योग. ३.३२ )
(१२२) गुड निदिजे तदधिके खंडे, परि कोणत्या गुणें लवणें ? ॥ ( कर्ण. ॥ ४२.३१ )
(१२३) सिंहासि द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ?।
कां श्रमलासि ? कसा त्वां जय पावावा रणात उरणा रे ? ॥ ( विराट. ४.४५ )
(१२४) **निंदित जन** होय मलिनपटसा शुचि, रजकसाचि खळ मळतो. ॥ (गोपीगोडवा२५)
(१२५) फारचि बरी निरयगति, **परवशता** शतगुणें करी जाच. ॥ ( विराट. १.५६ )
(१२६) कीं **कुलवती**स गुरुजनभजन न घडतां जिणें वृथा वाटे. ॥ ( आश्रम. ३.३ )
(१२७) धर्मत्यागें न घडे स्त्रीस, तसे कुलजमतिसही शर्म. । (हरिवंश. २३.१८)
(१२८) साध्वीदर्शन दुर्लभ अशुचिजनाला; करीं बरें स्मरण. । (आदि. १.८६)
(१२९) प्रेमें पतिचरणासि न देउनि, दे हात तायिताला जे।
ते स्त्री न रुचे पतिला, कीं तीतें आततायिता लाजे. ॥ ( वन. ६.६१ )
(१३०) पतिपरमेश्वरचरणा जी तत्सेवार्थ न नवशी करणें।
ती **मुग्धा** कैशी गे! वळवील स्वामिमन वशीकरणें. ( वन. ६.६३ )

(१३१) हे स्त्री नव्हे प्रतिष्ठा तुमची, जरि हीस सोडितां पाणी, ।
'धर्मे चार्थे च' असें वदलां कां प्रथम जोडितां पाणी ? ॥ ( विराट. १.१०० )

(१३२) भुलविल गंधें रुचिर **स्त्री** मूर्तिमती सुरा, न राहो ती; ।
दुःसह कामविकार स्त्रीरत्नास्तव सुरा नरा होती. ॥ ( विराट. १.१७७ )

(१३३) पतिजवळि कलत्र न ये का हो ? सिद्धाश्रमांत सावज ये. । ( उद्योग. ९.६५ )
(१३४) स्त्रीयोगे पुरुषाचे साधिति धर्मार्थकाम, सत्या गी. ॥ ( मदालसा. २.५६ )
(१३५) पळविति विवेक, वळविति, भ्रमविति नारी क्षणीं शुचितमातें. ॥ ( ब्रह्मो. ७.१४ )
(१३६) संतानोत्पादन जरि निंदित, केलें कशासि संतांनीं ? । (आदि. ४.८)
(१३७) जेंवि बहु **कुपुत्राचें**, न फणीचें तेंवि दे वपु त्रास. ॥ ( कृष्णामाहात्म्य. ४.३४ )
(१३८) गुरुमत जतन करिति जे त्यांलाचि **सुपुत्र** म्हणति जन तज्ज्ञ. ॥ (कर्ण. ३४.२१)
(१३९) वंध्यत्व लिहो भाळीं विधिचें कदपत्य न करकंज लिहो. ॥ ( आश्रम. २.५३ )
(१४०) सत्पुत्राला द्यावें धर्मज्ञे सर्व आपुलें वित्त. ॥ ( हरिवंश. २.१० )
(१४१) विंध्यासि मेरु, मेरुसि विंध्यचि जाणे, न अन्यनग नीच. ॥ ( कर्ण. २७.१७ )
(१४२) समयीं स्फुरेचि **गुरुनें** जें कथिलें करुनियां कृपा शास्त्र. ॥ ( कर्ण. ३३.४० )
(१४३) श्री **गुरु**चे उतराई व्हाया नमनाविणें उपाय नसे. ॥ ( शांति. ४.२३ )
(१४४) गुरुवर सारथि ज्याचा, त्यासी भांडुनि म्हणेल अमरप हा ! ॥ (उद्योग. १३.११८)
(१४५) 'स्वर्गपद, ब्रह्मपदहि, किंबहुना मोक्षपदहि, सोडावें, ।
**श्रीगुरुपद**चि ह्मणति कवि, 'सर्वस्वार्पण करूनि जोडावें. ॥ (द्रोण. २२.१५)

(१४६) सिंही नव्हेचि यद्यपि बाळनृपसुसत्कृता तथापि **शुनी.** ( कर्ण. ३८.१३ )
(१४७) संगासि उर्वशीच्या स्वप्नीं तरि काय गा ! ढवा लाहे ? ॥ ( विराट. १.१३३ )
(१४८) प्राणा मुकेल इच्छुनि सिंहीचे गजहि सबहुमान मुके; ।
कां न मुके कोल्हा ? कां छी म्हणतिल त्या **जनाधमा** न मुके ? ॥ (विराट. १.१३९)

(१४९) कोण करिल तें **प्रायश्चित्त** कसें, जें अनंत पातक वी ? । ( कर्ण. ४२.५८ )
(१५०) झाला पश्चात्ताप, प्रायश्चित्तांत मुख्य हा होय; ।
यापरि पवित्र न करी पापिजनां देवसिंधुचें तोय. ॥ ( ब्रह्मो. २२ )

(१५१) संपादिलें श्रमें जें व्यसनीं देतेंचि आश्रया **शास्त्र.** ॥ ( कर्ण. ४७.१० )
(१५२) मन **मातेचें** चिंतुनि अगुणाहि मृता मुलास कळकळतें. ॥ ( स्त्री. ३.९ )
(१५३) न म्हणेल काय माता व्हावा लोकांत आत्मज न नीच ? ।
रक्षील, धर्म रक्षुनि, जी ती भलतीहि आत्मजननीच. ॥ ( उद्योग. ११.२२ )

(१५४) माता आपण भागे, लागोंचि न दे मुलासि परि वारा. ( वामनचरित्र. १६० )
(१५५) पट्ठ, **पथ्य** गदापूर्वी, पूरापूर्वीच साधिती सेतु. ॥ ( स्त्री. ५.५० )
(१५६) कवि ह्मणति, 'कवन तैसें बहु उद्योगेंहि धन जसें मिळतें' ।
जितुकेंच मिळायाचें, अधिक मिळेनाचि एकही तिळ तें. ॥ (हरिवंश–मुखपृष्ठगीति)

(१५७) **वनवासें मुक्ति** अशी येऊं देऊं मनीं नको लहरी; ।
झाले मुक्त खग, हरिण, वृक, जंबुक कां वनीं न कोल, हरी? ॥ (शांति. ३.३६)
(१५८) उघडील जी **कपाट स्वर्गाचें** ती जिवीं धरावि किली. ॥ (अश्व. ३.५९)
(१५९) **ममकार** अहंकार त्यागुनि होशील मुक्त गेहींच; ।
भव, अपवर्ग, मम, न मम, हे दोघे नांदतात देहींच. ॥ (शांति. ३.५१)
(१६०) सर्वेहि मुमुक्षु म्हणतो जे **ममता** हेचि होय मम कारा; ।
यास्तव आधीं अंजलि जोडी, सोडीच तोय ममकारा. ॥ (शांति. ३.५३)
(१६१) ज्याच्या मनांत लेशहि शेष वसे कायविषयलोभ, वनीं ।
बाह्यद्रव्य त्यागुनि गेला नाहीं, वसेचि तो भवनीं. ॥ (शांति. ३.५६)
(१६२) सत्संगशाणनिशितें विद्याशस्त्रेंकरूनियां ज्यांहीं ।
ममताद्रु तोडिला, बा! नाहीं भय या भवीं तया कांहीं. । (मदालसा. ६.३०)
(१६३) युक्तचि **मरणाराला** हितपरिणामहि न सोसवे काढा. ॥ (आदि. ९.३९)
(१६४) मरणाऱ्या रोग्याला काय करिल जाणता भला वैद्य? ॥ (सभा. २.३७)
(१६५) **पक्का बुद्धि** करितसे सुयशाची वृद्धि, मृत्तिका काची. ॥ (विराट. १.१००)
(१६६) बहु तप करितां तापस धन्य नव्हे, **धन्य** करिल जो जतन. ॥ (आदि. ११.८१)
(१६७) ते धन्य पुरुष धर्मी नेणति आयास, भीति, आळस जे. ॥ (द्रोण. १२.१५४)
(१६८) स्वजनपरित्राणाहुनि अन्य व्रत मत नसेचि आर्याला. ॥ (द्रोण. १३.२०)
(१६९) योग्य श्रितावनाक्षम, कीं परमासाध्यरुज हिरा खाया. ॥ (द्रोण. १३.३८)
(१७०) **पाळकतापहरत्वें** मान जडा, अन्यथा नसे व्यजना. ॥ (विराट. २.४८)
(१७१) जों जों दुर्लभ तों तों सस्पृह वित्तेच्छु होतसे **वित्तीं**. ॥ (आदि. २४.२४)
(१७२) निज **नीचपण** प्रकटवि तें श्वान भल्यावरीहि भुंकोन. ॥ (सभा. ४.८५)
(१७३) नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवासि न स्वकर्मातें. ॥ (कर्ण. ४९.१)
(१७४) **कवि**स रुचे घालावें विषयसुख करूनी घोर तप डावें; ।
**मूढा**सि आवडे बहु जेवुनि सस्त्रीक घोरत पडावें. ॥ (आश्रम. ४.३९)
(१७५) तो **काचा** स्पर्शमणि त्यागुनि जो काय वेंचितो काचा. ॥ (द्रोण. ४.६३)
(१७६) बापास बाप न ह्मणे ऐशाला काय होय आजोबा? ॥ (वन. १.६५)
(१७७) मूर्त नरक, नरकविच्या हृदयाला जो **कृतघ्न** तो गमला. ॥ (उद्योग. १०.८३)
(१७८) ती यातना न नरकीं होय, कृतघ्नास जी नरा धामीं. ॥ (उद्योग. ११.२४)
(१७९) **संसार** दो दिवसांचा यश जोडी जो कुलीन तोचि तरे, ।
घ्यावें बरें ह्मणोनि स्वपरमुखे तें कुलीनतोचित रे, ! ॥ (सभा. १.७६)
(१८०) नांदे सुखें सदोदित संसारीं तोचि, जो अनय न करी; ।
न निघे, इतर जन बुडे व्यसनीं, पंकीं जसा अनयन करी. ॥ (द्रोण. १२.७५)
(१८१) भूत पुरुष सप्त तसे भावीही सात जण असे चवदा, ।
वदतां **अनृत** बुडवितो; याकरितां साधु हो! खरेंच वदा. ॥ (सभा. ५.१०६)

(१८२) लज्जाफलार्थ कैसा गुरुकर्णीं अनृत शब्द पेरावा ? ॥ (विराट. ६.५५)
(१८३) 'जे स्वर्गीं यज्ञांहीं संपादित असति रम्यतम लोक, ।
अनृतें ते सर्व बुडति,' धर्मज्ञ ह्मणति, 'घडे परम शोक. ॥' (हरिवंश. २२.१००)
(१८४) संसारी **सुवचाचें ग्रहण**, जसें संगरांत वर्माचें. ॥ (शल्य. १.३४)
(१८५) बहु पूज्य **सत्यवादी** त्रिजगीं उपमान त्या नसे कांहीं. ॥ (कर्ण. ४१.३६)
(१८६) धर्मन्यायोचित जें तेंचि **सुभाषण** मनास उद्धव दे. ॥ (विराट. ४.५३)
(१८७) सदसि परिस्फुट शब्दचि कार्य कराया समर्थ सदसिपरी. ॥ (उद्योग. ३.८)
(१८८) एक्या **सदुक्तिनें** जी सुगति घडे, ती न कोटि शिबिकांहीं. ॥ (भीष्म. १.८)
(१८९) सोडूं नये **प्रतिज्ञा**, धर्म नसे सत्यभाषणापरिस. ॥ (सप्तशती)
(१९०) **संसर्गींही** भोगिति, दोषीच न दोष आपुले भोगी ॥ (आदि. ३.२)
(१९१) देतो सकुटुंबाही **पापरता** नरकपात कीनाश. ॥ (विराट. २.२)
(१९२) आपणचि भारवाही बुडतो, बुडवी, कुळासि अघवाही. ॥ (वन. १२.१९)
(१९३) सोडावीच **कुसंगति** सर्वार्थदकायपाळणारांनीं; ।
स्वर्गपरें पुत्राचा बांधावा काय पाळणा रानीं ? ॥ (द्रोण. १२.१२७)
(१९४) पावेलचि भंगातें प्रभुहि, जरि धरिल पक्ष सदरीचा. ॥ (आदि. ७.४८)
(१९५) लाभ नसे, ताप वसे, ज्यामध्यें तो कुसंग सोडावा. ॥ (सभा. ७ ८)
(१९६) न **कुसंततितें**, द्यावें आलिंगन ताविल्या पहारेतें. ॥ (उद्योग. ५.९५)
(१९७) साप डसे एकासचि, **सद्द्वेष्टयाच्या** कुळासि पाप डसे. ॥ (वन. २.९)
(१९८) न जळेचि पद्मराग ज्वलनीं, तत्तेज मूल्य बहु वाढे. ॥ (ऐषिक. ३.९)
(१९९) व्यसनीं भल्यासि पाडी **दुष्ट**, गजा जेंवि पिहितमुख खळगा. ॥ (उद्योग. ६.६)
(२००) **भावि** प्रबळ; भ्रमतो सर्वहि, बालिश असो, असो सुकवी, ।
होणार सत्पथींही दिवसाही डोळसासही चुकवी. ॥ (आदि. ५.४६)
(२०१) होतां स्व**दैव** विपरीत, निजाप्तमित्रें ।
होताति केवळचि हेतुविना अमित्रें. ॥ (कुशलवो. ४.६१)
(२०२) ज्या लाभ हानि जेथें, नेतो बांधूनि काळ दाव्यानें. ॥ (कर्ण. ४७.६१)
(२०३) अनुकूळ काळ होतो तेव्हां बळ, बुद्धि, तेज, यश देतो; ।
प्रतिकूळ तोचि होउनि माघारें दत्त सर्वही घेतो. ॥ (मौसल. २.८४)
(२०४) अनुकूळ दैव असतां न समर्थ करावयासि हानि यम; ।
होतां तें प्रतिकूळ प्रबळहि दुर्बळचि होय हा नियम. ॥ (द्रोण. १६.१५)
(२०५) विधिहृतमति जन हरवुनि करग अमृत फळहि, साधितो हिरडे. ॥ (वन. ४.२७१)
(२०६) बलवत्तर विधि देतो थोराला थोरल्याचि तापातें; ।
इंद्रप्रमुखसुरांसहि जें भावि न लंघवेचि बापा ! तें ॥ (उद्योग. २.२३)
(२०७) दैवत्यक्तासि शके न सखा, न पिता, न माय ताराया. ॥ (द्रोण. १२.७३)
(२०८) आयुष्य, भाग्य, भोग, स्त्री, पुत्र, द्रव्य, हे पदार्थ जसे ।
दैवें पावति उदया, विलयाही पावती क्षणांत तसे. ॥ (ब्रह्मो. १४.१५)

(२०९) **क्रोध** असावा समयीं, केवळ वश चित्त न क्षमेला हो. ॥ (वन. २.५२)
(२१०) धर्माधर्म हिताहित इत्यादि विचार कायसा कुपिता. (स्त्री. २.२१)
(२११) ढाळितिल जाळितिल हिमहेममया **कामकोपलोभ** नगा. ॥ (आश्रम. २.२८)
(२१२) बुडतो, सर्व बुडवितो लोभी, क्रोधी तसाचि नर कामी. ॥ (द्रोण. २२.२१)
(२१३) **कामांध** खळ करीना, अन्य करी लेश तरि विवेक पिसा. ॥ (वन. ९.१४)
(२१४) अर्थ अपरिहार्यचि जो झाला गेला वृथाचि हा **शोक**; ।
शोक सफल जरि असतां, मेल्याला उठविते न कां लोक? ॥ (स्त्री. ३.७३)
(२१५) निजहित**लोभें** धरितो शिशुहि मुखीं एक, अन्य थान करीं. ॥ (विराट. ३.४८)
(२१६) भ्रमवी, श्रमवी, मळवी, पळवी सत्कीर्तिला **दुराग्रह** रे! ॥ (उद्योग. ९.८)
(२१७) बा! **दुरभिमान** न बरा देइल धनपतिकरींहि खर्पर हा. ॥ (उद्योग. ९.७३)
(२१८) **कामें, कोपें, लोभें** नागविलें अमित, यांस जे भुलले; ।
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीरही उलले. ॥ (उद्योग. ९.७२)
(२१९) मी, माझे, हें घातक, लागो या आजि आग **मोहा**ला; ।
न मनांत अहंममताभ्यधिका लोकांचिया गमो हाला. ॥ (द्रोण. १.४०)
(२२०) बहु **काम, कोप, लोभ**चि खर; न प्रळयाग्नि, तपन, यम राया! (द्रोण. १५.३३)
(२२१) येइल बहूपचारें वंध्योरसिजाग्नि काय ओलावा? ॥ (उद्योग. १.२०)
(२२२) होईल श्रीहंसी हे हंस त्यजुनि वायसा मान्य? ॥ (उद्योग. १.१३)
(२२३) मारुतिभंग घडेल प्रचुरचणकचर्वणोद्धता प्लवगा? ॥ (उद्योग. ४.३७)
(२२४) वाचाळनीचसख्यें न फळ, जसें वंध्यदारशुष्करतें. ॥ (उद्योग. ४.३८)
(२२५) झालें दीप्त अलातें जें गेह विझेल काय हाहांनी? ॥ (उद्योग. ४.८२)
(२२६) सोडुनि सदन्न सेविल कोण सुधी अशुचि वाळके तुकडे? ॥ (उद्योग. ११.४८)
(२२७) न रविपुढें मिरवेसें चंद्रींहि, कसें असेल बळ भगणीं? (उद्योग. १३.४२)
(२२८) पुष्कळ वाढेना कां विध्य, नव्हे पात्र रत्नसानुजया. ॥ (भीष्म. १.६२)
(२२९) वृद्धहि सिंह महामदमत्ताही काय गा! ढळे नागा? । (भीष्म. १.७८)
(२३०) करिल कसें मांजर? जें दुष्कर हरिहनन काज वाघास; ।
न शकति अग्नि विधु, कसा दिनमणिचा करिल काजवा घास? ॥ (आदि. १२.२५)
(२३१) आकार सम दिसे, परि सरडा पावेल काय नक्रतुला? ॥ (अवतार. २००)
(२३२) सुख व्हावें तरि, **धर्मा**प्रति ह्मण 'माथां वसे, नसे दूर'; ।
पूजा कैची लोकीं, जरि दगड शिरीं धरी न संदूर. ॥ (आदि. ९.५८)
(२३३) निज धर्मचि संसारीं मुक्तीचे हेतु, सूनु गुंतीचे. ॥ (स्त्री. ३.८)
(२३४) रक्षील धर्म समयीं धरिती त्याचाचि भरंवसा सुकवी. ॥ (सभा. ४.१०२)
(२३५) धर्मन्याय त्यजितां तेजस्वीही तमीं न रविहि तरे. ॥ (वन. २.९२)
(२३६) जें धर्मनीति करितें राजहित, करी न उग्र सेना तें. ॥ (शल्य. १.३५)
(२३७) बापा! धर्माच्या तों कोणीं सोडूं नयेचि कासेतें; ।
निष्फळ होती मेघें त्यजिलीं आलीहि जीविका सेतें. ॥ (वन. २.८१)

(२३८) सर्वहि नीच प्राणी धर्मातें संकटीं बरें पाहे ।
याहे अनयस्रोतें भलतेचिकडे सुखी असें आहे. ॥ (गदा. १.७७)
(२३९) भुजबळ देतें जय तरि कविनीं नयधर्मबळचि कां गावें ? (शल्य. ३.४०)
(२४०) होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव हो ! । (वन. १३.२७)
(२४१) धर्मासि न अनुमोदिति जे त्यांची आप्तता वृथा; पर ते. ॥ (आश्रम. ३.४५)
(२४२) देती सामग्री जय, तरि कां सन्नीतिला गुणी वरिते ? ॥ (विराट. (५.३७)
(२४३) धर्मन्यायविरोधें कोणाचेंहि न इष्ट साधेल. (उद्योग. ४,१५)
(२४४) ये धर्मचि; पुत्र, स्त्री, कोश, रथ, तुरग, करी न सांगातें. ॥ (भीष्म. ११.२६)
(२४५) धर्मरतिविना वानरजन्मांतचि कां न जन्म नर मोजी ? ॥ (द्रोण. ५.८७)
(२४६) धर्माच्याचि बळानें सद्विद्योत्पत्ति होतसे स्पष्ट; ।
तेव्हां नुरे अविद्या जीस्तव बहु जीव पावतो कष्ट. ॥ (हरि. ५४.६३)
(२४७) **श्रद्धा**चि करितसे हित धर्माचें, जेंवि माय तनयाचें; ।
जप, तप, मख, गुरुपूजा मुख्य श्रद्धाचि आयतन यांचें. ॥ (ब्रह्मो. १७.१)
(२४८) श्रद्धेनें भजत्यातें पाषाणहि फलद होय, जो अज्ञ ।
तोही सद्गुरु होतो; अश्रद्धेनें वृथा महायज्ञ. ॥ (ब्रह्मो. १७.२)
(२४९) दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें, क्षमा न सोडावी, ।
जोडावी कीर्ति, असी **कुलरीति** तुम्हीं कधीं न मोडावी. ॥ (उद्यो. ८.६)
(२५०) सिंहीला तोचि उचित सुत, जो मारूनि सिंधुरा जाला. ॥ (उद्योग. १०.४७)
(२५१) **अयशस्कर तोक** पळहि मळवाया धाम वा ! न रांगावें; ।
जरि न गमेचि, तरि सुखें चित्ररचित रामवानरां गावें. ॥ (उद्योग. १०.५५)
(२५२) **सुजना**सि विभीषणता रुचते, **कुजना**सि कीं दशाननता, ।
अनता जना शिवे रे संसारीं ओखटी दशा, न नता. (भीष्म. ६.२४)
(२५३) वांकेल ताजव्याचें भारावांचून काय बा ! परडें ? (द्रोण. १.४१)
(२५४) कांसेसि लागल्याचें क्षुद्र अलावुहि करूनि अवन तरे. ॥ (द्रोण. ७.७६)
(२५५) शोकीं **आप्तसमागम** विषतरुचा जेंवि भरविला पाला. ॥ (द्रोण. ८.३३)
(२५६) ज्या वाटेनें गेले गुरु, धरिती छात्र त्याचि वाटेतें. ॥ (द्रोण. ११.३४)
(२५७) **मूलमहत्त्व** न हरिलें मोठ्या झाल्या तथापि टीकांहीं. ॥ (द्रोण. २३.७६)
(२५८) अप्रियकारि जनाचा अणुमात्र धरूं नयेचि विश्वास. (हरिवंश २.८८)
(२५९) चुकल्या जनासि कोणी सांगुनि निजहित, पथासि जो लावी, ।
धनदेंहि **उपकृतीशीं** त्याच्या निजसंपदा न तोलावी. ॥ (हरि. ३.८२)
(२६०) **योगाभ्यासीं**च, धरुनि आत्मसुखप्राप्तिकाम लागावें. ॥ (हरि. ३.८६)
(२६१) जीर्णाचे केश जिरति, जीर्णाचे जिरति सर्वहि दंत, ।
परि जीर्णाच्या **जीवितधनवांछा** ज्या तयां नसे अंत. ॥ (हरि. ५.१७)
(२६२) आर्तांच्या भीतांच्या देतातचि हाक **शूर** हाकेला. ॥ (हरि. १०.२१)

(२६३) अभिषेकें जों ओले अलक शिरीं तोंचि आर्य आधीतें ।
वाळुनि, **प्रकृतीचें रंजन** जें करिति कार्य आधीं तें. ॥ (हरि. ११.१४)
(२६४) बहुतांचें संकल्पित जें तें होतेंचि निश्चयें कार्य; ।
**बहुजनहितार्थ** मृत्युहि जयचि असें ह्मणति सर्वही आर्य. ॥ (हरि. २३.४८)
(२६५) आ लेकरूं करी जें, घालावें मधु तयांत कीं आलें ? ॥ (हरि. २६.६१)
(२६६) पतिच्या छंदें केलें व्रत तप जें काय सर्व तें फळतें ॥ (हरि. २६.६५)
(२६७) सुहृदुक्त युक्त कटुही, ओखद बाळासि होय जेंवि हित. ॥ (हरि. २७.१०३)
(२६८) न करावें **परिणामीं तापप्रद** जें मनास देहास. । (हरि. २७.१०४)
(२६९) जें वारिरुह सुरस दे, वाळुनि त्या काय मधुकरी परते ? ॥ (मंत्रमय भाग. ४५)
(२७०) घालिति **परार्थ**चि धवलतर यश लक्षुनि, न आंग जन कास. ॥ (हरि. ३५.७९)
(२७१) भूतद्रोहिजनाश्वीं घालीच **विपत्ति**वीर पल्याण. ॥ (गोपीगोडवा. ४१)
(२७२) **गणिकास्पर्शें** होतें क्षीण यशः पुण्यपुंजही जळती. ॥ (कुश. १२.३२)
(२७३) ज्वरितांसि शर्करा जशि, कटु होय **खळासि** सुरसही **कविता**; ।
शिष्टा पद्मां सुख दे, दुष्टां घूकांसि ताप दे सविता. ॥ (प्रश्नो. ७७)
(२७४) ज्या शाणघर्षणादिक संस्कार, चढे गुणासि तोचि **मणी**. ॥ (हरिश्चंद्र. ५.३९)
(२७५) स्वप्नींहि **परस्त्री**तें न शिवे ऐसें करी अधीन मन; ।
गोविप्राश्वत्थांचें न चुकों द्यावें तुवां कधीं नमन. ॥ (मदालसा. ५.२३)
(२७६) **सावध** सदा असावें संसारीं, स्वहितकृत्य लक्षावें, ।
पुरुषार्थाचें साधन वा ! धनसें हें शरीर रक्षावें. ॥ (ब्रह्मो. ११.३४)
(२७७) निर्दोष जे तयांची चित्तांत कधीं करूं नये शंका; ।
प्राणहि वेंचुनि रक्षी वृद्धा, बाळा, सुदुर्बळा रंका. ॥ (ब्रह्मो. ११.३६)
(२७८) त्यजुनि पथ वनीं शिरतां सांपडतो स्पष्ट हा दवा, खातो ।
कीं व्याघ्रादिक, पावे कीं कंठकविद्धपाद वाखा तो. ॥ (ब्रह्मो. ९.४१)
(२७९) तो **आप्तोत्तम**, कामा ये जो धांवोनि अवसरीं विषमीं. ॥ (अमृत. १.६२)
(२८०) जें सन्मार्गप्रचारें करुनिच असतें संग्रहीं **पुण्य** हो ! तें ।
सर्वव्यापन्महीध्रप्रशमनविषयीं वज्रवत् दक्ष होतें. ॥(कुशलवो. ४.८४)
(२८१) यश, सुख, पुण्य मिळे मग बंधूनीं कां न नीट नांदावें ? ॥ (आदि. ३६.२४)
(२८२) **सद्रसना** जसि विनती तसि न करी औरसींहि माय किव. ॥ (ब्रह्मो. ४.२१)
(२८३) खळ निंदिति, म्हणुनि बुधे टाकावी काय हरिगुणासक्ति ? ।
दीरनणंदाजाचें साध्वी न त्यागिती सुपतिभक्ति. ॥ (मंत्ररा. उप. ५)
(२८४) विशुद्ध स्वांताला रुचति गुण पीयूषसम जे, ।
परी त्यांतें दुष्ट स्वमनि विष ऐसेंचि समजे; ॥
घृतें क्षीरें होती प्रमुदित मखीं निर्जर खरे; ॥
परी तेही तापप्रद रस जयाला ज्वर भरे. ॥ (मंत्ररा. उप. ९)

(२८५) संतत सज्जनसेवन, सत्क्षेत्रनिवास, सत्कथाश्रवण, ।
यांहीं युक्त प्राणी **पश्चात्तापी** न जाहले कवण ? ॥ (ब्रह्मो. २२.२४)
(२८६) ह्री, सत्य, धर्म, आर्जव जिकडे; तिकडेचि कृष्ण जाणावा; ।
**जिकडे प्रभु तिकडे जय** जाय; न लागे स्तवूनि आणावा. ॥ (उद्योग. ५.७९)
(२८७) निद्राभंग बरा, परि न बरा आवश्यक **क्रियालोप.** ॥ (आदि. ५.१००)
(२८८) गुण वावडींस, सुदृढ **प्रेमाचि** स्त्रीस आवरायाचा. ॥ (आदि. ११.४५)
(२८९) स्पष्ट हिताहित कथिता जो होय, सहाय तोचि रायास, ।
प्रियवाक् नर कीं नरकीं भोगवितो भोगितो चिरायास. ॥ (सभा. ४.४४)
(२९०) **सदतिक्रम** करिल कसा जो धर्मन्याय गुरुमुखें पढला ? ॥ (वन. ३.३७)
(२९१) **सच्छळकर्म** स्वल्पहि सद्यःक्षयहेतु जेंवि गर-वारी. ॥ (वन. ८.३७)
(२९२) कलिमाजि लघुत्वप्रद शक्तीस, तसेंचि **नीच** कावेस. ॥ (विराट. १.१४१)
(२९३) उघडहि निधी **अभाग्या,** न दिसे मलिना जनासि अत्रिज गा !॥ (विराट. २.२३)
(२९४) **भेद** नसावा बुध हो ! भेदें स्वयश न परांसि ओपावें. ॥ (विराट. ४.५५)
(२९५) जो सोडिला **दयेनें** पावेल ध्रुवपदा न वेदांतें. ॥ (उद्योग. ५.५४)
(२९६) **अशुचिस्पृष्टा सच्छ्री** म्हणवि भली तापल्या पहारेतें. ॥ (उद्योग. ५.९०)
(२९७) ज्यांनें मन सच्छ्रुतिमतपथ सोडुनि दुष्पथीं कदा न रते, ।
पावति भगवंताच्या जाणुनि **सद्भक्तिनें** पदा नर ते. ॥ (उद्यो. ५.८६)
(२९८) (श्लो०) प्राप्तप्रौढत्व सिंहीतनय न पळही क्रोष्टृयूथीं वसेल. ॥ (कृष्णविजय ५५.३४)
(२९९) ........................................ **विश्वंभर** ।
**त्राता** होय जयास काय करिती विघ्ने तया शंभर ? ॥ (कृ. वि. ५५.४१)
(३००) ओपा योगाग्निमध्यें तनुहि, परि न हा (=ईश्वर) **भक्तिवांचूनि** सोपा ॥
(कृ. वि. ५८.१६)
(३०१) ........................................ दृष्टि निवळे ।
न ज्यांची, त्या रोग्यां दिसति दरदुग्धेंदु पिवळे ॥ (कृ. वि. ६१.२)
(३०२) ........................................ त्या माकडा ।
पाजी दुर्मति मद्य, दे खळ **पिशाहातीं स्वयें कांकडा.** ॥ (कृ. वि. ६१.९)
(३०३) हंसातें हांसिलेही, तरी **गुणयश** तें नाशिलें काय काकीं ? ॥ (कृ. वि. ६१.१९)
(३०४) ज्या जाणेंचि नसे किमर्थ पुसतां **ग्रामाचिया त्या पथा** ? ॥ (कृ. वि. ६५.१९)
(३०५) जो सिंधूसि तरे सुखें भुजबळें तो कां न डोहा तरे ? ॥ (कृ. वि. ६६.१६)
(३०६) कोल्यानें हरि रांधिला **विधिबळें,** भ्याला शिखी गांधिला ! ॥ (कृ. वि. ७७.१६)
(३०७) दुष्टाचारीं क्षमा ती निजविमलयशीं स्पष्ट दावील हानी. ॥ (कृ. वि. ६८.३)
(३०८) तेज दुःसहचि सिंहशावकीं, दाहशक्ति जसि अल्पपावकीं. ॥ (कृ. वि. ६८.१२)
(३०९) आप्तीं आप्तांस, लावी व्यसन न कर जों तों, बळें जागवावें. ॥ (कृ. वि. ६८.२१)
(३१०) पादत्राणहि कीं शिरीं सुमुकुटस्थानीं पहातें चढो, ।
वांछि विप्रसभेंत बैसुनि पदीं शूद्र श्रुतीतें पढो. ॥ (कृ. वि. ६८.२६)
(३११) करिति कुमति प्राणत्रात्याञ्चिया अवमानना, ।
न निरखिति या साठीं ज्ञाते कधीं अवमानना. ॥ (कृ. वि. ६८.३५)

(३१२) कूपाला दोष कैंचा नुघडुनि नयनें पाडितां अंधकारा ? ॥ (कृ. वि. ७०.१०)
(३१३) दीनीं देव दया करी तसि, जसी मातापिता नंदनीं. ॥ (कृ. वि. ७३.९)
(३१४) स्वामी ज्याचा न ठाके मृगरिपुसमरीं यूथ वांचेल काय ? ॥ (कृ. वि. ७६.१०)
(३१५) ईशक्षोभ करी तृणासि अशनी हें बोलती जाणते. ॥ (कृ. वि. ७८.२०)
(३१६) सिंध्वंतींहि बुडोनि शुष्क असिजे पोटीं शिळापर्वतें. ॥ (कृ. वि. ७८.१७)
(३१७) केलें जें **ईश्वरें** तें शुभचि, कुशलधी शोचती कां अतीता ? ॥ (कृ. वि. ७८.२२)
(३१८) मोहुनिही करी बद्ध न, **सज्जन** तत्पदचि, भाग्य लक्ष्मीचें, ।
ज्यास न वेंच, नवेंच प्राभव दे, नुरवि लौल्य पक्ष्मींचें. ॥ (कृ. वि. ८१.४९)
(३१९) ने **वित्तमद** श्वभ्रा, तापवि परि निर्धना यदा दभ्रा ।
बा करुणेच्या अभ्रा ! श्री दासी संपदा करी बभ्रा. ॥ (कृ. वि. ८१.५५)
(३२०) दयित ब्राह्मण मजला (=प्रभुला) कौस्तुभ हा दृष्टिमणि खरें समज, ।
जगदिष्ट श्री प्रियहि स्वचतुर्भुजरूप हें तसें न मज. ॥ (कृ. वि. ८७.७३)
(३२१) अमृतप्रद परमेश्वर 'माग' ह्मणे, त्यासि मागतो गरळ. ।
परळ श्रीमंतातें मागे हतविधि, शिजे कसा हरळ ? ॥ (कृ. वि. ८८.२०)
(३२२) संकट पतिव्रतेचें पतिव्रतेनेंचि कीं निवारावें, ।
नौकेनें नौकेला बुडतां यादोनिधींत तारावें. ॥ (कृ. वि. ८८.४८)
(३२३) रणयज्ञीं भूपाला व्हावें अंगें सहाय भूपानें, ।
सागरतृषा हरावी कैसी स्वादूदकेंहि कूपानें ? ॥ (कृ. वि. ८८.४९)
(३२४) **पूज्यातिक्रम** करितो जो तो हो मर्त्य कीं सुर क्षेमी ।
नोहें कधींच आंगें असमर्थ तयाचिया सुरक्षे मी (=प्रभु). ॥ (कृ. वि. ८८.८१)
(३२५) जी ती **कथा** सुखाची सरिता हरिताप तापस श्रोते ।
कवि मीन आंत बाहिर दिसति विचारें परस्परां हो ! ते ॥ (कृ. वि. ८९.२४)
(३२६) नवल हरिकथा सरिता वाहविति स्थिति न मोडिती दूर, ।
आधीं बुडविति मग तन्नेत्रात भरे हळुहळु पूर. ॥ (कृ. वि. ८९.२५)
(३२७) **प्रभुचीं** अमितें **चरितें** जरि तें यश वर्णितां नसे अंत, ।
गातां दुर्गति चुकवी सुकविप्रिय हेंचि वर्णिती संत. ॥ (कृष्णविजय ८९.१००)
(३२८) **गुरु** हरिहर; बहु तरले गुरुचरिताच्या करूनि पठनातें. ॥ (उद्योग. १३.५७)
(३२९) कैसाहि असो **गुरु**, बहुमान्यचि चित्तें हि लंध्य न भल्याला, ।
पूज्यचि दक्षमखांतक जरि अस्थि भुजंग भस्म नभ त्याला. ॥ (उद्योग. १३.१५०)
(३३०) **गुरुचरणा**वरुनि सदा ओवाळुनि सांडिती असु ज्ञाते, ।
सुज्ञा हरिहरसे जे गुरुचरण, न मानती असुज्ञा ते. ॥ (उद्योग. १३.१५२)
(३३१) गुर्वनुमतें स्वधर्माचरणें कवि करिति कुळसमुद्धरण. ॥ (भीष्म. १.६८)
(३३२) गुर्वाशीर्बळवर्जित जो क्षणहि उभा न तो टिके शवसा. ॥ ६९ ॥
(३३३) भंगेल गुर्वपूजक साधुनि देईल गर्ग होरा जा (=ज्या) ॥ ७१ ॥
(३३४) सुगुरु सुशिष्यसुवश, कीं सुस्त्रीवश सुबहु मन्मथ नरा जा (=ज्या). ॥ ८७ ॥
(३३५) जे जे गुरुभक्तिरसिक ते न भ्रमले पडोनि संत तमीं. ॥ ९५ ॥

# परिशिष्ट-ट.

## मोरोपंती मंडळ.



(ग्रंथप्रसिद्धकर्ते, संपादक, टीकाकार,
भक्त वगैरे)

(श्लोक) 'तरंगिणी तथा वाणी
पुरस्थानपि भूभृतः ।
तिरस्कृत्य समभ्येति
रसिकं रसवाहिनी ॥'

(गीति) 'समलंकरोति काव्यं सुकविः
कुकविश्च तदुभयं काव्यम् ।
अनलं तनोति चित्ते सहृदय-
हृदयं प्रविष्टमात्रं चेत् ॥
सदसि चमत्कारकरश्चतुर-
तरश्चित्रबाणसंधाने ।
कोशधरोऽप्यर्थपरो रसेश्वरो
जगति जयति कविराजः ॥

(विठोबा अण्णाकृत सुश्लोकलाघव
४५६,४५३,४४०)'



(भावार्थ) नदी व वाणी ह्या दोघीही रसवाहिनी (जलाला, पक्षीं नवरसांना वाहणाऱ्या) आहेत. त्या जवळच्या भूभृतांचा (पर्वतांचा, पक्षीं राजांचा) तिरस्कार करून रसिकाजवळ (रसिकपुरुषाजवळ, पक्षीं समुद्राला) प्राप्त होतात. ४५६ सुकवि व कुकवि हे दोघेही काव्याला 'समलंकृत' (सम्+अलंकृत=उत्तम रीतीनें शोभित, पक्षीं स+मलंकृत=दूषित) करितात; त्यांचें अर्थात् सुकविकुकवींचें–काव्य सहृदय मनुष्याच्या अंतःकरणांत प्रविष्ट होतांच 'अनलं करोति' ह्मणजे सुकविपक्षीं अन्+अलं ह्मणजे पुरेसें वाटत नाहीं; ह्मणजे सुकवीचें काव्य कितीही ऐकिलें तरी आणखी ऐकावेंसेंच वाटतें; कुकविपक्षीं अनल ह्मणजे अग्नि त्यासारखें संताप देणारें होतें. ४५३. उत्तम कवि हा जगांत राजाप्रमाणें जय पावतो. राजा हा रसेश्वर (रसा+ईश्वर) पृथ्वीपति असून सुकवि हाही नवरसांचा स्वामी असतो. राजा कोशधर (भांडारगृहाचा स्वामी) असतो, तसा सत्कवीही अमर, हैम, मेदिनी, विश्व इत्यादि कोशांचा स्वामी असतो. राजा अर्थपर (द्रव्याच्या ठिकाणीं तत्पर) असतो, तसा उत्तम कवि हा शब्दार्थयोजनेविषयीं तत्पर असतो. राजा सदसिचमत्कारकर म्हणजे सत्+असि अर्थात् उत्कृष्ट तरवारीचा चमत्कार (युद्धांत) दाखविणारा अर्थात् मोठा शूर तरवारबहाद्दर असतो, तर कविवर्य हा सदसि ह्मणजे (विद्वानांच्या) सभेंत चमत्कारकर ह्म. स्वरचित काव्याची चमत्कृति दाखविणारा (रस, अलंकार, गुण इत्यादि काव्य-

साहित्यानें आपलें काव्य किती खचून भरलें आहे तें दाखविणारा ) असतो. तसेंच राजा विचित्रशरसंधानाविषयीं अतिशय चतुर असतो व कविश्रेष्ठ हा चमत्कारिक बाण ह्मणजे शब्द त्यांच्या योजनेविषयीं ह्मणजे मार्मिक, हृदयस्पर्शी काव्य करण्याविषयीं फार कुशल असतो.

सूचनाः—मोरोपंतांच्या काव्याचे मार्मिक रसज्ञ असे कीर्तनकार, कवि, लेखक, निबंधकार, ग्रंथप्रकाशक, व त्यांचे अनुकूल प्रतिकूल टीकाकार अशांपैकीं कांहींजणांचीं नांवें पुढें दिलीं आहेत. या शिवाय ज्यांचीं नांवें देणें योग्य असून तीं चुकून राहून गेलीं असतील त्यांची आह्मी मनःपूर्वक क्षमा मागतों.

**१ कीर्तनकारः—**



(गीति) अतिचित्रकलापातें उभवुनि
आर्यांस दे महाश्चर्य, ।
हरिदासकीर्तनगणीं बहु शोभे
तो **मयूर** कविवर्य. ॥

(१) चातुर्मासे संत विठोबादादा (समकालीन)
(२) चातुर्मासे मैराळबोवा (समकालीन)
(३) ताहराबादकर महीपतिसुत विठोबा (समकालीन)
(४) सोलापूरकर कविप्रवर रामजोशी (समकालीन)
(५) फलटणकर आत्मारामबुवा ( समकालीन )
(६) तुकाविप्र ( समकालीन )
(७) मटंगे नागेश्वर महादेव ऊर्फ नागेशकवि नंदिकेश्वरचरित्र या १८४ आर्याबद्ध काव्याचे कर्ते
(८) वुंडे वामनबुवा इंदापूरकर
(९) नासिककर त्र्यंबकबुवा
(१०) परांजपे गोविंदबुवा नासिककर
(११) वऱ्हाडकर बजाबा हरिदास
(१२) सागरकर हरिदासबुवा
(१३) रहिमतकरबुवा
(१४) पन्हाळकर गोसावी (निरीच्छ प्रेमळ हरिदास)
(१५) ओतुरकर पांडुरंगबुवा (पंतशिष्य)
(१६) पांडुरंग बोवाचे शिष्य सखारामस्वामी
(१७) चाकणकर गुजाजी
(१८) मसुरकर काशीनाथबावा
(१९) नागपुरकर दादाजी हरिदास
(२०) नागपुरकर गोपाळजी हरिदास
(२१) पातुरकर कृष्णबुवा
(२२) ढोले रामकृष्ण गोविंदबुवा
(२३) ब्रह्मनाळकर यशवंतबुवा
(२४) औंधकर पंतप्रतिनिधि बाळासाहेब बी. ए. सरकार
(२५) पटवर्धन डॉक्टर
(२६) चिंचणेरकर महाभागवत मुकुंदबुवा सातारा.
(२७) भागवत विनायकबुवा काशी.

(२८) जोशी बालहरिदास रामचंद्र पुरुषोत्तम पुणें
(२९) कुळकर्णी शंकर बळवंत बी. ए. एल्. एल्. बी.
(३०) काळे श्रीपाद विनायक
(३१) आठले रामचंद्र नारायण
(३२) चंवडे बाळकृष्णबुवा काशी
(३३) दांडेकर रामचंद्रबुवा
(३४) शिरवळकर रामचंद्रबुवा
(३५) वाशिमकर लक्ष्मणशास्त्री
(३६) सुरतकर रामचंद्र विष्णु दशपुत्रे.
(३७) सांगलीकर बंडुबुवा बाळकृष्ण
(३८) काशीकर गोपाळ बाळकृष्ण हरिदास
(३९) मुरुडकर बुवा पुणें
(४०) भिडे सदाशिवशास्त्री मुंबई
(४१) तांबे गणेश दत्तात्रय सातारा
(४२) तांबे सदाशिव धोंडो ऊर्फ तांबेशास्त्री
(४३) पाठक गोविंद त्र्यंबक पुसद.
(४४) कट्टी नारायण बिंदु अकोला
(४५) पुसदकर गोविंद त्र्यंबक शास्त्री
(४६) अभ्यंकर विनायकशास्त्री
(४७) वामनबुवा केमकर.
(४८) गाडे डाक्टर गोविंदराव वर्धा
(४९) कोटणीस हनुमंत पांडुरंग सांगली.

**२ ग्रंथ प्रसिद्धकर्तेः—**



(मासिकपुस्तकांचे प्रसिद्धकर्ते व संपादक)

(१) ढकले माधव चंद्रोबा (सर्वसंग्रहकार) (जन्म १८२५ मृत्यु १८८५)
(२) साने काशीनाथ नारायण बी. ए. ('काव्येतिहाससंग्रह'कार)
(३) मोडक जनार्दन बाळाजी बी. ए. (जन्म इ. स. १८४५ मृत्यु १८९०) ('काव्येतिहाससंग्रह'कार व 'काव्यसंग्रहाचे संपादक)
(४) चिपळूणकर विष्णु कृष्ण बी. ए. (जन्म इ. स. १८५० मृत्यु १८८२) ('काव्येतिहाससंग्रह'कार व 'निबंधमाला'कर्ते)
(५) तेंडुलकर बाबाजी अनंत ('मयूरकवी'चे प्रसिद्धकर्ते)
(६) ओक वामन दाजी ('काव्यसंग्रहा'चे संपादक) (जन्म इ. स. १८४५ मृत्यु १८९७)
(७-९) चौधरी जावजी दादाजी ( जन्म इ. स. १८३९ मृत्यु १८९२ ), चौधरी तुकाराम जावजी, चौधरी पांडुरंग जावजी } काव्यसंग्रहाचे प्रसिद्धकर्ते.
(१०) भानु चिंतामण गंगाधर बी. ए. ( काव्यसंग्रहसंपादक )
(११) केळकर नारायण चिंतामण बी. ए. (काव्यसंग्रहसंपादक)
(१२) भिडे बाळकृष्ण अनंत बी. ए. (काव्यसंग्रहसंपादक)
(१३) के. व्ही. लक्ष्मणराव एम्. ए. (कर्णपर्वाचे संपादक)
(१४) पंडित शंकर पांडुरंग एम्. ए. (जन्म इ. स. १८४० मृत्यु १८९४) (बृहद्दशमाचे संपादक)
(१५) पंत पराडकर रामकृष्ण दत्तात्रेय बी. ए. ( 'मोरोपंताचे समग्र ग्रंथ' याचे प्रकाशक )

(१६) ओक दामोदर केशव बी. ए.
('सभापर्व' व 'द्रोणपर्व'यांचे संपादक)

(१७) डुबे शिवराम तानबा बी. ए.
(संस्कृतमंत्ररामायणाचे संपादक)

## ३ केकावली सार्थ प्रसिद्धकर्ते.



(१) तर्खडकर दादोबा पांडुरंग (जन्म १८१४ मृत्यु १८८२) सुप्रसिद्ध 'यशोदापांडुरंगी' (इ. स. १८६५) टीकेचे कर्ते व व्याकरणकार

(२) गोडबोले परशुराम बल्लाळ (जन्म इ. स. १७९९ मृत्यु १८७५) 'नवनीत'कार व 'केकादर्श'कार (इ. स. १८६७)

(३) जोशी रामचंद्र भिकाजी 'शालापत्रक' कार व व्याकरणकार.

(४) चोणकर माधव रामकृष्ण (इ. स. १९१६)

(५) बोरवणकर

(६) घाणेकर

(७) केळकर केशव सदाशिव

(८) वेहेरे नारायण केशव एम्. ए. एल्. टी.

(९) श्रीरामदासानुदास

अनिर्दिष्ट—

केकावली इ. स–१८५८,१८८८,१८९०
केकावली टीकेसह. का वा. १८७७
बा. आ. कं. १८८८
केकार्थसूचिका–वि. ना. ता. १८७४
सार्थ केकासंचय–के. बा. व. १८७३

## ४ निबंधकार व लेखक.



(गीति) 'गुंफुनियां अष्टोत्तरशतरामायण-
मालिका गळां घाली ।
प्रभुच्या, अशी हिच्याविण
वाणी जन्मास कोणती आली ? ॥

झाला पद्ययुगाचा अंत
परत्रीं **पराडकर** जातां, ।
माध्यान्हीं गद्याचा आहे
सूर्य प्रवेशला आतां. ॥

(महाराष्ट्रजनविज्ञापना. गं. रा. मोगरेकृत)'

(१) हंस मल्हार बाळकृष्ण (मोरोपंतावरील निबंधाचे कर्ते) मयत.

(२) पांगारकर लक्ष्मण रामचंद्र बी. ए. ('मोरोपंती वेंचे' व 'मोरोपंताचें चरित्र' या सुप्रसिद्धग्रंथाचे कर्ते व संतचरित्रकार.

(३) गुंजीकर रामचंद्र भिकाजी (जन्म इ. स. १८४३ मृत्यु १९०१) (विविधज्ञानविस्तारकार)

(४) पंडित हरि माधव (जन्म इ. स. १८४९ मृत्यु १८९९) (स्वनामनिर्देश न करितां विविधज्ञानविस्तार, काव्यसंग्रह, शाळापत्रक इ. मासिकांतून मोरोपंतांवर लेख लिहिणारे विद्वान् कवि टीकाकार)

(५) परब काशीनाथ पांडुरंग (जन्म इ. स. १८५२ मृत्यु १९०४)

(६) भागवत राजाराम रामकृष्ण (जन्म इ. स. १८५१ मृत्यु १९०८. ('अलंकारमीमांसा'कार व नलदमयंतीकथार्याचे व 'भीष्मभक्तिभाग्य' प्रकरणाचे स्पष्टीकरण करणारे)

(७) ओक विनायक कोंडदेव(बालबोधकार) मयत.

(८) केळकर नरसिंह चिंतामण बी. ए. एल्. एल्. बी. ( 'मोरोपंताचे समग्र ग्रंथ' यांतील प्रस्तावनालेखक )

(९) परांजपे शिवराम महादेव एम्. ए. ( 'मोरोपंताचे समग्र ग्रंथ' यांतील प्रस्तावनालेखक )

(१०) पोतदार दत्तोपंत प्रोफेसर, बी. ए. ( मोरोपंताचे समग्र ग्रंथ यांतील प्रस्तावनालेखक )

(११) बनहट्टी श्रीनिवास नारायण एम्. ए.

## ५ मोरोपंती वळणावर काव्यरचना करणारे लेखक.



(श्लोक) 'कवि मयूर पिसें बहु टाकुनी ।
विगत होय यशा भुवि ठेवुनी ॥
बहुत तीं लुटुनी शिरिं खोंविती ।
रुचिर तीं दिसती यमकें किती? ॥
(रेव्हरेंड नारायण वामन टिळक-काव्यकुसुमांजलि अंक १ ला, २२)'

(१) मोगरे गंगाधर रामचंद्र

(२) लेले गणेश त्र्यंबक नासिककर

(३) लेले लक्ष्मण गणेश

(४) पाध्ये दामोदर गणेश एम्. ए.

(५) महाजनि विष्णु मोरेश्वर एम्. ए.

(६) कानिटकर गोविंद वासुदेव बी. ए. एल् एल्. बी. ('संमोहलहरी'कार पृथ्वीछंदश्लोक १२१)

(७) पाळंदे भास्कर दामोदर (जन्म इ. स. १८३२ मृत्यु १८७४)

(८) पटवर्धन गणपतराव हरिहर ऊर्फ बापूसाहेब कुरुंदवाडकर (गणेशपुराणार्या ११०० यांचे कर्ते)

(९) फणसे केशव विश्वास

(१०) खानवलकर गंगाधर नारायण (रामदासचरित्रकार)

(११) केरीकर विठ्ठल (विठ्ठल नृसिंह) (शुकरंभा, गजगौरीव्रत ७६, कबीर व वामन यांच्या चरित्रांवर आर्या रचणारे)

(१२) धुंडिराज ( प्रऱ्हादचरित्रार्या ५७, यांचे लेखक )

(१३) धुंडिराजपुत्र मोरेश्वर ('चंद्रावल्याख्यान'कार आर्या १०१)

(१४) ढवळे परशुराम बल्लाजी (गुरुचरित्रावर आर्या ३७८३ यांचे लेखक)

(१५) तंजावर सर (टी) माधवराव (जन्म इ. स. १८२८ मृत्यु १८९१) (यांनीं केलेल्या आर्या मार्गे सुधारकांत छापिल्या होत्या)

(१६) जोशी चिंतामणि (गोपीचंदाख्यान, गीति १८२ व सीतास्वयंवर गीति ९० हीं आख्यानें रचणारे)

(१७) आठल्ये कृष्णाजी नारायण माजी-एडिटर केरळकोकिळ व एडिटर लोकमित्र खानापुर)

(१८) नारायण कवि ('शिवमोहिन्याख्यान' या ३७ आर्यात्मक प्रकरणाचा कर्ता)

(१९) भास्कर कवि (गणपति स्वयंवराख्यानाचा कर्ता. पद्यें संकीर्ण २१०)

(२०) उषास्वयंवर व गयगंधर्वाख्यानाचा कर्ता (उषा० संकीर्ण १५६ पद्यें, गय० संकीर्ण १२५) पांडुरंग कवि

(२१) नाईक सखोबा गोंवेकर गोपीचंदाख्यानाचा कर्ता (पद्यें संकीर्ण ११८)

(२२) नरहरि रामजन्म गीति ६५ त्रयोदशाक्षरी मंत्रात्मक

(२३) नारायणविप्र कबीरजन्मचरित्रार्या १०० यांचा कर्ता

(२४) त्रयोदशाक्षरी चतुर्मंत्ररामायण गीति ९१ यांचा कर्ता अनामकवि.

(२५) द्वादशाक्षरी भागवतमंत्र साधलेल्या 'मंत्रमय ध्रुवचरित्रा'चा कर्ता. गीति २७६ अनामकवि.

(२६) कृष्णानंदनिमग्न 'राधाविलास' गीति ६२ यांचा कर्ता

(२७) जनार्दन 'दामाजीपंत चरित्र' गीति २४ यांचा कर्ता

(२८) महाजन देवीदास लक्ष्मण नांदेडकर.

## ६ भक्त व टीकाकार.



(१) बाबा पदमनजी रेव्हरेंड कोशकार (जन्म १८३१ मृत्यु १९०६)

(२) टिळक रेव्हरेंड कवि नारायण वामन

(३) टिळक लोकमान्य गीतारहस्यकार बाळ गंगाधर बी. ए. एल्. एल्. बी.

(४) दप्तरदार विठोबा अण्णा 'सुश्लोकलाघव, गजेंद्रचंपू' इ. ग्रंथांचे कर्ते

(५) प्रासादी राजाराम

(६) जनार्दन रामचंद्रजी

(७) कानिटकर केशव बाळकृष्ण

(८) आणेराव गोविंद बळवंत बी. ए.

(९) बडवे नारायण गोविंद पंढरपुरकर

(१०) बापट गोविंद शंकर शास्त्री (जन्म इ. स. १८४४ मृत्यु १९०४)

(११) गाडगीळ गजानन महादेव

(१२) इनामदार बळवंत कृष्ण

(१३) कुळकर्णी बापूजी लक्ष्मण विंचूरकर

(१४) गाडगीळ कृष्णाजी परशुराम (जन्म इ. स. १८४७ मृत्यु १८९६)

(१५) सर मोकदम श्रीनिवास नीलकंठ वणीकर ऊर्फ अप्पाजी महाराज

(१६) तर्खडकर द्वारकानाथ राघोबा (जन्म इ. स. १८४६ मृत्यु १९०४)

(१७) देशपांडे शंकर गणेश बी. ए. एल्. एल्. बी. वकील वर्धा.
(१८) गुळवणी वासुदेव दत्तंभट
(१९) बर्वे रामचंद्र जगन्नाथ
(२०) खरे विनायक शिवराम
(२१) सबनीस दत्तात्रेय घनःश्याम
(२२) शिंगणे मोरो गणेश
(२३) कर्वे मोरेश्वर वासुदेव भिवंडीकर
(२४) पटवर्धन श्रीधर गणेश वसईकर
(२५) पंडित बळवंत मनोहर सोलापुरकर
(२६) गोसावी शिवराम बाबाजी
(२७) तेंडोलकर देवराव केशव
(२८) कानिटकर वामन हरी बी. ए.
(२९) ताह्मन केशव गोपाळ एम्. ए. महामहोपाध्याय 'गुमानी' कविकृत 'पुराणनीतिमाले'चे भाषांतरकार.
(३०) मोडक वामन आबाजी बी. ए. (जन्म इ. स. १८३५ मृत्यु १८९७)
(३१) आपटे हरि नारायण
(३२) रानडे शंकर मोरो बी. ए. (जन्म इ. स. १८५०–१८९९)
(३३) जोशी आनंदीबाई डॉक्टर (जन्म इ. स. १८६५ मृत्यु १८८७)
(३४) कानिटकर काशीबाई.
(३५) साठे अच्युत सीताराम एम्. ए. बी. एल्.
(३६) बापट नागेश विनायक
(३७) लोंढे मोरो गणेश
(३८) पटवर्धन वासुदेव बळवंत बी. ए. माजी प्रिन्सिपाल फर्ग्युसन कॉलेज पुणें.
(३९) श्रीखंडे मथुराबाई
(४०) कुंटे माधव मोरेश्वर बी. ए. (जन्म इ. स. १८३५. मृत्यु १८८८) 'राजा शिवाजी' कर्ते.
(४१) जोशी वि. बा. कन्नडकर.
(४२) चिपळूणकर कृष्णशास्त्री (जन्म इ. स. १८२४. मृत्यु १८७८)
(४३) रानडे न्यायमूर्ति माधव गोविंद एम्. ए. एल्. एल्. बी. (जन्म. इ. स. १८४२. मृत्यु १९०१.)
(४४) विलसन डाक्टर

## मोरोपंतांची प्रभावळ.

### (७) मोरोपंतांचे ग्रंथ उदयास आणून लोकप्रिय करणारे कांहीं प्रसिद्ध लेखक व प्रकाशक.



(१) डुकले माधव चंद्रोबा 'सर्वसंग्रह'कार (जन्म. इ. स. १८२५, मृत्यु. १८८५)
(२) मोडक जनार्दन बाळाजी ('काव्यसंग्रह'-कार, 'काव्येतिहाससंग्रह'कर्ते) (जन्म. इ. स. १८४५, मृत्यु. १८९०)
(३) ओक वामन दाजी ('काव्यसंग्रह'कार) (जन्म. इ. स. १८४५, मृत्यु १८९७)
(४) तर्खडकर दादोबा पांडुरंग ('यशोदा-पांडुरंगी'चे कर्ते) (जन्म. इ. स. १८१४, मृत्यु १८८२)

(५) पंडित हरि माधव ('काव्यसंग्रह'साहाय्यक, 'विविधज्ञानविस्ताराचे टीकाकार) (जन्म. इ. स. १८४९, मृत्यु. १८९९)

(६) चिपळूणकर कृष्णशास्त्री (पंतांचे टीकाकार) (जन्म. इ. स. १८२४, मृत्यु १८७८)

(७) चौधरी जावजी दादाजी ('काव्यसंग्रहा'चे प्रकाशक) (जन्म. इ. स. १८३९, मृत्यु. १८९२)

(८) चिपळूणकर विष्णु कृष्ण ('निबंधमाला'कार (जन्म. इ. स. १८५०, मृत्यु १८८२)

(९) दप्तरदार विठोबा अण्णा सुश्लोकलाघवकार (मयत)

(१०) पंतपराडकर रामकृष्ण दत्तात्रेय 'मोरोपंताचे समग्र ग्रंथ' याचे संपादक.

(११) पंडित शंकर पांडुरंग ('बृहद्दशमा'चे संपादक) (जन्म. इ. स. १८४०, मृत्यु. १८९४)

(१२) गोडबोले परशुराम बल्लाळ ('नवनीत'-कार, केकादर्शकर्ते) (जन्म. इ. स. १७९९, मृत्यु १८७५)

(१३) भागवत राजाराम रामकृष्ण ('अलंकार-मीमांसा' कर्ते) (जन्म. इ. स. १८५३, मृत्यु. १९०८)

(१४) रानडे न्यायमूर्ति माधव गोविंद (जन्म इ. स. १८४२, मृत्यु १९०१)

(१५) हंस मल्हार बाळकृष्ण (मोरोपंतावरील निबंधकार) मयत.

(१६) पांगारकर लक्ष्मण रामचंद्र मोरोपंतांचे चरित्रकार.







# परिशिष्ट-ठ.



'पंतांची कविता आनंदजनक विचारांनीं आणि चमत्कारिक कल्पनांनीं ओतप्रोत भरलेली आहे. मोरोपंतांचीं कितीएक पद्यें स्वतंत्रपणें आनंदजनक आहेत व कितीएक एकंदर प्रबंधांत संलग्न असतांना आनंदाला प्रसवतात. तथापि भारतादि ग्रंथरचनेंतील त्यांच्या स्वतंत्र कल्पना आणि स्वतंत्र रचिलेल्या ग्रंथांतील कल्पना ह्या सर्वांचें एकीकरण करून पाहिलें असतां, मोरोपंतासारखी कवितास्फूर्ति आजपर्यंत झालेल्या कोणत्याही महाराष्ट्र कवीस नव्हती, व पंतांनीं रचिलेला आहे इतका काव्यग्रंथही दुसऱ्या मराठीभाषाकवीनें रचिलेला नाहीं हें स्पष्ट दिसतें. दुसरे, कवितेचा आत्मा जो रस तो ज्या मायेच्या आश्रयानें राहतो ती चमत्कारिक कल्पनाही मोरोपंतांच्या काव्यांत सर्वत्र भरलेली आहे. कितीएक ठिकाणीं त्यांच्या कल्पना इतक्या उज्वल व उदात्त आढळतात कीं, त्या कामांत ते नामांकित संस्कृत कवींची स्पर्धा करीत आहेत कीं काय असा भास होतों. ( हंसकृत पंतावरील निबंध— पृष्ठ ११७–११८ )'

'The language of poetry consists in imagery, description, metaphors-similies and sentiment adapted with propriety to the subject.'

( *Goldsmith* ).

सूचनाः—ही उपमांची यादी व वर्गीकरण अपूर्ण आहे. पंतांच्या काव्यांतील निरनिराळ्या विषयांवरील उपमांचें वर्गीकरण केलें असतां 'बहु कल्पना सुकविसा विजयहि बहु शरपरंपरा व्याला' ह्या पंतोक्तीप्रमाणें मोरोपंत हे महाकवि कसे ठरतात हें दाखविण्यापुरताच हा अल्प प्रयत्न केला आहे. ह्या दिशेनें मयूरकविभक्तांस उद्योग करण्यास आणखी पुष्कळ जागा आहे.

## मोरोपंतांच्या उपमाः—

**(१) अचेतनवस्तुविषयक उपमाः—**

क्षोमे द्रौणि, जसा रविकांतमणि स्पर्शतांचि तत्किरणीं ॥ १ ॥

(कर्ण. १०.६१)

भोळ्या दिगंबराचें आक्रमिलें वतन, **जळ जसें तैलें.** ॥ २ ॥ (नामार्या १०२)
**तेल जसें उत्तेजन देतें तत्काळ दीपकलिकेला.** ॥ ३ ॥
(मंत्रभागवत १०.७९८)
**न** विकत्थनरस रुचला कुलजाला काय चोखितां कुचला ? ॥ ४ ॥
(मंत्रभाग. १०.६६७)
अन्योन्यविशिखसदनीं शोभति रत्नप्रदीपसे शुद्ध. ॥ ५ ॥ ( कर्ण. १४.५८ )
क्षुब्ध कराया टाकी अरिवरि शर, जेंवि अग्न्युपरि घास ॥ ६ ॥ (कर्ण. १४.६४)
**ते** एकदांचि वर्षति शस्त्रांचे निकर, **जेंवि घन पाणी.** ।
**साहे नगसा,** ओपी धनपतिसा बाण बाणधनपाणी. ॥ ७ ॥ (कर्ण. १७.६)
बहु पेटला **धनंजय,** वरि पडतां शत्रुसैन्य तें **आज्य.** ॥ ८ ॥ (कर्ण. १७.१९)
संजय ह्मणे, सुयोधन, गिरिवरि हरिसा, रथांतरीं चढला; ।
**मानस्नेहकटाहचि** तो, **परिभवकोपपावकें कढला.** ॥ ९ ॥ (कर्ण. १८.३)
कुरुसेना **बहु कांपे पडतां शरवृष्टि फार जसि थंडी.** ॥१०॥ (कर्ण. १८.८)
तेव्हां दुर्योधन नृप सज्ज करूनि घे धनुर्लता दुसरी; ।
तींतूनि शरपंक्ति निघति, **शरयूआंतुनि जशा महा सुसरी.** ॥११॥(कर्ण.१८.९)
त्या शस्त्रांचीं पटलें त्वरित महास्त्रप्रयोगपटु कर्णे ।
लीलेनेंचि उडविलीं, **वातें गगनांत जेंवि तृण पर्णें.** ॥ १२ ॥ (कर्ण. १९.२२)
कल्पांतमेघसा तो, नर शरधारा नराधिपा ! सोडी ।
कुरुसेनेवरि पसरी शरपटला, **जेंवि भव्य पासोडी.** ॥ १३ ॥ (कर्ण. १९.२७)
मग मज पार्थांत सुकर, **जैसा क्षुब्धानिलासि अभ्रांत.** ॥ १४ ॥
(कर्ण. २०.४१)
संशप्तकांत झाला मम **जसा सागरोदरीं भेंडा.** ॥ १५ ॥ (कर्ण. ३०.२७)
**पांडववनांत पेटे दावानलसाचि कक्ष रिपु** ते जा(=ज्या) ॥ १६ ॥
( कर्ण. ३१.१५ )
**भाजा प्रतापदहनी,** ललबल हो, घस्मरांतका **हुरडा.** ॥१७॥ (कर्ण. ३१.४८)
कर्ण ह्मणे, 'तुज **सागर** भासे, मज भीम **कालवा** राया ! ॥१८॥ (कर्ण. ३२.१५)
स्नेहें लालन केलें माथां धरिलाहि मलिन वक्र **कच.** ।
तव शब्द तसा; भेदी हृदय, न दारुण असा नव क्रकच. ॥ १९ ॥ (कर्ण. ३२.१६.)
[ ही कचाची उपमा इतर ठिकाणींही आलेली आहे. ] ( आदि. अ. १० गी. ९ )
शररन्वितक्षत भूषणहेतु, **जसा रंध्रयोग मोत्यातें.** ॥ २० ॥ (कर्ण. ३२.२९)
**जरि होति कोळसे परि धनंजयीं पडति टोळ** सेना कीं ।
येथ रजीं रक्तीं वपु, तदधिक सुरतांत घोळसे नाकीं. ॥ २१ ॥ (कर्ण. ३३.३३)
**वृष्टि करीच, न राहे प्रावृड्घन जेंवि जरि भिजे सार्थ.** ॥ २२ ॥
( कर्ण. ३४.२८ )

कुरुपतिहित गुरुसुत करि परिभव, परि नृप न कुरुकटक रक्षी, ।
**गृहरक्षणा विझवितां उदकें स्नेहाग्नि जेंवि गृह भक्षी.** ॥ २३ ॥
( कर्ण. ३४.३० )

**शर** सोडिले तयावरि **गिरिवरि जैसीं पयोधरें अणें.** ॥ २४ ॥ (कर्ण. ३४.३१)
तेव्हां परपुरुष म्हणे, 'पार्था ! दिव्यास्त्र**वात** सोडावा, ।
**झोडावा, मोडावा वैरद्रुम**कर्ण, बाण जोडावा. ॥ २५ ॥ ( कर्ण. ४९.२० )
कर्णावरि बहु कोपे पार्थ जई तेधवां अनळसाचा ।
देह ज्वालामाली भासे त्या **रणमखीं अनळ साचा.** ॥ २६ ॥ (कर्ण. ४९.२१)
तुटला ध्वजचि न केवळ, विजयाचा भरवसाहि तुटला हो ! ।
सुहृदश्रुबिंदुसह तो पडला, **बळधैर्यसेतु फुटला** हो. ॥ २७ ॥ (कर्ण. ४९.४१)
तो शर **कृत्यानळसा** दुर्घटचक्रोद्धतिक्रियानळसा ।
गांठी कुरुबळविजय**प्रासादाच्या रविप्रभा कळसा.** ॥ २८ ॥ ( कर्ण. ४९.५१ )
शाणनिशितमुखबाणप्राणभृदीड्यार्क सूनुच्या अमळा ।
**खंडी नाळापासुनि कमळा मारुत तसा** शिर·कमळा. ॥२९॥(कर्ण.४९.५२)
जैसें स्वमुखींचें जळ खळबळ पळ, पळ न लागतां काढी ।
मरतांचि कर्ण, चिता भीतिहि शिरली मनामधें गाढी. ॥ ३० ॥ (कर्ण. ४९.५८)
मथिलें अहिला विजयें; **रजतांसि न पाविजे तुळा कथिलें.** ॥ ३१ ॥
(कर्ण. ४८.९)

**भस्म कराया** न लगे दवदहना फार कोप **टोळाचें,** ।
तेंवि नरास न, अहिचें **खंडन करि जेंवि तो पटोळाचें.** ॥३२॥(कर्ण.४८.१०)
स्रवला प्रेमाश्रुजळ, द्रवला पाहोनि शांतनव तो यां, ।
**जैसा प्रसवे, प्रेक्षुनि चंद्रकरा, चंद्रकांत नवतोयां** ॥ ३३ ॥
( भीष्मभक्तिभाग्य ४४ )

तें साहिलें परोपरि **परपादाक्रमण जेंवि सोपानें.** ॥ ३४ ॥ (गदा. ४.११)
सेना सर्व मिळाल्या धांवुनि अत्यंत शीघ्र दोघांतें ।
**जैशा तटिनी गंगायमुनांच्या श्रावणांत ओघांतें.** ॥३५॥ (द्रोण. १६.६१)
वरील बाह्य सृष्टींतील उपमा कितीतरी अनुरूप, उदात्त व हृदयंगम आहे !
शोक**ग्रीष्मविशुष्कीं** धर्म**सरीं** ताप बंधु**यादानीं** ।
धरिला, तो प्रशमविला भीष्म**घनें** चित्सुधेचिया दानीं. ॥ ३६ ॥ (भीष्मभक्ति. ९३)
यांतील रूपक किती स्वमंग आहे !
न शरत्काळींच्याही, ये प्रभुदृष्टिप्रभाव पुनिवेतें. ॥ ३७ ॥ (भीष्मभक्ति. १०६)
**पुण्यप्रदीप उजळी योजुनि तेथेंचि धनशरीराज्य ।**
वोंवाळीं देवद्विजपद, यासाठींच तो करी राज्य. ॥ ३८ ॥ (भीष्मभक्ति. १९०)
**चुंबक लोहासी तसा,** वेणुरवें जनमनासि आकर्षी. ॥ ३९ ॥ (अवतारमाला २६०)

परमदुरासद सर्वेहि भट, **तैलकटाह बहु जसा कढला.** ॥ ४० ॥
(मल्लारिविजय २८)

शिवकीर्ति किति स्वच्छा **अमृतनिधि ह्मणे, असी न मल्लहरी.** ॥ ४१ ॥
(मल्लारिविजय ४५)

जीचा प्रसाद वृद्धि ज्ञाना दे, **पावका जसा पवन.** ॥ ४२ ॥ (मदा. ३.१६)

तिसरेंहि 'शत्रुमर्दन' हें नाम व्यर्थ, सर्व देहांत ।
एकचि पुरुष बहु दिसे, **जैसा आदर्शजडित गेहांत.** ॥४३॥(मदालसो. ५.२८)

भुवनीं प्रसरत असतां यश सहजचि, **जेंवि वारिवर तेल.** ॥ ४४ ॥
(कर्ण. २७.२६)

परि **हृदयमृद्‌घटांतुनि उपदेशामृत हळूहळूं गळतें.** ॥ ४५ ॥
(मंत्रभाग. ६५८)

वाच्कि तुमच्या दयिता कृष्णाचें सांगतों तुह्मां, परिसा; ।
ह्मणुनि असें ज्ञान कथी **घांसी सुविशुद्धकांचनीं परिसा.** ॥ ४६ ॥
(मंत्रभागवत १०.६०४)

भक्त प्रेमें प्रभुला चालवि, **जैसें तरंडका** शीड. ॥ ४७ ॥ (पांडुरंगदंडक ४७)

असि साधु साधुपतिसीं गांठि पडे, ती **जसी अया परिसा.** ॥ ४८ ॥
(उद्योग. १.५८)

**खळमळसंसर्गास्तव न रणकर्सीं गुरुहि सैन्यहेम तरे.** ॥ ४९ ॥
(उद्योग. ४.३४)

विघरो दायादांचें बळ मन, **ढेंकुळ जसें जळीं विरतें.** ॥ ५० ॥
(उद्योग. ११.१५)

**उदकें भेंडा जैसा,** याच्या श्रवणेंचि तो विरो पापी. ॥ ५१ ॥ (उद्योग. १२.२९)

विटदृष्टि ते कलत्री भावी **स्वनखांत सूच वीरमणी.** ॥५२॥ (विराट. १.१२२)

जें कर्म **सिंधु** इतरां, मज हरिदासासि **आड** वाटे तें. ॥ ५३ ॥ (विराट. १.१७२)

उमगा बरें चतुरहो ! तो साधु तपःसमृद्धिचा **कुणगा.** ॥ ५४ ॥ (विराट. १.२१)

त्याच्या आह्मां, तेंवि न पांथा बहु धाक रात्रि गर्तोचा. ॥ ५५ ॥ (विराट. ३.३०)

**(२) अभूतोपमाः—**

शोषण जलराशीचें, संसर्पण जेंवि रत्नसानूचें, ।
अद्भुत वृषमरण गमे, कीं गगनाहूनि पतन भानूचें ! ॥ ५६ ॥ (कर्ण. ६.२)

नृपति बहु विलाप करी सूतासि म्हणे, 'अहा ! कसें घडलें ? ।
बा ! संजया ! अकस्मात् रविबिंब गळोनि भूतळीं पडलें ! ॥ ५७ ॥ ( कर्ण. ६.३. )

**(३) अयोग्य उपमाः—**

ह्मणति विभो ! भेटेल **क्षितिजेसह कीर्तिही नवी रमणी.** ॥ ५८ ॥
**( मंत्ररामायण युद्धकांड ४२ )**

**(सुग्रीवादिकपि रामसांत्वन करितांना जें वर ह्मणतात तें एकपत्नी रामाला शोभत नाहीं).**

हा पलभोजन, गूथी जसा कृमि, अघीं तसा रमे, यातें ।
मी पलमात्रें वधितों जैसा मृगकांत सारमेयातें. ॥ ५९ ॥

(रावणासंबंधीं मारुतीच्या भाषणांतील वरील गीतींतील दोन्ही उपमा अगदींच अयोग्य भासतात.)

पुनरपि ते रागानें जाउनि **गुडराशिला पिपीलिकसे**; ।
लंका व्यापुनि ह्मणती, 'खल हो ! अद्यापि वांचलेत कसे ?' ॥ ६० ॥
(मंत्ररामा. युद्ध. ३८९)

अस्थिरता जे श्रीची ते तूझ्या शत्रुजीवनीं राहो; ।
संतत कल्याण असो, **विपक्षलोकप्रतापरविराहो** ! ॥६१॥ (मंत्ररामा. युद्ध. ७५५)

(शत्रूला सूर्याची व रामाला राहूची उपमा शोभत नाहीं.)

अन्यनिशाचर**जीवनरस** नेला राममार्गण**भ्रमरीं**. ॥६२॥ (मंत्ररामा. युद्ध. ३३४)

(शृंगारप्रसंगीं योजण्याची भ्रमराची उपमा युद्धप्रसंगीं शोभत नाहीं. तीमुळें 'प्रलयसंमर्दनादि वीररसोत्कर्षक क्रियांचा लोप होऊन चुंबनालिगनादिकांचा भास होऊं लागतो.' म. बा. हंस)

न दिसति ह्मणउनि केवळ **काय नसति गुर्जरीस कुच** राजा ! ॥ ६३ ॥
(विराट. २.१२)

स्वप्रिय दाउनि, तन्मन करुनि बहुत आपणापरिस वेडें, ।
ऐसा देवसुत बरा कांत, ह्मणे **सुपति, कुपति, पुर खेडें.** ॥ ६४ ॥
(हरिवंश ३६.१०१)

तेव्हां धर्मरथावरि नकुळ असा होऊनी पराभूत, ।
गेला मांत्रिकनिर्जितशक्ति **शरण काय ईश्वरा भूत.** ॥ ६५ ॥ (कर्ण. १४.७२)

हुडकिति शवें पहा पतिसुत वळखायासि बायका सारीं; ।
या **कमळवनविहारा शिरल्या हंसीच काय कासारीं** ? ॥६६॥(स्त्री. ४.७)८

दुर्योधन धर्माशीं युद्ध करी **जेंवि तेल तूपासी.** ॥ ६७ ॥ (कर्ण. ९.३)

(हा तेलतूपाचा दृष्टांत पंतांचा फार आवडता दिसतो. तो अनेक स्थलीं आला आहे. उद्योग. ६.३५ इत्यादि)

होते निर्भय आश्रित अवलंबुनि तुज, **जसे कुपा सरडे.** ॥६८॥ (सौप्तिक. २.३६)

बहु दिवसां सुत पाहुनि कुंती झांकून आननास रडे; ।
**सरडीसही बहुप्रिय जे मत न पुरा न कानना सरडे.** ॥६९॥ (स्त्री. ३.६०)८

ती धर्मा मर्यादा सोसावी सर्वथा न रामाशीं; ।
**जागृदवस्थेंत जशी नासाग्रीं बैसली नरा माशी.** ॥ ७० ॥ (गदा. ५.२)

ते स्त्रीविलाप दुःसह भूपा, **अतिसारिया जसे हिरडे.** ॥ ७१ ॥ (शल्य. १.८)

तैसेचि निर्गमींही निजले, घालूनि **बाजसें हो तें.** ॥ ७२ ॥ (सौप्तिक. २.३०)

अरिकरिघटा पहातां तुज नरसिंहा विमूढगति हो; **ऊ** ।
**जसि मर्कटासि रुचिदा,** तसि तव बाणासि शत्रुचिति होऊ. ॥७३॥ (कर्ण. ७.१७)

मानिति ज्या अनपत्या धनपत्याखंडलादि लोकेश; ।
ज्यां होय जो अपुत्रिक जन नाकीं, **भोजनांत** तो **केश.** ॥ ७४ ॥ (शांति. ४.६१)
गेला स्वर्गासि अमित सुकृतें जोडोनि राय; तें नाकीं ।
होय सुदुःसह शका, **जैसें बाळासि रायतें नाकीं.** ॥ ७५ ॥ (आदि. ११.७५)
उत्तर म्हणे नको गे! पायां पडतों बृहन्नडे! सोड; ।
जोड दिली दुखवुं नको, **केवळ पितृकरतलस्थ हा फोड.** ॥ ७६ ॥
(विराट. ३.७४)

प्रभुला बिभीषण म्हणे 'पावेल जया न रावणि कदापि'; ।
**निजकपटशा पाणी जोडी, भोळया नरा वणिक दापी.** ॥ ७७ ॥
(वन. १२.५३)

धृतराष्ट्रासि रुचेसी सांगे अत्युग्रनीति तो कणिक ।
**वणिक ग्राहकहस्तीं देतो विषसर्पिशर्कराकणिक.** ॥७८॥ (आदि. २८.५)

याचप्रमाणें यमकाकरितां पंतांनीं क्वचित् अयोग्यशब्दरचना, तसेंच अयोग्य वर्णनही केलेलें आढळतें.

मच्छत्रुविजय इच्छिसि दुष्टा! बंधुत्व हें तुझें **जळलें.** ॥ ७९ ॥
(मंत्ररामायण युद्ध. ७०)

'जळलें' हा बायकाच्या तोंडांत शोभणारा शब्द रावणाच्या मुखांत अयोग्य वाटतो. सावित्रीचें चरित्र ऐकण्यास 'योग्य साधु, पतित न या' असें वर्णन (वन. १३.३) तसेंच उषेनें पतीचें चित्र ओळखतांच चित्रलेखा 'आणि अनिरुद्धासहित उचलुनि **वाजे**' ह्या स्थळीं 'बाज' शब्दाची योजना हीं अयोग्य भासतात.

**(४) उपमेवर उपमाः—**

क्रोधि हृदय गुर्वक्षर मोडीं, कीं मूल लाडिकें लिहितें. ॥ ८० ॥ (उद्योग. १३, १६४)
काय शुका मदिराक्षी, खदिरा क्षीणत्व दे रणीं कदली ? ॥८१॥ (उद्योग. १३.१८९)
लब्धतदनुमोदन तो **जंबुक सिंहीस**, कीं सकाम ससा ।
व्याघ्रीस, सतीस बळें, शातीस वरावयासि तामससा. ॥ ८२ ॥ ( विराट. १.४६ )
आस्तिकशपथ अहीचें, कीं हरिचें आवरी बल खलीन, ।
धर्म तसें भीमाचें, तो ह्मणतां भूखलीं खल खलीन. ॥ ८३ ॥ ( विराट. १.६९ )
तो शर गरधर खरसा, पविसा, रविसा, स्मरारिसायकसा; ।
पार्थभुजांतरि शिरला, वाल्मीकामाजि नागनायकसा. ॥ ८४ ॥ (कर्ण. ४९. ३१)
सुरनरमंडलकुमुद प्रभु भासे पूर्णचंद्र विकसविता, ।
कीं त्या कमळवनीं हा शोभेचें पिकवि विपुल पिक सविता. ॥ ८५ ॥
(षष्ठ स्तोत्ररामायण ९२)

सार्थक पार्थ करी, ती कैरविणी तो सुधांशु गौरविता, ।
सविता विनसीसि वरि, कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता. ॥ ८६ ॥ ( कृष्ण. ८६.२७ )

सूत म्हणे 'कविगुरुच्या जैसें रसिकांसि वाटलें कवनीं, ।
कीं उगवतां अदितिचा पांथा जायास वाट लेंक वनीं; ॥ ८७ ॥
किंवा जसें सुकंठप्लवगाला वाटलें कपींद्र वधीं, ।
वेननिधनीं प्रजांला, त्या पांचाळादिकां तसेंच तधीं. ॥ ८८ ॥ (गदा. ६. २. ३)
सद्धर्मबोध विनता सच्छिष्या, सिद्धरस जसा कथिला, ।
कीं लोहा स्पर्शमणी, होय तसा जो गुरूत्तमें कथिला. ॥ ८९ ॥ (कर्ण. ४१.७७)
वारण विदारिलें बहु बाणव्रातें, (१) जसे गिरी पविनें, ।
(२) रविनें किरणगणें घन, (३) कीं न्यायें बौद्ध खंडिलें कविनें. ॥९०॥ (कर्ण. ८.३२)

वरील गीतींत नैयायिक बौद्धमताचें खंडन करितात ही न्यायशास्त्रीय उपमा पंतांनीं दिली आहे. यावरून त्यांना त्या शास्त्राची ओळख होती असें मानणें गैर होणार नाहीं.

तो गज पळोंचि लागे, नाटोपे, (१) प्राकृता जसें चित्त; ।
(२) किवा जसें अनावर यत्नशतें, दैव कोपतां वित्त. ॥ ९१ ॥ (कर्ण. ८. २६)
क्षणहि न उरेल नकुला! कर्णनृसिंहापुढें तुझा दर्प, ।
सर्पप्राण जसे खगपतिपाशीं, शंभुनिकट कंदर्प. ॥ ९२ ॥ (कर्ण. १४. ४४ )

दुर्योधन परमेश्वर···कीं नृप रवि···(कर्ण. १४. ७४–७५) 'पौराणिक उपमा' व 'ज्योतिःशास्त्रीय उपमा' अनुक्रमांक १६६,९८ पहा.

अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं विधिचा; ।
सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्यबळपयोनिधिचा. ॥ ९३ ॥ (कर्ण. २१.१२)
शवमांसमत्त जंबुक तूं, गजमुक्ताश सिंह तो जिष्णु; ।
तूं शशक पार्थ गजपति; कीं दानव तूं सिताश्व तो विष्णु. ॥ ९४ ॥ (कर्ण. २१.६)
आखु बिडाल, श्वान व्याघ्र, शृगाल द्विपारि, शशक करी, ।
विष अमृत, सत्य अनृतहि तूं पार्थ, तया तुझां नसेचि सरी. ॥९५॥ (कर्ण. २१.१३)

**(५) कृमिपतंगसर्पादिसृष्टींतील उपमाः—**

**मोहळ कृष्ण सुरसमय, गोपी सरघाचि,** त्यासि त्या चुकल्या. ॥ ९६ ॥
(मंत्रभागवत १०.३९८)
मुरदृष्टि**मक्षिकांचा** मोहक तो **इक्षुचा सुरस भेला.** ॥९७॥ ( उद्योग. ८.५९ )
प्रभु निजभुज त्या तुंडीं शिरवी, **जैसा महाबिळीं उरग.** ॥ ९८ ॥
( मंत्रभाग. १०.४६० ), तसेंच कर्ण. १८.१९
**पुच्छ रगडितां नागें धावावें, कडकडोनि चावावें.** ॥९९॥ (कर्ण. १४.३)
**कुरुसेनाभुजगीतें खंडी जो शरनखाननीं नकुल.** ॥१००॥ (कर्ण. १४.३६)
कर्णाचे शरपातस्थळ सोडुनि पळति तेधवां दूर ।
शूरहि सोमक, **जैसे दंशाचे संघ लागतां धूर.** ॥ १०१ ॥ (कर्ण. १४.५५)
तसेंच कर्ण. २४.२०;
**मोहमहाजगरानें** पांडुसुताचा **चमूपती गिळिला.** ॥ १०२ ॥ (कर्ण. १६.४)

गळतां कवच नृपति बहु शोभे, **अहि जेंवि कंचुकापगमीं.** ॥ १०३ ॥
(कर्ण. ३१.१९)

कुंतीनंदन चंदन, झाली तत्खंडनक्षणीं जागी, ।
धांवे कर्णावरि भुजशाखेपासूनि, **शक्ति ते नागी.** ॥ १०४ ॥ (कर्ण. ३१.२१)
तरि पार्थासि न सेना त्यजिति, **मधुहरासि जेंवि सरघाली.** ॥ १०५ ॥
(कर्ण. ३३.५७)

सप्तद्वीपा पृथ्वी वृष उचली चार अंगुलें वरती. ।
**वडिशासि जसी मत्स्यी नुगळी** चक्रासि कांपवी पर ती. ॥१०६॥ (कर्ण. ४८.५७)
गेहांत भोगितें मन, **जैसें जाळयांत आपदा याद.** ॥ १०७ ॥
( मंत्रभागवत १०.६४२ )

न विटे ब्राह्मणनमना क्षत्रमन, **जसें वनासि मीनमन.** ॥ १०८ ॥ (उद्योग.९३४)
सच्चित्त गुर्वनादर, **तोयानादर करी न मीन मनें.** ॥१०९॥ (उद्योग. १०.७७)
**वात्सल्यदृष्टि** जाणे प्रभुची, जाणे तसें न **कूर्मी** तें; ।
कूर्मी काय इचें यश, हासे अमृताब्धिच्याहि ऊर्मीतें. ॥ ११० ॥ (भीष्मभक्ति.१०७)
परजीवन हरितीच प्रखर शरें, **पद्मरस जसें भ्रमर.** ॥१११॥ (मल्लारिविजय. ३९)
सात्यकिचेही बाणव्रज झाले त्या वृषासि घोळसिते, ।
**जेंवि पिपीलिक भुजगा,** किंवा व्याघ्रासि जेंवि कोळसिते. ॥ ११२ ॥
( कर्ण. १९.५ )

भक्तयशस्ययशांतें गात्याच्या ठाकतो पुढें मागें; ।
डोलतसे परमसुखें; **डोलावें सुस्वरें जसें नागें.** ॥११३॥ ( पांडुरंगदंडक १४ )
वा! **दावपावकासीं समर करुनि पावतिल पतंग जया?** ॥ ११४ ॥
( उद्योग. ९.९२ )

**कु रुचीका मासीसी** न सिवे क्लीवासि कीर्ति हो! कुरुची. ॥ ११५ ॥
( उद्योग. १२.४ )

पावेल लय, **ज्योतिस्पृक् जेंवि पतंग मातला विलया.** ॥ ११६ ॥
( विराट. १.१६० )

दूर चढोनि पडावे ते **गोमयगोलकार कीटकसे** ।
अस्खलित उच्चपदवीप्रति लंघूं पाहतात नीट कसे? ॥ ११७ ॥ ( विराट. २.१० )
कीचकरहित विराट स्पष्ट **जसा सर्प नीरदन दीन.** ॥ ११८ ॥ (विराट. २.३१)

**(६) कृषिशास्त्रीय उपमाः—**

राया! अशांत धावुनि तव सुतबळही धनंजया वेढी; ।
त्यांत दिसे पार्थरथध्वज, **जेंवि खळयांत वृषगणीं मेढी.**॥११९॥ (कर्ण. ११.५६)
भगवत्प्रसादकल्पद्रुमशिखरसमाश्रितापगेयपिकें ।
**श्रोतृक्षेत्रीं सात्विकभावांचीं पिकविलीं अनेक पिकें.** ॥ १२० ॥
(भीष्मभक्ति. ९४)

**(७) छंदःशास्त्रीय उपमाः—**

गोपीगोपयशोदानंदीं दिव्यांबरीं ललामगणीं ।
**आर्धीं मध्यें मगही गौरव सम करि जसें भला मगणीं.** ॥ १२१ ॥
(कृष्ण. ८४.४४)

(साकी) प्रभु तारात्मज दूतमुखें त्या हित कथि तें खळ न गणी, ।
त्यांत **वक्रपण आधीं मध्यें अंतिंहि जैसें मगणीं.** ॥ १२२ ॥
(मन्त्रगर्भसाकीरामायण युद्ध. ४)

( 'म' गण=तिन्ही गुरुअक्षरें ^ ^ ^ )

(गीति) **यगण** जसा **एक मुखीं मात्र सरल,** भूप **वक्र मग सर्व.** ।
ज्येष्ठत्व, राजसुतशत, औरस ज्याच्या मनी असा गर्व. ॥ १२३ ॥
(मंत्रभागवत १०.६३८)

( 'य' गण आद्य लघु—^ ^ )

**(८) जादूटोण्यासंबंधींः—**

सन्मति अपवादा भी, **करणीच्याहि न वधू तशि बिभ्याला.** ॥ १२४ ॥
(वन. ७.५१)

वीर शतानीक गदा सोडी, **मांत्रिक जसी महाकृत्या.** ॥१२५॥ (कर्ण. १५.१०)

**मांत्रिक मंत्रे मोहुनि धरितो जैसा पराक्रमें साप.** ॥१२६॥ (कर्ण. २३.६)

**मदभूतग्रस्ता तुज धर्मात्मा सिद्धमंत्र पाहेल,** ।
साधुपुढें मोह तसा, क्षणभरिहि न हा प्रलाप राहेल. ॥ १२७ ॥ (कर्ण. २४.२३)

कर्णानिलें उडविली, **रक्षामंत्रे जसी कुजनदृष्टि.** ॥ १२८ ॥ (कर्ण. ३०.६८)

**(९) ज्योतिषीय उपमाः—**

( गीति ) सहदेव नकुळ दोघे दोभागीं, त्यांत धर्मरथ चाले; ।
भासति जाणो क्षितिवरि **पूर्णेंदुसमेत शुक्र गुरु** आले. ॥ १२९ ॥
(कर्ण. ३८.४७)

(श्लोक) आत्मतेज मुनि हा तुजमाजीं । ठेवुनी मथिल राक्षसराजी; ।
**चंद्रमंडळीं जसा स्वकरांशीं । स्थापुनी रवि निशातम नाशी.** ॥१३०॥
(छंदोरामायण सर्ग १४.११)

(गीति) रुक्मी जळे मनीं, परि **चंद्राचें तेज रविपुढें काय**? ॥ १३१ ॥
(मंत्रभागवत १०.७१८)

कोणासही न ह्मणविल यापरि **गुरु शनिहि कुजहि अधम 'हा!'** ॥ १३२ ॥
(शांति. ६.१२)

**जैसे विमार्गगामी गुरु, कवि, बुध, मंगलग्रह क्रूर,** ।
तैसे लोकक्षयकर युद्ध करिति पांडुगुरुजनी शूर. ॥ १३३ ॥ (कर्ण. ११.४)

**नक्षत्रें इंदुविणें,** स्त्रीरत्ने प्रभुविणें तशीं गमलीं. ॥ १३४ ॥ (मंत्रभाग. १०.३९७)

त्या धर्मावरि धांवे, **पूर्णसुधारश्मिवरि जसा राहू.** ॥१३५॥ (कर्ण. ३८.४९)

कुंडलमंडित पांड्यक्षितिपतिचें शिर धरातळीं पडलें; ।
भासे पतन **विशाखामध्यगपूर्णेंदुमंडला घडलें.** ॥ १३६ ॥ (कर्ण. १३.२८)

कीं नृष **रवि**, शर **कर**, **भट उडु**, शोणितपूर **अरुण**, भीरु **तम**, ।
विजय **इनकांत**, नृप **विधु**, बळप **ग्रह**, इष्ट **पद्म** हृष्टतम. ॥१३७॥ (कर्ण. १४.७५)
झालीं नष्टप्रायें शत्रुबळें, **जेंवि उदयिं नक्षत्रें.** ॥ १३८ ॥ (कर्ण. १९.३०)
कर्ण क्षतजें न्हाला त्या काळीं **तरुण अरुणसा शोभे** ॥ १३९ ॥ (कर्ण ३१.२४)
कर्णे त्या नृपवृंदा भेटि दिली, जसि कलेवरा जीवें; ।
करि भटमुखे विकसितें तो, **रविचा उदय जेंवि राजीवें.** ॥ १४० ॥
(कर्ण. २०.२०)

**एकें अमृतकरेंचि व्योम धवळतें न तें उडुप्रकरें.** ॥१४१॥ (कर्ण.२९.३६)
दुःशासनासि तेव्हां सात्यकि करि विरथ; आणि **आभाळीं** ।
**केतू तीन** तसे, शर तीनचि रोवी तयाचिया भाळीं. ॥ १४२ ॥ (कर्ण. ३० ६५)
तो **शर शिरे शरीरीं सौरीच्या, शिखरिच्या जसा अशनी**, ।
**न शनि क्रूर** अहिपतिहि, रत ते स्नेहामृतीं न असृगशनीं. ॥१४३॥(कर्ण. ३२.२८)
अर्जुन तुझ्या प्रसादें तेजस्वी, त्वांचि तेज निज यातें ।
दिधलें, **ज्वलनासि जसें रविनें पावावयासि विजयातें.** ॥ १४४ ॥
(कर्ण. ५०.३५)

**राहुविमुक्तार्क तसा** झाला गतमोह भासता पार्थ. ॥ १४५ ॥ (कर्ण. ४९.३८)
वेष्टुनि शिर सितवस्त्रे बहु पहिल्याहूनि पावला तो भा; ।
**पूर्णेंदुमंडलानें उदयाचल जेंवि पावतो शोभा.** ॥ १४६ ॥ (कर्ण. ४९.७९)
अहिचा जसा किरीटीं, नगशिखरीं न प्रहार अशनीचा; ।
**अत्यंत तीव्र ह्मणती परी तसा दृष्टिपात न शनीचा.** ॥ १४७ ॥
(कर्ण. ४७.७७)

**अर्घोहें नव्हे काय ग्रहणीं रविमंडळ प्रभाविरहें?** ॥ १४८ ॥
(गदा. ४. १४)

**रविच्या रश्मिपुढें तम**, तेंवि टिके ज्यांपुढें न अविचार. ॥ १४९ ॥
(अवतारमाला १०५)

वाटे **उदयनगाग्रीं शारद्परिपूर्णचंद्रमा** बसला. ॥१५०॥(अवतारमाला १६२)
**निर्जीवन** करि अहिता, **स्वकरांहीं जेंवि पल्वला सविता.** ॥ १५१ ॥
(अवतारमाला २४९)

विखरी स्मरहर खरतर शर सरसर, **अहिमकर जसे किरण.** ॥ १५२ ॥
(मल्लारिविजय ३८)

**चंद्रातें, पावुनियां तपनद्युति, पावती अधिक कान्ती.** ॥ १५३ ॥
( मदालसो. २.४४ )

**रविनें विधुसा,** प्रभुनें स्वगृहागत मलिन ही न पोळविला ॥१५४॥ (उद्योग.१.४७)
रवि स्वगृहीं ह्मणजे सिंहराशींत असतां चंद्र आला तरी त्याचा अस्त होत नाहीं. या ज्योतिःशास्त्रनियमाकडे येथें कवीचें लक्ष्य आहे.

**गगनमणिकरींच्या तम केव्हां तरि काय हो! शिवे कमला?** ॥१५५॥
(विराट. १.१६)

(१०) **तीर्थक्षेत्रादिपवित्रवस्तूविषयक उपमाः—**

प्रद्युम्ना देवसुता मोठ्या भाग्येंकरूनि आवडती ।
झाल्यें, भगिनी हो! मी **जैशी रामेश्वरासि कावड ती.** ॥ १५६ ॥
(हरिवंश ३६.९९)

हीच उपमा 'पांडुरंगदंडक'गी० १९ यांत आली आहे.

**विष्णुपदीं पिंड जसा,** शत्रुशिरीं पाय देय जो डावा ।
तो म्यां दिला अधिक याहुनि जन्मुनि काय अर्थ जोडावा. ॥ १५७ ॥ (गदापर्व)
**लिंग पदच्युत भग्नहि लंघ्य नव्हे,** साधुनीतिला पाहें. ॥ १५८ ॥
( गदा. ४.१३ )

गुरुसदनीं वेद जसा, विषयीं तैसा न देह राबेल; ।
तो दास्यरूप वाहे त्या **नित्य चुकों न दे हरा बेल** ॥ १५९ ॥ (आदि. २.२५)
दारवियोग प्रभुला तो, **जेंवि ध्वजवियोग कलशाला.** ॥ १६० ॥
(अवतारमाला १३८)

**भजती जैशा यात्रा गंगायमुनाख्यसुसरिदोघांतें,** ।
तैशाचि रामकृष्णा गोपी; उपमा न दुसरि दोघांतें. ॥१६१॥ ( अवतारमाला २३३ )

(११) **दैववाद व प्रयत्नवादः—**

शास्त्रप्रोक्तविधानें रथ कल्पुनि शीघ्र आणिला शल्यें, ।
**जेंवि मनोरथ साक्षात् केला दैवेंचि सिद्ध** वात्सल्यें. ॥ १६२ ॥
( कर्ण. २३.३३ )

पार्थापुढें तसें **बळ कर्मविपाकापुढें जसें न चले.** ॥१६३॥ (कर्ण. ३०.१८)
आला की कर्ण बळी **जैसा अनिवार्य कर्मपरिपाक.** ॥१६४॥ (कर्ण. ३१.४६)

(१२) **धार्मिक उपमाः—**

जो कीं यथार्थनामा राजा! पांडवसहाय वसुदान, ।
**आचार्यें काळकरीं दिधलें समराध्वरीं तदसुदान.** ॥ १६५ ॥
( कर्ण. ४.२४ )

शिरले परमोदारा भगवंताच्या यथेष्ट शर देहीं; ।
**ब्रह्मण्यवदान्यसधनसाधूच्या अर्थिजन जसे गेहीं.** ॥ १६६ ॥
(कर्ण. ११.४७)

**धर्मज्ञ गृहस्थ जसा, प्राप्तातिथिकारणें गृह निवेदी;** ।
गुरुसुत तसा निजास्त्रे अर्पी, पार्थासि विमुख हों नेदी. ॥ १६७ ॥ (कर्ण. ११.४१)
संशप्तकांसि टाकी, स्वीकृति गुरुसूनुचीच पार्थ करी; ।
**त्यजुनि अपांक्तेयातें पांक्तेयातेंचि अतिथि जेंवि वरी.** ॥ १६८ ॥
(कर्ण. ११.४२)

त्यांहीं केली प्रभुची कीर्ति **स्वप्रेमशिशुगळां जिवती.** ॥ १६९ ॥
( मंत्रभागवत १०.४२७ )

रक्षी गुरुसेवा हे **सच्छिष्यशिशूसि** गालवा! **जिवती** ॥१७०॥ (उद्योग. ८.८८)
**जसि इष्टि दशहविष्का, तींत करिति पिष्टपिंड दशधा,** ती. ।
आचार्यपुत्र दावी युद्धमखीं पांड्यगजवधीं, जाती. ॥ १७१ ॥ (कर्ण. १३.२९)
**तूं** (=धर्म) **समरयज्ञदीक्षित** धर्मात्मा सत्यसंध, **मी होता**; ।
अधिकार **धार्तराष्ट्राहुतिशतहोमीं** मला दिला होता. ॥१७२॥ (कर्ण. १८.२१)
**यजमान पात्र** ह्मणती **ऋत्विक् संचितफळाप्रति** ज्ञाते. ।
ज्यांचें त्याच्या हातें हो कर्म, न हो चला प्रतिज्ञा ते. ॥ १७३ ॥ (कर्ण. १८.२२)

ही रणयज्ञोपमा संस्कृतप्राकृतकवींस फार प्रिय आहे. पंतांनींहि आपल्या रामायण, भारत इत्यादि काव्यांतून ती वारंवार विस्तारानें वर्णिली आहे. सप्तमस्तोत्ररामायण गीति ६४–६८ ( लंकेंत **रणमहाक्रतु**…) पहा. केकावलि पृ० ३३६ पहा.

पार्थहि रथातळीं निज तेजें सकळ स्वशत्रुभट लोटी, ।
स्वर्गाखालीं ढकली **शक्र जसा वेचतां सुकृतकोटी.** ॥१७४॥ (कर्ण.३३.३०)
दुर्व्यसन **राहु गिळितां पुण्यें सज्जनरविप्रभा वांचे** ॥१७५॥ (कर्ण. ५०.२६)
'**शूद्र श्रुतिस,** मज तसा हा' ह्मणुनि इणेंहि बा! मरायाचा. ॥ १७६ ॥
(मदालसो. २.१८)

राज्ञीला शोक जसा **ताप तसा पापिया न रौरव दे.** ॥१७७॥ (मदा. २.८१)
**भाद्रचतुर्थी** कृष्णादेहचि बहुधा **कलाप** हा, याला ।
स्त्री बाळ वृद्ध साधुहि पुरजन बहु धाकला पहायाला ॥ १७८ ॥ (विराट. १.१७५)
अरिरक्त पहा **दक्प्रिय गणपमुखस्थहि असा न सेंदूर.** ॥ १७९ ॥
(विराट. १.१५३)

**(१३) पशुसृष्टींतील उपमाः—**

**वाघहि वळता** परि खळ वळला नाहीं, तिलाचि बहु दापी. ॥ १८० ॥
(मंत्रभाग. १०.८४)
जाणों तो **सिंहें निजभागहर वृक** क्षणामध्यें धरिला. ॥ १८१ ॥
(मंत्रभाग. १०.४७५)
मोघश्रम जलदघटा परते, ते **जेंवि हरिपुढें कुतरीं.** ॥ १८२ ॥
(मंत्रभाग. १०.३६५)
न निजति दिवाहि काराद्वारांतचि जागती **जसे कुतरे.** ॥ १८३ ॥
(मंत्रभाग. १०.६७)

अन्योन्यातें भेदिति शस्त्रीं, **शृंगीं जसे हठी बैल.** ॥ १८४ ॥ (कर्ण. १६.१७)
भी सात्यकिला कौरवसेना, **व्याघ्रासि जेंवि वृषसेना.** ॥१८५॥ (कर्ण. ३०.५८)
जेव्हां असें महाबळ भीम शरें दिनकरांगजा ताडी, ।
तद्वेदना वृषातें क्षणभरि मोही, **जसी गजा ताडी.** ॥ १८६ ॥ (कर्ण. ३२.४६)
खलसेना निश्चेष्टा केली बांधोनियां तिचे पाय; ।

**काय यशःपय घ्याया बांधियली फार मारकी गाय?** ॥ १८७ ॥
(कर्ण. ३३.४१)

कीं कृष्णमतासि दिलें त्वां मन, **गीतासि जेंवि दे हरण.** ॥ १८८ ॥
(गदा. ५.३१)

मुर मथिति तद्बळातें, **हरिणांच्या व्याघ्र जेंवि कळपातें.** ॥ १८९ ॥
( मल्लारिविजय ३४ )

रक्षीं, दुःखीं पडलों, **मृग जेंवि दवाकुळा अरण्यांत.** ॥१९०॥ (मदा.६.२२)

**सुटला दाव्यापासुनि वत्स स्तन्यार्थ जेंवि गाईला ।**
**धांवे,** अक्रूर तसा भेटाया कडकडूनि आईला. ॥ १९१ ॥ (मंत्रभागवत १०४८१ )

**तशा गजासि गंगा** तसि हे आशीहि शुचितमा ! मातें. ॥ १९२ ॥
(उद्योग. २.१९)

ज्यासि न साधु सहावे, **जेंवि पहावे तुरंग न हल्याला.** ॥ १९३ ॥
(उद्योग. ९.९९)

**फोडी जैशी व्याघ्रविमुक्त कुलभ्रष्ट धेनु हंबरडे.** ॥ १९४ ॥ (विराट.१.७९)

(१४) **पक्षिसृष्टींतील उपमाः—**

**मोर जसा मेघातें,** प्रभुतें पाहूनि विधि तसा हर्षे. ॥१९५॥(मंत्रभाग.१०.२५५)
तसेंच उद्योग. १.३३ 'जाला **वृष्टीस मोरसा** मौन ॥'

वाट प्रभुची पाहे व्रज, **जलदाची तृषार्त चातकसा.** ॥ १९६ ॥
( मंत्रभाग. १०.२६३ )

सुचिर गरगरां फिरवुनि लीलेनें, **गरुड जेंवि उरगातें.** ॥ १९७ ॥
(मंत्रभाग. १०.४५९)

**नागासि गरुड तैसें,** वोढी पुच्छीं धरूनिहि जडाला. ॥ १९८ ॥
( मंत्रभाग. १०.५३६ )

ही गरुडभुजगोपमा वारंवार आढळते. कर्ण. १६.१८;१८,१४; विराट. (१.६७) पहा.

**मोर भुजंगासि** तसा, शाल्वासि प्रभु ह्मणे, उगा मंदा ! ॥१९९॥(मंत्रभाग.१०.९५९)
घालुनि धनुष्य कंठी धरिला, धरि **गारुडी जसा अहितें.** ॥२००॥ (कर्ण.१४.३७)
न शिखंडी भी, तांडव करि, **जेंवि घनीं प्रमोदित शिखंडी.** ॥ २०१ ॥
( कर्ण. १६.१९ )

मग त्या भोजें केला, सोडुनि तीव्रेषु, मूर्छित शिखंडी, ।
**जैसा मेघें विद्युत्पातें वृष्टिप्रमोदित शिखंडी.** ॥ २०२ ॥ (कर्ण. १६.१९)
ही मेघमयूरोपमा पंतांची अत्यंत आवडती आहे.

निर्मळ **विवेकमानसहंस** कसें शोककर्दमें किटलां ? ॥२०३॥ (भीष्मभक्ति. ४६)
याच्या सुयशा सेविति सुकवि **जसे हंस मानसा सुसरा.** ॥ २०४ ॥
( अवतारमाला १७ )

**वायस यत्न करुनिही गतिला रोधील काय हंसाच्या ?** ॥ २०५ ॥
(अवतारमाला २१७)

ही हंसवायसाची उपमा पंताची फार आवडती दिसते. उद्योग. १.१३, १८ पहा.

तन्मतिस खररवें दे भय, **जेंवि श्येनगल बलाकेला.** ॥२०६॥ (मदालसो.२.२)

साचा, राया ! माझ्या **चित्तखगा साधुसंग हा चारा.** ॥ २०७ ॥
(उद्योग. १.२४)

**घूकासि जसा दिनकर,** तुज सुजनोत्कर्ष पळ पहावेना, ।
तन्नाम तुला, **अहिला गरुडाचे नामासे** सहावेना. ॥२०८॥ (उद्योग. ९.४५)

यशश **बुजगवणें** दे भक्तासि **शिवों न काळकागातें.** ॥ २०९ ॥
(उद्योग. ८.६१)

ह्मणत्ये सभा तुज **जशी पिकरिपुकाकासि आंबराइ 'छी' !** ॥ २१० ॥
(उद्योग. १०.३)

सतुरगसारथिरथ मी झालो **शुक,** गुरुशरौघ **पंजरसा,** ।
शर शिरकले शरीरीं **कंजीं अळि शिरति जेंवि कंजरसा.** ॥ २११ ॥
(उद्योग. १३.१०६)

**अंगारभुक्चकोरें पण न करावाचि पार खायाला.** ॥ २१२ ॥
(उद्योग.१३.२१५)

**(१५) पारमार्थिक उपमाः—**

ज्यास रुचि अर्थिरतिची जेंवि **मुमुक्षूस भिक्षुसेवेची.** ॥ २१३ ॥ (द्रोण. ५.९४)

धर्मादि सर्व झाले दुःशासनपरिभवें परम हर्षी; ।
**ज्ञानें मोहपराभव होतां जैसे तपःपर महर्षी.** ॥ २१४ ॥ (द्रोण. ३.७५)

**जो मृत्युलाहि न गणी, जैसा योगी मुनीड्य संसारी.** ॥२१५॥(कर्ण.६.६६)

नैराश्य उचित नोहे, स्पष्ट करावें धरूनि आव रण, ।
यत्ने परबळ भेदू, **भेदिति योगेंचि जेंवि आवरण.** ॥ २१६ ॥ ( कर्ण. ७.५ )

त्यांच्याचि क्षतजनद्या त्यांतेंचि रणांगणांत वाहविती, ।
**निजविषयवासना बहु खवळोनि जसे न धैर्य राहविती.** ॥ २१७ ॥
( कर्ण. ११.५९ )

**अज्ञ तपस्वी** शिरला **विषयांत** तपोबलें कधीं न तरे ॥२१८॥ (कर्ण. ३०.२८)

पांचाळपांडुकैकयवीरांनी रोधिला चमूपाल, ।
लंघावया शकेना त्यांसि, **जसा ब्रह्मविज्ञना काल.** ॥ २१९ ॥ (कर्ण. ३०.८१)

तापविलें बळ सूर्यें भीमेंहि, जसें हुताशनी चर्म; ।
पावे संकोच तसें, **भक्तिज्ञानोदयीं जसें कर्म.** ॥ २२० ॥ ( कर्ण. ३३.६ )

**यमदूत दोष विघ्न त्वत्कीर्तनभयरवें जसे पळती,** ।
तैसेचि मद्धनुर्ध्वनिभीतभट क्षिप्र पळति, ते गळती. ॥ २२१ ॥ ( कर्ण. ३५.४ )

जलदांधकार हरिला पार्थे योजूनि पावना सारा; ।
**भक्तें मोह जसा हरिनामा** योजूनि पावना सारा. ॥ २२२ ॥ (कर्ण. ४९.२५)

**याच अर्थाची किंचित् भिन्न शब्दयोजनेची कर्ण. ४९.२६ 'वरुणाह्नतिमिर···'ही गीति आहे.**

कर्णे निष्फळ करितां **यतिनें ललनाकटाक्षसे बाण.** ।
आग्नेय अस्त्र योजी पार्थ तयाचे हरावया प्राण. ॥ २२३ ॥ ( कर्ण. ४७.५ )
**अध्यात्में गुरुलब्धें जेंवि** निवे कर्ण त्या जळेशास्त्रें. ॥२२४॥ (कर्ण. ४७.११)
**मुक्ति मुमुक्षूस** जसी, या तीच स्त्री रुचे, नको कांहीं; ॥२२५॥ (मदा. ४.१६)
**हरिकिर्ति गीति जी म्यां** देवा ! **व्हावें कुरंग रे ! तींत,** ।
लोळावा हा सत्पदधूळींत जसा तुरंग रेतींत. ॥ २२६ ॥ ( सन्मनो. ३२ )

**(१६) पुरुष उत्तम** (उदार, गुरु इत्यादि):–

करिति **वदान्य** जसे निज कोश, तसे क्षीण सर्व शर भाते. ॥२२७॥ (कर्ण. १७.१७)
विनवूनि पुसेन, जसा शिष्य ह्मणे इष्ट माग धीदासी. ॥ २२८ ॥ (कर्ण. २६.१६)
अर्जुन झाला रविसुतमर्मी वरबाणपंक्ति शिरकविता, ।
ती कांपवी तयाचें, **रसिकाचें जेंवि काय शिर कविता.** ॥ २२९ ॥
( कर्ण. ४७.४६ )

रसिकांविषयींच्या आणखी उपमा परिशिष्ट 'ई' पहा.

**(१७) पुरुष हीन** ( हीन वृत्तीचे, दरिद्री इ० ):–

**पार्शी व्याघ्र शिरकता तन्नाशीं करुणता नुठे व्याधीं.** ॥ २३० ॥
( कर्ण. १८.२ )
पिटतो आह्मांसि, **जसा गोप पशूंतें धरूनियां काठी.** ॥ २३१ ॥
( कर्ण. ३१.४० )
आतां मरा ! न वांचे दीप्तगृही जो न तोय सांचविता. ॥ २३२ ॥ (कर्ण. ४९.१३)
**न जगे तो दुर्भिक्षव्यसनापूर्वी न धान्य सांचविता.** ॥ २३३ ॥
( कर्ण. ४९.१४ )
**प्रभुनें प्रसादकामानुगसा** अप्रिय मुखें न लेश वदे. ॥२३४॥ (गदा. ५.२३)
कुरुराज्य तुज न साजे, **प्रभुचें चोरासि जेंवि आभरण.** ॥ २३५ ॥
(उद्योग. ४.१०)
अंधापासुनि पावे भीष्मद्रोणोक्तही अनादर तें ।
**जेवि अनादरिजे, हरिहरकीर्तन सुबधिरें अनादरतें.** ॥ २३६ ॥
(उद्योग. ४.४७)
हा गुरुचें दर्शन घे, **हेमंतीं जेंवि अधन घे ऊन.** ॥२३७॥ (उद्योग. १३.४६)
जनमतचि करावें, जें **स्वीमत करि जेंवि मानव ढिला तें.** ॥ २३८ ॥
( सन्मनो. ५० )

**(१८) पौराणिक उपमा:—**

गेला द्विज पाताळीं, **चापच्युत रावणारिचा शरसा.** ॥ २३९ ॥
( आदि. २.१०६ )
गुरुपत्नीनें केला धन्य, **शिवादृष्टिनें जसा नंदी.** ॥ २४० ॥ (आदि. २.११९)

**संशप्तक ते राक्षस, अर्जुन तो रघुपती,** न वरचील।
दृष्टांत सज्जनप्रिय; यास्तव न कवि सुमती नव रचील. ॥ **२४१** ॥ (कर्ण. १२.१९)
गुरुसुत **महेंद्र,** धनु **घन,** शर ते **जलवृष्टि,** सैन्य तो **घोष,**।
नृप **गोवर्धन,** त्याचा धर्ता उत्साह **देव** निर्दोष. ॥ २४२ ॥ (कर्ण. १३.१२)
**बळि जिंकितां जसा करि सुरपति सत्कार विष्णुचा** भूपा !।
दुर्योधन पांडववधिं द्रौणीची स्तुति करी तदनुरूपा. ॥ २४३ ॥ (कर्ण. १३.३०)
पांडवमार्गणपातस्थळ सोडुनि, पळति सर्व तव सैन्यें,।
**श्रीरामनामकीर्तनरवभीताघें** जसीं धरुनि दैन्यें. ॥२४४॥ (कर्ण. १४.५६)
दुर्योधन **परमेश्वर** वाटे, तो **वीरभद्र** कर्ण बळी,।
धर्महि **दक्ष,** समर **मख, ऋत्विज** पांचाळ. होय उग्र कळी. ॥ २४५ ॥
(कर्ण. १४.७४)
भेटे युयुत्सु धर्मा त्यजुनि ज्येष्ठा कृतानया भ्राया।
**जैसा साधु बिभीषण रघुकुलतिलका** महादयाश्रा त्या. ॥ २४६ ॥
(भीष्म. १.१०८)
राजा धर्म महात्मा मर्दी कुरुसैन्य, त्यासि वाराया।
ये दुर्योधन, **जैसा अंधक रोधावया शिवा,** राया. ॥२४७॥ (कर्ण. १७.२०)
क्षोभे त्यावरि पांडवनृपमति, **महिषासुरीं जसी चंडी.** ॥२४८॥ (कर्ण. १८.७)
पडले कुरुसेनेवरि शर, **लंकेवरि पराक्रमी कपिसे;** ॥२४९॥ (कर्ण. १९.२९)
बळभद्रप्रियभगिनी कृष्णावरजा बळेंचि ज्या वीरें,।
**शक्रसुधा जसि गरुडें,** हरिलि सुभद्रा तसी महाधीरें. ॥२५०॥ (कर्ण. २०.३)
**कुब्जेसि कृष्णसा तूं** पटु मज्जयसिद्धिलागिं उजराया. ॥२५१॥ (कर्ण. २१.३२)
शल्य तया उत्तर दे, **उग्र जसें विष हरासि अर्णव दे.** ॥ २५२ ॥
(कर्ण. २५.१६)
गुरुसागर बहु गर्जे, **परि मुनिचा एकही भरे न पसा.** ॥ २५३ ॥
(कर्ण. २९.३५)
धाकें धर्म पळाला, हरि अरिनें, **शंभु कीं वृकें पिटिला.**।
कर्ण धराया धांवे **जेंवि हिरण्याक्ष तो महाकिटिला.** ॥२५४॥ (कर्ण. ३१.२८)
उग्रतपोनिधि राजा **त्र्यंबकसा, काय साम्य** तुज आहे,।
स्त्रीसहि तुझ्या **रतीचें,** जरि कोपे तुजकडे नृपति पाहे. ॥२५५॥ (कर्ण. ३१.३३)
अरिहरिपासुनि सुटतां करि करिभूपति पलायन त्वरित,।
स्मरलें सुरांसि तेव्हां **कालयवनभीतशौरिचें चरित.** ॥२५६॥ (कर्ण. ३१.४३)
पूर्वी **शिवप्रसादें काळापासूनि विप्र तो सुटला;**।
संप्रति कर्णापासुनि नृप. नवल घट न महोपलीं फुटला. ॥ २५७ ॥ (कर्ण. ३२.४)
भीम वृषावरि ये, **विधिवरि जैसा भूतपाल कामारी.** ॥२५८॥ (कर्ण. ३३.९)
झाले विफळ गुरुसुतीं **रंभेचे श्रीशुकीं जसे** गमजे. ॥ २५९ ॥ (कर्ण. ३४.१६)

पाहे त्या विप्रा प्रभु **जैसा कीं पुष्पसायका पुरहा;** ।
**तेव्हां** वाटे होइल **देवद्दगर्ग्नीत काय कापुर हा.** ॥ २६० ॥ (कर्ण. ३५.२९)

तसेंच कर्णपर्व अ० ५० गी० १९-२२ यांतही पौराणिककथांनीं भरलेलीं सुंदर रूपकें दिलेलीं आहेतः—

तुमची आज्ञा **देवी** निजहस्तगतार्जुनायुधें आजी ।
कर्णमहिष मारुनियां विजयातें पावली रणामाजी. ॥ २६१ ॥ (कर्ण. ५०.१९)
त्वां **इंद्रें** प्रेरितसितवाहाशनिनें वृषाद्रिचें पिष्ट ।
केलें हें यश देवा ! गातील तुझे सदा महाशिष्ट. ॥ २६२ ॥ (कर्ण. ५०.२०)
तूं **नरसिंह** महात्मा, बीभत्सु तुझा **नखप्रकर** देवा ! ।
वृष **कनककशिपु,** महिमा **प्रऱ्हाद** तुझीच ज्या रुचे सेवा. ॥ २६३ ॥
(कर्ण. ५०.२१)

तूं **रुद्र,** तुझें तिसरें **लोचन** हें बंधुरत्न, वृष **काम;** ।
तूं **राम,** कर्ण हा **भव,** अर्जुनभुजतेज हें तुझें नाम. ॥ २६४ ॥ (कर्ण. ५०.२२)

तसेंच कर्ण. ५०,५९-६० यांत दुर्योधनाला रावणाची व वालीची व पांडवांस सुग्रीवाची व कृष्णास रामाची उपमा दिली आहे.

त्यजि न पराभूति खळा, **जसि अनसूया त्यजी न अत्रीतें.** ॥ २६५ ॥
(कर्ण. ३०.५१)

**नळ** होय धर्मराजा, कलहोत्सुक **पुष्करहि** तुह्मी सर्व. ।
बळ होतें सत्याचें, खळ हो ! तुमचा न चालिला गर्व. ॥ २६६ ॥ (कर्ण. ४९.१२)
**नयनाग्निकील नीलग्रीवाचा मीनकेतुवरि** जैसा ।
अरिवरि सायकनायक जाय कराया क्षय त्वरित तैसा. ॥ २६७ ॥ (कर्ण. ४९.५०)
प्रभुला सत्कीर्ति वरिति, **नृप कन्या भुलुनि जेंवि सौभरितें.** ॥ २६८ ॥
( अवतारमाला २४७ )

त्या परमसंकटीं तो स्मरता झाला मदालसामुद्रा, ।
क्षुद्रा उपमा अन्या; त्या ती, **गंगा जसी हिता रुद्रा.** ॥२६९॥ (मदा. ६.१३)
**पुष्पोत्कटाचि** दुसरी गणितील अजान कीचकवितीतें ।
जी कृष्णा साध्वी कां ह्मणतील न **जानकीच** कवि तीतें. ? ॥२७०॥ (विराट. १.१६९)

## (१९) भूतपिशाचादिसंबंधीं:—

अश्वत्था मागावा वर पूजुनि, परि **भला नव्हे मुंजा.** ॥ २७१ ॥ (कर्ण. ११.३१)
**उग्रपिशाचाश्रय** जो, छाया तापप्रदाचि त्या तरुची ॥ २७२ ॥ ( कर्ण. ११.६६ )
रक्त प्राशिति, मूर्छित करिती, वधितीच, लागती ज्यासी ।
त्याचें तेज हरिति, शर ते **ब्रह्मग्रहचि** पार्थतरुवासी. ॥ २७३ ॥ (कर्ण. १९.२८)
दुःशासन न वृषाला सोडी, **निधिला जसा बरा भूत.** ॥२७४॥ (कर्ण. ३०.६६)
पार्थेतभग्नसुयोधन **मांत्रिकपरिभूतभूतसम** झाला. ॥ २७५ ॥ (कर्ण. ३४.३६)

निजजनविघ्नांत प्रभु हा, **जैसा शरभदेव मुंजांत.** ॥ २७६ ॥
( अवतारमाला २२५ )

**श्रीनृहरिनामगर्जन भूतातें होय,** तेंवि पत्तीतें. ॥ २७७ ॥ ( द्रोण. ९.२० )
**परिभूतें होतीलच मन्मंत्रबळें पळांत अरिभूतें.** ॥२७८॥ (उद्योग.५.२२)

**(२०) राजनीतिशास्त्रीय उपमाः—**

**जसि योजिली सुचतुर प्रभुनें व्यापी समस्त जग नीति,** ।
तसि गुरुसुतशरवृष्टि क्षितिला आक्रमुनि जाय गगनीं ती. ॥ २७९ ॥ (कर्ण. १३.१०)
श्रीरामासि भजावें भक्त म्यां जेंवि तेंवि संतातें, ।
**राजासि उपासावें तैसेंचि जनें प्रधानपंतातें.** ॥ २८० ॥
( सन्मनोरथ. १ )

नित्य महाराज **तुह्मी स्वामी; नाम प्रधानपंत** अजी ! ।
सोडविता जलधींत ग्राहग्रस्ता गजासमेत गजी. ॥ २८१ ॥ ( नाममाहात्म्य ९९ )
**त्रिभुवनराज्य प्रभुचें प्रतिनिधिनें त्वां स्वहस्तगत केलें;** ।
**भोळ्यादिगंबराचें आक्रमिलें वतन, जळ** जसें तेलें. ॥ २८२ ॥
( नाममाहात्म्य १०२ )

**(२१) वनस्पतिसृष्टींतील उपमाः—**

**मोचेला** (=केळीला) **वात जसा,** गोपीतें कांपवी अरिष्ट खळ. ॥ २८३ ॥
( मंत्रभागवत १०.४३१ )

ते एकदांचि निजले; **जाणों सर्वांसि चारिले धुतरे.** ॥२८४॥(मंत्रभाग. १०.६७)
डसले शर अहि मर्मी, सर्वांगे रक्तपूर तो वमला, ।
भ्रमला कृतवर्मा बहु; समरीं **पुष्पितपलाशसा गमला.** ॥ २८५ ॥
(कर्णपर्व १६.१५)

ही फुललेल्या पळसाची उपमा संस्कृतप्राकृतकवींची फार आवडती आहे. मोरोपंतांनीं आपल्या काव्यांत युद्धवर्णनांत पुष्कळच वेळां ही योजिली आहे. कर्ण. १८.११; ३१,५४;४७,२८;

लाजवि **पक्कफळनिचित,** त्यांच्या क्षतशतयुताकृतीस **वड.** ॥२८६॥ (कर्ण.१८.१०)
धर्मशरीरीं जडले शर, **कंटक जेंवि सर्वथा पनसा.** ॥ २८७ ॥ (कर्ण. ३१.२)

ही फणसाची उपमा कर्ण. ४९.३३ यांतही आली आहे.

कृष्णाविणें क्षिति मला **नलिनी मधुपासि जेंवि शुष्करसा.** ॥ २८८ ॥
( उद्योग. १.४४ )

**झाला म्लान, फिरविला पुष्पाचा जेंवि वन्हिवरि हार.** ॥ २८९ ॥
( आदि. ५.१२ )

**स्पर्शावया सतीला पाहे, दव जेंवि कल्पलतिकेला.** ॥२९०॥ (उद्योग. २.२७)

मज ह्मणति, **पारिजातें हि न लंघावी कदापि सुरसा**(=तुळसी) **रे**॥२९१॥
( उद्योग. १३.१४८ )

बहु **पानवेल** मिरवे तेंवि न मिरवे यशास **मिरवेल.** ॥२९२॥ (विराट १.१७३)
वद केंवि आवरावी **अमृतफळहृता रसज्ञमति तूतें ?** ॥ २९३ ॥
( विराट. १.१४ )

भीमप्रतापतपनें झाले बहु शुष्क ते जसे **पळवे** (=पाचोळा ). ॥ २९४ ॥
( विराट. १.१६७ )

बहु सुखशोभाप्रद न **स्वस्तरुचाही** यशासम **स्तबक.** ॥२९५॥ (विराट. २.३२)

**(२२) विवाहादि उत्सवांतीलः—**

ठोकी सुकंठ, परि त्या न विटवि, **जशि बहुहि दुर्दशा स्याला.** ॥ २९६ ॥
(पंचमस्तोत्ररामायण ६९)

वानर परंतु वाली दडपी कक्षेत तो दशास्याला, ।
या होय, **फाल्गुनमयी श्रीमंताच्या जशी दशा स्याला.** (=साळयाला)
॥ २९७ ॥ (परंतु–रामायण ३५)

खळकृतनिंदा सुखदा हो **श्यालकृता** जसीच मतिस **रळी.** ॥ २९८ ॥
( सन्मनो. २३ )

प्रिय हरिजन हो, आला **जैसा माहेरचा बहायाला,** ।
**स्त्रीजन जसा विवाहा,** जावें म्यां सज्जना पहायाला. ॥ २९९ ॥
( सन्मनोरथ. ३९ )

संसारदुःख विसरवुं सत्पद्धति मतिस, जेंवि काय घडी, ।
**वरमायेसि विवाहीं** विसरवि **चवरी गुलाल पायघडी.** ॥ ३०० ॥
( सन्मनो. ३६ )

**पांचालिकाविवाहीं जैसें** पिशुनीं तसें असो रुसणें. ॥ ३०१ ॥
( सन्मनो. २० )

आवड असो कथेची, **जसि बाळा फाल्गुनांत पुनिवेची.** ॥ ३०२ ॥
( सन्मनो. ४७ )

कृतकृत्य होय तव सुत, **जेंवि पिता अर्पितां वरीं दुहिता.** ॥ ३०३ ॥
(कर्ण. ७.३३)

विजयश्रीसीं होउनि युक्त सुखें श्रीवरा सख्यासंगें, ।
खेळे विजय शरकरें वीरशिरःकंदुकें क्षतजरंगें. ॥ ३०४ ॥ (कर्ण. ११.५)
झांकिति अन्योन्यांतें बाणपटीं, **उत्सवीं जसे व्याही.** ॥३०५॥ (कर्ण. १४.५४)
**व्याह्या प्रियतनयेच्या लग्नीं जपला तसा नसे व्याही.** ॥ ३०६ ॥
( हरिवंश. ३६.४ )

प्रियसखसे यमनगरीप्रति **रक्तें रंगवूनि बोळविती.** ॥३०७॥ (कर्ण. ३०.७८)
**रिपुरक्तार्चे खेळों पावुनियां समर फाल्गुना सिपणें.** ॥ ३०८ ॥
( उद्योग.४.९९ )

**(२३) वेदांतादि शास्त्रीयोपमाः—**

कर्ण तुझ्या अस्त्रातें, सर्पातें जेंवि गरुड खंडितसे, ।
रिपुशर विजयी गमती. **द्वैतीं अद्वैतवादि पंडितसे.** ॥३०९॥ (कर्ण. ४७.१५)
वारण विदारिले बहु बाणव्रातें, जसे गिरी पविनें, ।
रविनें किरणगणें घन, कीं **न्यायें बौद्ध खंडिलें कविनें.** ॥३१०॥ (कर्ण. ८.३२)

**(२४) वैद्यकीय उपमाः—**

वधिलचि हा, **शूलार्ता वाटुनि केला जसा उडीदवडा.** ॥ ३११ ॥
(द्रोण.२१.७१)

कष्टें धर्मा झाला **बहु धिक्कार्तासि लशुनसा मान्य.** ॥३१२॥ (द्रोण. २१.७१)
न भजति सुयशस्काम क्लीबा, **आरोग्यकाम चिबुडाला.** ॥३१३॥ (भीष्म.१.६४)
**शाकांत प्रवर जसें,** पथ्यहि **तैसें न दोडकें** चव दे. ॥३१४॥ (विराट. ५.४७)
सभ्यें सोडावाचि, **स्वपरविकृतिकर कुसंग गंधकसा.** ॥३१५॥ (उद्योग.७.२८)
सेवावें सेव्य, जरी **पुत्रप्रेमाम्लपित्त ओकवीतें** ॥ ३१६ ॥ (उद्यो. ३.१०१)
हा विप्र उग्रकर्मा **क्लेशकरव्याधिसारखा;** यासी, ।
न उपेक्षावें आळस न धरील प्राणसार खायासी. ॥ ३१७ ॥ (कर्ण. ११.६५)
**मंत्रौषधरत्नांहीं देहापासूनि रोगसा नेला.** ॥ ३१८ ॥ (कर्ण. ११.७२)
युद्धीं परमार्थ मिळे निश्चित, मिळणें पलायनें तोटा; ।
हें जाणोनि पळे तो मातेच्या **रोग पातला पोटा.** ॥ ३१९ ॥ (कर्ण. ३१.३६)
**रास्नादिकषाय शमवि वातादिस, अमृतरस जुरवि शेष,** ।
मनुजप तसा प्रजाधिप राम असा स्तविति सुरवर विशेष. ॥ ३२० ॥
(नामांकरामायण १२६)

चोरास सुगम तिमिरीं धन; **खळकर्णासि हितवचें गमति मिरीं.** ॥ ३२१ ॥
( आर्यागीतिमुक्तामाला ४० )

देती बहु तेज स्तव, **सद्वैद्यें योजिले जसे काढे.** ॥ ३२२ ॥ (गदा. १०.१८)

हा काढ्याचा दृष्टांत वारंवार आढळतो. ( आदि. ९,३९; १७.३; अश्व. १.६८; मंत्रभागवत १७.५५६. )

आलें मनासि माझ्या **तीक्ष्णहि परि पथ्य हें जसें आलें.** ॥ ३२३ ॥
( गदा. १०.१८ )

रणमृत्यु नच रुचे, जरि बहु हित तरि, **जेंवि बोळ बीतीतें.** ॥ ३२४ ॥
(द्रोण. २३.६३)

**सुरसाहि न बहु मानी जैंवि ज्वरदूषितास्य पित्तानें.** ॥ ३२५ ॥
(स्त्रीपर्व २.१४)

**पटु पथ्य गदापूर्वा** पूरापूर्वीच साधिती सेतू. ॥ ३२६ ॥ ( स्त्री. ५.५० )

**आर्ता धन्वंतरिसा,** त्या नारद भेटला पथामाजी. ॥ ३२७ ॥ ( अश्व. १.२१ )

यद्यश यक्षगणा दे बळ, जेंवि **विषूचिका गदा पाणी.** ॥३२८॥ (हरिवंश ९.५१)

ह्मणती सद्यःकीर्ति**प्रज्ञाघ्रस्पर्श तोंडलें** कवि त्या. ॥ ३२९ ॥ (विराट. ३.५१)

होता तसाचि जागा द्रौणि **ज्वरदग्धकायसा राती.** ॥ ३३० ॥ (सौप्तिक. १.५)

बाळातें पोसावें, हित **भेषज लागतां कटुहि सोसावें.** ॥३३१॥ (कृष्ण.२९.२६)

**ते एकदांचि निजले, जाणों सर्वांसि चारिले धुतरे.** ॥ ३३२ ॥
( मंत्रभागवत १०.६७ )

नयनें फिरवुनि पडला, **कर्कटिकाफळ जसें तसा उलला.** ॥ ३३३ ॥
( मंत्रभाग. ४६३ )

गांजीन परि सहावें; **ह्मणिजे वैद्यें दिली सुधा कांजी.** ॥३३४॥ (कर्ण. २१.४०)

त्या धर्मव्यूहावरि जाय, **ज्वरसाचि तद्बळ हिराया.** ॥३३५॥ (कर्ण. १५.२०)

**अमृतचि** तें त्याच्या रिपुसिंहध्वनिशूलतप्तकर्णांचें. ॥ ३३६ ॥ (कर्ण. २०.१६)

दु सह दुर्जय शिरला, **अपथ्यशीलांत रोगसा** पार्थ. ॥३३७॥ (कर्ण. ३०.२६)

**मंत्रौषधिक्रियातिग रोग जरी रोधिला तरी खवळे,** ।
तैसा कर्ण महाबळ रोधूं ह्मणती तथापि तो न वळे. ॥ ३३८ ॥ ( कर्ण. ३०.८० )

निज नाशार्थचि पडले भट कृष्णाच्या गळां, न तन्नाशा, ।
**मरति ज्वरार्त न जगति पुरवीतां दुग्धसर्पिरन्नाशा.** ॥ ३३९ ॥
( कर्ण. ३३.२७ )

परि न गणिलेचि तेणें **पथ्यैकपरें जसे स्वरिपु रोग.** ॥३४०॥ (कर्ण. ३४.१४)

हरिलें सदुक्तींनीं, **दक्तम वैद्यानें जसें शलाकांनीं.** ॥३४१॥ (कर्ण. ५०.३३)

**शास्त्रसुशस्त्रें काढुनि धर्ममनांतीच मोहमय कुरुप,** ।
सरतांचि दक्षिणायण मौन धरी तो **महाकुशल** कुरुप. ॥ ३४२ ॥
(भीष्मभक्ति. १०२)

मजवरि परमानुग्रह, **जेंवि सुधा ज्वरहतासि चाखवितां.** ॥ ३४३ ॥
(मदा. ४.२०)

हा बहु पापद, तापद, यापरी **कटुकी न कटु, न वा कुचला.** ॥ ३४४ ॥
(उद्योग. ३.८८)

पतितासि सांवरी मृदु शुचि हा उपदेश केशवा! तूळ ।
**जैसा अंबार्पित अतिरुग्णासि पदार्थलेश वातुळ.** ॥ ३४५ ॥
(उद्योग. १०.८६)

**न गिळी कटुकरस** ह्मणुनि कोप करुनि काय बाळ कापावा ? ॥ ३४६ ॥
(उद्योग. १३.५२)

**(२५) व्यावहारिक उपमाः—**

यदुनाथातें गोष्ठीं पाहे **जैसा चकोर सोमासी.** ।
त्याच्या प्रभुमूर्तिरतद्गुपमेसि **सितारता असो मासी.** ॥ ३४७ ॥
(मंत्रभागवत १०.४८४)

ही चंद्रचकोरांची उपमा पंतांची फार आवडती आहे. मदालसोपाख्यान २.५७ पहा.

**आह्मां व्यसनार्तांची** धर्मस्थिति हेचि **बाज,** पावें गा ! ।
त्वां मोडावें न इला, स्वस्वास्थ्यसुखार्थ बा ! जपावें गा ! ॥ ३४८ ॥ (सभा. ५.४१)

त्या सिंहनाद होय, **व्याला पुच्छीं जसा पदन्यास.** ॥ ३४९ ॥ (द्रोण. ३.४८)

ब्राह्मण पुष्कळ खवळे **पुच्छछेदार्तिनें जसा साप.** ॥३५० ॥ (कर्ण. ११.२०)

**डसला काळाहि तया लागति हरिगुणगर्हू कडु** नरा जा(=ज्या)॥३५१॥
( हरिवंश २०.५८ )

तो तैसा लज्जाकर, **जेंवि परपटोपभोग परिटांचा.**॥३५२॥ (अनुशासन ६.१४)

करिति व्याकुळ ते **शरचोर प्रभुलाहि साधुसार्थांच्या.** ॥ ३५३ ॥
( कर्ण. ११.५५ )

**जैसे कुपुत्र,** गजहि न आवरिति पदेंकरूनि तुडविती. ॥३५४॥ (कर्ण. ११.६०)

या चितेसि मदात्मा सांपडला **सुकर वाळवीस पट.** ॥३५५॥ (शल्य. १.१६)

स्त्रीजन विरहीं टाकी, **जैसा अग्नींत दिव्य पट किटला.** ॥ ३५६ ॥
(मंत्रभागवत १०.३८७)

शिष्यांहीं अनुभविलें लालनसुख, **जेंवि वृद्धतोकांहीं.** ॥३५७॥ (आदि. २.६७)

**पितरांसि अपत्यांचा लोभ असे,** त्यापरीस मज त्याचा. ॥ ३५८ ॥
(मंत्रभाग. १०.३४९)

बाळाच्या सत्कारें माता अतिवत्सला जसी हर्षे ।
भक्ताच्या पूजेनें प्रभु आनंदाश्रु हा तसा वर्षे. ॥ ३५९ ॥ ( पांडुरंगदंडक २७ )

बहु मेळवूनि बल्लव अन्न पळत जाय कृष्ण सोडून, ।
**अधन शिशु जसा टाकुनि चिंतामणि बहु कपर्द जोडून.** ॥ ३६० ॥
(उद्योग. १.४९)

**मातेतें त्यजुनि पळहि जाय न भलतीकडे जसें बाळ,** ।
सत्संगति सोडुनि, मन नच जाउ, तसेंचि घेउ हें आळ. ॥ ३६१ ॥
( सन्मनोरथ. ११ )

सत्संगींच शिरावें, **बाळ जनन्यंचळीं जसें** शिरतें. ॥ ३६२ ॥ (सन्मनो. १३)

तुज नलगे शिकवावें, स्नेहें देतें परंतु आठउनि, ।
पतिभजनीं सुख पावो तव मति, **शीतांत जेंवि पाठ उनीं.** ॥ ३६३ ॥
( मदालसो. २-५३ )

मातेच्या शिक्षेला होय वश **जसा सदश्व कविकेला.** ॥३६४॥ (मदा. ५-४३)

प्राज्य विषय सेवुनिहि **न तृप्त, अनळ जेंवि भक्षितां आज्य.** ॥ ३६५ ॥
(मदा. ६-१)

**अंबांकस्थित शिशु शशिमंडळ कवळावया** जसा पाहे, ।
तूं विजयासि वधाया वांछिसि हें कोण जाणता साहे. ॥ ३६६ ॥ ( कर्ण. २७-४ )

प्रेमकळेतें पाहुनि भुलतो, **बाळक जसा मिठाईतें.** ॥३६७॥ (पांडुरंगदंडक२)

कविहृदयासि बहु रुचे त्यागचि, **बाळास उद्धव नवासा.** ॥ ३६८ ॥
( सन्मनो. ३.१२ )

विठ्ठल तेंवि कथेच्या, **सत्राच्या निकट तो बराडि कसा;** ।
हा तत्काळ प्रेमळजन हृदयीं **चिकटतो बरा डिकसा.** ॥३६९॥ (पांडुरंगदंडक५)

ही डिंकाची उपमा द्रोण. ७.१४ यांतहि आलेली आहे.

जो गहिंवरतो, निघतां प्रभूला वंदूनि भेटतो काय ।
'हाय !' प्रभुहि ह्मणे हो ! **कन्येला धाडितां जशी माय.** ॥ ३७० ॥
(पांडुरंगदंडक ५१)

हरि कुरुकुळहित इच्छी **तोकाचें नित्य माय जेंवि हित.** ॥ ३७१ ॥
त्यासि वराशी देतो, **देतो पुत्रासि जसि पिता ठेवी.** ॥३७२॥ (आदि. २.२३)

**शलभा दीप,** तसा प्रभु हळु हळु येऊंचि दे न त्या पळवी. ॥ ३७३ ॥
(मंत्रभाग. १०.१९२)

**जसि शिशुची स्तनपानीं,** धर्मश्रवणीं तसीच सादरता. ॥ ३७४ ॥
( भीष्मभक्ति. ८७ )

सुकविमन न सोडी हरियश, **जैसें तोक थान,** यागा या, ।
बहुतचि अंतर, विसरे जो सुरसिक तो कथा न या गाया. ॥ ३७५ ॥
(अवतारमाला २९३)

**वत्स जसा स्तन्यातें सादर पीतो धरूनि आम्यातें,** ।
जें साधुमुखोद्भूतयश तेंसें प्यावें करूनि आ म्यां तें. ॥ ३७६ ॥ ( सन्मनो. ३४ )

उपहास मल्ल करि, परि रक्षी स्मरकाळ, कोप हा साचा ।
न धरीच सदय हृदयीं, **जेंवि जनक बाळकोपहासाचा.** ॥ ३७७ ॥
( मल्लारिविजय ५८ )

तुज पांडवजय दुर्घट; **नारळ हरिजेल काय खवेतरें ?** ॥ ३७८ ॥
(उद्योग. ९.८१)

त्या स्मरणें मन पडलें तापीं बहु, **जेवि तळमळत डागें,** ।
हृदयें मोह उघडिला **जैसा ग्रीष्मांत तळमळ तडागें.** ॥ ३७९ ॥
(उद्योग. १७.५३)

**हे मूर्ति मज जसी, तसि धनिकाला बहुमता नसेल वही.** ॥ ३८० ॥
(उद्योग.११.१०६)

रक्षिति सर्वांचें मुनि सर्व, **जसे वृत्तिमंत वतनातें.** ॥ ३८१ ॥
(उद्योग. १३.१२४)

**कवडी दुर्लभ ज्या त्या मोत्यांच्या जेंवि राशि खंडीची.** ॥ ३८२ ॥
( उद्योग. १३.२३० )

**(२६) सामाजिक चालीरीति, वगैरेः–**

भूपसभा शोभेना कीं नव्हता कर्ण **सत्तिलक** भाळीं. ॥३८३॥ ( कर्ण. २०.१८ )
सद्रसना नामातें, कीं **सोडी बंधुता न दायातें,** ।
तैसी क्षिति चक्रातें; श्रम झाला फारसा तदा यातें. ॥ ३८४ ॥ (कर्ण. ४८.५९)
**न टिकति** रिपु जिष्णुपुढें **जैसे दिव्यापुढें कुडे शपथ.** ॥ ३८५ ॥
( कर्ण. ३५.१२ )

**मणिकनकभूषणाहुनि सुबहुमता स्त्रीजना गळसरी ती.** ॥ ३८६ ॥
( सन्मनो. ४८ )

जी सत्पदभुक्त कुसुममाला **भव्यासि भालदोरी ती.** ॥ ३८७ ॥ (सन्मनो. ६०)
कर्णयुगांत भरावें हें हरिहरिजनयश प्रचुर म्यां तें, ।
**जैसा दोंदीं कोंदी गुर्जरदेशस्थ विप्र चुरम्यातें.** ॥ ३८८ ॥ (सन्मनो. ३)
हा हो सुतृप्त राघवनामें, **सारेंचि जेंवि तेलिंगा,** ।
**शीला जपो,** बहु जपति **जैसे अय्याख्य साधु ते लिंगा.** ॥ ३८९ ॥
( सन्मनोरथ. ४ )

शील ह्मणजे ( *character* ). याला पंत फार महत्त्व देत होते हे त्यांच्या शीला-विषयींच्या अनेक उक्तींवरून दिसून येतें. आर्याकेका ८९, उद्योग. ५.८० पहा.

मद्ग्रंथ असावा बहुजनबहुमत **जेंवि शंभुवृषभांड.** ॥ ३९० ॥ (सन्मनो. १४)
**सूक्त करावें तैसें जैसें तपकीरतत्परें जतन.** ॥ ३९१ ॥ (सन्मोरथ. १८)

**(२७) सूपशास्त्रीय उपमा** ( भोजनसंबंधीं ):–

रसिकें तैल न खावें, मिळतां नव विपुल धेनुचें आज्य ॥३९२॥ (अश्वमेध. १.१६)

ही तेलातुपाची उपमा पंतकाव्यांत वारंवार आढळते.

जा, मुग्धा! **दुग्धातें सोडुनि सेवील कोण तक्रातें?** ॥३९३॥(अश्व. १.२०)
हो पूर्णकाम, **सुरभीपोषकजन ताक काय गा! उकळी?** ॥ ३९४ ॥
( द्रोण. ६.७५ )

यत्पदयशें सुधारस **विरस, सुरसिकांसि जेंवि भात शिळा.** ॥ ३९५ ॥
( द्रोण. ५.४ )

**हेंचि बहु सरस अमृत त्यजुनि रसिक वरिल काय पां गूळ?** ॥ ३९६ ॥
( द्रोण. २०.३० )

**तेला निजप्रतापें कढतां होतां प्रतप्त वन्हिच पी.** ॥ ३९७ ॥
(मंत्रभागवत. १०.१९३)

देवासि जलाशयतटनिष्ठ बकाकार असुर, **सुग्रास** ।
**क्षुधित ब्राह्मणसा,** गिळि; भीति न शिशु सुरहि बळहि उग्रास. ॥ ३९८ ॥
(मंत्रभाग. १०.१९६)

देती जननीहस्तीं त्या स्त्री **माशाचि मूर्ति ही गुड ती.** ॥ ३९९ ॥
(मंत्रभाग. १०.१४६)

त्या बहु तापति, **जेंवि क्षुधित सदन्नांत गरळ भक्षूनी.** ॥ ४०० ॥
(मंत्रभागवत. १०.३९०)

**मोठा गोड कठिण वरि आंत, गुळें घोळिला जसा गोटा.** ॥ ४०१ ॥
(मदा.२.६७)

कीं विप्र **पुरोडाश,** क्षत्रकुळें त्यापुढें जमी **दिवसीं**(=क्षुद्रपक्वान्न) ॥ ४०२ ॥
(उद्योग. १३.८१)

ती सिद्ध होय, **दधिचें जेंवि करायासि सिद्ध ताक रवी.** ॥ ४०३ ॥
(उद्योग. १३.२०२)

**केंवि ह्मणेल रसज्ञा सोडुनि शालीस नाचण्यास हित?** ॥ ४०४ ॥
(विराट. १.१८२)

वीर स्वशक्ति चतुरा कळविती **गंधेचि जेंवि चव घांस.** ॥४०५॥(विराट. २.४१)

**(२८) स्त्रीविषयक उपमाः—**

(गीति) मद्र महीपति गमला तो निजला धरुनि पोटिशीं महिला, ।
ती व्यसुलाहि न सोडी श्री, **पतिला जशि पतिव्रता महिला.** ॥ ४०६ ॥
(शल्यपर्व. २.१०२)

देती प्रभूक्तितें श्रितमति, **कुलजा जेंवि मान सासूतें.** ॥४०७॥(द्रोण. ३.३०)
हो नियति बहुमता मम मनिस, **कुलवतीस जसि सदाश्वश्रू.** ॥ ४०८ ॥
(सन्मनो. ४१)

ती विप्रजना गयनृपवाक् हयमेधक्रियासुखनि वेदी, ।
**मणिकनकमयी जसि तनु साध्वी व्हाया प्रिया सुख** निवेदी. ॥ ४०९ ॥
(द्रोण. ५.९३)

मतिची पडो हरिगुणीं, **पतिकंठीं मिठि जसी सुदारांची.** ॥ ४१० ॥
(सन्मनो. ६)

**हृदय** हरिजना, **कांता सतिनें उघडें करूनि ओपावें.** ॥ ४११ ॥
(सन्मनो. ४०)

**वरिति स्वयंवरवधू सद्गति सत्कीर्ति याचि सन्मरणीं.**॥४१२॥(कर्ण.७.४)

नव नव निघति विजयशर, **माहेरीं गीत जेंवि दळपांत.** ॥ ४१३ ॥
( कर्ण. १२.१६ )

प्रेमें नवीं नवीं तीं माझ्या रसनेसि सुकविकुलगीतें ।
गीतें यावीं, येती **माहेरीं जेंवि बहुत मुलगीतें.** ॥ ४१४ ॥
( सन्मनोरथराजि. २२ )

(अनुष्टुबार्ध) **धीला** सद्गुण हे जैसे **मुलीला** नग मोहिती. ॥ ४१५ ॥
( पुंडरीकप्रार्थना. ३७ )

(श्लोकचरण) भुले सुकविवाग्वधू तव गुणा **अनर्घ्या नगा.** ॥ ४१६ ॥ ( केका. ९९ )

**कौसुंभरंगरंजितवस्त्रानें शोभती जसी महिला,** ।
हतकटकरक्तरंगें आली शोभा रणीं तसी महिला. ॥४१७॥ ( कर्ण. ३३.१५ )

द्विजशाप **मान्य पतिसा** गुरु, तीस **न** कर्ण **मान्य चाकरसा.** ॥४१८॥
( कर्ण. ४९.३७ )

निश्चित धरा रथातें, पलपिंडातें गिळी जसी मकरी, ।
**जाररता कुलटासी,** पतिबांधवघात हा असीम करी. ॥ ४१९ ॥ (कर्ण. ६.५५)
शुंडा तसि होय, बळें **जसि पडली साधुच्या गळां कुलटा.** ॥ ४२० ॥
भीष्मद्रोणवियोगज्वरतप्ता निज मनांत तव सेना, ।
**इच्छी आलिंगाया** कर्णातें, **अन्य कांत गवसेना.** ॥ ४२१ ॥ (कर्ण. ७.६)
त्या कर्णाच्या अंगीं खोंवी आपुंख धर्म शर तीस, ।
परि कर्णशक्ति न दमे; **कलहीं कुलटा अजिंक्य गरतीस.** ॥ ४२२ ॥
( कर्ण. ३१.६ )

**होय सतीस प्रेमें उत्सव पाहोनि नित्य कांत, नवा;** ।
विधु पाहतां चकोरां, प्रभुमूर्तिविलोकनीं हि शांतनवा. ॥४२३॥ (भीष्मभक्ति. १०९)
त्या स्तुतिमणिमालेनें कुरुवर **भक्तिस्वयंवरवधूतें** ।
**मूर्तश्रीभाग्यें वरि;** जें मनिं धरिजें शिवेंहि अवधूतें. ॥ ४२४ ॥
( भीष्मभक्ति. ११५ )

**मुग्धा मतिस पहाया,** तसि माझी दृष्टि, नरळली **लाजे.** ॥ ४२५ ॥
( अनुशासन. ३.६३ )

**स्वप्रियलब्धरसकथन करिती स्वसखीजनीं जसी बाला,** ।
प्रेमळजनीं करूं निजसुख रसना स्तवुनि आपल्या भाला. ॥ ४२६ ॥
( सन्मनोरथ. ४२ )

ऊर्वश्यादि सहस्र प्रभुपदपरिचारिका स्त्रिया धन्या ।
पाहुनि लज्जित झाल्या, **नागरकन्या पुढें जशा वन्या.** ॥ ४२७ ॥
( अवतारमाला. ३६ )

म्यां कीर्तना टपावें, मार्जारें सर्वदा जसें दुग्धा, ।
मन्मति विनयादिगुणां वाहो, **प्रेमें नगा जसी मुग्धा.** ॥ ४२८ ॥ (सन्मनो. ३८)

सत्पदरजांहुनि अधिक मज चिंतामणि सुरद्रु न गमावे, ।
सन्नतमति**महिलांगीं नवनव** सेवाधिकार **नग** मावे. ॥ ४२९ ॥
( सन्मनोरथ. ६४ )

स्त्रीस जसें न त्यजवे केलें उच्छिष्ट मांजरें दुभतें, ।
सद्भजन दूषिलें जरि दुष्टें, सद्बुद्धि न त्यजूं शुभ तें. ॥ ४३० ॥ ( सन्मनोरथ. ८ )

पूज्य असो मतिस जसा जन **जैसा जड अशक्त जामाता,** ।
सद्दृष्टि या जनीं अवलोकुनि लाजोत साधु **ज्या माता.** ॥ ४३१ ॥
( सन्मनो. १५ )

**भाग्यवतीला दुर्बळ कन्यासी** सत्सभेसि हे उक्ति ।
**व्हावी परिपाल्या कीं** घेती शिशुचीहि जाणते युक्ति. ॥ ४३२ ॥
( सन्मनो. १९ )

**साध्वी स्त्रीनें** न ढळों द्यावा हा **सुमतिनें तसा पदर,** ।
सेवावें रसिकें वच याचें श्रीराघवें जसें बदर. ॥ ४३३ ॥ ( सन्मनो. २५ )

**साध्वीला जें कांहीं कांतप्रिय तेंचि कार्य होय जनीं.** ।
स्वाहाधवानभिमतीं आग्रह काशास आर्य हो ! यजनीं. ॥ ४३४ ॥ ( सन्मनो. २९ )

**निश्चय करुनि, न मागें तिळही ठेवी पतिव्रता चरण,** ।
भगवद्भजनीं माझी तैसीच करू मति व्रताचरण. ॥ ४३५ ॥ ( सन्मनो. ३० )

भजुनि कुमतिला बुडतो, **सुसमर्थहि सर्व जेंवि गणिकेला.** ॥ ४३६ ॥
( मल्लारिविजय ४७ )

**कीं कुलवतीस गुरुजनभजन न घडतां, वृथा जिणें वाटे.** ॥ ४३७ ॥
( आश्रम. ३२ )

**श्वश्रूकर जेंवि शिरे गेहीं जरि न ह्मणती सुना सीर;** ।
व्यूहीं तेंवि कुरुचमू धिक्कारुनि तो धराशुनासीर. ॥ ४३८ ॥ ( द्रोण. १०.३१ )

**सासू करी उपेक्षा** त्यागीना **स्वविनयासि परि सून.** ॥ ४३९ ॥
( अश्वमेध. १.१८ )

तद्भार्या अनसूया मजवरि करि **सासुमायसी** माया. ॥ ४४० ॥
( सीतारामायण. १२ )

**श्वश्रूपुढें स्नुषा,** तसि भक्तिपुढें शक्ति नच नटावी हो. ! ॥४४१॥ (भीष्म.५.४८)

शोचूं नयेचि सुज्ञें, **जैसी कन्या निवेदिली पतितें.** ॥४४२॥ (उद्योग. ३.४२)

कीर्तन असो मतिस बहु मत, **जैसें स्त्रीस हळदकुंकु** तरी. ॥ ४४३ ॥
( सन्मनो. ४३ )

वरि संकोच असावा आंत बहुत कृष्णकीर्तनीं काम; ।
**गुरुजनसमक्ष पतिचें घेतां आर्याग्रहें जसें नाम.** ॥ ४४४ ॥
( सन्मनोरथ. ५६ )

मुख्य स्वबंधु पांडव, तन्नाशार्तेंचि हे अकवि टपती, ।
**विश्वस्तां** मीनांतें **परदारांतें** जसे बक **विट-पती.** ॥ ४४५ ॥ (उद्योग. ८.९)

**क्लीबाला कन्यासी** तुज कां द्यावी बळेंचि हे महि म्यां? ॥ ४४६ ॥
(उद्योग. १०.९४)

तसेंच, सरस उपमेचीं कांहीं उदाहरणें केकावलि पृ० ३३७-३३८ यांत दिलीं आहेत तीं पाहावीं.

**बांधी बाहुगुणांनीं दक्षा वामा, न मान दामानीं.** ॥ ४४७ ॥
(उद्योग. १३.१६२)

**वृद्धकलत्र युव्या,** मज हें तेंवि पहावयासि पद लागे. ॥४४८॥(विराट.१.११८)

संगासि उर्वशीच्या स्वप्नीं तरि काय गा! ढवा लाहे? ।
सैरंध्री वीरवधू या तुज नरकाय गाढवाला हे. ॥ ४४९ ॥ (विराट. १.३३)

उलटा आंत, स्पष्ट व्यवहार दहांत दाखवी सुलटा, ।
मन्मति हो तैसी **परपुरुषासक्ता सदा जसी कुलटा.** ॥ ४५० ॥
(सन्मनो. ४५)

वाटावें इतरांचें, **कामिजना परकलत्र सुंदरसें.** ॥ ४५१ ॥ (सन्मनो. ६६)

क्रीडावें मुक्तींनीं, **माहेरीं जेंवि लाडक्या मुलिनीं.** ॥४५२॥ (गंगास्तुति३५)

(श्लोकार्ध) तत्बाणाहत ते **अधःपतनभाक्** झाले महासंगरीं ।
**जो कन्याद्रविणें स्वजीवन करी तत्पूर्वजांचे परी.** ॥ ४५३ ॥
(कुशलवो० ७.३६)

मुलीच्या लग्नाचा पैसा घेऊन त्यावर उपजीविका करणाऱ्या वधूपित्याप्रमाणें मुलाच्या लग्नाचा चापून हुंडा घेऊन मुलीच्या आईबापांना तळतळत ठेवणारे वरपिते नर हेहि क्षुद्रार्थी होऊन नरकभाक् होत नाहींत काय? वर दिलेल्या भिन्नभिन्न विषयांवरील मोरोपंतांच्या उपमा वाचून तत्कालीन परिस्थिति, चालिरीति वगैरे गोष्टीवर पुष्कळच प्रकाश पडून पंतांचे त्यासंबंधी विचारही कळून येतात. असाच प्रकार त्यांच्या काव्यांत इतरत्र त्यांनीं केलेल्या वर्णनावरूनही कळून येतो. पुढील परिशिष्ट 'ड' पहा.





## परिशिष्ट--ड





### मोरोपंताचे तत्कालीन परिस्थिति, चालीरीति वगैरे गोष्टींविषयीं कांहीं विचार.

हें परिशिष्ट त्रोटक असून केवळ दिक्प्रदर्शनापुरतेंच आहे. मागल्या **'मोरोपंताच्या उपमा'** या 'ठ' परिशिष्टांत यासंबंधीं बरेच विचार आले आहेत. येथें फक्त स्वतंत्र रीतीनें आलेले तत्संबंधीं आणखी कांहीं विचार ग्रथित केले आहेत. पंतांच्या शोधक वाचकांस या दृष्टीनें विचार करण्यास मुबलक जागा आहे. स्थलसंकोचास्तव यापेक्षां जास्ती विचार येथें घेतां येत नाहींत.

**१ कौटुंबिक प्रेमः-**

**(अ) अपत्यवात्सल्य मातापित्यांचें:-**

**(१) कन्यापुत्राची समानताः-**

पुत्रचि अधिक, न कन्या, अन्यास गमे, मला न लोभ्याला. ।
नयनयुगांतुनि एकहि द्याया स्वप्नीं न कोण तो भ्याला ? ॥१॥ ( आदि. ३१.१८ )

**(२) कन्येची इच्छाः-**

जनककुळाहुनि पतिकुळ अधिक असावें असा वधूकाम. ॥२॥ (हरिवंश ३५...)

**(३) कन्येविषयीं समजूतः-**

परिसे असें पृथा जों तोंचि ह्मणे त्यांसि कन्यका, मातें ।

द्या, **द्यायाचीच सुता, हे किमपि न येचि अन्य कामातें.** ॥ ३ ॥
आत्मा पुत्र, सखा स्त्री,**कन्या चिंताचि** सर्व काळ, जिला ।
प्रसवोनि वाहती मनिं श्रीमंतहि पितर सर्व काळजिला. ॥४॥(आदि. ३१.२८.२९)
'सुता असाव्या ! ही इच्छा अरिसहि न शिवो' ॥५॥ ( उद्योग. १३.२०१ )

**(४) सामान्यः–**

मन मातेचें चितुनि अगुणाहि मृता मुलास कळकळतें. ॥६॥ ( स्त्रीपर्व. ३.९ )
चिरतें काळिज कानीं कन्येचें करुणवच जसें शिरतें. ॥७॥ ( स्त्रीपर्व. ५. २३ )
द्यावें वचनकराला प्रेमें सर्वस्व वतन यश तातें. ॥८॥ ( हरिवंश. २९. )
अहित कथील तरि कसा गुरु ? बाप कसा ? तसीच आइ कसी ? ॥९॥(उद्योग.९.७४)
मातृस्तन्यावांचुनि शिशुचा कृश होय वरदुधे काय. ।
बालकपालक जननीस्नेहचि, बोलोनि बहु बुधें काय ? ॥ १० ॥ (नाममाहात्म्य७४)

**(आ) अविभक्त कुटुंबस्थितिः–**

**(१) पितृप्रेम कन्येचें:–**

**कन्या जशि पितृभाग्यें**, साधुयशें तेंवि **फुगति** देवधुनी. ॥ ११ ॥
( साधुसत्कार १० )

**(२) पितृमातृप्रेमः–**

भगवंत भगवदनुगां, आह्मां तों संत सदनुगां ठावें. ।
**बाळें प्रथम बयेचे, बापाचे तदनु चरण गांठावे.** ॥ १२ ॥
( साधुसत्कार ३० )

मज दीना देवाहुनि अधिक तुह्मी संत सर्वथा धर्मे. ।
**बाळा जेंवि पित्याहुनि** अधिका माताचि द्यावया शर्मे. ॥ १३ ॥
( साधुसत्कार ३१ )

**(३) बंधुप्रेमः–**

आत्मा जसा तसाचि **भ्राता** येथें न भेद कांहींच ।
वेदस्मृतिशास्त्रमतें; स्वानुभवेंही विशेष नाहींच. ॥ १४ ॥ ( स्त्रीपर्व. ३.३६ )
यश सुख पुण्य मिळे, मग बंधूंनीं नीट कां न नांदावें ? ॥१५॥ ( आदि. ३७.२४ )

लक्ष्मणाचें बंधुप्रेम राम वसिष्ठादि गुरुजनांजवळ वर्णितोः–

"वदे राम, 'स्वामी ! सुमति धृति दे हा समवन,
प्रभो ! नित्य प्रेमें करि, गमवि गेहासम वन. ।
न सौमित्रि भ्राता, सकळगुरुसुस्नेह सजला,
प्रवासीं रक्षाया द्रवुनि मजला स्पष्ट भजला.' ॥ १६ ॥" ( श्रीगुरुरामायण २३ )

रामलक्ष्मणांचें बंधुप्रेम वर्णितांना कवि ह्मणतातः–

छाया तनूची तनुला न सोडी । त्या बंधुंची एक तशीच जोडी ॥
परस्परीं त्यांसि अपार गोडी । त्या मित्रभावा उपमाचि थोडी. ॥१७॥ (छंदोरामायण).

रामभरतांचें बंधुप्रेम सीतारामायणांत सीता वर्णन करित्येः–

(श्लोक) तीर्थ, क्षेत्र, तपोवनें, मुनिजन प्रेमार्द्रधी पाहुनी,
स्वामी या विषया पुरा विसरते, पुण्याश्रमीं राहुनी; ।
स्वप्नीं न त्यजिते विरक्ति; असती चित्तें सखी हो ! ढिले,
आले, गाय तसेचि, वत्सभरतस्नेहेंच्चि हे ओढिले. ॥ १८ ॥ (सीतारामायण १७८)

## (इ) साध्वीधर्म व साध्वीचें पतिप्रेमः–

पतिच्या छंदें केलें व्रततप जें काय सर्व तें फळतें. ॥ १९ ॥ ( हरिवंश. २६.६५ )
मज भक्षीलचि तो (=राक्षस) तरि विधुरपणें सर्वथा नका राहूं, ।
ती स्त्री मीच, ह्मणा, जी ! मागे सारूनिया नकारा, हूं. ॥२०॥ ( आदि. ३१.२६ )

## (ई) सासूसासऱ्यांचें जामात्यावरील प्रेमः–

सासूसि सासऱ्यासहि सुतशतसत्कार्य होय **जामाता;** ।
विहिणीव्याह्याकरवीं धुवविति निजपादतोयजा माता. ॥२१॥ ( उद्योग. २१९ )
बहुतकरुनि तों एका कन्येच्या या जनांत जा (=ज्या) माता, ।
त्यांसि गमे स्वतनुपरिस अधिक सुतासूनुपरिस जामाता. ॥२२॥ ( स्त्रीपर्व ५.२१ )
यद्यपि चिंताकारण दे कन्या त्यांसि एक, जामाता– ।
कन्यांच्या संसारीं त्यां होय सुधाभिषेक जा (=ज्या) माता ॥२३॥ (मंत्रभागवत १०)

## (उ) सासूसासऱ्यांचें सुनेवर प्रेमः–

## (१) सासऱ्याचें प्रेमः–

अग्निशुद्धीनंतर दशरथमामंजीनीं दाखविलेलें सीतास्नुषेवरील प्रेम व त्यांनी केलेला
(त्या)चा गौरवः–

(श्लोक) संसारीं असतात साधु कुलज स्नेहाढ्य के सासरे,
मामाजी परि एक, यासह दुजा साम्यास कैसा सरे ? ।
पोटासीं धरिलें, सये ! मज शिरीं हुंगोनियां दाटले,
प्रेमें तातच्चि वाटले, नयनिचे नाहीं झरे आटले ! ॥ २४ ॥

(गीति) अस्मद्दर्शनशोकें, तृणसें सर्वस्व जीवित त्यजुनी, ।
स्वर्गीहि खिन्न होते; प्रीति नव्हे सन्मनांत सत्य जुनी. ॥ २५ ॥
मातें ते वदले, 'तुवां उपवनें, तैसींच वत्से ! वनें,
केलीं; जें पतिभक्तिसद्व्रत सतीसर्वस्व, तत्सेवनें ।
भर्ता तारुनि संकटीं, कविसभा श्रीसंपदे, वारिला,
विश्वोपद्रव, जाहला तव तपें या कंप देवारिला. ॥ २६ ॥
'त्वां सूर्यवंश सुयशें सति ! धन्य केला, । वैदेह धन्य तुज पावुनि कन्यकेला,' ॥
प्रेमें असा मज दिला बहुमान, लज्जा । सांगे मदीय नयनांसि 'पदींच मज्जा.' ॥२७॥
( सीतारामायण १५०–१५३ )

**(२) सासूचें प्रेमः—**

कौसल्यासासूबाई सीतास्नुषेचें गौरव करितांना ह्मणतेः—

(श्लोक) श्वश्रूतें क्षितिजा नमी, तंव तिहीं आलिंगिली आदरें,
कौशल्या मग ते वदे सुचुबुकीं स्पर्शोनि तीतें करें, ।
'रामाशीं चिरकाळ सर्वगुणसंपूर्णा स्वपत्या रहा,
पातिव्रत्यबळें तुझ्याचि तरला दुःखाब्धिला वत्स हा. ॥ २८ ॥
वत्से ! तूं रघुवंशभूषणमणी, स्तुत्या सतींच्या गणीं,
चारित्रासि तुझ्या सुरेंद्ररमणी गाती सुखे स्वांगणीं; ।
त्वत्कोपेचि दशास्य दुर्मति कथाशेष त्रिलोकांत या
झाला, कोण असा असे त्रिभुवनीं मारावयाला तया ?' ॥ २९ ॥

( कुशलवोपाख्यान १.११–१२ )

अत्रिभार्या अनसूया हिचें सीतेवर स्नुपाकन्यासदृश प्रेमः—

(श्लोक) वेणी घालुनि, लोचनीं निजकरें, ती लेववी कज्जळ;
लावी चंदन, सुव्रता; मज गमे गंगाचि तें तज्जळ. ।
गुंफी सत्कुसुमें शिरीं, सुरुचिरा माळा गळां अर्पुनी, ।
प्रेमें धर्म कथी, सुधाधिकरसें सूक्तें मला तर्पुनी. ॥ ३० ॥

(गीति) तैसाचि मल्ललाटीं, साध्वी सिंदूरतिलक जो लावी, ।
तोहि अगतसार सदा, कैसी तत्सुकृतकीर्ति बोलावी ? ॥ ३१ ॥
वत्से ! मांडवि ! मद्विवाहचरित प्रेमें पुसे ती सती,
सांगावी मज लागली, निजमुखें सर्वा कथा तीस ती. ।
आशीर्वाद वहु प्रसन्नहृदया, दे मायसी लोभवी;
त्या आर्येसि, तसेंचि ईसहि महावात्सल्य हें शोभवी. ॥ ३२ ॥

( सीतारामायण १३,१४,१७ )

**(ऊ) स्वामीचें सेवकावरील प्रेम व सेवकाची लीनताः—**

मारुतीनें सीताशुद्धी करून सीतेचा चूडामणि रामास आणून दिला तेव्हांचें वर्णन लक्ष्मण वसिष्ठादिगुरुजनांजवळ करितोः—

(श्लोक) आर्येचा, प्रभुला, पदें नमुनियां, दे वीर चूडामणी,
त्या आलिंगुनि हा निवे बहु जसा सच्चंदनाला फणी; ।
घे माथां उपकार मेरुहुनही भारी स्वचित्तीं गणी,
याचा होय हरिप्रवीरनिकरीं बंदी रघूंचा धणी. ॥ ३३ ॥
रघुपति ह्मणे, 'याचा साचा ऋणीच सदा असे'
हृदय कळवी शांता दांता स्वसाधुसदा असें. ।
हरि वरि न तो पाहे साहेचिना स्तवभार हा,
कवि म्हणति, 'या लोकीं शोकीं न मज्जुनि बा ! रहा.'॥३४॥ (श्रीगुरुरामायण३१,३२)

**२ कलिकाळांत मंत्रतेज प्रतिवर्षीं कमी होतें:—**

कलिकाळीं मंत्रांचें तेज प्रतिवासरीं क्षया जाय. ।
तेज चढे तुज नामा ! बहु मानें काळ हा तुला काय ? ॥ ( नाममाहात्म्य ९ )

**३ कळींतील जुलमी राजे:-**

कलिमाजि क्षुद्र नृप प्रजेसि देती धनार्थ बहु ताप, ।
पापप्रसक्त लोभी न पहाती धर्म माय कीं बाप. ॥ ३६ ॥ (आर्याकेकावलि ४९)

**४ कारभाऱ्याची जरब:-**

सत्संग **कारभारी** भारी मारी मुकुंद चित्तातें; ।
जड उद्धरवुनि घेतो, देतो जोडुनि सुकीर्तिवित्तातें. ॥ ३७ ॥ (सत्संगस्तव ५३)

**५ काश्यां हि मरणान्मुक्तिः-**

मज दीना अर्थिजना स्वभजन सप्रेम या मह्या दे बा ! ।
**काशींत मरण** वरदप्रवरा ! विश्वेश्वरा ! महादेवा ! ॥ ३८ ॥ (विश्वेशस्तुति २२)

**६ काशींत मरणसमयीं उजवा कान उपदेशग्रहणार्थ वर होतो:-**

**मरणावसरीं सर्व प्राण्यांचा होय दक्ष कान वरी.** ।
उपदेश करिसि ज्या, तो मुक्तीस विचारदक्ष कां न वरी ? ॥ ३९ ॥ (विश्वेशस्तुति ९)

**७ खंडोबास भंडारादि प्रियः-**

**उधळिन भंडार** ह्मणे तुज भाकर भरित जों निवेदीन, ।
होउनि सफळमनोरथ तों करुणासागरा ! निवे दीन. ॥ ४० ॥ ( खंडोबास्तव ४ )

**८ गोड पदार्थांचा वीट आला तर आलें मीठ खातातः—**

ये बहु गोडरसें बहु वीट, म्हणुनि सेविती लवण आलें. ।
तूं न तसा, नामरसा सेवुनि विषयाकडे कवण आलें ? ॥ ४१ ॥ (नाममाहात्म्य ७९)

**९ गर्भाधानप्रसंगींची चालः-**

ठावें असोनि सर्वहि, 'पतिच्या खोलींत कोंडवा सून,' ।
ऐसें स्वसख्यापाशीं कांगे ! वदलीस तोंड वासून ? ॥ ४२ ॥ ( उद्योग. १३.२०५ )
दायांतें आयांतें ह्मणत्ये, 'मज लाविली बळेंच सवें, ।
कां मोडितां तुह्मींच ? क्षण आतां स्वपति वेगळें नसवें. ॥ ४३ ॥
पतिजवळुनि कां नेता नेउनि हितबोध करुनि खोलींत ? ।
तुमच्याहि असें अंतर पडलें कां गे ! क्रियेंत बोलींत.' ॥४४॥ (स्त्रीपर्व. ४.५८.५९)

**१० चिखलांत रुतलेली गाय बाहेर काढण्याचें पुण्य:-**

पंकांत दैवयोगे जी, पावलिया श्रमा, रुते गाय, ।
तीचा उद्धर्ता जो, त्यासि सकळ लोक मारुते ! गाय. ॥ ४५ ॥ ( नामरसायन ३८ )

**११ देवदर्शनार्थ जाणारी स्त्रीपुरुष मंडळी:-**

भट, संत, पंत, पंडित, हरिपदरत त्यांत फारसे नसती, ।
**देवसदनिं बहु फिरती** बाया, परि त्यांत विरल लीन सती. ॥४६॥ ( स्फुट )

**१२ दैववादः**–दैववादाचा स्वीकार पंतांनीं आपल्या काव्यांतून वारंवार केलेला आढळतो. त्यांतील थोडीं उदाहरणें परिशिष्ट–'ठ' पृ० १८९ (११) यांत दिलीं आहेत. येथें आणखीं थोडीं उदाहरणें देतोंः–

(१) **न चुकेचि भावि,** चुकतें तरि मृत्यु न व्हावयासि कामरण।
करिताचि भीष्म, येतें मग त्या मध्यमवयांत कां मरण ॥४७॥ (आदि. १४.१७)

(२) माद्री ह्मणे, 'न म्यां, नरदेव **नियतिनेंचि** भुलविला साचा' ॥ ४८ ॥
(आदि. १९. ११)

(३) चाला अवश्य येतों, **भावि चुकेनाचि जें भलें खोटें.** ॥ ४९ ॥
(सभा. ३. ६२)

(४) कृष्णा ह्मणे, '**समर्थ** न कोणीही सुज्ञ **भावि टाळाया.**॥५०॥ (सभा. ४.१०१)

तसेंच सभा. अ० ७.५५ 'बलजलनिधिनें····', वन. ४.२१८ 'मग पुण्यश्लोक ह्मणे····', मंत्रभागवत ४,४४ 'जायचि, अवश्य होतो होणार अनर्थ अर्थ जो भावी'

**१३ पतिपूर्वी मरण, सतीची चाल, विधवेची अनुकंपनीय स्थिति, पतिमरणोत्तर केशवपनः–**

पतिपूर्वी स्त्रीस मरण हे लग्नाहूनि काय हो! ऊन।
न रहावेंचि सतीनें पळभरहि विरूपकाय होऊन. ॥५१॥ (आदि. ३१.२३)
शिव! शिव ह्मणेल मरणावधि वैधव्याधिमग्न बाला हो! ॥५२॥ (द्रोण. ७.२३)

**१४ परिस, चिंतामणि कल्पतरु याविषयींची समजूतः–**

**स्पर्शमणि** सुवर्ण करी, दे स्पर्शमणित्व तो न लोहातें.।
हा साधुसंग करितो साधु असाधुसि, हरूनि मोहातें. ॥ ५३ ॥ (सत्संगस्तव ४०)
'सत्संगम **चिंतामणि**मंदिर' ऐसें कित्येक वदतात.।
परि न समीचीन दिसे; हा देतो जेंवि आत्मपद तात. ॥ ५४ ॥ (सत्संगस्तव ४१)
(श्लोक) सदय पद यशा निर्मला निरुपम सदाही संत.।
**सुरतरु,** यांचें ऐकतां सुचरित ह्मणती 'हंत!' ॥ ५५ ॥' (सद्वर्णन ३)

**१५ बारा वर्षांनीं भेट घेणें ती विधिपूर्वक घ्यावीः–**

कीं भेटि बहु दिसां; भय भेटाया दीनबंधुला वाटे.।
तरि भेटावें विधिनें; गेले जाताति साधु ज्या वाटे. ॥ ५६ ॥ (संशयरत्नमाला ४२)

**१६ बाहेर जावयास निघतांना हटकलें असतां अपशकुनः–**

उठतां बहु त्वरेनें, 'कोठें जातां?' असें तुह्मां देवी।
पुसती झाली जाणों, **पुसतां, ज्ञाता पुढें न पद ठेवी.** ॥ ५७ ॥
(संशयरत्नमाला १)

**१७ बागुलबोवाचें भयः–**

कीं 'भीतो भ्रांत वृथा; मृगजळमग्नासि काय तारावें?'।
ह्मणतां असें कसें? **शिशुभय जाया बागुलासि** मारावें. ॥ ५८ ॥
(संशयरत्न. १८)

**१८ ब्रह्मदेव प्राण्याच्या कपाळावर त्याचें कर्म लिहितोः-**

श्रीकाशि तुझे दर्शन बहु हर्षद, निर्धना जसें निधिचें. ।
लिहितें भाग्य ललाटीं, **लिहिणें मोडोनि सर्वही विधिचें.** ॥ ५९ ॥
( काशीस्तुति ७ )

**१९ मुहूर्तावर विश्वासः-**

प्रायः **सुमुहूर्ताचा** शोध करायासि लागला वेळ. ।
होय महत्कार्य, परि प्रभुचा तों नित्य सहज हा खेळ. ॥ ६० ॥ ( संशयरत्न. ७ )

**२० राजे लोक राघु पाळून बोलण्यास शिकवितातः-**

निजपटुसेवकवदनें, आपणही, पढवितात कीरा जे, ।
'तत्कलभाषण' ह्मणती 'अमृताहुनि मधुर' 'कौतुकी राजे'. ॥ ६१ ॥
( नामरसायन. ७० )

**२१ रामकीर्तनस्थळीं मारुतिराय कथाश्रवणास उभेः-**

जेथें जेथे कीर्तन, तेथें तेथें उभाचि तूं अससी. ।
श्रीरामनामसद्रसपानीं अतिद्दावरा कसा बससी ॥ ६२ ॥ ( नामरसायन २९ )
जेथे प्रभुचें कीर्तन, तेथें तूं वससि हस्त जोडून, ।
मोडून मनचि अन्य व्यवहार समस्त सर्व सोडून. ॥ ६३ ॥ ( मारुतिस्तुति ३८ )

**२२ विवाहांत पायघड्यावरून वरपक्षीय वऱ्हाड्यांनीं जाण्याची चालः-**

राम-जयश्री-लग्नीं लंका घाली सुनील पाटावें ।
सेना-वऱ्हाडिणीला **पायघडी** कां असें न वाटावें ? ॥ ६४ ॥ ( वनपर्व १२.१२ )
तसेंच, सन्मनोरथराजि ३६ पहाः- ( 'संसारदुःख...पायघडी.' )

**२३ विवाहांत 'शुभमुहूर्तः सावधान' ह्मणण्याची चालः-**

द्विज **'सावधान'** ऐसें सर्वत्र विवाहमंगलीं ह्मणती. ।
तें एक रामदासें आयकिलें; त्या असो सदा प्रणती. ॥ ६५ ॥
( रामदासगुणवर्णन १ )

**२४ विवाहांत वधूवरांस हळद लावण्याची चालः-**

जळद बळद सस्याला, हरिभजना साधुसंग हा बळद. ।
मुक्तिस मुमुक्षुस करें आपण सत्संग लावितो हळद. ॥ ६६ ॥ ( सत्संगस्तव ५१ )

**२५ व्रतांत मौन व एकस्थळीं वासः-**

कीं कांहीं **व्रतनियमीं बोलों चालों नये** असें झालें; ।
तरि दीनरक्षणाहुनि अधिकफलव्रत कधीं मना आलें ? ॥ ६७ ॥ (संशयरत्न. १८)

**२६ व्यंकटेशास नैवेद्य-आंबटतिखटतेलकट पदार्थांचाः-**

अर्पिति नैवेद्य तुज प्रेमभरें चिच तिखट तेलगट, ।
सत्तेनें वैकुंठीं शिरती द्वारीं करूनि ते लगट. ॥ ६८ ॥ ( व्यंकटेशप्रार्थना १९ )

**२७ शिशुशिक्षणः-**

स्तन पाजितां, निजवितां, हालवितां, बाळकासि खेळवितां, ।
दे बोध; जो सुदुर्लभ थोरासि सहस्रकल्प मेळवितां ! ॥६९॥ ( मदालसो. ५.१३ )

**२८ शीलदानयाचनाः-**

मज भणगाला वरदा ! वर जरि करुणा करूनि देशील ।
तरि मानवती सज्जन मनें जयाला, असेंचि दे **शील.** ॥७०॥ ( आर्या केका. ८९ )

**२९ शंकरास धोतरा प्रियः-**

स्वीकारा स्तवन, **कुसुम** भगवान् घेतो कसा **धुतरियाचे ?** ॥ ७१ ॥
( साधुसत्कार ३४ )

**३० सणांत आनंदः-**

जीवातें सत्संग स्वसुखें, तोयें भरी नद सरातें. ।
हा जें, न **पाडवा** प्रिय, **दिपावळिहि** न करी, न **दसरा,** तें॥७२॥(सत्संग २८)

**३१ स्त्रीजनांचें प्रेमः-**

कामोपभोगतुल्या प्रीति जगीं स्त्रीजना नसे दुसरी, ।
पतिच्या संगावांचुनि सर्व स्त्रीच्या वृथा कळाकुसरी. ॥ ७३ ॥ ( हरिवंश. ३५.६१ )
वरपुरुषसंग बायी ब्रह्मानंद स्त्रियांसि जाणावा. ॥७४॥ ( हरिवंश. ३६.७० )
( श्लोकचरण ) अलंकृतिमती सती मनिं स्फुरे, न जों संगती. ॥७५॥ (केका. १३)

*** ॐ श्रीगोपीजनवल्लभाय नमः ***



# शुद्धिपत्र.



## भाग २ रा.

मोरोपंतचरित्र पृ० ३२ ओळ तेरा याखालीं स्वलिखित ग्रंथाचीं पुढील नावें वाचावीं:- ( २४ ) अद्वैतमीमांसा, ( २५ ) अमरकोश, ( २६ ) आचारार्क, ( २७ ) आदित्यहृदय ( २८ ) कैवल्योपनिषट्टीका, ( २९ ) शृंगारतिलक, ( ३० ) सांख्यतत्त्वकौमुदी.

| पृ० | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| **परिशिष्ट 'उ'** | | | |
| २४ | १ | वर्णसंक्षेप | वर्णनसंक्षेप |
| **चरित्र.** | | | |
| ४६ | २९ | सावळा | सावता |
| ६० | ३ | वडीळ | वडील |
| ७२ | २२ | वीररसवर्णास | वीररसवर्णनास |
| १११ | २५ | सत्पुरुषदर्शनसमा, | सत्पुरुषदर्शनसमा- |
| ११५ | २६ | वरील | पुढील |
| १३२ | २० | श्रुतदेवानें | श्रुतदेव |
| १९२ | २५ | रघुनाथापंडितांचे | रघुनाथपंडिताचें |
| २०३ | २३ | अनामिक | अनामिका |



